

सदा प्रभुपदावरी निजसमर्पिलीसे तनू । कथेत मन गोविले कमल मालिकेसी जणू ।
मुखातुन जसा झरा सगुणभक्तिचा वाहतो । समर्थ गुणदास ते सतत मी नमस्कारितो ।।



सुप्रसन्नः समाधानी निश्चयी च दृढव्रती । सोऽस्तु मे वरदो नित्यं वरदानंदभारती ।।



## उद्याच्या उज्ज्वल भवितव्यासाठी

# ओंकार ट्रस्ट

(स्थापना २६ जुलै १९९१)

**रजिस्टर्ड ऑफिस :**

गुजरवाडी-निंबाळकरवाडी,
कात्रज, ता. हवेली, जि. पुणे - ४११०४३.

**पत्रव्यवहाराचा पत्ता :**

C/O **श्री. भा. वा. सातवळेकर**
७ चंद्रमा अर्पाटमेंट, नित्यानंद हॉल जवळ,
सिंहगड रोड, हिंगणे खुर्द, पुणे - ४११०५१
☎ : ०२०-२४३४५०६१

**मुंबई सार्वजनिक विश्वस्त कायदा १९५० अन्वये नोंदणीकृत संस्था नोंदणी क्रमांक ई १५०५ दिनांक १० ऑक्टोबर १९९१**

**कलम ८० ग खाली आयकर सवलत**





**संस्थापक कार्यवाह**

**कै. सौ. वसुंधरा भा. सातवळेकर**

---

**संस्कार वर्ग संचालक**

**सौ. ज्योती शेटे** | **सौ. रेखा मिटकर** | **श्रीमती मालती निमोणकर**
**सौ. नीता पटवर्धन**

---


ओंकार ट्रस्ट २०१४ चा **''प.पू. स्वामी वरदानंद भारती''** विशेषांक, संपादक सौ. कल्याणी अशोक शिवले (उज्वला काळे), ट्रस्टी यांनी प्रतिमा ऑफसेट, पुणे - २९ येथे छापून श्री. भालचंद्र वा. सातवळेकर, यांनी ७ चंद्रमा अर्पाटमेंट, नित्यानंद हॉल जवळ, सिंहगड रोड, हिंगणे खुर्द, पुणे - ४११०५१ येथे प्रकाशित केला आहे.

टीप : १) सदरचा विशेषांक **फक्त खासगी वितरणासाठी** आहे.

२) या अंकात प्रसिद्ध झालेल्या लेखनाशी संपादक सहमत असतीलच असे नाही.

**अक्षरजुळणी आणि छपाई :** प्रतिमा ऑफसेट, पुणे - २९. फोन : २५४६०२१६. ई-मेल : **pratimaoffset@gmail.com**

# अध्यक्षीय मनोगत

१९९१ पासून कार्यरत असणाऱ्या 'ओंकार न्यासा' तर्फे दरवर्षी 'कल्याणी' विशेषांक प्रसिद्ध केला जातो. एका संताचे जीवन व त्यांचे कार्य यावर अंक आधारित असतो. हे करण्यामागे आमचा उद्देश असा असतो की, संतांचे जीवन, त्यांनी केलेले सामाजिक, आध्यात्मिक कार्य, त्यांची शिकवण, त्यांचे साहित्य याची संकलित माहिती वाचकांना एकत्रित मिळावी. आत्तापर्यंत असे २२ अंक प्रकाशित झाले आहेत. या मालिकेतील या वर्षीचा २३वा वार्षिकांक आधुनिक काळातील एका असामान्य संतपुरुषावर म्हणजेच प.पू.स्वामी वरदानंद भारती यांच्यावर प्रकाशित करण्यास आम्हाला आनंद होत आहे. या अंकाचे प्रकाशन अतिशय योग्य तथापि तेवढेच व्यस्त व्यक्तिमत्त्व असणारे प.पू. स्वामी गोविंद देवगिरी महाराज उर्फ आचार्य किशोरजी व्यास यांचे शुभ हस्ते होत आहे. आमच्या दृष्टीने हा दुग्ध शर्करा योगच म्हणावा लागेल. कारण प.पू. स्वामी गोविंद देवगिरी महाराजांना स्वामी वरदानंदांचा सहवास लाभलेला आहे. दरवर्षीप्रमाणे हा विशेषांक ही सर्व वाचकांना आवडेल अशी आम्हास खात्री आहे.

हे विशेषांक प्रकाशित करीत असताना ज्या संतांच्या कार्यासाठी तो समर्पित करावयाचा असतो त्या संतांच्या निगडित संस्थांशी त्याचप्रमाणे त्या संताच्या साहित्याचा अभ्यास केलेल्या विद्वान व्यक्तींशी संपर्क साधून निरनिराळे विषय ठरविले जातात. निरनिराळ्या मान्यवर लेखकांकडून त्या त्या विषयावरील लेख प्रसिद्धीसाठी प्राप्त होतात. विषयांची पुनरावृत्ती होऊ नये असा उद्देश असतो. संपादकांना यासाठी काही महिने विशेष मेहनत घ्यावी लागते. अंकाचा दर्जा सतत उंचावत जावा व वाचकांच्या पसंतीस तो उतरावा असा कसून प्रयत्न असतो.

वार्षिक 'कल्याणी' विशेषांका व्यतिरिक्त न्यासाचे महत्त्वाचे कार्य गुजर-निंबाळकवाडी येथे न्यासाच्या एक एकर जागेमध्ये चालते. न्यासाने ही जागा २० वर्षांपूर्वी घेतली होती. जागा टेकडीवर असून तेथे सुमारे ४००० चौ.फूटाच्या तीन इमारती आहेत. जेथे गेल्या १४ वर्षांपासून निराधार-अर्ध निराधार मुलांना दत्तक घेऊन त्यांना अन्न-वस्त्र-निवारा या मूलभूत गरजा भागविण्याबरोबरच शिक्षणही दिले जाते. त्याचबरोबर त्यांना सुसंस्कारित केले जाते. सध्या तिथे १० मुले-मुली रहात आहेत. आमच्या एक विश्वस्त श्रीमती मालती निमोणकर या मुलांना सुसंस्कारित करण्याचे काम करीत आहेत. गावातील मुलेही त्यांच्या शिकवणीचा लाभ घेत आहेत.

गेल्या १६ वर्षांपासून न्यासातर्फे उत्कृष्ट सामाजिक कार्य करणाऱ्या व्यक्ती वा संस्थेस न्यासाच्या संस्थापिका कै.सौ. वसुंधरा सातवळेकर यांच्या नावे 'वसुंधरा कृतज्ञता पुरस्कार' दिला जातो. अकरा हजार रुपये रोख, मानपत्र व स्मृतिचिन्ह असे त्याचे स्वरूप असते. या वर्षीचा हा पुरस्कार पुण्याच्या येरवडा भागातील वस्त्यामध्ये- शिक्षण व इतर परिवर्तन घडवून आणणाऱ्या 'सुराज्य सर्वांगीण विकास प्रकल्प' या संस्थेस दिला जाणार आहे. गेल्या वर्षीचे पुरस्कारार्थी श्रीहरिओम् तथा सदाशिव मालशे यांना दिलेले मानपत्र आपणांस या अंकात वाचावयास मिळेल.

पुणे शहर जसे जवळपासच्या खेड्यातून पाय पसरू लागले तसे जागेचे भाव वाढत चालले. त्यामुळे त्या अनुषंगाने येणाऱ्या बऱ्या वाईट गोष्टी ओघाने आल्याच. अतिक्रमण हा त्यातील फार मोठा धोका आहे. संरक्षण म्हणून न्यासाच्या जागेला भिंत व त्यावर तारेचे कुंपण घालणे, त्याचप्रमाणे जागेचे सपाटीकरण करून घेण्याचे ठरविले आहे. लोकांकडून संपादित केलेला विश्वास व आर्थिक पाठबळ याच्या आधारेच न्यासाचे कार्य सुरू आहे. मिळविलेला विश्वास सार्थ करणे हे आमचे कर्तव्य आहे. त्यामुळे नियोजित काम तातडीने करणे अत्यावश्यक आहे. कामाला खर्च बराच येणार आहे. खात्री आहे की आपण आपल्या परीने यथायोग्य सहकार्य करालच. देणगीदारांना आयकर कायदा कलम ८० ग अन्वये प्राप्तीकरातून सूट मिळते.

अंकाबद्दलची अधिक माहिती आपणास अंकातील 'संपादकीय' मध्ये वाचावयास मिळेल. तर सन २०१३-१४ मध्ये न्यासाने केलेल्या कार्याची माहिती 'वाटचाल' मध्ये मिळू शकेल.

आपल्या सहकार्याची अपेक्षा करून मी हे मनोगत पुरे करतो.

धन्यवाद!

**म. वा. सरदेशपांडे**
अध्यक्ष



# संपादकीय



**सदाचार सन्नीती । तशीच ती तिसरी सद्‌वासना ।**
**जागृत असल्या रक्षण होते । जगताचे सज्जना ।।**

सदाचार, सन्नीती व सद्‌वासना ही त्रिसूत्री समाजात जागृत असेल, आचरणात असेल तरच जगताचे रक्षण होते.

असामान्य सद्‌गुरूभक्ती, संस्कृतीचा सार्थ अभिमान, जाज्वल्य देशभक्ती, चारी आश्रमांचे पालन, कुशल वैद्य, उत्तम प्रशासक, विचारवंत आणि थोर आध्यात्मिक जीवन जगणारे असे विविध पैलूंनी अलंकृत झालेले आधुनिक काळातील थोर संत श्री. अनंत दामोदर आठवले म्हणजेच प.पू. स्वामी वरदानंद भारती, त्यांच्या परिवारात ते पू.आप्पा म्हणून प्रिय होते. त्यांचे जीवन म्हणजे सांगोवांगींच्या गोष्टी नाहीत. त्यांचा सहवास लाभलेले भाग्यवान आपल्यात आहेत.

आज चैत्र वद्य एकादशी पू. स्वामींचा संन्यास दीक्षाग्रहण दिन. या दिवशी त्यांच्या जीवनकार्यावर केंद्रित केलेला २३वा 'कल्याणी' विशेषांक प्रकाशित करण्याचे भाग्य लाभणे ही केवळ त्यांचीच कृपा. इ.स.२०१४ हे वर्ष पू.स्वामींनी समाधी घेतल्याचे तपपूर्ती वर्ष. या वर्षात पू. वरदानंदांवर अंक प्रकाशित व्हावा अशी २०११ सालपासूनची म्हणजचे प.पू. दासगणू महाराजांचा अंक प्रकाशित केल्यापासूनची इच्छा होती. पू.स्वामींच्या वाङ्मयाचा बहुआयामी व्यक्तिमत्त्वाचा आणि कर्तृत्वाचा आढावा २५०-३०० पानी अंकात घेणे अवघड गोष्ट आहे.

इ.स. १९२० ते २००२ हा पू. स्वामींचा जीवनकाळ. प.पू. दासगणू महाराजांसारख्या संतांचे कृपाछत्र त्यांना लाभले. त्यांचे आजोबाच त्यांचे सद्‌गुरू होते. अंकांतील पहिले १२-१३ लेख त्यांच्या जीवनावर, त्यांच्या व्यक्तिमत्त्वावर, विचारांवर प्रकाश टाकणारे आहेत.

पू. अप्पांची ग्रंथसंपदा अलौकिक आहे. पू. दासगणू महाराजांच्या कवनाचे शेवटचे चरण त्यांनी वयाच्या अवघ्या पाचव्या वर्षी पूर्ण केले. वयाच्या बावीसाव्या वर्षी कोणत्याही संदर्भ ग्रंथाशिवाय श्रीकृष्ण कथामृत या महाकाव्याची रचना केली. गुणवत्ता आणि दर्जा यांत हा ग्रंथ अग्रेसर आहे. संतकवी श्रीदासगणू महाराज यांचे समग्र वाङ्मय खंड १ ते १०, सन १९६० ते १९६७ या कालावधीत पूर्ण केले. १९६१ साली निदान पंचक हा ग्रंथ लिहिला. बारा उपनिषदांवर त्यांनी भाष्य केले. १९७९ साली सर्वश्रुत मनोबोधाची निर्मिती केली. अनुवाद ज्ञानेश्वरी- ओवीला ओवी असा १०,००० ओव्यांचा ग्रंथ अवघ्या ३ महिन्यांत पूर्ण केला. तर ८००० ओव्यांचे ब्रह्मसूत्र केवळ ७० दिवसांत पूर्ण केले. प्रस्थानत्रयीवर भाष्य केल्यामुळे ते आचार्यपदाला पोहोचले. ११०० पानी मनुस्मृती सार्थ भाष्यग्रंथ त्यांनी समाधीच्या आधीच्या काही कालखंडात पूर्ण केला. श्रीदासगणू महाराज म्हणायचे, 'अनंताने मला मागे टाकले'

उपरोक्त ग्रंथसंपदेची ओळख करून देणाऱ्या लेखांची सुरुवात, त्यांनी लिहिलेल्या सद्‌गुरू षोडोशोपचार पूजा या छोट्या पुस्तिकेवरील लेखाने केली आहे. हेतू एवढाच की पू. आप्पांचे त्यांच्या सद्‌गुरूप्रती असणारे भाव प्रकट करून वाङ्मयावरील लेखांची सुरुवात व्हावी. याशिवाय अंकात त्यांच्या स्तोत्रवाङ्मयाचा, किर्तनोपयोगी आख्याने, पोवाडा इत्यादी वाङ्मयावरील लेखांचा समावेश आहे. थोडक्यात सांगावयाचे तर त्यांच्या समग्र वाङ्मयावरील विवेचन एकत्रित वाचता येईल व त्यातून त्यांचे मूळ उद्‌बोधक ग्रंथ वाचण्याची प्रेरणा वाचकांना होईल यासाठीचा हा प्रयत्न आहे. प्रयत्न केला आहे पण आकाशाला गवसणी घालणे अशक्य आहे याची पूर्ण जाणीव आहे. बालकाचे बोबडे बोलही माऊलीला गोड वाटतात. पू.अप्पा संत आहेत. माऊली आहेत. हा अल्पसा प्रयत्न ते नक्कीच गोड मानून घेतील असे वाटते.

अंक मूर्त रूपांत येण्यास मोलाचा वाटा आहे तो श्रीदासगणूपरिवारातील श्री. महेश आठवले, सौ. कल्याणीताई नामजोशी, श्री. विनायकराव नांदेडकर, कु.गार्गीताई देशपांडे, श्री.ग.प्र.परांजपे, श्री. प्रकाशराव मेहेंदळे आदींचा. ओंकार ट्रस्ट सदैव त्यांचा ऋणी आहे. नेहमीप्रमाणे अंकातील मान्यवर लेखकांनी लेख देऊन आम्हास उपकृत केले आहे. जाहिरातदार, देणगीदार यांचे पाठबळ तर आहेच. आम्ही त्यांचे आभारी आहोत.

अंकाबद्दलच्या आपल्या प्रतिक्रिया अवश्य कळवा.

धन्यवाद

**सौ. कल्याणी शिवले**
**(उज्वला काळे)**

।। जय जय रघुवीर समर्थ ।।

## वाटचाल २०१३-१४

२६ जुलै १९९१, गुरूपौर्णिमा या शुभदिनी 'ओंकार ट्रस्ट'ची स्थापना झाली. संत महंतांच्या शिकवणीने प्रेरित झालेली काही मध्यमवर्गीय मंडळी एकत्र आली. समाजकार्य म्हणजेच ईशकार्य हे या मंडळींचे ध्येय. कै. सौ. वसुंधरा सातवळेकर यांच्या पुढाकाराने या सर्वांनी ट्रस्टची स्थापना केली. **'शुद्ध बीजापोटी फळे रसाळ गोमटी'** या संत उक्तीनुसार गेली २३ वर्षे ईश्वरकृपेने, लोकाश्रयाने संस्थेचे कार्य व्यवस्थित चालू आहे. संस्थेमार्फत विविध समाजोपयोगी उपक्रम विनामूल्य राबविले जात आहेत.

उदा.- १) संस्कार वर्ग, २) हुशार व गरजू विद्यार्थिनीस शिष्यवृत्ती, ३) शालांत परीक्षेत संस्कृत व मराठीत प्रथम येणाऱ्या विद्यार्थ्यास पारितोषिक, ४) मुलांसाठी विविध स्पर्धा, ५) एक संत, त्याचे कार्य व वाङ्मय यावर दरवर्षी 'कल्याणी' विशेषांक, ५) उत्कृष्ट सामाजिक कार्य करणाऱ्या व्यक्ती अथवा संस्थेस पुरस्कार इत्यादी.

### आता टाकूया एक दृष्टिक्षेप या वर्षातील कार्यावर...

- २१/२/२०१३ रोजी 'योगी अरविंद' विशेषांकाचे प्रकाशन झाले, तसेच श्री. हरिओम तथा सदाशिव मालशे यांना 'वसुंधरा कृतज्ञता' पुरस्कार प्रदान करण्यात आला.
- माहे मार्च २०१३ मध्ये श्रीसमर्थ भक्त मा. सुनिलजी चिंचोलकर यांची 'स्वामी विवेकानंदां' विषयीची तीन दिवसांची व्याख्यानमाला आयोजित करण्यात आली होती.
- 'ओंकार ट्रस्ट' व 'अरविंद विचार मंच' यांच्या संयुक्त विद्यमाने नोव्हेंबर २०१३ मध्ये ३ दिवसांची 'योगी अरविंदा'च्या जीवनावरील व्याख्यानमाला आयोजित करण्यात आली.
- माहे डिसेंबर २०१३ मध्ये 'स्वरूप वर्धिनी'ने आयोजित केलेल्या क्रीडा स्पर्धेमध्ये ओंकार न्यासाचाही सहभाग होता.
- कर्वे स्त्री शिक्षण संस्था येथे निबंध स्पर्धा, योगासन स्पर्धा व पाठांतर स्पर्धा आयोजित केल्या गेल्या. निबंध स्पर्धेमध्ये ८वीच्या १९२ मुलींनी, योगासनाच्या स्पर्धेत ९२ मुलींनी सहभाग घेतला. पाठांतर स्पर्धा ५वी ते ७वी च्या मुलींसाठी घेण्यात आली.



**सन २०१३ चा 'वसुंधरा कृतज्ञता' पुरस्कार प्रा. मिलिंद जोशी यांचे हस्ते स्विकारताना 'श्रीहरिओम', शेजारी संस्थेचे अध्यक्ष श्री. म. वा. सरदेशपांडे**



**प्रकाशन सोहळा २०१३ च्या वेळी दीप प्रज्वलन**



## वाटचाल २०१३-१४



- माहे जानेवारी २०१४ मध्ये डॉ.सौ. आरती दातार यांचे बहीणाबाई चौधरी यांच्या रचनांवर आधारित त्यांच्या जीवनाची ओळख करून देणारे प्रवचन झाले.
- न्यासातर्फे १० गरीब निराधार मुलांचा सांभाळ करण्यात येतो. त्या मुलामुलींनी शाळेत खेळ, पाठांतर, गायन, पाककला इत्यादि विविध स्पर्धात बक्षिसे मिळविली.
- न्यासाच्या हितचिंतकांनी, परिचितांनी आपले, आपल्या नातेवाईकांचे वाढदिवस न्यासाच्या मुलांबरोबर साजरे करून एक वेगळा अनुभव घेतला.
- 'नीलज्योत' या संस्थेने ओंकार न्यासास मदत म्हणून एक 'नृत्यस्पर्धा' आयोजित केली होती. या संस्थेने ओंकार न्यासास शिवणयंत्र भेट दिले.
- २०१३ च्या दुष्काळाने तोंडचे पाणी पळाले होते. 'स्वरूपवर्धिनी' या संस्थेने दुष्काळग्रस्त भागांत टँकरने येणाऱ्या पाण्याची साठवण करण्यासाठी टाक्या पुरविल्या. त्यांच्याबरोबर आपल्या न्यासामार्फतही कोरेगांव भीमा जवळील ठाकरवाडी या वाडीला पाण्याच्या पाच टाक्या पुरविण्यात आल्या.
- दि. २६-३-१४ ते २८-३-१४ तीन दिवस 'कै. सौ. वसुंधरा सातवळेकर' स्मृतिनिमित्त समर्थभक्त श्री. सुनिलजी चिंचोळकर यांची 'श्रीशंकराचार्यांची पंचायतनपूजा' या विषयावरची व्याख्यानमाला आयोजित करण्यात आली.

**या आहेत चालू वर्षातील घडामोडी :**

ईश्वरी कृपेने व आपल्या सहकार्यामुळे गेली २३ वर्षे न्यासाचे कार्य अविरत चालू आहे. आपणास काही नवीन उपक्रम सुचत असल्यास आम्हाला जरूर कळवा. आपणही आमच्या कार्यात सहभागी होऊ शकता. संपर्कासाठी विश्वस्तांचे फोन नंबर अंकाच्या प्रथम पृष्ठावर दिले आहेत.

**धन्यवाद!**





गुजर-निंबाळकर वाडी येथील मुलांचे वसतिगृह



प्रार्थना म्हणताना मुले




स्व-रुपवर्धिनी ओंकार न्यास आयोजित क्रीडादिन

"ओंकार" न्यासातर्फे दरवर्षी "वसुंधरा-कृतज्ञता पुरस्कार प्रदान करण्यात येतो. सन २०१२-२०१३ या वर्षासाठी **'हरीओम' तथा सदाशिव मालशे काका** यांना हा पुरस्कार प्रदान करण्यात आला होता. त्यावेळी प्रदान करण्यात आलेले मानपत्र सर्वांच्या माहितीसाठी या अंकामध्ये प्रसिद्ध करत आहोत.

## वसुंधरा कृतज्ञता पुरस्कार २०१२ - २०१३

## 'हरीओम' तथा सदाशिव मालशे काका

# गुणगौरव

दिनांक : २१ फेब्रुवारी २०१३

नेमेचि येतो मग पावसाळा। हा सृष्टीचा नियम जाण बाळा।

या काव्यपंक्ती सर्वश्रुत आहेत. ऋतुप्रमाणेच जन्म, बालपण, तरुणपण, वृद्धापकाळ आणि मृत्यू हे प्राणिमात्रांसाठीचे निसर्गचक्र आहे. जन्म आणि मृत्यू या दोन घटना कोणत्याही सर्वसामान्य सजीवांच्या मर्जीनुसार घडत नाहीत. जन्म आणि मृत्यू या दोहोमधील कालक्रमणा मात्र कशी असावी हे बुद्धिजीवी मनुष्यप्राणी ठरवू शकतो. जीवनौघात जगत असतांना ठराविक चौकटीच्या प्रवाहातून बाहेर पडून जो जगतो त्याला 'अवलिया' म्हटले जाते. किती जगला या पेक्षा कसा जगला याला जास्त महत्व आहे. श्रीसमर्थ रामदास स्वामी म्हणतात की, 'मरावे परी किर्तीरूपे उरावे.' आपले आजचे पुरस्कारर्थी म्हणजे एक 'अवलिया' व्यक्तिमत्त्व आहे.

**'हरीओम'** तथा **सदाशिव मालशे काका** आपण जगावेगळे 'उद्योगपती' आहात. आपण काही काळ चिन्मयमिशनमध्ये काम केलेले आहे. त्यांचा परस्परांशी संवाद साधताना पहिला शब्द असतो 'हरिओम'.आपण सामाजिक कार्य करीत असतांना त्यात एवढे गढून गेलात की 'मी'ला विसरलात आणि 'हरिओम' झालात.

बालवयांत आपले पितृछत्र हरपले. मामांच्या पुढाकाराने आपण शिक्षणासाठी पुण्यात आलात. खडतर आयुष्य सोसलेत. वार लाऊन उदरनिर्वाह करावा लागला पण आपण डगमगला नाही. जिद्दीने आपले शिक्षण पूर्ण केले. निमशासकीय नोकरीत स्थिरावलात. मनांत आणले असते तर मी आणि माझा संसार असे सुखी जीवन आपण जगू शकला असतात. पण स्वत: सहन केलेल्या वेदनांची झळ तुम्हाला स्वस्थ बसू देत नव्हती. आपण भोगलेले दु:ख दुसऱ्याला भोगायला लागू नये या शुद्ध हेतूने प्रेरित होऊन आपण ग्रामीण-भागांत शिक्षणासाठी धडपडणाऱ्या विद्यार्थ्यांच्या मदतीसाठी धावलात. नोकरीच्या पहिल्या पगारापासून ते निवृत्तीवेतनाच्या मर्यादित मिळकतीतून शक्य तेवढी मदत खेड्यातील गरजू विद्यार्थ्यांना आपण करीत आहात. एकट्याची मदत पुरेशी नाही हे ओळखून आपण शहरांतील दानशूर व्यक्तींचा शोध घेतलात. देणारा आणि गरजू यांच्यामधील एक भक्कम पण निरिच्छ, सेवाव्रती व विश्वासू दुवा झालात. गरजूंची गरज, ओळख देणगीदारांना सांगायची आणि त्यांनी दिलेली मदत गरजूंपर्यंत पोहोचवावयाची हे काम आनंदाने स्वीकारले. मदत मिळवून देण्याचे अवघड काम विनातक्रार करीत राहिलात. आपल्या पारदर्शक स्वभावामुळे देणगीदारांसाठी अत्यंत विश्वासू व्यक्ती झालात. मदतीचे स्वरूप दहा रुपयांचे असो वा दहा हजार, कपडे असोत वा धान्य, कोणत्याही प्रकारच्या उपयुक्त वस्तू असोत. आपला उत्साह कायमस्वरूपी तेवढाच खळखळता असतो. दिलेल्या देणगीची पावती देणगी दारापर्यंत पोहचविण्याची तत्परताही तेवढीच असते. आपला लोकसंग्रह फार मोठा आहे. आज १०-१२ संस्थांना आपण अशा स्वरूपाची मदत हजारो लोकांकडून मिळवून देत आहात. गेली २२-२३ वर्षे आपले हे कार्य अविरतपणे चालू आहे ते ही प्रसिद्धीपासून दूर राहून.

सेवानिवृत्ती नंतरचा आपला दिनक्रम तर आवर्जून जाणून घ्यावा असाच आहे. सकाळी आठ ते दुपारी एक पर्यंतचा वेळ 'निवारा' वृद्धाश्रमांत पडेल ते काम विनामोबदला करण्यासाठी आपण घालविता. दुपारी तीन ते रात्री नऊ वेगवेगळ्या सेवाभावी संस्थांसाठी निधी मिळविण्यासाठी भ्रमंती चालू असते. देण्यातला आंनद आपण अखंड अनुभवीत असता. आपल्या या आगळ्यावेगळ्या कार्याची नोंद दै. सकाळ, लोकसत्ता, महाराष्ट्र टाईम्स यांनी घेतली आहे.

दि. १२/१२/१२ रोजी आपण वयाची सत्तरी पूर्ण केलीत. दुसऱ्यासाठी जगणाऱ्या आपल्यासारख्या सत्तर वर्षाच्या 'तरुणास' सन २०१२-१३ चा 'वसुंधरा कृतज्ञता पुरस्कार' महाराष्ट्र साहित्य परिषद पुणेचे प्रमुख कार्यवाह प्रा. श्री. मिलिंद जोशी यांच्या शुभहस्ते समारंभ पूर्वक प्रदान करताना न्यासास अत्यंत आनंद होत आहे.

आपणास आरोग्य, दीर्घायुष्य व आपल्या सेवाव्रतात सुयश लाभो ही ईश्वरचरणी प्रार्थना.

आपले

**म. वा. सरदेशपांडे**
अध्यक्ष, ओंकार न्यास

**भा.वा. सातवळेकर**
उपाध्यक्ष, ओंकार न्यास

दिनांक : २१ फेब्रुवारी २०१३



# अंतरंग





 अंतरंग 



•••

## ओंकार ट्रस्ट तर्फे प्रकाशित करण्यात आलेले कल्याणी विशेषांक

| सन | विषय |
|---|---|
| १९९२ | गुरुपौर्णिमा |
| १९९३ | दासनवमी |
| १९९४ | स्वामी विवेकानंद |
| १९९५ | श्रीज्ञानेश्वर महाराज |
| १९९६ | संत तुकाराम महाराज |
| १९९७ | संत एकनाथ महाराज |
| १९९८ | संत नामदेव महाराज |
| १९९९ | श्रीगोंदवलेकर महाराज |
| २००० | श्री स्वामीस्वरूपानंद (पावस) |
| २००१ | परमार्थपाणिनी श्री गुरुदेव रानडे |
| २००२ | मधुराद्वैताचार्य श्री ज्ञानेश्वर कन्या श्री गुलाबराव महाराज |
| २००३ | ब्रह्मीभूत परमहंस परिव्राजकाचार्य स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती |
| २००४ | परमहंस परिव्राजकाचार्य श्री वासुदेवानंद सरस्वती (टेंबे) स्वामी महाराज |
| २००५ | परमपूज्य श्रीमंत बाबामहाराज आर्वीकर |
| २००६ | परमहंस परिव्राजकाचार्य श्री सद्गुरू भगवान श्रीधर स्वामी महाराज |
| २००७ | परमपूज्य गुरुदेव स्वामी चिन्मयानंद |
| २००८ | श्री समर्थ रामदास स्वामी |
| २००९ | भगवत् पूज्यपाद जगद्गुरू आद्य शंकराचार्य |
| २०१० | भगवान् श्रीरामकृष्ण परमहंस |
| २०११ | आधुनिक महिपती श्री दासगणुमहाराज |
| २०१२ | महाराष्ट्रातील स्त्री-संत-पंचक |
| २०१३ | योगी अरविंद |

## वसुंधरा कृतज्ञता पुरस्काराचे मानकरी

| सन | नाव | | कार्य |
|---|---|---|---|
| १९९७ | डॉ. स्वर्णलता चंद्रशेखर भिशीकर | – | पंजाबमध्ये दहशती परिस्थितीत सामंजस्याची वातावरण निर्मिती. |
| १९९८ | प्रा. डॉ. अशोक प्रभाकर कामत | – | नामदेव अध्यासन (पुणे विद्यापीठ) द्वारे समाजप्रबोधन. |
| १९९९ | श्री. सुनील गोपाळ चिंचोलकर | – | प्रवचन व व्याख्यानाद्वारे श्रीसमर्थ शिकवणीतून समाजप्रबोधन. |
| २००० | सौ. सिंधुताई श्रीहरी सपकाळ | – | अनाथ आश्रम- बालसंगोपन. |
| २००१ | श्री. द्वा. वा. केळकर | – | पत्रद्वारा दासबोध अभ्यासक्रमाचे प्रर्वतक. |
| २००२ | डॉ. सुनीलकुमार लवाटे | – | अनाथ आश्रम मुलांचे संगोपन व शिक्षण. |
| २००३ | डॉ. पारस कपूरचंद शहा | – | मोफत नेत्रचिकित्सा शिबिराद्वारे रुग्णसेवा. |
| २००४ | श्री. श्रीकांत मुंदडा | – | हृदयमैत्री चळवळ. |
| २००५ | श्री. गिरीश यशवंत प्रभुणे | – | भटके-विमुक्त विकास प्रतिष्ठानद्वारे लोकसेवा. |
| २००६ | मानव्य संस्था (संस्थापक - कै. विजयाताई लवाटे) | – | एच्.आय्.व्ही. पीडित मुलांसाठी कार्य. |
| २००७ | श्री. राजा दांडेकर व रेणू दांडेकर | – | दुर्बल घटकांच्या उन्नतीसाठी शाळा व इतर उपक्रम. |
| २००८ | श्री. विजय व सौ. साधनाताई फळणीकर | – | आपलं घर - अनाथ मुलांचे घर व वृद्धाश्रम |
| २००९ | सौ. माधुरी प्रमोद अभ्यंकर (संचालिका- श्रीवत्स, सोफोश, पुणे.) | – | कुमारी माता व अनाथ मुलांचे पुनर्वसन. |
| २०१० | सौ. मृणालिनी भाटवडेकर | – | सावली सेवा ट्रस्ट, रेड लाईट एरियातील मुलांचे पुनर्वसनासाठी कार्य. |
| २०११ | श्री. दिलीप कुलकर्णी | – | पर्यावरणासाठी कार्य. |
| २०१२ | वंचित विकास संस्था | – | रेड लाईट एरियातील मुलांचे व स्त्रियांचे पुनर्वसन कार्यासाठी |
| २०१३ | श्री. हरीओम तथा सदाशिव मालशे | – | सामाजिक संस्थांना मदत मिळवून देणे. |



# 'तेजोमय'
## प.पू. स्वामींचे संक्षिप्त चरित्र

**श्री. विक्रम विनायक नांदेडकर**
प.पू. अप्पांचे नातू
विज्ञानशास्त्र पदवीधर, नांदेड येथे स्वतंत्र व्यवसाय.

**।। श्रीशंकर ।।**

श्रावण वद्य ११ शके १९२४ च्या सकाळी, प.पू.स्वामी वरदानंद भारती तथा पू.अप्पांच्या 'संजीवन समाधी'ची बातमी आली. टॅक्सी, रेल्वे, विमान, कुठल्याही प्रकारे लवकरात लवकर उत्तरकाशीस पोहोचण्यासाठी असंख्य लोकांनी धाव घेतली. समाधीच्या वार्तेने पिळवटून गेलेल्या अंत:करणात अनेक भावनांची दाटी झाली होती. हुरहुर, दु:ख, शोक, आश्चर्य, साशंकता, आशा, सद्गुरूंच्या सामर्थ्याचा अभिमान अशा अनेक भावना, हृदयात न मावल्यामुळे, अश्रूंवाटे मुक्त होण्याचा प्रयत्न करीत होत्या. पू. अप्पांच्या या अलौकिक सामर्थ्याच्या विचाराने स्तिमित, रोमांचित झालेल्या अवस्थेत, सान्ताच्या सर्व मर्यादा ओलांडून, अनंताला कवटाळणारे हे अनंतचरित्र वेगाने स्मृतिपटलावरून सरकू लागले.

अनंत चतुर्दशी शके १८४२ (२७ सप्टेंबर, १९२०) रोजी पू.अप्पांचा जन्म, सौ.राधाबाई व श्री.दामोदर आठवले यांच्या पोटी झाला. श्रीदासगणू महाराजांचे सच्छिष्य, मानसपुत्र असलेल्या श्री.दामुअण्णांचा विवाह, प्रत्यक्ष श्री साईबाबांच्या आशीर्वादाने झालेला. तरीही त्यांची दोन अपत्ये अल्पायुषी ठरली.

श्रीदासगणू महाराजांनी गोदामातेला प्रार्थना केली की माय, यावेळी चि. दामूचे मूल जगू दे. ते तुला अर्पण करून, तुझे लेकरू म्हणून वाढवीन. त्याप्रमाणे श्री.दादांनी, गोदावरीचे नाभीस्थान असलेल्या रामेश्वर येथे, पू.अप्पांना पाळण्यात ठेऊन तो गोदापात्रात प्रवाहित केला आणि पुढे, गोदामाताचे हे लेकरू, श्री दादांच्या सहवासात, श्री दामुअण्णा व सौ. राधामायच्या ममतेत वाढू लागले. अनंत चतुर्दशीचा जन्म म्हणून त्याचे नामकरण झाले 'अनंत!'



**पुण्याईने त्यांच्या वंशी । अनंत जन्मा आला ।।**
**श्री. दामूअण्णा, सौ. राधाबाई आठवले**
**उभे- चि. तुकाराम आजेगांवकर, बसलेले - चि. अनंत १९२२**

चि. अनंता ४ वर्षांचा झाला आणि दैवाने एक जबरदस्त आघात केला. देखणे रूप, उंचीपुरी भारदस्त शरीरयष्टी, आनंदी वृत्ती, लाघवी स्वभाव आणि पहाडी पण अत्यंत गोड गळा अशा व्यक्तिमत्त्वाच्या श्री.दामुअण्णांना क्षयाची बाधा झाली आणि त्यातच अवघ्या ३२व्या वर्षी त्यांना देवाज्ञा झाली. श्री.दादा आणि ती. राधामाय यांनी हा वज्राघात मोठ्या धीराने सोसला, तो छोट्या अनंतासाठी. बाल्यावस्थेत अत्यंत किरकोळ आणि रोगट प्रकृतीच्या अनंताची काळजी, श्री.दादांनी अत्यंत दक्षतेने वाहिली.

वयाच्या १०व्या वर्षी चि. अनंताने, पंढरपूर येथील शाळेत प्रवेश घेतला आणि त्याच्या लौकिक शिक्षणास सुरुवात झाली. अफाट स्मरणशक्ती, प्रखर बुद्धिमत्ता, वाचनाची आवड, अस्खलित, शुद्ध वाणी, उपजत कवित्व अशा गुणांमुळे शिक्षकांनाही जाणवलं की हे मूल विलक्षण आहे. क्रीडासक्त अशा बालवयातही छोटा अनंता, भान हरपून रामायण-महाभारत वाचत असे. पाचव्या इयत्तेत असतानाच, अनंताने मेघदूत हे महाकाव्य, गीर्वाणलघुकोष व मल्लिनाथी टीका यांच्या सहाय्याने आपले आपण समजावून घेतले. त्यावेळी मेघदूत पदवीच्या अभ्यासक्रमात होते. घोकंपट्टीच्या अभ्यासाची पद्धत जणू अनंतास माहितीच नव्हती. त्यामुळे अनंताच्या अभ्यासाची, वाचनाची, चिंतनाची दिशा चौफेर झाली.

१६ व्या वर्षी चि. अनंताने पहिले कीर्तन केले. स्वत: श्री. दादा, श्री.केशवराव महाराजांची उपस्थिती होती. पूर्वरंगासकट सर्व आख्यान अवघ्या पाऊण तासात संपले. महाराज म्हणाले, ''अनंता! अरे, नदी उगमाशी टिपटिपतच असते. पुढे मोठा प्रवाह होतो.'' त्यानुसार तिथे उगमाशी टिपटिपणाऱ्या या कीर्तनगंगेने पुढे विशाल, पवित्र, खळाळत्या प्रवाहाचे रूप घेतले. अनेक मतप्रवाहांच्या उपनद्या सामावून घेतल्या. तृषार्त, तप्त पथिकांचे शांतवन केले. विपुल जलाने भक्तीचे मळे फुलवले!

शालांत परीक्षा प्राविण्याने उत्तीर्ण झाल्यानंतर, श्री.दादांच्या इच्छेनुसार चि.अनंताने, पुणे येथे आयुर्वेद महाविद्यालयात प्रवेश घेतला. बाल्यावस्थेतील कृश अनंता आता रुबाबदार युवक झाला होता. याच सुमारास, स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या वक्तृत्व आणि विचारांनी चि.अनंताचे मन भारावून टाकले. आपणही राजकारणात सक्रिय होऊन देशहितास्तव प्रयत्न करावे असे त्याला वाटू लागले. पण इतर सगळे हट्ट तत्काळ पुरविणाऱ्या श्री.दादांनी त्याच्या या विचाराला प्रखर विरोध केला. आणि त्याला राजकारणापासून परावृत्त केले. याच काळांत चि.अनंता काहीसा नास्तिकतेकडे झुकला. विचित्रशा रूढी, परंपरा, धार्मिक कृत्ये यासंबंधी तो श्री.दादांशी खंडणात्मक वाद करीत असे. चौफेर वाचन, कुशाग्र बुद्धी यांच्या बळावर तो कधी श्री.दादांनाही निरुत्तर करी. एक दिवस श्री.दादा चि. अनंतास म्हणाले, **''हे बघ अनंता! मी तुझ्याइतके वाचलेले नाही. तेव्हा तुझे म्हणणे मला पुराव्यानिशी खोडता येणार नाही. पण माझे मत सत्यावर आधारित आहे आणि सहस्रावधी वर्षे, चांगलं म्हणून प्रस्थापित आहे. या काळांत ही मते स्वीकारणारे अनेक महापुरुष होऊन गेले. तू त्यांच्यापेक्षा विद्वान आहेस हा अहंकार नव्हे का? आजवर तू केवळ खंडणात्मकच विचार केलास. कधी मंडनासाठी विचार कर. तू बुद्धिमान आहेस. असे करशील तर तुझ्या लक्षात येईल की, भारतीय संस्कृतीने स्वीकारलेली मते इतर कोणत्याही समाजरचनेपेक्षा चांगली आहेत.''** या एका संवादाने जणु चि. अनंताच्या जीवनास कलाटणी मिळाली. आणि त्याला वाटू लागले...

**''एकाएकी असे वाटले, चिंतामणि हाती आला ।**
**वा सूर्याच्या दिव्य प्रकाशें, अज्ञ तिमिर हा हत झाला ।।**

नास्तिक विचारांचा अनंता, आता सनातन वैदिक परंपरेचा कट्टर पुरस्कर्ता झाला. त्याची कुशाग्र बुद्धी आता विरोधकांवर घणाघात करणार होती.

चि. अनंताने आयुर्विद्या पारंगतचे पदव्युत्तर शिक्षण विशेष प्राविण्यासह पूर्ण केले. आणि त्याच विद्यालयात आता चि.अनंता, प्राध्यापक झाला. चि.अनंताचे आता प्रा.अनंतराव झाले. शिक्षण-काळातच अनंताचे लग्न झाले व सौ. इंदिराबाईंसह त्याने गृहस्थाश्रमात प्रवेश केला. स्वधर्म, भाषा, परंपरा व संस्कृती यांचे प्रखर अभिमानी, अत्यंत बुद्धिमान म्हणून, विद्यार्थीदशेतच अनंतरावांनी महाविद्यालयात आपली वेगळी ओळख निर्माण केली होती. आता प्राध्यापक म्हणूनही त्यांचा आदरयुक्त धाक निर्माण झाला होता. याला कारण होते, त्यांचे प्रतिपाद्य विषयावरील प्रभुत्व, सुगम तरीही आत्मविश्वासपूर्ण वक्तृत्व, करारी नजर, आणि स्वच्छ चारित्र्य. पुढे अनंतरावांनी आयुर्वेद महाविद्यालयाचे प्राचार्यपदही भूषविले. शिवाय राष्ट्रीय शिक्षण मंडळाचे आजीव सभासद, पुणे विद्यापीठाचे कार्यकारिणी सदस्य, आयुर्वेद रसशाळेचे प्रमुख, ताराचंद रुग्णालयाचे अधिक्षक अशी अनेक मानाची पदेही अनंतरावांनी भूषवली. सर्व प्रशासकीय जबाबदाऱ्या त्यांनी, शिस्तप्रियता, नियोजन कौशल्य यांच्या बळावर उत्तम पार पाडल्या. 'व्याधिविनिश्चय' व 'अष्टांगसंग्रह' या ग्रंथांचे लेखन, व 'शल्यशालाक्य' आणि 'कौमारभृत्यतंत्र' या ग्रंथांचे सहलेखन करून, अनंतरावांनी आयुर्वेद वाङ्मयात मोलाची भर घातली.

हे सर्व करीत असताना, पत्नी, तीन मुली, दोन मुलगे असे कुटुंब आणि संपूर्ण दासगणू परिवारही, अनंतरावांनी समर्थपणे सांभाळला. परंपरेतील सर्व उत्सव-महोत्सव उत्साहाने केले. कीर्तने-प्रवचने-व्याख्याने यांच्या सहाय्याने, कळकळीने आणि साक्षेपाने समाजप्रबोधन केले. भक्तिरसात न्हाऊ घालणाऱ्या, श्रीदासगणुमहाराजांनी रचलेल्या आख्यान काव्याला आता श्री.अनंतरावांच्या विद्वत्तेची आणि धारदार वाणीची जोड मिळाली. त्यामुळे सामान्य आणि विद्वान अशा सर्वप्रकारच्या श्रोत्यांसाठी अनंतरावांची कीर्तने म्हणजे पर्वणी ठरू लागली. पुणे विद्यापीठातील ज्ञानेश्वर अध्यासनाचे काम निधीअभावी रखडले होते. त्यासाठी अनंतरावांनी शिवाजी मंदिर, पुणे येथे स्वत: एक महिना कीर्तने करून निधीसाठी आवाहन केले. आणि महिनाभरात ३ लक्षांपेक्षा जास्त निधी जमवून, अध्यासनाचे काम मार्गी लावले! हे अनंतरावांच्या, मंत्रमुग्ध पण अंतर्मुख करणाऱ्या कीर्तनांचे फलित! शैक्षणिक, सामाजिक व आध्यात्मिक क्षेत्रांत आता श्री.अनंतरावांचा नावलौकिक झाला होता. परिवारातील व स्नेहीजन आता त्यांना प्रेमादराने अप्पा म्हणू लागले.

आपले सद्गुरू, श्रीदासगणुमहाराजांचे चरित्र, अत्यंत परिश्रमपूर्वक, पू.अप्पांनी लिहून प्रकाशित केले. श्री.दादांचे समग्र वाङ्मयही, दहा खंडांत संपादित करून प्रकाशित केले. त्यात 'श्रीगजाननविजय' या काव्याचा अंतर्भाव करावयाचा होता. पण श्रीदासगणुमहाराजांनी त्याचे सर्व हक्क, कुठलीही रॉयल्टी न मागता, शेगांव संस्थानास दिले होते. त्यामुळे पू.अप्पांनी शेगावास पत्र पाठवून, ते छापण्यासाठी विनंती केली. अर्थातच त्यांना ती मिळाली. पण त्यातून पू.अप्पांच्या तत्त्वपालनास आणि शुद्ध आचरणास झळाळी मिळाली.

कार्तिक वद्य १३ शके १८८४ (२५ नोव्हेंबर, १९६२) रोजी श्रीदासगणुमहाराजांनी पंढरपुरास देह ठेवला. वयाच्या ४थ्या वर्षीच पितृछत्र हरपूनही, अप्पांना ज्यांच्या मायेच्या सावलीमुळे कधीच पोरकेपण जाणवले नाही, ते श्री दादा गेल्यामुळे, जणु सर्वस्व गेल्याची जाणीव झालेल्या अप्पांनी स्वत:सच सावरले नाही, तर व्याकुळ झालेल्या सर्व दासगणु परिवारास सांभाळले. आता श्री.दादांच्या परंपरेची जबाबदारी सर्वस्वी अप्पांवर होती. **'न लोभ दुसरा, घडो गुरुपरंपरा रक्षण'** हेच आता अप्पांच्या आयुष्याचे ध्येय होते. ते साधण्यासाठी

म्हणून अप्पांनी गोरटे, ता.उमरी, जि. नांदेड येथे श्रीदासगणुमहाराजांची वस्त्रसमाधी बांधून, श्रीदासगणु प्रतिष्ठानची निर्मिती केली. परंपरेतील कार्याचा विस्तार आता खूप वाढला होता. हे सांभाळत असताना, आयुर्वेद महाविद्यालयाच्या कार्यास न्याय देता येणार नाही म्हणून अप्पांनी प्राचार्यपदाचा राजीनामा दिला. अत्यंत प्रांजळ, प्रामाणिक आणि निर्मोही अंत:करणाने त्यांनी हे अत्यंत प्रतिष्ठेचे पद सोडले. शक्य असूनही केवळ अडवायची म्हणून खुर्ची अडवली नाही.



**श्रीदासगणु महाराज यांचे समवेत श्री. अनंतराव– हैद्राबाद १९५४**

आता अप्पांचे सर्व लक्ष, श्री.दादांच्या वाङ्मयीन उपदेशाचे अधिष्ठान म्हणून, प्रतिष्ठानवर केंद्रित झाले. हे प्रतिष्ठान, जत्रेचे ठिकाण न होता साधनाकेंद्र व्हावे, यादृष्टीने त्यांनी योजना आखल्या. पूर्ण केल्या. त्यामुळे कुठलाही सांप्रदायिक अभिनिवेश न बाळगता, वाल्मिकी, व्यास, ज्ञानेश्वर, तुकारामांची परंपरा तीच आमची परंपरा, असे ब्रीद असलेले साधनाकेंद्र आपणास लाभले. अप्पांच्या शिस्तीत, कल्याणकारी विचारांचा प्रचार प्रसार करणारे हे केंद्र, प्रामाणिक साधकांसाठी अत्यंत उपयुक्त असेच आहे. शक्य असेल त्याने अवश्य अनुभव घ्यावा.

गुरुपरंपरा रक्षण-संवर्धनाचाच भाग म्हणून अप्पांनी विशाल अशी स्वत:चीही ग्रंथसंपदा निर्माण केली. भगवद्गीता, ब्रह्मसूत्रे आणि उपनिषदे या प्रस्थानत्रयींवर भाष्य लिहून अप्पा 'आचार्य' पदास प्राप्त झाले. श्रीशालिवाहन, श्रीकृष्णकथामृत यांसारख्या अप्रतिम महाकाव्यांची रचना करून ते महाकवी झाले. मनोबोध, साधक-साधना, वाटा आपुल्या हिताच्या यांसारखे अनेक ग्रंथ, अत्यंत सुगम भाषेत, सोपेपणाने, कल्याणाचा मार्ग दाखवणारे आहेत. ''भगवान् श्रीकृष्ण- एक दर्शन'' सारख्या ग्रंथात या पूर्णावताराचे, लोककल्याणाचे राजकारण समजावून, कृष्णरूपी एक आदर्श नेता उभा केला आहे. महाभारताचा इतिहास विकृतपणे मांडून, आम्हाला आदर्शभूत असणाऱ्या अनेक व्यक्तिरेखांचं अत्यंत आक्षेपार्ह आणि हिडीस वर्णन करणाऱ्या तथाकथित अनेक प्रथितयश लेखकांच्या असत्य व निराधार लेखनाला सडेतोड आणि सप्रमाण उत्तर दिले. त्यासाठी असे लिखाण करणाऱ्या श्री.आनंद साधले, इरावतीबाई कर्वे आदि लेखकांना जाहीर आव्हानही दिले. पण कल्पनांच्या भुसभुशीत पायावर, तकलादू विचारांचे इमले उभारणाऱ्या कुणीही, हे आव्हान स्वीकारले नाही. या विषयावर वादळी व्याख्याने देऊन पू.अप्पांनी हे संस्कृती व आदर्श हननाचे प्रयत्न धुळीस मिळविले. पुढे ही व्याख्याने त्याच शीर्षकासह पुस्तक रूपात प्रसिद्ध झाली.

अप्पांच्या जीवनप्रवासात, गुरूपरंपरा संवर्धनरूपी गंगा, यशस्वी गृहस्थधर्मरूपी यमुना हे दृश्य प्रवाह तर होतेच पण वैयक्तिक साधनारूपी सरस्वतीचा गुप्त ओघही होता, जो त्यांच्या वयाच्या सोळाव्या वर्षापासून अखंड प्रवाहित पण जगाच्या दृष्टीने नेहमीच अदृश्य राहिला. सोळाव्या वर्षी अप्पांना श्रीदासगणुमहाराजांचा अनुग्रह झाला आणि श्रीविष्णु-सहस्रनामाचे साधन मिळाले. आणि 'नामसहस्राची मज हातासी धरून चालवी भक्ती' असा त्यांचा साधनप्रवास सुरू झाला. या, साधक ते सिद्ध अशा प्रवासात, विविध टप्प्यांवर आलेले अनुभव, अंत:करणाची स्थिति, अनुभवलेल्या भावना, हे सर्व, कवी अप्पांनी काव्यबद्ध केले. अप्पांचं हे सर्व आत्माभिव्यक्ती असलेलं सहजोत्कट काव्य 'भावार्चना' या नावाने प्रसिद्ध आहे. त्याच काव्यावरून त्यांना झालेला श्रीवरदनारायणाचा साक्षात्कार सिद्ध होतो. अन्यथा –

**''रत्न ये अवचिता हाती, ठेविले खोल जपुनी ते ।**
**वरिवरि काढुनी त्यासी कशासी हो न्याहाळावे ।।''**

या अप्पांच्याच उक्तीप्रमाणे त्यांनी हे स्वत: कधीच कुणाला सांगितले नाही.

श्रावण वद्य अष्टमी शके १८९३च्या दिवशी अप्पा गंगोत्री मुक्कामी होते. अनेक वर्षांपासून भगवद्दर्शनाचा ध्यास घेतलेलं त्यांचं अंत:करण अत्यंत व्याकुळ झालं होतं. गंगोत्री परिसरात एका नीरव, निर्जनस्थळी अप्पांनी ठाण मांडलं ते **'आता इथुन परतेन न मी भुकेला'** अशा दृढसंकल्पाने! श्रा.व. ९ व १०, अन्नपाण्याविना तळमळतच गेली. अप्पांची स्थिती विलक्षण झाली. शरीरास कंप सुटला, जीव घाबरा झाला, मस्तक बधीर झाले. धाप लागली, कासाविशी सहन करण्यापलीकडे गेली. त्यांना वाटले. जणूं मृत्यु साक्षात् समोर येऊन उभा आहे. अशातच श्रा.व.११च्या पहाटे, तो भाग्याचा क्षण अप्पांच्या जीवनात आला. तो चतुर्भुज, भक्तवत्सल नारायण प्रत्यक्ष समोर होता. अप्पांनी त्या समचरणांना कडकडून मिठी मारली. तो अनुभव ते व्यक्त करतात–

**''धावली हो पावली हो ही विठाई माऊली**
**चंदनाने मोगऱ्याची माळ कंठी घातली''**

त्याचक्षणी नारायणस्वरूपात विलीन व्हावे असे अप्पांना वाटले. पण कार्य अजून अपूर्ण आहे. त्यासाठी योग्य काळ नेमिलेला आहे असा संकेत भगवंताने दिला आणि अप्पा अतीव आनंदाने परतले.

श्रीवरदनारायणाच्या आदेशाप्रमाणे, गुरूपरंपरा रक्षण, समाज प्रबोधनाचे कार्य पुढे अप्पांनी साक्षेपाने पार पाडले. नेटका पण यशस्वी

गृहस्थाश्रम सौ.इंदिराबाईंच्या सहधर्मचारिणीच्या साथीने पूर्णतेस नेला. ''जे जे कार्य नियोजिले सकलही, सिद्धीप्रती पावले.'' अशी कृतार्थतेची भावना अप्पांची झाली आणि अप्पांनी संन्यासग्रहणाचा निर्णय घेतला. दक्षपणे अप्पांचे जीवन घडवणाऱ्या ति.राधामायनीही, जणू इच्छामरण पत्करून आपल्या या अलौकिक लेकराचा चतुर्थाश्रमप्रवेश प्रशस्त केला. सर्व लौकिक-अलौकिक, दृष्य-अदृष्य, पाश दूर सारून, अप्पांनी संन्यासाश्रमात प्रवेश केला. आता पू.अप्पा, स्वामी वरदानंद भारती झाले! वरदनारायणाच्या कृपेने, केवळ आनंदच ज्यांना व्यापून राहिला आहे, ते वरदानंद! त्यांचे यतिवेषातील ते प्रथम तेजस्वी दर्शन, सर्वांगावर रोमांच उभे करणारे होते. जणु जगद्गुरू श्रीमदाद्यशंकराचार्यच प्रत्यक्ष समोर होते.

**''या जगात भोगू याहून काय ते ।**
**शांतीसुख संतोषावीण ना रिते ।**
**स्थान एक, अंतर्बहि मी प्रसन्नलो ।**
**धन्य जाहलो, मी खरा, धन्य जाहलो ।।''**

अशी आत्मानंदाची नित्य अनुभूती घेणाऱ्या स्वामी वरदानंदांनीही हिंदुराष्ट्राचा, हिंदुहिताचा, लोककल्याणाचा विचार, क्षणभरही दूर केला नाही. त्यांनी जनजागृतीचे कार्य अथकपणे केले. सभा घेतल्या, व्याख्याने दिली. तरुणांसाठी शिबिरे घेतली. राष्ट्रसंरक्षण पोवाड्यासारख्या जहाल विचारांची प्रेरणा दिली. हिंदुस्थान हा हिंदुंचाच! तो अखंड होऊन पुन्हा गतवैभवास प्राप्त व्हावा ही त्यांची तळमळ 'सिंधुगीत' या सिंधुस्नानावेळी व्यक्त झालेल्या त्यांच्या काव्यात आढळते.

''बुडत हे जन, देखवें न डोळां'' यासाठी म्हणून निर्माण झालेल्या त्यांच्या वाङ्मयमंदिराचा कळस ठरला तो त्यांच्या 'मनुस्मृति-सार्थ-सभाष्य' हा विस्तृत आणि अप्रतिम ग्रंथ! न वाचताच मनुस्मृती जाळायला निघणाऱ्यांच्या काळात, या स्मृतिग्रंथातील तत्त्वे आजही कशी हिताची ठरतील हे त्यांनी पटवून दिले आहे. ग्रंथलेखनाची केवळ भूमिकाच १०० पृष्ठांची, विस्तृत अशी आहे. स्मृतिग्रंथ हे राज्यघटना व दंडसंविधानच जणु आहेत. भारतीय संस्कार आणि भारतीय वृत्ती, समाज यांचं नियमन, यांची धारणा ही भारतीय परंपरेतील स्मृतींमुळे चांगली होईल की पाश्चात्यांकडून उधार घेतलेल्या, आपल्या सवयी-संस्कारांच्या विपरीत दंडविधानाने? हा महत्त्वाचा मुद्दा या भूमिकेच्या केंद्रस्थानी आहे. अत्यंत सोपं आणि विस्तृत भाष्य हे या ग्रंथाचं वैशिष्ट्य आहे.

मनुस्मृतीच्या लिखाणानंतर, अप्पा म्हणत ''जीवन धन्य जाहले, आता न वसन जीर्ण ठेविन हे.'' नारायणाने नेमिलेल्या काळाची वाट जणूं ते पाहात होते. **''हाक मारितसे । पैल गंगातीर । कर्णी वारंवार । नाद पडे।''** ही त्यांची अवस्था होती. ते आतुर झाले होते, प्राणेश्वरासवे जाण्यासाठी. महाशिवरात्र शके १९२४. अप्पा गोरटे मुक्कामी होते. ते म्हणत, ''आता इथून जाईन तर पुन्हा येणार नाही. पुढे भगवंताची इच्छा.'' उत्तरकाशीस जाण्यास निघाले तेव्हा श्री.दादांच्या दर्शनासाठी समाधीजवळ आले. दादाऽऽऽऽ अशी आर्त साद घालून समाधीला कडकडून मिठी मारली. नयनाश्रूंनी समाधीस जणू अभिषेक होत होता. गुरू-शिष्याची ती लौकिकातली शेवटची भेट!

कैलासाश्रम उत्तरकाशी इथे अप्पांच्या चित्तवृत्ती प्रसन्न होत्या. गंगामैय्याचे सान्निध्य होते आणि श्रीवरदनारायणाकडून नेमिलेल्या दिवसाचा संकेत मिळाला होता. ३० वर्षांपूर्वी प्रत्यक्ष दर्शन दिले तोच हा श्रा.व.११ चा दिवस होता. या भाग्याच्या, जीवनाचे सार्थक करणाऱ्या एकादशीस अप्पांनी गंगेत स्नान केले. एका कौपिनाशिवाय सर्व वस्त्रे, गंगाघौत प्रवाहित केली आणि परत आपल्या खोलीत आले. देह भस्मचर्चित करून, नारायणाच्या प्रतिमेसमोर दर्भासनावर पद्मासनस्थ झाले. डावा हात, कमंडलूतील गंगामातेला स्पर्श करीत होता. उजव्या हाताने अप्पांनी, श्रीवरदनारायणाच्या चरणांना स्पर्श केला. आपला वरदहस्त उभारून जणू आज ही विठाई आपल्या लेकराला पालवीत होती. उत्कंठेचा भाव दाटून आला. जीवाने, शिवाकडे ओढ घेतली. आणि भगवंताच्या भक्ताने श्रीचरणी आत्मनिवेदन केले. इथेच पू.अप्पांचे लौकिकाशी नाते तुटले. कारण आता ते अलौकिकाशी तादात्म्य पावले होते. सान्ताच्या सर्व मर्यादा ओलांडून अनंत झाले होते.

पू.आप्पांच्या, याच समाधी अवस्थेची बातमी मिळाल्याने सर्वांनी उत्तरकाशीस धाव घेतली होती. अप्पांच्या या विलक्षण स्मृतींत हरवून गेल्याने, उत्तरकाशीस कधी पोहोचलो हे कळलेच नाही. श्रा.व. १३ला अप्पांचा श्वास आणि हृत्स्पंदन थांबले. देह होता, पण देही मात्र त्याच्या चिदानन्दरूपात जीव त्याच्या शिवरूपात, आधीच मिसळला होता. २१व्या शतकातही, ज्ञानेश्वर माऊलींप्रमाणे संजीवन समाधीची ही घटना अलौकिक होती. इतक्या व्याकुळ अवस्थेतही, अप्पांचे हे सामर्थ्य पाहून, अभिमानाच्या भावनेने, शोकावर मात केली होती.

पू.अप्पांचा देह एका लाकडी पेटीत बंदिस्त करून, गंगेत विसर्जित करण्यात आला. पण आईची भेट घेताना, हा अडसर जणू पू.अप्पांना नकोच होता. प्रवाहात कांही अंतर पुढे जाऊन, पेटीचे दार खाड्कन उघडले आणि अप्पांचा देह अलगद गंगौघात लुप्त झाला. गोदामातेचे हे लेकरू आज गंगेच्या कुशीत विसावले होते.

पू.आप्पांच्या खोलीत त्यांचा शेवटचा निरोप होता...

**''आम्ही जातो अमुच्या गावा । अमुचा रामराम घ्यावा।।''**

''बोलिले जे ऋषी साचभावें वर्ताया' हे जीवन कसे असते याचा आदर्श, हे अनंत चरित्र आहे. अप्पांचे सगुण दर्शन होणार नाही म्हणून व्याकुळ झालेल्या सर्वांसाठी, ते या निरोपात म्हणतात, ''अरे! पिकले पान गळायचेच. **हे शरीर म्हणजे 'मी' नव्हे! 'मी' मद्ग्रंथांचा संभार. आणि या ग्रंथांचं वाचन, चिंतन आणि आचरण हाच माझा खरा सहवास.**'' आश्वासनपूर्वक ते सर्वांना सांगतात-

**'बोला जय जय नारायण ।**
**हरितो तो सारा शीण।।''**

**विक्रम विनायक नांदेडकर**
पुंडलिकवाडी, नांदेड ४३१६०१
भ्रमणध्वनि : ९४२१८६९०२२





# बहुआयामी व्यक्तिमत्त्व व कर्तृत्व

**डॉ. सौ. कल्याणी माधव नामजोशी**
एम. एस्सी. (इलेक्ट्रॉनिक्स) एम. ए. संस्कृत. पीएच. डी. (संस्कृत वेदांत),
गरवारे महाविद्यालयांत २ वर्षे प्राध्यापक. 'साक्षेप समर्थांचा', 'एका जनार्दनी', 'तेजाचं चांदणं' या पुस्तकांचे सहलेखन. वैदिक वाङ्मय, उपनिषदे, भगवद्गीता, ज्ञानेश्वरी, दासबोध व इतर संत वाङमयावर ६००० पेक्षा जास्त व्याख्याने व प्रवचने. प. पू. स्वामी वरदानंद यांच्या शिष्या.

**प्रस्तावना** – भारत देश सत्पुरुषांची खाण आहे. येथे संत - परंपरा अक्षुण्ण आहे. एकापेक्षा एक थोर अधिकारी संत कालानुरूप विविध प्रांत, जाती, वर्ण, भाषा, भिन्न भिन्न सामाजिक - राजकीय परिस्थितीत निर्माण झाले. याला स्त्री संतही अपवाद ठरल्या नाहीत. महाराष्ट्रात ही संतपरंपरा अशीच समृद्ध आहे. एवढेच नाही तर ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास, तुकाराम यासारख्या महाराष्ट्री संतांविषयी भारतभर आदराची भावना आहे. त्याच परंपरेतील पू. स्वामी वरदानंदभारती म्हणजेच पूर्वाश्रमीचे प्राचार्य श्री. अनंत दामोदर आठवले म्हणजे आमचे अप्पा, एक श्रेष्ठ दुवा आहे. त्यांचे व्यक्तिमत्त्व व कर्तृत्व बहुआयामी होते त्यांच्या कर्तृत्वाचे अल्पसे स्मरण करण्याचा हा प्रयास आहे.

बालवयापासूनच त्यांची प्रगल्भ बुद्धी, प्रतिभासंपन्नता व जबरदस्त ज्ञानलालसा त्यांचे आजोबा पू. दादा तथा दासगणुमहाराज यांच्या लक्षात आली होती. वयाच्या सहाव्या वर्षी कीर्तन-आख्यानातील पदे अर्थपूर्ण शब्दात सहज खेळता खेळता क्षणार्धात पूर्ण करणे, वयाच्या बारा-चौदा वर्षांच्या आत गीतारहस्यासारख्या ग्रंथाचे पांक्त वाचन करून संपविणे, संस्कृतविषयीच्या निर्माण झालेल्या आकर्षणातून संस्कृतविषयाचा फारसा गंध नसताना 'मेघदूत काव्य' शब्दकोशाच्या मदतीने अन्वय व व्याकरणासहित समजून घेणे, तसेच स्वतंत्रप्रज्ञेला जे भावते त्यात मुरड घालण्याचा प्रसंग आल्यावर मनाची होणारी उलघाल अत्यंत सुंदर भाषाशैलीत, तर्कशुद्ध विवेचनाने शब्दबद्ध करणे तेही पू.दादांच्याविषयीचा आदर मनात राखूनच. हे सर्व वयाच्या १५ वर्षांच्या आत घडणे म्हणजे काही पूर्वसुकृताचा प्रभाव व कठोर परिश्रम याचाच परिपाक म्हणावा लागेल.

त्यानंतर अंत:करणात प्रखर देशभक्ती, त्याचबरोबर नास्तिकता रुजू लागली होती. वयाच्या १६ व्या वर्षी विष्णुसहस्रनामाचा पू. दादांच्या बरोबर नास्तिक विचारांच्या प्रभावातून वादविवाद, चर्चेची जोरदार सत्रे चालत असत. पू. दासगणूमहाराजांना त्यांचा व्यासंग, युक्तिवाद याचे जसे कौतुक वाटत असे तसेच वितर्काला कारण ठरणारी नव्याने निर्माण झालेली त्यांची विचारसरणी बदलली पाहिजे असे पदोपदी जाणवत असे. त्यामुळे कधी प्रेमाने, कधी रागाने तर कधी कठोर वचनांनी पू. दादांनी त्यांना समजावले. तसेच फटकारलेही. त्याचा परिणाम म्हणजे आस्तिकता त्यांच्या मन-बुद्धीला पटली आणि ते प्रामाणिकपणे ईश्वरनिष्ठ, गुरुनिष्ठ बनले. त्यांच्या अल्पवयातील योग्य दिशेने जाणाऱ्या बुद्धिवादाचे करावे तेवढे कौतुक कमीच आहे असे म्हणावे लागेल. कारण वैचारिक परिपक्वता जेव्हा विनयाला, अनुसरून व आदराने समर्पित होते, तेव्हा तिचे रूप अत्यंत मनोहर व कल्याणकारी असते हे सर्व अल्पवयात त्यांच्या ठिकाणी प्रकट व्हावे म्हणजे त्यांच्या थोर व्यक्तिमत्त्वाचा एक विलोभनीय पैलूच आहे.

पू. अप्पांना मराठीमध्ये महाकाव्य नाही याची फार खंत वाटत असे. त्याकरिता त्यांनी मॅट्रिकची परीक्षा दिल्यानंतर मिळणाऱ्या सुट्टीत श्रीशालीवाहन नावाच्या महाकाव्याचे लिखाण सुरू केले. वाचकांच्या दुर्दैवाने महाकाव्याच्या सर्व लक्षणांनी युक्त असलेले हे काव्य पूर्ण होऊ शकले नाही. परंतु त्यांनी वयाच्या चोविशीत 'श्रीकृष्णकथामृत' नावाचे सोरठ, चौपाई छंदोरचनेतील महाकाव्य लिहून पूर्ण केले. प्रतिभासंपन्न कवींच्या जीवनातही सामान्यत: एखाद-दुसरे महाकाव्य इतक्या अल्पवयात लिहिणे हा अनुभव विरळाच म्हणावा लागेल. येथे त्यांच्या विलक्षण प्रतिभासंपन्नतेचे दर्शन घडते आणि पुढे त्यांच्या हातून घडणाऱ्या प्रस्थानत्रयीवरील भाष्यसेवेच्या कार्याची ही जणू नांदी ठरते.

प्रसिद्धीपराङ्मुखता, नि:स्पृहता, परिसीमेचा प्रामाणिकपणा आणि व्यक्तिमत्वातील निरागसता, सत्यप्रियता, आश्वासकता या दुर्मिळ दैवी गुणांचा परिचय त्यांच्या पंचविशीच्या आतच लोकांना घडत होता. त्यामुळे लहान वयातच त्यांच्याविषयी कोणत्याही नाते-संबंधाने निर्माण झालेली आदराची भावना उत्तरोत्तर सहवासाने ती वृद्धिंगतच होत असे.

पू. अप्पांच्या व्यक्तिमत्त्वामध्ये क्वचित् परस्पर विरोधी म्हणावे अशा गुणांचा मिलाप झालेला होता. कठोर शिस्तपालनाबरोबरच अत्यंत कोमल अंत:करण, काटेकोर व्यवहाराबरोबर अंत:करणाची उदारता, धीरगंभीर व्यक्तिमत्त्वाला नर्म विनोदाची झालर, प्रत्येक गोष्टीचा आस्वाद घेताना जशी भरभरून रसिकतेची दाद तसेच परमार्थिक जीवनात अत्यंत निर्लेपता, सहवासात येणाऱ्या लहान-थोरांविषयी वगळ-निगळ न करता निर्व्याज प्रेम पण अन्याय्य वर्तणूक, भारतीय तत्त्वज्ञान, संस्कृती, इतिहास व विचारधारा या विषयी सवंगतेने मत प्रदर्शन करणाऱ्या व्यक्तींवर कशाचाही कोणाचाही मुलाहिजा न ठेवता कठोर शब्दात समाचार, हे सर्व गुण परिचितांच्या अंत:करणाला मोहित करत असत. उत्तम भोजनाचा आस्वाद घेताना त्यात रंगून जाणारे

पू. अप्पा अनशनाच्या बाबतीतही तितकेच कठोर होते. वक्तशीरपणा, नीटनेटकेपणा, वेळेचा अपव्यय होणार नाही या विषयी कटाक्ष असणारे पू. अप्पा गप्पांच्या मैफिलीत तास न् तास रंगून जात असत. या सर्व गुणांच्या ताणा-बाण्याने त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे उंची, मोहक, मुलायम व आकर्षक असे भरजरी वस्त्र विणले गेले होते. त्याचे आकर्षण त्यांच्या सहवासात येणाऱ्या व्यक्तीला कायमच वाटत राहिले. पू. अप्पांच्या प्रमाणे हिमालयासारखे उत्तुंग तर, सागरासारखे गहन, गंभीर व्यक्तिमत्त्व कालाच्या पटावर निर्माण होणे विरळच!

पू. अप्पांचे कर्तृत्व बहुआयामी, बहुविध अंगांनी सुशोभित झालेले होते. अष्टांग आयुर्वेद महाविद्यालयातील सहाध्यायांचे अध्ययनात पू. अप्पांचा अनेक अंगांनी सहभाग उल्लेखनीय होता. सहाध्यायांना क्रमिक पुस्तकातील विषय समजावून सांगणे, कठीण विषय लक्षात राहण्यासाठी संस्कृत भाषेत तो काव्यबद्ध करणे, विविध संदर्भासहित अवघड विषयांचे निरूपण करणे, हे आणि अशा अनेक प्रकारानी त्यांचा 'आयुर्विद्या पारंगत' होईपर्यंतचा कालावधी शिक्षणाच्या बाजूने अत्यंत यशस्वीपणे पार पडला. ते अध्यापकांचे अत्यंत लाडके विद्यार्थी होते. त्यांच्या कर्तृत्वावरील दृढ विश्वासाने त्यांना शिक्षण संस्थेत जबाबदारीची पदे सोपविण्यात आली. ते आयुर्वेद रसशाळेत सर्वोच्च पदावर होते, तर 'टिळक आयुर्वेद महाविद्यालयाचे' (हे नामकरण पू. अप्पांच्या प्रयत्नाने झाले) प्राचार्य व ताराचंद इस्पितळाचे प्रमुख अशा अधिकाराच्या श्रेष्ठ पदावर त्यांनी भरीव व यशस्वी कामगिरी केली. ते एक उत्तम अध्यापक, प्रशासक, व्यासंगी, शिस्तप्रिय म्हणून प्रसिद्ध होते. त्यांची ही यशस्वी कारकीर्द १५ वर्षांची होती. त्यांनी तत्वाला मुरड घालण्याचे प्रसंग वारंवार येऊ लागल्याने पुढे शिक्षणसंस्था सोडली. त्यांची कार्य करतानाची तत्परता, निरलसता व विद्यार्थी परायणता जशी ठसठशीतपणे नजरेत भरते, तसेच राजीनामा देतानाचा त्यांचा तडफदारपणाही त्यांच्या निर्मोहीपणामुळे अंत:करणाला भावतो. त्यांच्या कर्तृत्वाचे आयुर्विद्या महाविद्यालय हे महत्त्वाचे दालन ठरते. कारण त्यांची आयुर्वेद विषयांवरील ग्रंथसंपदा आजही भारतभर मान्यता पावलेली आहे.

शैक्षणिक क्षेत्रातून निवृत्त झाल्यावर ते लेखनाकडे वळले. त्यांनी ब्रह्मसूत्रे व उपनिषदे यावर भाष्यग्रंथ लिहून मराठी सारस्वतात बहुमोल भर घातली. श्रीमहानारायण उपनिषदावरील त्यांचे भाष्य हे आगळे-वेगळे ठरते. कारण श्वेताश्वतर उपनिषदासहित प्रमुख दशोपनिषदांवरील भगवद् पूज्यपाद श्रीमद् शंकराचार्य यांचे भाष्य उपलब्ध आहे. परंतु महानारायण उपनिषदावरील त्यांचे स्वतंत्र भाष्य त्यांच्या अलौकिक प्रज्ञेचे द्योतक आहे. श्रौत, स्मार्त व न्याय या तीनही प्रस्थानावरील त्यांचे भाष्य पू. अप्पांना आचार्यपदावर विराजमान करते. अलीकडे तीनशे-साडेतीनशे वर्षात त्यांच्या प्रमाणे प्रस्थानत्रयीवर भाष्य करणारा थोर विचारवंत भारतातही विरळाच म्हणावा लागेल.

पू. दादांचा शिष्य संप्रदाय पू. अप्पांचे आध्यात्मिक कर्तृत्व जाणून त्यांच्याकडे सातत्याने, आग्रहाने पू. दादांच्या समाधी मंदिराच्या स्थापनेकरिता विनंती करीत होता. त्यांना स्वत:ला मठ-स्थापना व महंती या विषयी अत्यंत उदासीनता असल्याने लोकांचा आग्रह त्यांनी निकराने परतवला. दीर्घ कालानंतर मात्र पू. दादांच्या परिवाराने पू. अप्पांकडून मंदिर स्थापनेकरिता परवानगी मिळवली. हे मंदिर उभारणीचे कार्य म्हणजे सद्गुरु सेवाच आहे या भावनेने पू. अप्पांनी मंदिर उभारणीसाठी अपरंपार कष्ट केले. कीर्तन-प्रवचन या माध्यमातून लोकेच्छेने एकत्रित होणारा धन-भाग त्यांनी मंदिर उभारणीकरिता वेचिला. नावाकरिता दिलेले दान त्यांनी कधीही स्वीकारले नाही. त्यामुळे मंदिरात कोठेही देणगीदारांची पाटी नाही. श्रीदासगणू प्रतिष्ठान पुरेसे मोठे आहे. भक्त-निवास ही येणाऱ्या लोकांच्या सोयीकरिता बांधलेला आहे. संस्थानात वर्षाकाठी अनेक उत्सव-महोत्सव होतात. त्यातील नियोजन व व्यवस्था पू. अप्पांच्या शिस्तीत आखलेली आहे. वेळेचा कटाक्ष हे पू. अप्पांचे वैशिष्ट्य आजही तितक्याच तत्परतेने सांभाळले जाते. श्रीदासगणू प्रतिष्ठान पू. अप्पांच्या कर्तृत्वाचा महत्त्वाचा मानबिंदू आहे.

पू. दादांचे निवासस्थान म्हणजे पंढरपूर येथील 'श्रीदामोदराश्रम.' एके वर्षी चंद्रभागेला खूप मोठा पूर आला. पंढरपुरात लोकांच्या घरादाराचे अतोनात नुकसान झाले. अर्थात त्याचा फटका दामोदराश्रमाला बसला. त्याच्या डागडुजीचे महत्त्वाचे कार्य पू. अप्पांना पार पाडावे लागले. त्यासाठीही त्यांनी कीर्तन-प्रवचनाचा मार्ग अवलंबिला. स्वेच्छा देणगीचा स्वीकार केला. या सर्व गोष्टींचा उल्लेख करण्याचे कारण म्हणजे पू. अप्पांनी कधीही धनसंचय केला नाही. स्वत: नोकरीत असताना प्रपंचाकरिता जो संग्रह योग्य वाटला तेवढाच केला. परंतु नोकरीचा राजीनामा दिल्यानंतर पुढे २५ वर्षे प्रपंचात लहानशी वस्तूही कधी विकत घेतली नाही. त्यांनी अत्यंत नि:स्पृहपणे पुढील काळात गृहस्थाश्रमाची कालक्रमणा केली.

'धन्यो गृहस्थाश्रम:' या वचनाप्रमाणे त्यांनी गृहस्थाश्रमाची यथोचित पूर्तता केली. स्वत: कर्तृत्ववान् असल्याने त्यांनी अनेकांना मार्गदर्शन केले. अनेकांना जवळ ठेवून घेतले व त्यांच्या जीवनाची घडी सुस्थिर केली. कोणाचे व्रतबंधन, कोणाचे विवाहबंधन तर कोणाला बिनबोभाट आर्थिक मदत केली. अनेक सुहृदांना त्यांच्या पाठीशी उभे राहून मानसिक आधार दिला. अनेकांच्या व्यावहारिक, प्रापंचिक समस्या सोडविताना वडिलांप्रमाणे, थोरल्या बंधूप्रमाणे खंबीर मार्गदर्शन केले. ते अनेकांना अनेक प्रकारे आधार वाटत राहिले. विशाल वटवृक्षाच्या छायेत अनेकांनी शीतलतेचा अनुभव घ्यावा तसे त्यांच्या विशाल कर्तृत्ववत् व्यक्तिमत्त्वाच्या मधुर, शीतलतेचा इतरेजनांनी अनुभव घेतला.

पू. अप्पांनी तीनही आश्रमांच्या यथायोग्य पालन, आचरणानंतर चतुर्थाश्रम स्वीकारला तो ही मातेच्या इच्छेची पूर्तता करून व शास्त्र मर्यादेचा अवलंब करूनच. संन्यासाश्रमातही मनुस्मृती आदि ग्रंथांच्या निर्मितीमुळे विद्वत् संन्यासाच्या परंपरेला त्यांनी सार्थकता दिली.

पू. दादांचा परिवार पू. अप्पांच्या कर्तृत्वामुळे पू. अप्पांच्याकडे आकृष्ट झालेला होता. पू. दादांच्या निधनानंतर व शिक्षण संस्थेच्या जबाबदारीतून निवृत्त झाल्यानंतर त्यांच्याकडे दादांचा परिवार मोठ्या

आशेने मार्गदर्शनाची प्रतिक्षा करत होता. पू. अप्पांनी स्वत:च्या अपेक्षेप्रमाणे आपला आध्यात्मिक अधिकार प्राप्त करून घेतला आणि त्यांनी आपल्या प्रेमाने परिवाराला छत्रछायाप्राप्त करून दिली. शेवटपर्यंत ते मार्गदर्शक म्हणून सर्व परिवाराकरिता परिश्रम घेत राहिले. परिवाराचे-लोकांचे प्रेम, श्रद्धा, साधनाधिकार कसा वाढत राहील यासाठी ते झटत राहिले. त्यांच्या अलौकिक जीवनातील चढ-उतारात नेहमीच त्यांना आश्‍वस्त करीत राहिले. आणि शेवटी संतकोटीच्या त्या महात्म्याने परिवारावर अलोट प्रेमाचे कृपाछत्र आपल्या पश्चातही कायमस्वरूपी स्फूर्तिरूपाने जिते-जागते ठेवले.

'संन्यासदीक्षा ग्रहण' हा त्यांच्या चरित्रातील अलीकडच्या काळात एक अवघडच प्रसंग म्हणावा लागेल. कारण महाराष्ट्रात विद्यमान काळात तरी चतुर्थाश्रमाचा स्वीकार फारच अभावाने केलेला आढळतो. त्यामुळे त्यांच्या चतुर्थाश्रम प्रवेशाविषयी अनेक प्रकारचे कुतूहल, चर्चा, आधुनिकांमध्ये निर्माण झाली. पू. अप्पांच्या तीनही आश्रमांच्या यशस्वी पूर्ततेनंतर त्यांचा चतुर्थाश्रम आचरण-व्यवहार गौरवाचा ठरला. पू स्वामी विद्यानंदगिरी यांच्यासारख्या ज्ञानी व अधिकारी पुरुषाने त्यांना विद्वत् संन्यास द्यावा ह्यातच त्यांचा अधिकार प्रत्ययाला येतो.

पू. अप्पांची गुरुभक्ती व देशभक्ती अत्यंत उत्कट होती. ते म्हणत, 'मी संन्यास घेतला आहे तरी माझ्या अंत:करणात या दोन गोष्टींना अढळ स्थान आहे.' तो त्यांचा भाव संन्यासदीक्षेची १२ वर्षे त्याच उत्कटतेने कायम होता, याची साक्ष त्यांचे वाङ्मय व देहसमर्पण या गोष्टी देतात.

पू. अप्पांनी घेतलेली समाधी हा त्यांच्या कर्तृत्ववान व पारमार्थिक जीवनाचा कळस ठरतो. ही समाधी म्हणजे सचोटीच्या जीवनवृक्षाला आलेले मधुर फळ होय. 'वीर ओळखावा रणी व संत ओळखावा मरणी' या उक्तीप्रमाणे आत्मलोप करून राहिलेले सद्गुरु समर्पित त्यांचे जीवन देहत्यागाच्या घटनेने उजागर झाले.

**डॉ. सौ. कल्याणी माधव नामजोशी**
१०१२/४, शिवाजीनगर, पुष्कराज, मित्रनगर कॉलनी,
पुणे ४११ ०१६. फोन - २५६५४८६६

•••

**हिमालयासम व्यक्तित्वाची,**
**उंची ज्यांची शोभतसे ।**
**अथांगता बुद्धीची ज्यांच्या,**
**विशाल उदधी सम भासे ।।**
**संतांसम जे निरलसतेने,**
**जनसामान्या सुखवीती ।**
**स्वये भवनिधी तरूनी, तारक**
**झाले अवघ्या जगाप्रती ।।१।।**



।। श्रीशंकर ।।

# वन्दे वरदानन्दम्

**सरस्वती कवी मो. बा. रवंदे**

संस्कृत काव्यातीर्थ, डी.एड., निवृत्त संस्कृताध्यापक. संतकवी दासगणूमहाराजांनी दिलेली सरस्वतीकवी ही पदवी. काव्यनिर्मिती- श्रीगणुदासायन (५५५५ पद्य हा संख्या असलेले महाकाव्य) श्रीशालिवाहन पद्य पुरवणी व गद्य कादंबरी, श्रीसंतकवी दासगणू विरचित आठ कीर्तनाख्यानांचे संस्कृत पद्यमय सयमक त्याच चालीवर असलेली अशी रचना, गीतेमध्ये- कालीदासाच्या मेघदूताच्या खंड काव्यावरची २१ गीते (गीतरामायणाप्रमाणे) थोडेशी मराठीत (पद्यमय) सुभाषिते. आणि प्रसंगानुरूप विविध रचना इ.

**महती ज्ञानेश्वरिची- या चालीवर (संस्कृत गीतम्)**

**वन्दे वरदानन्दं । श्रीयतिवर्यं विमलं शुद्धम् ।।ध्रु०।।**
**उत्तरकाशी क्षेत्रे । गंगा तीरे परम- पवित्रे ।।**
**निवसन्तं तं वन्द्यं । ध्यायन्तं हृदि हरि-गोविन्दम् ।।**
**वन्दे वरदानन्दम् ।।१।।**

**श्रीगणुदास-प्रसादात् । निर्मुक्तं खलु ममता- पाशात् ।।**
**त्यक्ताखिल-निर्वेदं । निरवद्यं तं निर्यत- भेदम् ।।**
**वन्दे वरदानन्दम् ।।२।।**

**नारायण बदरीशं । पश्यन्तं हृत-निखिल-क्लेशम् ।।**
**भगवन्तं सुख-कन्दं । मनसि जपन्तं श्याम-मुकुन्दम् ।।**
**वन्दे वरदानन्दम् ।।३।।**

**काषायाम्बर-वेषं । कण्ठे पावन-धृत-रुद्राक्षम् ।।**
**सश्रद्धं तं विबुधं । पटु-वक्तारं, भवगद्-वैद्यम् ।।**
**वन्दे वरदानन्दम् ।।४।।**

**युक्त्या वादविवादं । कृण्वन्नास्तिक-मत-विच्छेदम् ।।**
**उपनिषदाद्यनुवादं । कुर्वन्तं, संस्तुत-सद्वृन्दम् ।।**
**वन्दे वरदानन्दम् ।।५।।**

**भस्मेनांकित-भालं । गौरशरीरं, भव्य-विशालम् ।।**
**शान्तं दान्तं सिद्धं । सरस्वती-कवि-वन्दित-पादम् ।।**
**वन्दे वरदानन्दम् ।।६।।**

**-सरस्वतीकवि (मो.बा. रवन्दे)**
काव्यतीर्थ, नांदेड



# कुटुंबवत्सल अप्पा

**सौ. मुक्ता विनायक नांदेडकर**

गृहिणी

ती. अप्पांची कन्या. नांदेडमधील नांदेडकर या प्रसिद्ध घराण्याची सून.

**।। श्रीशंकर ।।**

भगवान श्रीकृष्णाप्रमाणे बहुआयामी व्यक्तिमत्त्व असणारे आमचे ती. अप्पा! त्यांच्या कोणकोणत्या पैलूंचे वर्णन करावे? जो जो उंच उंच जावे तो तो क्षितिजाच्या कक्षाही रुंदावत जातात. ते आपल्या हातात आले असे कधीच होत नाही. त्याप्रमाणेच ती. अप्पांच्या चरित्राचा आवाकाही प्रचंड आहे. ती. अप्पांच्या समाधीनंतर गेल्या ११ वर्षात 'तेजाचे चांदणे' आणि 'तेजोनिधी' ही दोन गद्य चरित्रे आणि एक २९ अध्यायांचा ओवीबद्ध ग्रंथ अशी त्यांची तीन चरित्रे प्रसिद्ध झाली आहेत. तरीसुद्धा ती. अप्पांचे चरित्र पूर्ण झाले आहे असे कोणासच वाटत नाही.

ओंकार प्रतिष्ठानतर्फे यंदा ती. अप्पांच्यावर विशेषांक प्रसिद्ध होतो आहे. ती. अप्पांच्या परिवारासाठी ही विशेष अभिमानाची गोष्ट आहे. ओंकार प्रतिष्ठान परिवाराने आता श्रीदासगणू आणि ती. अप्पांच्या परिवाराची एवढी भावनिक आपुलकी बाळगली आहे की औपचारिक आभार मानून त्यांच्या ऋणांतून मुक्त व्हावे असे वाटत नाही. त्यांच्या आदेशाप्रमाणे ती. अप्पा (वैद्य अनंत दामोदर आठवले तथा स्वामी वरदानंद भारती) मला जसे दिसले, जसे भासले, जसे आकळले तसे शब्दरूपात मांडण्याचा प्रयत्न करते आहे.

प.पू. श्रीदासगणू महाराज (दादा) आणि ती. अप्पा या दोघांमध्ये पिता-पुत्र, आजोबा-नातू, स्वामी-सेवक, सद्‌गुरू-शिष्य अशी अनेक नाती एकवटली होती. मी जरी शिशुवयात होते तरी त्या दोघांच्या वागण्या-बोलण्यातला विलक्षण जिव्हाळा, प्रेम, आत्मीयता माझ्या बालमनालाही जाणवत असे. श्री. छगनकाका बारटक्के, श्री. तुकारामकाका आजेगांवकर यांच्यावर ती. अप्पांनी बंधुवत् प्रेम केले. श्री. काशीअक्का तांबोळकरां-सारख्या निराधार स्त्रीला बहिणीचा दर्जा दिला. कु. वसुमति देशपांडे हिचा तर पित्याच्या मायेने सांभाळ केला. ती. अप्पांना सख्खे नातेवाईक फार थोडे. पण प्रेमाने आपलेसे झालेल्या या २५-३० माणसांचे कुटुंब कित्येक वर्षे सुखाने नांदले. आम्हा मुलांवर लहानपणापासून ती. अप्पांच्या प्रेमळ स्वभावाचे, विशाल हृदयाचे, उदार अंत:करणाचे कळत नकळत संस्कार होत गेले. या सर्व संस्कारांचा खरा उपयोग व्यक्तिश: मला विवाहानंतर नांदेडकर कुटुंबात समरस होताना झाला.



**खुर्चीवर श्री. अनंतराव व शेखर, सौ. इंदिराबाई व महेश**
**मागे उभे : मीरा, अहिल्या, मुक्ता**

माझे लहानपण पुण्यातील सदाशिव पेठेतल्या गोखले वाड्यात गेले. वाड्यात आम्ही ६-७ जणी बरोबरीच्या होतो. २-४ मुलेही सोबत असायची. शाळेतून घरी आल्यावर सगळे मिळून अंगणात खेळायचो पण दिवेलागणीच्या आत घरात आलेच पाहिजे असा ती. अप्पांचा दंडक असे. हातपाय धुवून देवासमोर बसून शुभं करोति, परवचा म्हणून झाल्यावर आम्ही सर्वजण ती. अप्पांच्या जवळ बसत असू. ती. अप्पा आम्हाला संस्कृत सुभाषिते, स्तोत्रे, मराठी श्लोक शिकवित. उन्हाळयातील १।।-२ महिन्यांचा लोणावळ्याचा मुक्कामही खूप मोठी संस्काराची रुजवण करीत असे. भांगरवाडीतल्या लहान-मोठ्या १५-२० जणांना घेऊन ती. अप्पा शेजारी असलेल्या हनुमान डोंगरावर जात. डोंगर पठारापर्यंत चढताना ती. अप्पा आमच्या सोबत सर्वात पुढे असत. डोंगर पठारावर फिरत असताना मारुतीरायाचे दर्शन झाले की, आम्ही मुले डोंगरचा मेवा म्हणजे करवंदे, जांभळे, तोरण, चिंचा या रानमेव्याची मजा चाखत असू. मनसोक्त हिंडत फिरत डोंगराआड लपणाऱ्या सूर्याला पाहूनच आम्ही सर्वजण खाली उतरत असू. येताना वाटेत पडलेल्या रानशेण्याही गोळा करून आणत असू.

त्यातून आम्हावर असे संस्कार झाले की, आज आम्हाला संसार करताना कुठल्याही गृहकृत्याची लाज वाटत नाही. सोबत आणलेल्या पळसाच्या पानांच्या पत्रावळी तयार करून दशहरा महोत्सवात त्याचा जेवणासाठी वापर होत असे. दिसायला साध्या असणाऱ्या अशा छोट्या छोट्या गोष्टीतून ती. अप्पांचे सहज खेळकर वर्तन व्यक्त होत असे. कीर्तन प्रवचनातून व्यक्त होणारे त्यांचे बौद्धिक सामर्थ्य पाहून आम्हाला त्यांच्या आमच्या सोबतच्या सहज खेळकर वर्तनाचे अप्रूप वाटायचे. पुढे मोठे झाल्यावर ती. अप्पांनी रचिलेले 'श्री कृष्णकथामृत' हे महाकाव्य वाचीत असताना या त्यांच्या वर्तनाचे गूढ उकलले. श्रीकृष्णाचे वर्णन करताना एके ठिकाणी असा उल्लेख येतो की,

**''सहज खेळकर साधे वर्तन ।**
**यातच मोठ्यांचे मोठेपण ।।''**

त्या वर्णनातून एवढा मोठ्या पात्रतेचा माणूस आम्हा मुलांमध्ये कसा रमत होता हे लक्षात आले.

ती. अप्पांना देशाटनाचीही प्रचंड आवड होती. आसेतु हिमाचल त्यांनी तीन वेळा भारत भ्रमण केले. कुठेही गेले तरी परत येताना घरातील प्रत्येकासाठी काहीतरी वस्तू घेऊन यायचे. धाकटी मुले शेखर, महेश यांच्यासाठी खेळणी तर आम्हा मुलींसाठी वेगवेगळे अलंकार, सौ. आईसाठी विशेष पातळ तर ती. आजीसाठी अंगठीतून निघणारे तलम रेशमी नऊवार पातळ इ.इ. ते स्वत: पारंगत वैद्य असल्याने रोजच्या तसेच प्रवासातील जेवणाखाण्यावर त्यांचे विशेष लक्ष असे. आरोग्याला घातक असलेली खाण्यापिण्याची मौज ते कधीच करू देत नसत. साध्या सुग्रास अन्नावर त्यांचा विशेष भर असे. मात्र त्या त्या मोसमातील फळे ते आमच्यासाठी आवर्जून आणत. उन्हाळ्यात हापूस आंबे दोन महिने रोज खावयास मिळत. एकदोन वेळा घरी आईस्क्रीमचे भांडे आणून आंब्याचे आईस्क्रीम करण्याचा कार्यक्रम होई. ती. अप्पा स्वत: ते भांडे फिरवायला बसत. वैदिक ब्राह्मणांना बाजारातील आईसक्रीम चालत नसे. त्यांना विशेष निमंत्रित करून ती. अप्पा स्वत: तयार केलेले आईस्क्रीम पोटभर खाऊ घालीत. माझा धाकटा भाऊ महेश याने ती आठवण अजून ताजी ठेवली आहे. आजही उन्हाळ्यात ब्रह्मवृंदाना मंत्रजागरासाठी आमंत्रित करून तो घरी तयार केलेले आईस्क्रीम खाऊ घालतो. अशाच प्रकारे वेगवेगळ्या मोसमात ती. अप्पा बटाटेवडे, भेळ, इडली, डोसा, दहीवडे असे निरनिराळे पदार्थ घरीच सौ. आईला करावयास लावीत. आजच्या पिढीला कदाचित या गोष्टी खऱ्या वाटणार नाहीत. पण ते सर्व संस्कार आम्ही आजही जपून ठेवले आहेत. आमच्या पिढीच्या घरात ते आहेतच. अगदी श्रीदासगणू प्रतिष्ठानसारख्या संस्थेतही ब्रह्मवृंदांना असे पदार्थ घरी तयार करून तृप्त करतात.

अशा तऱ्हेने ती. आजी, ती. अप्पा, सौ. आई यांनी केलेले संस्कारयुक्त लाडकौतुकात, शिस्तीत, आम्ही वाढत होतो. त्यांच्या स्वत:च्या आचरणातून, वडीलकीच्या मार्गदर्शनातून, क्वचित व्यक्त होणाऱ्या धाकातून आम्हा मुलांचे आयुष्य घडत गेले. त्यांच्या नजरेतच एक विलक्षण जरब होती. अगदी अनोळखी माणसालासुद्धा त्यांच्या नजरेला नजर देता येत नसे. त्यांच्या आवाजालाही विशेष धार होती. समोरचा मनुष्य खोटे बोलतो आहे हे लक्षात आल्यावर त्यांचा आवाज चढायचा पण तो समोरच्या माणसाच्या हिताच्या कनवळ्याने. पण काही क्षणच. थोड्या वेळातच त्या व्यक्तीला त्यांच्या वत्सलतेचे दर्शन होई. **''जे करणे असेल ते खरे करा तत्त्वता'** ही श्रीदासगणू महाराजांची शिकवण ती. अप्पांनी आयुष्यभर जोपासली. भाजी कशी चिरावी यापासून पुरणपोळीसारखे अवघड पक्वान्न कसे करावे इथपर्यंत अतिशय मौलिक सूचना ते आम्हाला देत. भांड्याच्या आकाराच्या बाहेर जर गॅसच्या ज्वाला दिसल्या तर तुमचा गॅस वाया जातोय हे ते लक्षात आणून देत. ती अप्पांची हिमालयाची यात्रा प्रतिवर्षी व्हायचीच. साधारणपणे २०-२५ दिवस टिकणारे, सोबत नेण्यासाठी सोयीचे असणारे तीन-चार नवीन पदार्थ त्यांनी आम्हाला शिकविले. केळ्याच्या वड्या, कोको आणि दूध पावडर यांचा वापर करून केलेल्या घरगुती कॅडबरीच्या गोळ्या, लोण्यात कणीक फेसून करायच्या साखरपाण्याच्या वड्या, बदामाची पूड घालुन तूपात तळलेले खजूर अशा अनेक पदार्थांच्या पाककृती (रेसिपी) त्यांनी आम्हाला शिकविल्या. शिवाय बोधही केला की आवश्यकतेनुसार पदार्थ तयार करण्यासाठी बुद्धी असून तुम्ही तिचा वापर करीत नाही. ''पिछेसे आयी आगे चली'' अशाच चक्रात अडकून पडता. त्यांची मार्गदर्शनाची ही वृत्ती व्यवहाराच्या प्रत्येक क्षेत्रात होती. वैज्ञानिक संशोधनापासून शेतीतील कष्टाळू कामापर्यंत त्यांचे मार्गदर्शन असे. सौ. आईला त्यांनी बॉलबेअरिंग बसविलेले दळणाचे जाते करून दिले होते.

नांदेडकर घराणे आणि श्रीदासगणू परिवाराचा तीन-चार पिढ्यांपासून जिव्हाळ्याचा ऋणानुबंध. त्यामुळे माझे पति अप्पांना माझ्यापेक्षाही जास्त जवळचे. इतके की ती. अप्पांनी त्यांना कधी जावई मानलेच नाही. पोटच्या मुलाप्रमाणे माया केली, उपदेश केला, कर्तव्याची जाण दिली, मार्गदर्शन केले एवढेच नाही तर अनेक संकटातून तारून नेले. वेळ प्रसंगी कौतुकाची शाबासकी दिली. ती. अप्पांच्या संन्यासदीक्षेच्या प्रसंगी केलेल्या काव्यांत त्यांनी ती. अप्पांच्या गृहस्थाश्रमाचे मोठे हृद्य वर्णन केले आहे.

**''धन्य म्हणति त्या गृहस्थाश्रमा तुमच्यासम जे आचरिती ।**
**सुटून गेला करित नेटका धन्य खरी ती दासोक्ती ।**
**दान धर्म पूजन संतांचे उदात्तता अंत:करणा ।**
**प्रसाद अमुच्या चित्ति असो द्या हीच विनंती तंवचरणा''** ।।

दान हे मनुष्याच्या उद्धाराचे महत्त्वाचे साधन आहे. ती. अप्पांनी स्वत: तसेच त्यांच्या आईच्या हस्ते अन्नदान, वस्त्रदान, सुवर्णदान, रजतदान, भूदान, दक्षिणा, देणग्या अशी अनेक प्रकारची दाने अगदी भरभरून दिली आणि तीही उजव्या हाताने दिली तर डाव्या डाताला कळणार नाही इतक्या गुप्तपणे. संकटकाळी राष्ट्रभक्त मंडळी कारागृहात असताना त्यांचे संसार ती. अप्पांनी उघड्यावर येऊ दिले नाहीत. त्यांनी मदत केली हे संबंधित राष्ट्रभक्तांना खूप उशिरा कळले. पुत्रधर्म, पतिधर्म, पितृधर्म, राष्ट्रधर्म असे अनेक धर्म पाळणारे ती. अप्पा बघितल्यानंतर त्यांच्या रूपाने मूर्तिमंत धर्मच प्रगटला आहे असे वाटे.

ब्रह्मवृंदांचे आणि संतांचे सत्कार हे ती. अप्पांचे विशेष आवडीचे

विषय. २५-३० वर्षांपूर्वी पंढरपूरला दामोदराश्रमात आयोजित केलेला संतपूजनाचा समारंभ आजही अनेकांच्या स्मरणात आहे. स्वत: ती. अप्पा आणि सौ. आईने आलेल्या प्रत्येक संतांचे हात जोडून विनम्र भावाने केलेले स्वागत, त्यांचे पादप्रक्षालन, आसनस्थ झाल्यावर त्यांचे यथासांग पूजन आजही आठवण झाली की दृष्टीसमोर तरळते. ती. अप्पा स्वत: मुखाने श्रीदासगणूंनी रचलेले ''साधुसंत सत्पुरुष गड्यांनो सत्पथ वासरमणी'' हे पद म्हणत होते ते स्वरूप सतत दृष्टीपुढे उभे ठाकते. उपस्थित भाविकांना, **''जई जगा धाकुटे होइजे। तई जवळीक माझी।।''** या ज्ञानेश्वर महाराजांच्या उक्तीचा प्रत्यय आला. दान, धर्म, पूजन, उदार अंत:करण ही चतु:सूत्री जणू ती. अप्पांच्या आश्रयाने राहात होती. असा हा धन्य गृहस्थाश्रम अलगद सुटून गेला आणि ती. अप्पांनी वानप्रस्थाश्रमात प्रवेश केला. नेटका करता प्रपंच कसा सुटून जातो ते त्यांनी स्वत:च्या आचरणातून दाखवून दिले.

आदर्श पुत्र, पति, पिता, सखा, सोयरा इत्यादी भूमिका यशस्वीपणे पार पाडीत असतानाच श्रीदासगणू महाराजांच्या परंपरेतील उत्सव महोत्सव, कीर्तने, प्रवचने, समाज प्रबोधन, शंका निरसन इत्यादी कार्येही ती. अप्पा समर्थपणे पार पाडीत होते. जोडीला त्यांची वैयक्तिक साधनाही होतीच पण ती सरस्वती नदीप्रमाणे गुप्तस्वरूपात होती. वयाच्या पन्नासाव्या वर्षीच त्यांनी श्रीवरदनारायणाचा साक्षात्कार होण्याएवढा अधिकार मिळविला. प्रत्यक्ष श्री. वरदनारायणाचे दर्शन झाल्यावर त्यांची चित्तवृत्ती प्रफुल्लित झाली, मन कसे आनंदविभोर झाले, प्रसन्न झाले. श्रीनारायणाच्या वरद हस्तस्पर्शाने ती. अप्पा विश्वरूपदर्शन झालेल्या अर्जुनाचे समाधिसुख, धन्यता कसे अनुभवू लागले याचे अनुमान त्यांनी केलेल्या कवितांवरून करावे लागते. प्रत्यक्ष बोलतांना त्यांनी हा विषय आपण होऊन कधीही काढला नाही.

श्रीदासगणू महाराजांचे शिष्योत्तम, सर्वार्थाने सर्वाधिकार मिळविलेले ती. अप्पा श्रीरामदासनवमी शके १८९५ (इ.स. १९७३) या पवित्र दिनी, श्रीवरदनारायणाच्या आज्ञेने गुरुपदी आरूढ झाले. ती. अप्पांच्या व्यक्तिमत्त्वाला एक अपूर्व तेजोवलय प्राप्त झाले. ती. अप्पांचा अनुग्रह सहजपणे मिळत नसे. त्यांचे शिष्यत्व घेऊ इच्छिणाऱ्या साधकाकडून ज्ञानेश्वरी, गाथा, दासबोध, मनोबोध, गीता इत्यादी ग्रंथांची पारायणे, काही जप करण्यास सांगत. ही एवढी साधना झाल्यावरच शिष्यत्व देत. त्यांचा शिष्यपरिवार हळूहळू वाढत होता. शिष्याचे हित ही ते स्वत:ची जबाबदारी समजत.

**त्वमेव माता च पिता त्वमेव । त्वमेव बंधुश्च सखा त्वमेव ।**
**त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव । त्वमेव सर्वं मम देव देव ।।**

सद्‌गुरूंचे सांगितलेले माहात्म्य त्यांचे शिष्य सर्वार्थाने अनुभवू लागले. ती. अप्पा अगदी बालवयात असतानाच श्रीदासगणू महाराजांनी त्यांच्या हृदयात हे प्रेमबीज लावले. स्वत:च्या वात्सल्याचा वर्षाव करून ते रोप वाढविले, आशीर्वादाची सावली केली आणि त्या छोट्या रोपट्याचा आज महावृक्ष झाला.

**प्रेमबीज रुजविले तंव हृदिं गणुदासांनी वाढविले ।**
**वर्षावाने त्या प्रेमाच्या तृप्त जाहलो अम्हि सगळे ।।**

सर्वच शिष्यपरिवाराला त्यांच्यातील समभावाचे दर्शन होऊ लागले. श्रीज्ञानेश्वरीच्या सातव्या अध्यायातील उक्तीप्रमाणे...

**झाला गुरुकृपेचा उष:काल । पडले ज्ञानाचे उन कोमल ।**
**तेथ दृष्टीस पडे विपुल । ऐश्वर्य साम्यभावाचे ।।**

याचा अनुभव सर्वांना येऊ लागला. प्रत्येक जवळ येणाऱ्या भाविकाला वाटू लागले ती. अप्पांच्या सर्वात जवळचा मीच आहे. एवढ्या मोठ्या प्रमाणात अशी आत्मीयता अनुभवास येणे ही एक अलौकिक बाब होती. मात्र आत्मीयता आणि वात्सल्याचा अनुभव जेवढा खरा होता तेवढीच ही वस्तुस्थितीही खरी होती की, ती. अप्पा या सर्वातून विरक्तही होते. अनुवाद ज्ञानेश्वरीत त्यांनीच गुरुमाऊलींविषयी म्हटले आहे की,

**''हे उदारा सद्‌गुरूमूर्ती । याहून नवल असे अति ।**
**तुम्ही आपुले म्हणता ज्याप्रति । तो इतरा न आपुला म्हणे ।।''**

येथे 'आपुला' या शब्दाने त्याविषयीची आसक्ती सुचवायची आहे. आसक्ती ममत्व सुटल्याशिवाय विरक्ती प्राप्त होत नाही, अंगी वैराग्य बाणल्याशिवाय ज्ञान प्राप्त होत नाही आणि ज्ञान प्राप्त झाल्याशिवाय परमेश्वर भेटत नाही. अगदी साध्या भाषेत सांगायचे तर परमेश्वराच्या प्राप्तीची दोन प्रमुख साधने. ईश्वरात प्रत्येक भूतमात्राला पाहणे किंवा प्रत्येक भूतमात्रात ईश्वराला पाहणे. ती. अप्पांनी यांतील कोणता पर्याय निवडला होता हे नक्की ठरविण्याचा अधिकार कोणालाच नाही. पण प्रत्येकजण आपापल्या दृष्टीने यावर विचार करू शकतो.

**नारायण ध्यानी नारायण मनीं । आसनी शयनी नारायण ।**
**कृति नारायण वृत्ति नारायण । सारे जनवन नारायण ।**
**नारायण शक्ति नारायण भक्ती । आसक्ती विरक्ती नारायण ।।**

ती. अप्पा त्यांच्या रोजच्या जीवनात घेत असलेले हे अनुभव हळुवारपणे त्यांच्या मुखातून अभंगरूपाने प्रकटले आहेत. संपूर्ण दासगणू परिवाराच्या गुरूस्थानी असलेल्या पू. अप्पांनी विविध क्षेत्रात प्रचंड कार्य केलेले आहे. विस्तारभयास्तव एवढीच विनंति करते की जिज्ञासू वाचकांनी श्रीक्षेत्र गोरठा जि. नांदेड येथे उभारलेल्या 'संजीवन' या पू. अप्पांच्या स्मृतिदालनास भेट देऊन त्यांचे चित्ररूप चरित्र पहावे, अभ्यासावे, त्यांनी लिहिलेल्या ग्रंथांचा परिचय करून घ्यावा. त्या ग्रंथांच्या वाचनातून आचरणाची प्रेरणा मिळाली तर त्यासारखे भाग्य नाही. पू. अप्पांचे संपूर्ण आयुष्य जणु भगवद्‌गीतेचा उत्सवच होता.

वयाच्या १६व्या वर्षी त्यांना सद्‌गुरु दासगणू महाराजांकडून 'विष्णुसहस्रनामाचा लाभ झाला व तो त्यांनी आयुष्यभर प्राणपणाने जपला. शिवाय परिवारातील साधकांना त्याचा लाभ करून दिला. आजही गोरटे येथे श्रीदासगणू मंदिरात 'विष्णुसहस्रनामा'ची सामुदायिक पठनाची नित्य उपासना होते. एवढेच नव्हे तर पू. अप्पांच्या प्रत्येक शिष्याच्या घरीही ही उपासना होते. गोरटे येथील ''श्रीदासगणूमंदिर'' केंद्रस्थानी ठेवून श्रीसाईबाबा, श्रीवामनशास्त्री, श्रीदासगणू महाराज, पू. अप्पा (स्वामी वरदानंद भारती) यांच्या रूपाने ही भक्तिप्रेमरसाची गंगा, लोकोद्धाराचे व्रत घेऊन अखंड वाहतेच आहे. अशा या पवित्र पावन, निर्मळ गंगेत पुन:पुन्हा अवगाहन करून आपले शरीर, मन, बुद्धी शुद्ध,

निश्चल होण्यासाठी प्रयत्न करू. जवळ आलेल्या लेकराला माय कधी अंतर देत नाही हा आजवरचा इतिहास आहे. यासाठीच आपल्या परंपरेत सद्गुरूला माउली म्हटले जाते.

माझ्यासारखी भाग्यवान मीच आहे. ती.पू.अप्पांच्या रूपाने एका कर्तव्यदक्ष, प्रेमळ पित्याचे छत्र मला लाभले. आम्हा नांदेडकर कुटुंबीयांच्या मस्तकावर ठेवलेला त्यांचा वरदहस्त आजही आम्हाला आश्वस्त करीत असतो. त्या कृपाशीर्वादाच्या कृपेचा स्पर्श आम्ही भरभरून अनुभवीत आहोत. तीर्थरूप असणारे पिताश्रीच आम्हाला सद्गुरू म्हणून लाभावेत याहून दुसरे भाग्य ते कोणते. आमची चारी मुलेही सद्गुरूंच्या सेवेत समर्पित आहेत याचे या वयात खूप समाधान आहे. माझा धाकटा मुलगा चि. विश्राम याने पू. अप्पांची काव्यरूपात प्रार्थना केली आहे. त्या प्रार्थनेनेच या लेखाचा समारोप करूया.

### करुणाकरा

**करुणाकरा अनंता । वरदा सदा असावे ।**
**ते छत्र सत्कृपेचे । केव्हा न अंतरावे ।।धृ।।**

**वचने तुझी आम्हाला । कळली परी न वळली।**
**मन बुद्धिलाही अजुनी । स्थिरता मुळी न आली ।**
**आळसा दुरी धराया । आम्हास जागवावे ।।१।। वरदा...**

**श्रद्धा जरी असे ती । निष्ठेचि वानवा ती ।**
**वाचन श्रवण होते । आचरणि नाहि वृत्ती ।**
**ज्ञानेश होउनीया । कर आमुचे धरावे ।।२।। वरदा...**

**गुरूपंथ चालवाया । दे शक्ति तूच सदया ।**
**दोषास घालि पोटी । शिशुवरति ठेवि माया ।**
**तंव मार्गि चालण्या या । हृदिं आमुच्या वसावे ।।३।।**
**वरदा सदा असावे...**

ॐ श्री: 卐

**सौ. मुक्ता विनायक नांदेडकर**
'अनंतश्री' संकुल, महावीर चौक, नांदेड (मराठवाडा)
भ्रमणध्वनी : ७७०९४१७४७६

•••

**मन-वाणी-बुद्धीही श्रमली देशहितार्थासी,**
**संस्कृति संरक्षणार्थ बनले योद्धा-संन्यासी ।।**
**धर्माचरणी निरपवाद जणु गांगेयचि सार्थ,**
**यथार्थ आचरणे जिंकियले चारहि पुरुषार्थ ।।**



# एका सिद्धाची सहधर्मचारिणी!

**सौ. वसुधा परांजपे, पुणे**
बी.ए. (आनर्स) भारत हायस्कूलमध्ये ३० वर्षे शिक्षिका, अध्यात्म विषयावर प्रवचने, राणी लक्ष्मीबाई मंडळ असो. कार्यकारी विश्वस्त, विपुल लेखन, ग्रंथलेखन, विविध मासिकांतून लेखांचे लिखाण.

प. पू. अप्पांनी आपल्या रुक्मिणी स्वयंवर आख्यानाच्या पूर्वरंगाच्या पदात कुटुंब संस्थेचे महत्त्व सांगताना म्हटले आहे, 'स्त्रीरथी येथिचा असे सारथी पती' पतीने सारथी असणे किंवा पत्नीने 'रथी' होऊन घर सांभाळणे यावर त्यांचा विश्वास होता. यातील कोणीच श्रेष्ठ वा कनिष्ठ नाहीत असेही त्यांचे मत होते. पती-पत्नीच्या निकोप नातेसंबंधावरच आदर्श कुटुंब संस्थेचा रथ चालत असतो. श्री. अनंत दामोदर आठवले आणि सौ. इंदिरा अनंत आठवले हे एका आदर्श कुटुंबाचे 'सारथी' आणि 'रथी' होते. बहुआयामी व्यक्तिमत्त्व आणि कर्तृत्व असणाऱ्या पू. अप्पांच्या इंदिरावहिनी आदर्श सहधर्मचारिणी होत्या.

इंदिरा वहिनीचे पूर्वाश्रमीचे नाव विमल. कु. विमल हरिभाऊ लिमये. हे लिमये कुटुंब मूळ जत संस्थानातले. हरी गणेश लिमये त्यांचे वडील. रेल्वेत स्टेशनमास्तर. वरचेवर बदली हा नित्यक्रम! पंढरपुरी पटवर्धनांकडे विमलचे आजोळ. तेथे त्यांचा जन्म झाला. ११ ऑगस्ट १९२४. श्री. पटवर्धनांचे घराणे प्रसिद्ध होते. घरात लहानपणापासून कुमारी विमलावर घरकामाचे संस्कार. धुणं-भांडी-स्वयंपाक घरातली कामे ती करीत असे. आणि व्हर्नाक्युलर फायनल पर्यंत शिकलेली. वडिलांच्या बदल्यांमुळे मोठा भाऊ बाबू यासह विमल पटवर्धनांकडे रहायची.


गृहिणी, सखी, सचिव- समवेत श्री. अनंतराव (१९५८)

पटवर्धन व दासगणू महाराज यांचा स्नेह होता. दासगणू महाराजांची नात गंगू (म्हणजे अनंताची बहीण) विमल या समवयस्क. दासगणूंचा वाडा मोठा होता. तेथे अनेक मुली खेळायला, भोंडल्याला एकत्र येत. आणखी एक गंमत अशी की बाबू आणि अनंता हेही मित्र होते. जाणे-येणे असे. फायनल झाल्यामुळे आता ती खरोखरीच उपवर झाली म्हणून आजीने हरिभाऊंना अनंताचे स्थळ सुचविले. मुलगी पसंत पडेल का असा प्रश्नच नव्हता.

मुलगी विमल तेजस्वी, गौरकेतकी वर्ण, बोलके डोळे, गोल चेहरा, महालक्ष्मीसारखे मुख मंडल, लांब सडक केस, उंची मध्यम - सारेच सुंदर होते. विमलच्या आईच्या आई-आजी- चंद्राक्का म्हणत, ''कुणी नापसंत करील तर त्याला काही कळत नाही असेच म्हणावे लागेल.

दासगणू महाराजांचा अनंता लाडका होता. वडिलामागे त्याचे सारे काही त्यानीच केले होते. नाकी डोळी नीटस, थोडासा गौरवर्ण, काहीशी भेदक नजर, सरळ उंच, चेहऱ्यावर मंद स्मित, भव्य कपाळ! आकर्षक व्यक्तिमत्त्व! शिवाय दासगणू महाराजांच्या कृपाछत्राखाली वाढलेला. सारे अनुकूल होतेच पण तरीही हरिभाऊंना वाटे, इतक्या मोठ्या घरातल्या मुलाचे हे स्थळ. आपली मुलगी काहीच नाही! आपण देणार तरी काय? तथापि कळलेच आहे तर भेटू या म्हणून गेले. तो दादा (दासगणू म.) म्हणाले, अहो हरिभाऊ विमल तुमची मुलगी, मला नंतर कळले. आमच्या गंगूची मैत्रीण!

हरिभाऊ काही म्हणणार तो दादा उठले, साईनाथांच्या प्रतिमेसमोर त्यांनी वाङ्निश्चय केला. नमस्कार करून आले. म्हणाले, तर हरिभाऊ मुलगी पसंत आहे. आमच्याकडे सारे काही आहे. मुलगी द्या तिजबरोबर नारळ! बस! ठरलं तर मग!

हरिभाऊंनी स्वत:लाच चिमटा काढला. हे स्वप्न नाही ना? यानंतर दिनांक-तिथी ठरवून दादांनी तसे अनंताला पत्र पाठवले आणि नियोजनाप्रमाणे कु. विमल - श्री. अनंत आठवले यांचा मंगल विवाह पंढरीत खाजगीवाल्यांच्या वाड्यात १९ फेब्रुवारी १९४१ या दिवशी संपन्न झाला. वधू-वरांनी माला अर्पण करतानाच परस्परांना पाहिले.

आता विमल लिमये सौ. इंदिरा अनंत आठवले म्हणून - आठवल्यांची स्नुषा म्हणून गृहप्रवेश करती झाली. सर्व ज्येष्ठांच्या पाया

पडण्याचा कार्यक्रमही यथासांग झाला. राधा मातेचे नेत्र कृतकृत्यतेने वहात होते. दोनच दिवसांनी प्रथेप्रमाणे नवदाम्पत्याच्या हस्ते अन्नदान करण्यात आले.

ती दादांचे घरी १०-१५ माणसे नित्याचीच होती. आला गेला पाहुणा या व्यतिरिक्त. पण इंदिरेला मुळातच कामाची हौसही होती. सवयही होती. नव उत्साहाने ती सारी कामे करू लागली. एक दिवस दादांनी विचारले, इंदिरा, तुला स्वयंपाक येतो करता? खेळायला अनेक वेळा आलेल्या इंदिरेला हे आजोबा तसे नवीन नव्हते. ती पटकन् उत्तरली – 'हो, सगळं येतं करता मला! मग आजच करते मी स्वयंपाक!' ती. दादांच्या सूचनेमुळे ज्येष्ठ स्त्रिया तिला थोडीफार मदत करून तिच्या कामाकडे मोठ्या कुतुहलाने पाहू लागल्या.

ती. दादा अंघोळीला गेले. स्नान-संध्या झाली. जेवायलाही बसले. पुरणाच्या पोळ्यांचा बेत होता. नैवेद्य झाला. मधोमध वरणासह भाताची मूद, पुढे थोडी खीर, चटण्या-कोशिंबिरी, उजवीकडे दोन भाज्या – वाटीत आमटी! सुरेख बेत जमला. ती. दादा जेवताना संतोषाने म्हणाले, बरं झालं, आता राधेला विश्रांती घ्यायला हरकत नाही! इंदिरे छान झाल्यात हं पुरणपोळ्या!

दिवस-महिने जात होते. पतिराज पुण्यातून येत. त्यांच्या वाटेकडे इंदिरेचे लक्ष असायचं. पण शनिवारी किंवा सोमवारी जोडून काही असल्याशिवाय अनंतराव येत नसत. तथापि काही सुट्ट्या त्यांनी पंढरपुरात घालवल्या. गुरुपौर्णिमा उत्सवाला ते येणार हे निश्चित होतं. यावेळी त्यांना नवीन गोड बातमी कळणार होती. ८ मार्च १९४३ या दिवशी अनंतराव पिताश्री झाले. इंदिराबाईंना पुत्ररत्न मिळाले. पटवर्धनांकडे मुलाचे बारसे झाले. मुलाचे नांव शंकर ठेवले! मुलगाही पायगुणाचा ठरला. याच वर्षी झालेल्या परीक्षेत अनंतराव उत्तम प्रकारे उत्तीर्ण झाले. आयुर्वेद विशारद झाले! म्हणजेच आयुर्वेदाची पदवी मिळण्यापूर्वीच पिताश्री पदवी मिळाली!

पुढे काही दिवस अप्पा ती. दादांच्या प्रकृतीच्या दृष्टीने त्यांचेसह रहात. पुढे मामा गोखल्यांमुळे ते आयुर्वेद पारंगतचा अभ्यास करण्यासाठी पुण्यातल्या अभ्यंकर वाड्यात रहात. पण एकटे. मुलं भाचे (गंगूचे दोघे मुलगे – ती गेली क्षयाने म्हणून) यासह ते पंढरीत रहात. त्याचवेळी अधिक ज्येष्ठ होता. तो अप्पांनी पुण्यात करायचा घाट घातला. त्याला अत्यंत उत्तम प्रतिसाद शांताबाई गोखल्यांनी जागा देऊन दिला. अप्पांच्या कसोटीचा तो काळ होता. कारण त्यांनी ती परीक्षाही प्राविण्यांकाने मिळविली आणि 'अधिक'ची सारी उठाठेव सौ. इंदिरा वहिनींनी केली. नांदेडकडील सर्व मंडळी गोखले वाड्यातल्या अनेक कुटुंबातून विभागून होती म्हणता येईल. या साऱ्या व्यापाचे कौशल्य इंदिराबाईंचे होते.

इंदिराबाई तशा शिस्तीच्याच होत्या. मुलांवरील त्यांचे संस्कार प्रेमाच्या धाकाने झाले. याच वर्षातली म्हणजे १९५० मधली महत्त्वाची गोष्ट – कृष्णकथामृत – महाकाव्याचे लेखन! या थोर महाकवीला लेखक मिळाल्या इंदिराबाई! कृष्णनिर्याण कथा झाली त्यावेळी अप्पांना भरून आले होते. हुंदके येत. इंदिराबाई दिङ्मूढ! डोळे वाहात असतानाच त्यांनी विचारले – आपणास काय झाले? त्या कानकोंड्या झाला. तो भक्त्युद्रेक थोडा ओसरला. अप्पांनी खुलासा केला. तेव्हा इंदिराबाईंना हायसे वाटले. पंढरीतला हा प्रसंग त्या तितक्याच हृद्यतेने सांगतही!

शंकर आता बारा-तेरा वर्षांचा झाला होता. पुण्याच्या नू. म. वि. मध्ये शिकत होता. त्याला एकएकी जबर दुखणे झाले. ल्युकोमिया. अप्पांनी अथक प्रयत्न केले. अनेक डॉक्टर्स बघितले. मुंबईच्या मोठ्या हॉस्पिटलमध्येही ठेवले. पण.... पण मोठा वाईट! निरूपायाने शंकर गेला. १९५६ साली वहिनींवर आकाश कोसळले. त्यांच्यावर शंकरच्या जाण्याचा परिणाम फार फार झाला. अप्पांचेही प्रयत्न थकले. दादांनी मात्र तिला धीर दिला. म्हणाले, अग, तो तुझा नव्हताच ना, म्हणून तुला दुःख दिले त्याने. तू चिंता करू नको. तो एक गेला तर तुला दोन होतील! देवावर श्रद्धा ठेव!''

संतवचनावरचा दृढ विश्वास म्हणा की योगायोग म्हणा मुलींच्या पाठीवर १९५८ मध्ये शेखर तर १९६१ मध्ये महेश या दोघांचा लाभ इंदिराबाईंना झाला. लेकरांचे आणि परिवाराचे सारे सारे त्यांनी पूर्ण उत्साहाने केले. लोणावळे, पंढरपूर, पुणे, गोरटे, नांदेड – सर्वत्र संचार असे. हिमालयातली प्रतिवर्षीची वारी. ही सारी व्यवधाने त्या सांभाळीत. एक वर्ष पायी आळंदी पंढरपूर वारी केली. पण त्यात आलेला वामनशास्त्री पुण्यतिथीचा उत्सव नेहमीप्रमाणे केला. अप्पांनी काव्यासह कीर्तने तर ५०-७५ माणसांचा स्वयंपाक वहिनींनी! पुन्हा वारीला जोडले गेले. अप्पाही मनापासून अनेक प्रकारची मदत करीत.

शांताबाई गोखल्यांचे जामात अप्पा पळसुले हे त्यांचे जिव्हाळ्याचे मित्र बनले. सावरकर दोघांचा जिव्हाळ्याचा विषय! १९६२ मध्ये ती. दादा पंढरीत गेले. हा धक्का अप्पांसह सर्वांना मोठा होता. आता नोकरी सांभाळून (आयुर्वेद महाविद्यालय) गुरुपरंपरा रक्षणाचा विचार ते गांभीर्याने करू लागले. त्याकामी इंदिरा वहिनींची अमोल मदत त्यांना झाली. पत्नीची ही कृतज्ञता त्यांनी बऱ्याच वेळा व्यक्त केली आहे.

महाविद्यालयीन दायित्व वाढल्यावर रसशाळेच्या बंगल्यात ते राहायला गेले. इंदिराबाई तेथे ही लोकप्रिय झाल्या. मीराचा विवाह तेथेच पार पडला. शरदराव भावे हे इंजिनिअर त्यांना जावई लाभले. पुढे काही वर्षांत मुक्ता-अहिल्या यांचीही लग्ने झाली. मुक्ताचे यजमान इंदिराबाईंनी लहानपणापासून पाहिलेले. विनायकराव नांदेडकर. तर अहिल्येचे यजमान सांगलीचे अरविंद थत्ते. (१९७४)

या मधल्या काळात म्हणजे सुमारे १९६८ पासून ८४ पर्यंतच्या काळात पतीसह वर्तमान इंदिराबाईंनी चारधाम यात्रा केल्या. दोन-तीन यात्रा दोन-तीनदा ही झाल्या. केदार मार्गावरची दमछाक आणि अमरनाथची पिसू घाटीतली चढण ह्या दोन्ही गोष्टी त्या कधीच विसरल्या नाहीत. 'भव्य भयंकर गगनस्पर्शी कडे गिरीचे सभोवती' हे अप्पांचे वर्णन तंतोतंत पटते. अमरनाथची पूजा उभी राहून केली गेली. पूर्णाकृती लिंगाचे दर्शन अविस्मरणीय होते. १९७६ मध्ये लेहला सिंधू दर्शनही घेतले. १९७६ मध्ये बद्रिनाथ पुन्हा झाले. वहिनींसह या वेळी महेशही

होता. किंजवडेकरांचे संहिता वाचन झाले. वहिनींनी पुरणा-वरणाचा स्वयंपाक केला. (अनेक प्रसंग लेखमर्यादेसाठी लिहिले नाहीत. क्षमस्व!)

चि. शेखर व महेश यांनीही आपापल्या क्षेत्रात बरीच प्रगती केली. १९८० मध्ये शेखर तर १९८२ मध्ये महेश चतुर्भुज झाले. त्यांच्या विवाह प्रसंगी अप्पांचा उत्साह गृहस्थाश्रम्याला पूर्ण शोभणाराच होता. महेशच्या लग्नातल्या उखाण्यात त्यांनी प्रिय पत्नी इंदिराचा ४० वर्षांचा सहवास फार सुखाचा झाला हे व्यक्त केले आहे. इंदिरा वहिनींचा हा ४० वर्षांचा सहप्रवास हे सहजीवन आदर्श ठरले. एवढेच नव्हे तर विशेष हा की शेखर-महेशांना ती. दादांनी आपल्या मांडीवरही घेतले होते!

मध्यंतरीचा ८-१० वर्षांचा काळही याच उत्साहात व्यतीत झाला. इंदिरा वहिनींच्या स्थूल प्रकृतिमानाप्रमाणे काही त्रास सुरु झाले. डोळ्यात पू झाला म्हणून जे ऑपरेशन केले, नेमके तेच अयशस्वी झाले! डोळा गेला! अप्पांनीच समाधान करून इंदिरावहिनींना समजावले.

१९९१ वे वर्ष म्हणजे अप्पांच्या विवाहाला ५० वर्षे झाली. या निमित्त अप्पांनीच पंढरपुरात थाटामाटात कार्यक्रम केला. दानधर्म केला. ५१ मेहुणे जेवायला घातली. सर्व मायमाऊल्यांना दाने दिली. एकच झाले. उखाण्याचा आग्रह होताच अप्पांनी उखाणा घेतला. पण आता माझ्या संन्यासाला इंदिरेने होकार द्यावा असे सूचित केले. अर्थात वातावरण काहीसे गंभीर झाले, पण अप्पांनी वाक्पटुत्वाने ते सुधारले!

नातीच्या लग्नाला जाण्याच्या तयारीत सारे होते. अचानक राधा अस्वस्थ झाल्या. सुदैवाने अप्पा जवळच होते. त्यांच्या ध्यानात गंभीरता लगेच आली. त्यांनी आईचे मस्तक आपल्या मांडीवर घेतले आणि... राधा मावशी पंचत्वात विलीन झाल्या. त्यांची स्वत:ची इच्छा पूर्ण झालीच, पण अनंताची ही इच्छा पुरी व्हावी असे त्यांच्या अंतरातम्याने ठरवले म्हणून असे घडले! आता संन्यास घेण्यात अडचण राहिली नाही.

पुण्यातच राधामाऊलीचे और्ध्वदेहिक पुरे केले. अंत्यविधी पंढरपूर आणि नांदेडला केले. यानंतर नियोजित दिवशी ते उत्तरकाशी येथे जायला निघाले. उभयतांची स्थिती करुणपूर्ण होती. परंतु निग्रहाने पत्नीचे सांत्वन करून आवश्यक त्या त्या सूचना देऊन अप्पा गेले व पुढे त्यांनी संन्यास घेतला. यानंतरही अप्पासंबंधींचे वृत्त वहिनींच्या कानावर पडत असे आणि त्यात त्या समाधान मानीत असत. दहा वर्षांचा हा काळ अस्वस्थतेचा गेलाच, कारण त्यांचा समाचार मिळत असे. दर्शन भेट अशक्यच होती.

शके १९२४ च्या श्रावणाच्या महिन्यात अप्पांनी पूर्वसूचना देऊन वैकुंठ गमनाची योजना केली. उमानंदांना तशी सूचना होती. हे सारे नंतर कळले. त्यांचे अंतिम काव्यही सर्वांना समजले. इतक्या दूरवर असतानाही महाराष्ट्रातून ४००-४५० माणसे तेथे गेली. त्यांच्या अंत्यदर्शनासाठी! धन्य त्यांचे जीवन!

पण या धन्यतेचे अलौकिक सुख इंदिराबाईंना पहायला मिळाले नाही. विकलता खूपच वाढली. आवश्यक तो दानधर्म त्यांनी पंढरपुरात केला. पण त्यांचे पश्चात आपले कसे होईल या विचाराने त्या खूपशा अस्वस्थ झाल्या. विरह नवीन नव्हता. तथापि ते कायमचे गेले ही जाण त्रस्त करीतच होती. पण इंदिराबाईंनी विवेकाने विजय मिळविला! वर्णन असे आहे -

**''तशी तर विरक्तता । आधीच होती तत्त्वता।**
**पन्नाशीतच होती शक्यता। संन्यासग्रहणाची।**
**ध्येयपूर्तीसाठी त्यांनी । सर्वस्वावर ओतले पाणी।**
**माझ्या संकुचित विचारांनी। लघुता येईल तया।।**
**आजवरचे माझे जीवन। त्यांनाच होते ना अर्पण।**
**मग आजच का विषण्ण। वाटावे मजलागी ?।।**
**गोरट्यात दादा आहेत। 'हे' त्यांना सोडून नाहीत।**
**तेथेच रहावे आपुले त्यात । आत्यंतिक हित आहे।।''**

अशा पोक्त विचारांनी खंबीर झाल्या आणि कपाळाचे कुंकू, गळ्यातले मंगळसूत्र अखंडितपणे सांभाळत, पाठ, पोथीवाचन, कथा-कीर्तने, प्रवचने, पारायणे यात पूर्णपणे रंगून गेल्या. गोरट्यातले उत्सव, महोत्सव त्यांना साह्यभूत झाले. क्वचित कधी तरी पंढरी-पुणे खेप होई. मुलांना भेटून परत जात. त्याही स्थितीत एक धक्का दुर्दैवाने दिलाच. अचानकपणे पंढरपूरमध्ये शेखर गेला. पण यातून सावरायला त्यांना फार वेळ लागला नाही. अशीच १०-११ वर्षे गेली.

आता ८८ पुरी झालेली होती! शक्ती क्षीण होत होती. आत्यंतिक इच्छाबळावर जरी त्या सर्व काही करीत होत्या तरी शेवटी शीर्यते तत् शरीरम् या न्यायाने त्यांची क्षीणता वाढत होती. महेशकडे पुण्याला नेण्याचा आग्रह चालूच होता. योगायोग म्हणा वा प्रबळ इच्छाशक्ती म्हणा, महेशकडे जाण्याइतपत प्रकृती बरी झाली. महेशनेही पद्मनाभ आणि मंगेश मामा यांना पाठविले गोरट्याला आणि गाडीनेच पुण्यास मातोश्री आल्या. धाप केवळ प्रवासानेही लागली होती. पण तशाही स्थितीत जिना चढून वर गेल्या. नारायणाचे प्रसन्न दर्शन घेतलं! धापा टाकणं चालूच होतं.

मीरा, मृडानी, महेश सारे सेवातत्पर होते. एकादशीला वहिनींच्या भेटीला आम्ही दोघे गेलो. थोड्या गप्पाही झाल्या. पण क्षीणता सातत्याने वाढत होती. अंथरुणावरच दोन दिवस गेले. रविवार, चतुर्थी होती, दुपारी २ वाजता सर्वांना हाक मारून उठल्या. महेश पुढेच बसलेला होता. चटकन त्यांच्या खांद्यावर डोके टेकले नि शेवटचा श्वास सोडला. ती. सौ. इंदिरावहिनी पंचत्वात विलीन झाल्या. राधामातेप्रमाणे इंदिरा मातेजवळ महेश होता. धन्य ते! दिवस होता १४ एप्रिल २०१३.

पुण्यातच और्ध्वदेहिक झाले. १८ एप्रिल १३ ला नांदेडात उर्वशी घाटावर हजारो भक्तांच्या उपस्थितीत गोपाळगुरूंच्या मार्गदर्शनाखाली अस्थिविसर्जन झाले! भाव विभोर झालेले परिवारीय व्याकुळतेतच आपापल्या घरी परतले!

**सौ. वसुधा परांजपे, पुणे**
ब्लॉक नं. ७, विठ्ठलनगरी,
उपाशी विठोबा मंदिरा शेजारी, पुणे ४११०३०
फोन : २४४७११०९

●●●



# आधुनिक युगातील वैदिक जीवनपद्धतीचा आदर्श
# आमचे प.पू. अप्पा

**सौ. सुखदा देशमुख**
बी.कॉम., गृहिणी
प.पू. दासगणू परिवाराची सदस्य

**श्रुतिस्मृष्युदितं धर्ममनुतिष्ठन् हि मानवः।**
**इह कीर्तिमवाप्नोति प्रेत्य चानुत्तमं सुखम ।।**

श्रुति म्हणजे वेद व स्मृति म्हणजे धर्मशास्त्र यात सांगितल्याप्रमाणे धर्माचे यथायोग्य पालन करणारा मनुष्य इहलोकीही कीर्ती मिळवतो आणि परलोकीही उत्तम सुखाचा (गतीचा) लाभ करून घेतो असे मनुस्मृतीत म्हटले आहे. मनुस्मृति ही चातुर्वण्य व्यवस्थेचा पुरस्कार करणारी समाजव्यवस्थेची आचारसंहिता आहे. यात समाजाची विभागणी चार वर्णात करून, प्रत्येक व्यक्तीचे आपापले धर्म सांगितले आहेत. व्यक्ती जीवनाची साधारणत: चार आश्रमात विभागणीही केली आहे. ब्रह्मचर्य-गृहस्थ-वानप्रस्थ-संन्यास असे हे चार आश्रम सांगितले आहेत.

मोक्षप्राप्ती हे धर्माचे वा मनुष्य जीवनाचे अंतिम ध्येय, लक्ष्य वा साध्य आहे. मोक्ष म्हणजे काय? याचे उत्तर शास्त्रकार देतात...

**न मोक्षो नभसः पृष्ठे न पाताले न भूतले ।**
**मोक्षो हि चेतो विमलं सम्यक्ज्ञानविबोधितम् ।।**

अत्यंत निर्मल ज्ञानाने पवित्र झालेले, विकसित झालेले, विवेकी विचारी असे जे प्रसन्न अंत:करण ते म्हणजेच मोक्ष. असा मोक्ष प्राप्त करून घेणे हेच प्रत्येक मनुष्यजीवनाचे ध्येय असले पाहिजे.

आजच्या आधुनिक युगात या सर्व गोष्टी साधणे अशक्य आहे असेच आपणास वाटते. पण प.पू. अप्पांसारखे (पू. स्वामी वरदानंदभारतीजी) सत्पुरुष महात्मे आजच्या आधुनिक वैज्ञानिक युगातही वैदिक जीवनपद्धतीचा आदर्श आपल्यापुढे उभा करू शकतात. सर्वार्थाने संपन्न, समाधानी, सम्यक् जीवन व्यतीत करून, विज्ञानास आव्हान देत संजीवन समाधी घेऊन मोक्षास प्राप्त होतात.

तत्त्वनिष्ठा, धर्मश्रद्धा, परमेश्वरप्रीती, सद्गुरूनिष्ठा, सदाचार, सन्नीती, विवेक, साक्षेप यातून निर्माण होणारा विश्वास, भक्ती, सातत्य, धैर्य, सहनशीलता, सर्वसमावेशकता यांच्या आधारे 'नर करनी करे तो नारायण बन जाये', याचा प्रत्यय प.पू. अप्पांनी आपल्याला करून दिला.

**मार्गाधारे वर्तावे । विश्व हे मोहरे लावावे**
**अलौकिका नोहावे । लोका प्रति ।**

असे संतश्रेष्ठ ज्ञानदेवांनी म्हटल्याप्रमाणे प.पू. अप्पांचे जीवन होते. हिंदू धर्माच्या विविध व्याख्या आहेत, त्यातली कोणतीही घेतली तरी प.पू. अप्पा त्या धर्माचरणाचा आदर्श ठरतात. ईश्वर धर्मस्थापनेसाठी अवतीर्ण होतो तर त्या धर्माचे पालन संत करून दाखवतात, म्हणून तर संत तुकाराम महाराज म्हणतात-

**देवासी अवतार । भक्तासि संसार ।**
**दोहींचा विचार । एकपणे ।।**

असे एक अलौकीक, दिव्य, परीपूर्ण जीवन पू. अप्पांचे होते. देव-देश- धर्म- प्रेम हा त्यांच्या जीवनाचा गाभा होता. शतपैलू असे त्यांचे व्यक्तिमत्त्व होते. कटाक्षाने त्यांनी आश्रमधर्माचे पालन सर्व कर्तव्ये यथासांगपणे पार पाडत केले. त्यांनी पालन केलेल्या आश्रमधर्माचाच आढावा या लेखात घेण्याचा प्रयत्न माझ्या अल्पमती प्रमाणे करणार आहे. **क्षितीज जसे का वाढत जाते उंच चढोनी बघता ।** अशीच अवस्था प.पू. अप्पांच्या जीवनचरित्राकडे पाहताना होते. त्यांच्या चरित्राची उंची, उदात्तता, उत्तमता मला शब्दबद्ध करता येईलच असे नाही, पण प.पू. अप्पा हे अत्यंत जिव्हाळ्याचा व प्रेमादराचा विषय असल्याने आणि '**अमृत प्यावया सुमधुर असले । पराग्रहाचे कारण कसले ?**' या पू.अप्पांच्याच वाक्याचा आधार हे लिखाण करताना घेत आहे. या विशेषाकांत अनेक मान्यवर सिद्धहस्त लेखकांचे लिखाण असताना मी हे धारिष्ट करत आहे. कारण, ज्या आकाशात गरुड भरारी मारतो तिथे चिलटाने उडू नये असे थोडेच आहे? मी माझ्या अल्प भाषाज्ञान व लेखनकौशल्यानिशी हा प्रयत्न करत आहे.

सर्वप्रथम ब्रह्मचर्याश्रम या संबंधीचा आढावा आपण घेऊ. ब्रह्मचर्याश्रम हा भावी जीवनाचा पाया असतो. तो जितका भक्कम तितकीच वरच्या इमारतीस बळकटी येते व तिची उंचीही वाढवता येते. अत्यंत संस्कारक्षम असे हे वय असते. पू. अप्पांचे पितृछत्र त्यांच्या वयाच्या ५/६व्या वर्षी हरपले पण प.पू. दासगणूमहाराजांच्या कृपाछत्राखाली अप्पांना या पोरकेपणाची वा अनाथतेची जाणीवही झाली नाही. त्यांच्या मातोश्री राधामाय अतिशय दक्षपणे त्यांची काळजी घेत. वयाच्या आठव्या वर्षी प.पू. अप्पांचा उपनयन संस्कार शिर्डी येथे झाला व त्यांच्या ब्रह्मचर्याश्रमाचा श्रीगणेशा झाला. अतिशय तीक्ष्ण बुद्धिमत्ता, अलौकिक पाठांतर क्षमता, तार्कीक वृत्ती, अन्यायाची चीड व ती व्यक्त करण्याचे धारिष्ट, कोणत्याही गोष्टीच्या मूलापर्यंत पोहचण्याची

विचक्षण क्षमता असे अनेक सद्‌गुण पू. अप्पांच्या ठायी बालवयातच प्रत्ययास येत होते. एका बटूस प.पू. अप्पांनी एक आशीर्वादपर काव्यात म्हटले आहे, त्यात ते म्हणतात,

**बाळा सरून वय केवळ खेळण्याचे,**
**स्वीकारिले व्रत तुवा प्रथमाश्रमाचे,**
**येथूनिया तुजसि बंधन वागण्यात,**
**हे जानवे न नुसते पडते गळ्यात ।।१।।**

***केव्हाही ना चुकवणे निज नित्यकर्म,***
***मातापित्यांस भज तोच तुझा स्वधर्म,***
***राही विनम्र अपुल्या गुरुच्या समोर,***
***श्रद्धा तदीय वचनांवर ठेव फार ।।२।।***

असे आठ कडवे असलेले हे काव्य म्हणजे स्वत: प.पू. अप्पांच्या ब्रह्मचर्याश्रमाचा आरसाच आहे. शालेय अभ्यासाव्यतिरिक्त हरिविजय, पांडवप्रताप यांसारखे ग्रंथ वयाच्या ८/९ व्या वर्षी तर रामायण, महाभारतासारखे विशाल ग्रंथ १६/१७ व्या वर्षी अभ्यासून झाले होते. इतर अनेक तत्त्वज्ञान विषयक ग्रंथांचे वाचन सतत चालू असे. त्यांचे संस्कृत भाषेवर नितांत प्रेम होते. तसेच वाढत्या वयाबरोबरच संस्कृत भाषेवर उत्तम प्रभुत्वही प्राप्त झाले होते. काव्यरचनाही संस्कृतभाषेतून होत होती. या सततच्या वाचन, मनन, चिंतनातून एक उत्साही, ध्येयनिष्ठ तरूण स्वाभाविकपणे त्या काळच्या परीस्थितीनुरूप (इ.स. १९४०) देशप्रेमाने भारला जाऊन राजकारणात जाऊ इच्छीत होता. स्वातंत्र्यवीर सावरकरांचे व्यक्तित्त्व व कर्तृत्व आकर्षित करू लागले होते. पण प.पू. अप्पांच्या या विचारास प.पू. दासगणू महाराजांनी संपूर्ण व प्रखर विरोध केला.

प.पू. अप्पांच्या मनाची विलक्षण तगमग झाली. पण सद्‌गुरूंवरच्या अविचल निष्ठेमुळे त्यांनी हा निर्णय स्वीकारला. मन:शांतीसाठी गुरूंनी सांगितलेले रोजचे १२ विष्णुसहस्रनामाचे पाठ व ज्ञानेश्वरी, गाथा, दासबोध या ग्रंथांचे रोज २०-२५ मिनिटे वाचन नियमाने निष्ठेने केले, त्याचा अनुकूल परिणाम दिसू लागला. मन शांत झाले पण देशप्रेमाची ऊर्मी गप्प बसू देईना. या वैचारिक मंथनातूनच प.पू. अप्पांनी वयाच्या १८व्या वर्षी 'शालिवाहन' या ग्रंथाची निर्मिती केली. शककर्ता शूर, पराक्रमी, धैर्यशाली नायक असलेला शालिवाहन आजही तरुणांच्या मनात मातृभूमीच्या प्रेमाचे चैतन्य निर्माण करू शकतो.

दरम्यान पू.अप्पा शालान्त परीक्षा उच्चवर्गात उत्तीर्ण झाले. तत्त्वज्ञान विषयात एम.ए. करून अध्यापक होण्याची त्यांची इच्छा होती पण गुरूंच्या इच्छेखातर त्यांनी आयुर्वेद शास्त्रशाखेत विनातक्रार प्रवेश घेतला व पुणे येथे महाविद्यालयीन शिक्षणास सुरुवात केली. गुरुपरंपरेतील कीर्तने वयाच्या १६व्या वर्षीपासून प.पू. अप्पा करतच होते. प्रगल्भ भाषा, मुद्देसूद विषयमांडणी श्रोत्यांच्या मनाचा ठाव घेत असे. मोठे विद्‌वान व रसिक श्रोत्यांचीही पसंती पू.अप्पांच्या कीर्तनास मिळत असे. हे पाहून प.पू. दासगणू महाराजांना फार समाधान वाटे. या काळात महाराजांनीच पसंत केलेल्या कन्येशी प.पू. अप्पा विवाहबद्धही झाले. पूर्वाश्रमीची कु. विमल लिमये आता सौ. इंदिरा अनंत आठवले या नावाने आठवल्यांच्या घरची गृहलक्ष्मी झाली होती. तिच्या हसऱ्या उत्साही कामसू वृत्तीने दासगणूमहाराजांचा पंढरपूरचा वाडाही अधिकच आल्हाददायक झाला होता.

आयुर्वेदाचे शिक्षण सुरू असतानाच प.पू. दासगणू महाराजांनी पू.अप्पांना चौपाईच्या चालीवर कृष्णकथा रचण्याची आज्ञा केली. मिरजेचे राजे पटवर्धन यांची तशी इच्छा होती. पू. अप्पांनी हे कार्य शिरी घेतले व थोड्याच अवधीत मराठी सारस्वतात एक अप्रतिम महाकाव्य *'श्रीकृष्णकथामृत' या नावाने अवतरले. अत्यंत रसाळ, नवरसांनी युक्त, भक्तीप्रेमाचा आदर्श निर्माण करणारे हे काव्य रसिक मनास तृप्त करते. यातले भाषेचे सौंदर्य, उपमा, प्रसाद, गेयता, उत्कटता थक्क करतात.* प.पू. अप्पांच्या काव्यप्रतिभेस परतत्वाचा स्पर्श आहे याची जाणीव या महाकाव्याच्या रूपाने होते. मानवी नातेसंबंधातील अनेक नाजूक, उत्कट, कोमल भावनांची परिपूर्ण जाण पू. अप्पांना वयाच्या २१ व्या वर्षी कशी झाली असेल? व या सर्व भावना अत्यंत उदात्त पद्धतीने काव्यबद्धही कशा करता आल्या असतील? प्रत्यक्ष सरस्वतीचा वरदहस्त पू. अप्पांच्या मस्तकी होता हेच खरे.

वरील सर्व घटना पू. अप्पांची गुरूंवरची अत्यंतिक निष्ठा, श्रद्धा व विश्वासच दर्शवितात. विद्याध्ययन व गुरुनिष्ठा या दोन गोष्टी ब्रह्मचर्याश्रमात अत्याधिक महत्त्वपूर्ण असतात. या दोन्हींचेही पालन पू. अप्पांनी काटेकोरपणे केले व स्वत:च्या उदात्त, तेजस्वी व्यक्तिमत्त्वाची पायाभरणी याकाळात केली. शिष्यत्वाचा आदर्श त्यांनी सर्वांपुढे स्वत:च्या वर्तनातून उभा करून दाखविला.

**समाज धारण कल्याणास्तव कुटुंब संरक्षणे ।**
**भाग हे ध्यानि सदा ठेवणे, ।**
**गृहस्थधर्मातूनी सुखावह सर्वांना पोसणे, ।**
**येथची फिटती सारी ऋणे ।**

हिंदू धर्मात गृहस्थाश्रमास फार आदराचे स्थान आहे. समाजव्यवस्था टिकविण्यासाठी कुटुंबाचे संरक्षण झालेच पाहिजे व याचसाठी विवाहसंस्था ही अत्यंत महत्त्वाची आहे. या दृष्टिकोनातून पति-पत्नीच्या भूमिका कशा असाव्या हे प.पू.अप्पांनी वरील पदात मांडले आहे. गृहस्थाश्रमावरच इतर तीन आश्रम अवलंबून असतात. तसेच धर्मशास्त्रात सांगितलेली मनुष्यावरची तीनही ऋणे जसे देवऋण, ऋषिऋण व पितृऋण याच गृहस्थाश्रमात फेडता येतात म्हणूनच धन्यो गृहस्थाश्रम: म्हटले आहे.

प.पू.अप्पांचा गृहस्थाश्रम असाच होता. त्यांचे कुटुंब हे विस्तारित होते. शिक्षणासाठी ठेऊन घेतलेले विद्यार्थी, आश्रित कुटुंबे, मित्रपरिवार, शेजारी इत्यादी. प.पू. अप्पा हे वत्सल, दक्ष व शिस्तप्रिय कुटुंबप्रमुख होते. वर उल्लेखिलेल्या तीनही ऋणांची पूर्तता प.पू. अप्पांनी यथासांग रीतीने केली. देवऋणात समाविष्ट होणाऱ्या इष्ट व पूर्तीची सांगता पू. अप्पांनी कुलाचार, तीर्थयात्रा, दानधर्म, यज्ञयाग याद्वारे केली. जवळपास २५ विविध प्रकारचे यज्ञ व पुरश्चरणे पू.अप्पांनी केली. संपूर्ण भारताची यात्रा त्यांनी त्रिवार केली तसेच १९६१ पासून दरवर्षी हिमालयाची दुर्गम

यात्रा पू.अप्पा करत. यात लडाखमधल्या लेह येथील सिंधुदर्शनापासून अरुणाचल प्रदेशापर्यंतचा हिमालय कैलासमानसयात्रेसह पू.अप्पांनी अनुभवला. ऋषिऋणाची पूर्तता गुरुपरंपरा सांभाळून व अनेक अमूल्य ग्रंथलेखन करून झाली. पुत्रप्राप्ती नंतर ते सहजी पितृऋणातून मुक्त झाले. ही सर्व कार्ये पू. अप्पांनी अत्यंत दक्षतेने, उत्साहाने व प्रेमाने पण निष्काम भावनेने केली. यात अल्पशीही उपेक्षा, वंचना यांचा स्पर्शही होऊ दिला नाही. त्यांचा प्रपंच हा परमार्थाहून वेगळा नव्हता. सर्व कार्य कर्तव्यनिष्ठेने व भगवंतार्पण भावनेने केल्यामुळे प्रपंच हाच परमार्थ बनला.

हा काळ प.पू. अप्पांच्या अलौकिक कर्तृत्वाचा आहे. एकीकडे गुरूपरंपरा सांभाळताना दुसरीकडे टिळक आयुर्वेद महाविद्यालयात आधी अध्यापक व नंतर प्राचार्य हे मानाचे व तितकेच जबाबदारीचे पद सांभाळले. आयुर्वेद अभ्यासक्रमाचे नियमन केले. व्याधिविनिश्चय, शल्यशालाक्य, कौमारभृत्य, निदानपंचक या ग्रंथांचे लिखाण केले. हे ग्रंथ आजही आयुर्वेदाच्या अभ्यासक्रमात समाविष्ट आहेत. पू. अप्पांना वैद्य म्हणवून घ्यायला आवडे. स्वभाषा, स्वसंस्कृति, स्वदेशी यांचा सार्थ अभिमान त्यांना होता. त्यांच्या या वृत्तीचा परिचय त्यांची वेशभूषा, संभाषण यातून वेळोवेळी सर्वांना यायचा.

यासर्व कार्याबरोबरच पू. अप्पांनी अत्यंत परिश्रम घेऊन, गावोगावी मिळेल त्या वाहतुकीच्या साधनाने वा मैलोन मैल पायी चालून पू. दासगणू महाराजांविषयी माहिती मिळवली व त्यांचे चरित्र प्रकाशित केले. गुरूविषयीच्या अत्यंतिक प्रेमादरापोटी त्यांनी हे केले. १९६३ साली पू.अप्पांचे सर्वस्व असलेले पू. दासगणूमहाराज ज्ञानेश्वर पुण्यतिथिच्या दिवशीच वैकुंठवासी झाले. काळाचा आघात अप्पांनी धैर्याने, विवेकाने सोसला, अल्पकाळात स्वत:ला सावरले व गुरूपरंपरेचे कार्य चालू ठेवले.

बदलत्या काळात पू. अप्पांची शिस्तप्रियता, त्यांचा आर्थिक व्यवहारातील काटेकोरपणा, तत्त्वनिष्ठा संस्थेच्या इतर संधिसाधू सदस्यांना जाचक वाटायला लागली. अशा स्वार्थी लोकांकडून पू.अप्पांना महाविद्यालयाच्या प्रशासनात विरोध होऊ लागला. दरम्यान ज्यांच्या आग्रहाखातर पू. अप्पांनी आयुर्वेदाचे शिक्षण घेतले, अध्यापन केले व प्राचार्यपदही सांभाळले त्या मामा गोखले यांचे निधन झाले. गुरुपरंपरा वा आयुर्वेद असे द्वंद्व पू. अप्पांच्या मनात निर्माण झाले. विलक्षण बुद्धिमत्ता व अफाट कर्तृत्व असले तरी शेवटी शरीरधर्मानुसार काही मर्यादा येतातच. पू.अप्पांनी अत्यंत विचार पूर्वक १९६६ साली राष्ट्रीय शिक्षण मंडळाच्या आजीव सदस्यत्वाचा व टिळक आयुर्वेद महाविद्यालयाच्या प्राचार्यपदाचा राजीनामा दिला. व पू. अप्पांच्या जीवनाच्या आयुर्वेद विषयावर पडदा पडला.

पुढील काळात अप्पांनी श्रीदासगणू महाराजांची सर्व ग्रंथसंपदा (जी २ लाख ओव्यांच्या घरात आहे) एकत्रित करून तिचे १० खंडात संपादन केले. दासगणू महाराजांचा जन्मशताब्दी महोत्सव अत्यंत थाटामाटात गोरटे येथे साजरा केला. या कार्यक्रमास श्री सोनूमामा दांडेकर, श्री धुंडामहाराज देगलूरकर आदी भागवत संप्रदायाच्या विभूती आल्या होत्या. पुढे याच पवित्र जागेवर पू. दासगणू महाराजांच्या वस्त्र समाधीची स्थापना केली. आज गोरटे येथील हे समाधिस्थान पवित्र असे 'साधना स्थळ' म्हणून विकसित झाले आहे. प्रामाणिक साधकांसाठी एक साधनाकेंद्र उपलब्ध आहे.

यानंतरचा काळ पू. अप्पांच्या ग्रंथनिर्मितीचा आहे. महाभारताचे विकृतिकरण करणाऱ्यांना सडेतोड उत्तरे देऊन पराभूत करणारे **'महाभारताचे वास्तव दर्शन'** प्रामाणिक साधकांच्या शंका-समाधान करणारे **'वाटा अपुल्या हिताच्या'** काही कीर्तनोपयोगी आख्याने, विविध देवतांची स्तोत्रे, लग्नमुंजीनिमित्त शुभेच्छापर आशीर्वाद, स्वरूप, काव्य इ. लिखाण सुरू होते.

अशी ही गुरुपरंपरेची गंगा कीर्तन, प्रवचन, संतांचे उत्सव या स्वरूपात वाहत होती. तिला आयुर्वेद शास्त्राच्या अध्ययन, अध्यापन व प्रशासनाची यमुना येऊन मिळाली. पण पू. अप्पांच्या परमार्थसाधनेची सरस्वती मात्र गुप्तच राहिली. ती प्रगट झाली १९७१ साली श्रावण वद्य एकादशीस गंगोत्री या हिमालयातील पवित्र धामी. कैवल्याची ही सरस्वती अचानक प्रगटली असे वाटले तरी ही आपोआप नक्कीच नव्हती. प्रत्यक्ष वरद नारायणाने चतुर्भुज स्वरूपात साक्षात दर्शन दिले, यासाठी फार मोठी साधना पू. अप्पांनी केली असणार, पण ती साधना काय व कशी केली हे मात्र त्यांनी कधीच प्रगट होऊ दिले नाही. त्यांच्या भावार्चना या काव्यग्रंथातून त्यांच्या साधनेचा क्रम जाणत्या, अभ्यासू लोकांना प्रत्ययास येऊ शकतो. सांसारिक कार्येच जर ईश्वरार्पण भावनेने केली तर दैनंदिन कर्तव्यकर्मेच पूजा ठरतात. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात तसे-

**''तया सर्वात्मका ईश्वरा, स्वकर्म कुसुमांची आवळीया**
**पूजा केली तेणे अपारा तोषा लागी.''**

या दिव्य ईश्वरी साक्षात्कारानंतर गुरूपरंपरा सांभाळण्याचे वचन श्रीवरदनारायणास देऊन पू. अप्पा हिमालयातून गंगोत्रीहून महाराष्ट्रात आले.

आता प.पू. अप्पांची शांती काही निराळी होती. मनुष्यजन्मास धन्यता लाभली होती. जीवन कृतार्थ झाले होते. साधना पूर्ण झाली होती. अर्थ कामाची चाके व धर्माचे तुरग (घोडे) असलेल्या त्यांच्या गृहस्थाश्रमाच्या सुवर्णरथावर कैवल्याची पताका फडकली.

पू. अप्पांचे जीवन आता अधिकाधिक समाजाभिमुख होऊ लागले. समाजाचे मार्गदर्शन, जनसामान्यांना हिताचा मार्ग दाखवणे हेच आता आयुष्याचे मुख्य ध्येय होते. 'बुडते हे जन देखवेना डोळा म्हणून कळवळा येतो मनी' ही भावना दृढ होत होती. श्री ज्ञानदेवांनी ज्या उदात्त भावनेने संस्कृतातील गीतेचे सार प्राकृतात सांगितले, त्याच हेतूने पू.अप्पांनी ज्ञानेश्वरीचा अनुवाद मराठीत करून हे उपनिषदकालीन ज्ञान आधुनिक काळातही हिताचे आहे हे पटवून दिले. या अनमोल ग्रंथाचे नाव **'अनुवाद ज्ञानेश्वरी'** असे आहे. पू. अप्पांचे लिखाणाचे कार्य निरंतर चालूच होते. **मनोबोध, कर्मयोग** असे जवळपास ५० च्या आसपास ग्रंथ अप्पांनी लिहिले. यात ब्रह्मसूत्र व उपनिषदांचा आवर्जून उल्लेख करावा लागेल. ब्रह्मज्ञान ही कोण्या एका गटाची मालकी नसून तो

प्रत्येक मनुष्यमात्राचा अधिकार आहे. या उदार विचारातून व्यास महर्षिंपासून चालत आलेली ही ज्ञानगंगा अप्पांनी मराठी भाषेत **'ब्रह्मसूत्रार्थदर्शिनी'** या ग्रंथाद्वारे आपल्यापर्यन्त पोचवली. उपनिषदे हे वेदान्ताचे सार आहे असे म्हणतात. प्राचीन द्रष्टे ऋषी व त्यांचे अनन्य शिष्य यांच्या संवाद रूपाने हे सनातन ज्ञान पू.अप्पांनी **'उपनिषदर्थ कौमुदी'** या ५ खंडांद्वारे ज्यात दशोपनिषदे समाविष्ट आहेत, हे ज्ञान आपल्याला दिले.

भगवद्गीता, ब्रह्मसूत्र व उपनिषदे यांना प्रस्थानत्रयी म्हणतात व या तिन्हींवर भाष्य लिहिणाऱ्या तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात **आचार्य** ही पदवी लाभते. म्हणजे पूज्यपाद शंकराचार्यांनंतर पू. अप्पा हेच भारतीय तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रातले आचार्य आहेत. पण प्रसिद्धी पराङ्मुखता हेही त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे वैशिष्ट्य होते. म्हणूनच एवढी थोर, महान व्यक्ती महाराष्ट्रात कार्यरत होती पण म्हणावा तसा प्रसार त्यांच्या कार्याचा झाला नाही. म्हणूनच त्यांच्या ग्रंथांचा प्रसार हेच शिष्य म्हणून आपले आज आद्य कर्तव्य आहे.

पू. अप्पांचे कीर्तनाचे कार्यक्रम संपूर्ण महाराष्ट्रात तर क्वचित प्रसंगी महाराष्ट्राबाहेरही झाले. त्यांनी २००० कीर्तने तितकीच प्रवचने व शेकडो व्याख्याने दिली. संस्कृतिप्रेम, संतांचे कार्य, वैदिक धर्माची सर्वश्रेष्ठता, देशप्रेम, सनातन तत्त्वज्ञान इ. विषयांचा अंतर्भाव या कीर्तन-प्रवचनात असायचा. विलक्षण पाठांतर, अत्यंत प्रभावी वक्तृत्व व व्यक्तित्व, ओघवती भाषा, प्रसंगविशेषाने व्यक्त होणारे भाव, तर्कशुद्ध मांडणी, आधुनिक वैज्ञानिक उदाहरणे, वेळेचे काटेकोर पालन या सर्व गोष्टींमुळे श्रोते भारावून जात, मंत्रमुग्ध होत.

या सर्व कार्यामुळे पू. अप्पा बराच काळ घराबाहेरच असत. वडील मुलाच्या विवाहानंतर ते भावनिक रूपाने वानप्रस्थी जीवनच जगत होते. परंपरेचे कार्य मात्र निस्पृहपणे चालू होते. एवढ्या आश्चर्यचकित करणाऱ्या कार्याच्या मोबदल्यात त्यांना स्वत:साठी कशाचीही अपेक्षा नव्हती. मन संपूर्णपणे विरागी झालेच होते. याचाच परिणाम म्हणून त्यांना चतुर्थाश्रमात प्रवेश करण्याची म्हणजे विधिवत संन्यास ग्रहण करण्याची प्रबळ इच्छा होऊ लागली. यामागे वर्णाश्रम मानणाऱ्या आपल्या हिंदू संस्कृतिवरची अमाप निष्ठा हे एक कारण होते तर दुसरे कारण होते- पू.दासगणुमहाराजांची संन्यास घेण्याची इच्छा होती, पण ती पूर्ण झाली नाही, म्हणून आपल्या गुरूंच्या इच्छेची पूर्ती हेही एक कारण होते.

१९८८ साल हे दासगणू महाराजांचे १२१ वे जयंतीवर्ष व २५ वे पुण्यतिथी वर्ष होते. या निमित्ताने पू. अप्पांनी गुरूंचा स्मरण महोत्सव वर्षभर विविध कार्यक्रम विविध गावी करून केला. याची सांगता गोरटे येथे थाटात झाली. १२१ पदार्थांचा अन्नकोट व स्वास्थ्यविषयक समस्या येऊनही पू.अप्पांनी स्वत: केलेले सर्व कार्यक्रम या उल्लेखनीय घटना.

यानंतर मात्र संन्यासदीक्षेची इच्छा अधिकच प्रबळ झाली. संन्यास घेऊन हिमालयाच्या कुशीत, गंगामैयाच्या तीरावर उर्वरित आयुष्य व्यतीत करण्याचा निर्णय पू.अप्पांनी जाहीर केला. सर्व शिष्य परिवार हादरला. पू.अप्पांच्या मातोश्री तर अत्यंत कासावीस झाल्या. माझे अंत्यकर्म तुझ्या हाताने होऊ देत हाच त्या माऊलीचा ध्यास होता. श्रीनारायणाच्या कृपेने त्या माऊलीची ही अंतिम इच्छा पूर्ण झाली. पू. अप्पांनी मातेस फुलाप्रमाणे जपले होते. सर्वार्थाने अप्पांनी राधामायच्या पवित्र कुशीचे, तिच्या तपाचे, धैर्याचे, संयमाचे चीज केले होते.

दुसरी साध्वी होती पू. अप्पांची धर्मपत्नी. त्यांची अवस्था तर शब्दात सांगता येणे कठीण पण इतक्या वर्षांच्या सहवासानंतर पू.अप्पांनी घेतलेला निर्णय बदलणे अशक्य हे त्या माऊलीस ठाऊक होते. मूक अंत:करणाने ती अश्रू ढाळीत होती. पू.अप्पांनी त्यांच्या लग्नाचा ५० वा वाढदिवस थाटात साजरा केला. ५० जोडप्यांची पूजा करून त्यांना दक्षिणा, वस्त्रे, स्त्रियांना सौभाग्यालंकार दिले. सर्वांदेखत उखाण्यातून अप्पांनी धर्मपत्नीचे कौतुक केले. तिने संसारात कशी उत्तम साथ केली याचा अवर्जून उल्लेख केला. या कार्यक्रमाबरोबरच एका आदर्श, संपन्न वैभवशाली गृहस्थाश्रमाची सांगता झाली.

अल्पावधीत पू. अप्पा हिमालयात उत्तर काशी येथील कैलास आश्रमात संन्यासदीक्षा ग्रहणासाठी गेले. या आश्रमाचे महामंडलेश्वर पू.स्वामी श्री विद्यानंदगीरीजी अप्पांना संन्यास आश्रमाची दीक्षा देणार होते. ७ एप्रिल १९९१ रोजी पू. अप्पांनी शेवटचे चक्री भजन केले. सत्तरी ओलांडलेले अप्पा भगवंतांच्या नामस्मरणात तल्लीन होऊन दीड तास नाचत होते. भजनानंदात लीन झाले होते. दुसऱ्या दिवशी त्यांनी शेवटचे गोपाल काल्याचे कीर्तन केले. आपल्या परंपरेत प्रत्येक उत्सवाची सांगता काल्याच्या कीर्तनाने होते. प.पू. अप्पांचे संपूर्ण जीवन हे ईश्वरभक्तीचा उत्सवच होता. त्याची सांगता त्यांनी काल्याच्या कीर्तनाने केली.

पुढच्या तीन दिवसांत दीक्षाविधि संपन्न झाले. वनातून समिधा आणणे, प्रायश्चित्त, सर्व पितरांबरोबरच स्वत:चे श्राद्ध, अनेक देवता पूजन, निरनिराळे होम व मध्यरात्री, गंगेच्या प्रवाहात कमरे इतक्या पाण्यात उभे राहून पार पडलेला प्रत्यक्ष दीक्षाविधी. महामंडलेश्वरांनी पू.अप्पांना विधिवत संन्यास दीक्षा दिली. यास परमहंस दीक्षा असेही म्हणतात. पू. अप्पा द्विजातून त्रिज झाले. श्री. अनंत दामोदर आठवले आता पू. स्वामी वरदानंदभारतीजी झाले.

यानंतर महिनाभर अधिक मासाचा कार्यक्रम कैलासआश्रमात झाला. पू. अप्पांनी मुंडकोपनिषदांवर प्रवचने केली. उत्सवाच्या सांगतेनंतर सर्व मंडळी परतली. पू. अप्पा तेथेच राहिले. जवळपास दीड-दोन वर्षे पू. अप्पा उत्तरकाशीतच राहिले. या दरम्यान एक दु:खद घटना घडली. प्रमोद दीक्षित नावाचे राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचे तरुण कार्यकर्ते हिंदू बचाव या मोहिमे अंतर्गत आसाममध्ये कार्यरत होते. तेथे त्यांची हत्या झाली. या बातमीने पू.अप्पा अत्यंत अस्वस्थ झाले. हिंदूराष्ट्रभिमानी त्यांचे मन हळहळले. या तगमगीतूनच त्यांनी राष्ट्रसंरक्षण पोवाडा रचला. यात हिंदूंना जागृत होण्यासाठी आवाहन केले आहे. वर्तमान भीषण परिस्थितीची जाणीव तरुणांना करून देताना या अराजकतेची कारणे व उपायही या पोवाड्यात सांगितले आहेत. सर्व वाचकांनी हा राष्ट्रसंरक्षण पोवाडा अवश्य वाचावा.

कोणास अशी शंका येईल की संन्यास म्हणजे सर्वस्वाचा त्याग मग अशा विचारांची गरज काय? पण यथाशक्ती समाजप्रबोधन देश-

धर्म संरक्षण हे संन्यासाचे कर्तव्यच आहे अशीच भावना पू. अप्पांची होती. यासंदर्भात पूज्यपाद शंकराचार्य हेच त्यांचे आदर्श होते.

स्वामीजी महाराष्ट्रात आले. रणरणत्या उन्हात त्यांनी गोदापरीक्रमा केली. इतर ठिकाणी प्रवचने व्याख्याने झाली. चातुर्मास, विविध ग्रंथांची पारायणे, श्रावणात कृष्णकथामृत असे कार्यक्रम झाले.

गोरटे येथील ध्यानमंदिराचे काम पूर्ण होत आले होते. या मंदिराचा पाया पू. अप्पांनीच खणला होता आता त्यावर कळसही त्यांनीच चढवला. तत्पूर्वी पू. अप्पांनी ध्यान मंदिरात स्वत: ७ दिवस अनुष्ठान केले. याचाच परीणाम आजही ध्यानमंदिरात जाणवतो. विशेष प्रसन्नतेचा अनुभव प्रत्ययास येतो.

यानंतर पू. अप्पांनी मुक्तिनाथ, तपोवन, वैष्णोदेवी, सिंधुस्नान असे हिमालयातील प्रवास केले. मिझोरमचाही प्रवास झाला. यानंतर अप्पा अधिक काळ उत्तरकाशीत तर विशेष कार्यक्रमानिमित्ताने गोरटे येथे राहिले. दरम्यान त्यांनी पू. दासगणू महाराजांच्या जीर्ण झालेल्या पंढरपूर येथील वास्तूचे नूतनीकरण विशेष परीश्रम घेऊन करवून घेतले. सद्गुरूंच्या नावाने पारितोषिक देण्यास सुरुवात केली. संतांच्या कार्याचा व विचारांचा प्रचार करण्यासाठी संतविद्याप्रबोधिनीची स्थापना केली. शिबिरे घेतली, व्याख्याने दिली. सर्वशक्तीनिशी समाजप्रबोधन करण्याचा प्रयत्न केला.

स्वामीजींनी आता ८० वर्षे ओलांडली होती. पण स्मरणशक्ती, वाणीचा ओघ व तेजस्वी काया यात कुठेही उणेपणा नव्हता. पण आता त्यांच्या मनात 'संपन्नं यच्च कर्तव्यं अधुना जीवितेन किम्?' असे विचार येत होते. परमेश्वराने त्यांच्यासाठी योजलेल्या कार्यात एक कार्य शिल्लक होते ते म्हणजे मनुस्मृती लिखाणाचे. अत्यंत परिश्रमपूर्वक, अल्पकाळात, श्रीवरदनारायणाची आज्ञा पू. अप्पांनी तडीस नेली. मनुस्मृती आजही कशी उपयुक्त आहे आणि ती कशी व का अभ्यासायची हे सांगण्यासाठी मनुस्मृतिभूमिका लिहिली. हे लिखाण संपले त्याच दिवशी पंढरपूरहून पांडुरंगाचा प्रसाद आला. कार्याची पोचपावती मिळाली. २५ जानेवारी २००२ या दिवशी **'मनुस्मृतिसार्थ सभाष्य'** या विशाल ग्रंथाचा प्रकाशन सोहळा संपन्न झाला.

पू. स्वामीजी उत्तरकाशीस जाण्यास निघाले. यावेळी मात्र त्यांनी सर्वांना निक्षून सांगितले की, 'मी आता पुन्हा खाली येणार नाही.' शिष्यपरिवार कासाविस झाला. तिसऱ्यांदा सिंधूस्नान करून पू. अप्पा उत्तरकाशीत आले. संन्यास दीक्षेस १२ वर्षे झाली. गंगादशहऱ्यासाठी ते गंगोत्रीस आले व त्यांनी गंगामायला साकडे घातले, हे माय मी आता किती दिवस वाट पाहू. नारायणाला माझ्याकडे कृपादृष्टीने पहायला सांग ना! गंगामैय्याने तिच्या लाडक्या लेकराचा निरोप श्रीनारायणाला नक्कीच कळवला असणार म्हणून तर गुरुपौर्णिमेच्या दिवशी पू. अप्पांना नारायणाचा कौल मिळाला व ज्या दिवशी प्रथम सगुण दर्शन झाले तोच दिवस अर्थात् श्रावण वद्य एकादशीच भगवंताच्या संपूर्ण मीलनासाठी निश्चित झाला. यापेक्षा दुसरे कोणते मोठे भाग्य असू शकते?

पू. अप्पांनी या सर्वाची जाणीव कोणालाही येऊ दिली नाही. कैलासआश्रमाचे व्यवस्थापक स्वामी उमानंद यांना सांगितले ''मै जीस दीन गंगाजी नहाने जाऊंगा उसी दिन समाधी लूंगा, आप कुछ मत करना. सांस थम जाने के बाद मुझे गंगाजीमे विसर्जीत करके ही सबको खबर देना.''

सर्व सावरासावर त्यांनी स्वहस्ते केली. सर्व वस्तू वाटून टाकल्या. आवश्यक त्यांना पत्रे लिहिली व सर्वांसाठी एक निरोप स्वहस्ते लिहून ठेवला. ठरल्याप्रमाणे एकादशीस ते गंगास्नानास गेले, परत येऊन देवघरात नारायणाच्या प्रतिमेसमोर पद्मासन घालून बसले. सर्वांगास भस्म लावले. डाव्या हातात गंगाजलाचा कमंडलू, उजवा हात नारायणाच्या चरणास स्पर्श करत होता व पू. अप्पा, स्वामी वरदानंदभारती समाधिस्थ झाले. ही त्यांची संजीवन समाधी होती. अशा तऱ्हेने स्वेच्छेने शरीरत्याग करून ते नारायण स्वरूप झाले. त्यावेळची त्यांची अवस्था अद्‌भुत, अलौकिक, अवर्णनीय अशीच होती. त्रयोदशीस त्यांचे श्वास थांबले व दुसऱ्या दिवशी त्यांचा देह गंगार्पण करण्यात आला.

**मनुष्याणां सहस्रेषु कश्चित् यतति सिद्धये ।**
**यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वत: ।।**

अशी जीवनाची सुरुवात करणारे पू. अप्पा

**बहुनां जन्मनामन्ते ज्ञानवान् मां प्रपद्यते ।**
**वासुदेव: सर्वमिति स महात्मा सुदुर्लभ: ।।**

याप्रमाणे नारायणाशी एकरूप झाले. ब्रह्मलीन झाले. ब्रह्मविद् ब्रह्मैव भवति याप्रमाणे ब्रह्म झाले. म्हणूनच आजही त्यांचे अस्तित्व जाणवते. त्यांच्या शेवटच्या आदेशाप्रमाणेच त्यांचे ग्रंथ हेच त्यांचे स्वरूप आहे. त्यांचे वाचन, मनन, आचरण, चिंतन हीच खरी गुरुपूजा आहे.

असे हे अद्‌भुत थक्क करणारे जीवन चरित्र आहे. त्यांचा हा प्रवास अत्यंत प्रेरणादायी आहे. कुठल्याही तत्त्वाशी तडजोड न करता, पू.अप्पा आजच्या आधुनिक काळातही वैदिक पद्धतीने आश्रमाधारित जीवन स्वाभिमानाने व संपन्नतेने जगले. आजही त्यांच्या नुसत्या स्मरणानेही सज्जन हृदय नतमस्तक होते. जे जे उत्तम, उदात्त, उन्नत, महन्मधुर ते ते असे त्यांचे आभाळाएवढे व्यक्तिमत्त्व होते. त्याचा एक पैलू वाचकांपुढे आणण्याचा मी यथाशक्ती प्रयत्न केला. या विशेषांकातल्या इतर लेखांतून पू. अप्पांचे इतर अनेक आयाम आपणासमोर तेजस्वीपणे येणारच आहेत. तेव्हा अधिक काय लिहावे. अशा अनंतरूपी अनंतास शतश: नमन आणि 'मदीय हृदयी स्फुरो शुभ विचार देवा सदा' अशी विनम्र प्रार्थना.

याआधी प.पू. दासगणू महाराजांच्या विशेषांकाच्या प्रकाशन वेळी कल्याणी अंकात लिहिण्याची संधी लाभली होती. पुन्हा ही सेवा करण्याची संधी मिळाली त्याबद्दल संपादक मंडळ व ओंकार ट्रस्टचे मन:पूर्वक आभार. व आपण करत असलेल्या शिवभावाने जीवसेवेच्या पुढील वाटचालीसाठी शुभेच्छा!

**।। ॐ शांति: शांति: शांति: ।।**

**सौ. सुखदा देशमुख**
विंडलास रेसिडेन्सी, कर्झन रोड, दालनवाला,
डेहराडून, उत्तरखण्ड. मो. ०८७५५०७८७७७

●●●



## - राजधर्म -

''तै स्वामी म्हणती तयासी । ऐक माझ्या वचनासी । सांभाळी निजप्रजेसी । पुत्रवत् आपुल्या ।।
तुझ्या प्रजेचे हिताहित । तैसेच त्यांचे जीवित । अवलंबून आहे खचित । नृपश्रेष्ठा तुजवरी ।।
जो प्रजेसी ठेवी दु:खित । त्याच्या राज्यास होणार घात । भूपतिचे नेतृत्व । आहे अवलंबून त्यावरी ।।
प्रजेच्या असंतोषाची । बीजे आतां कथितो साची । सावधगिरी फार यांची । ठेवावी की नृपश्रेष्ठा ।।
लांच घेणे न्यायांत । वा करणें पक्षपात । मत्सर वाढविणे ज्ञातीत । धरणे अति धनतृष्णा ।।
ज्यास देती अवघे मान । त्याची अप्रतिष्ठा करणे जाण । विद्वानांचा अपमान । व्यर्थ पीडा दुबळ्यांना ।।
ही कारणे अनर्थांची । आहेत अवघी जाण साची । भलत्याच कामी भलत्याची । कदा योजना करूं नये ।।
त्या त्या खात्याचे ज्ञान । असावे मंत्र्याठायी पुर्ण । आप्त, सखा म्हणून । कोठे कोणास योजूं नये ।।
जवळी न करणे चहाडखोरा । दया न दाखविणे तस्करा । गुणीजणांचा गुण खरा । घ्यावा निरपेक्षपणाने ।।
हाताखालील कामगार । असावेत फार चतुर । निर्लोभ मंत्री सल्लागार । सदा जवळी ठेवावे ।।
जी कांही गोष्ट करणें । ती अवघ्यासी विचारणें । सर्वांनुमता अनुसरणें । आपलाच हेका न धरावा ।।
सुकाळ अथवा दुष्काळासी । राजा कारण निश्चयेंसी । जैसे दिवसरात्रीसी । कारण सुर्यनारायण ।।
प्रजापीडन करु नये । व्यापारी मन गोवूं नयें । कर लादुन करुं नयें । भरणा आपुल्या कोषाचा ।।
वाव न द्यावा चैनीप्रती । स्वयें आचरावी नीति । तरीच इहपरलोकी निश्चिती । सौख्य लाभें राजाते ।।

– दासगणु

**वरील विचाराचे लोक भारतभाग्य विधाता ठरतील**
**या विश्वासासह...**

**विक्रम नांदेडकर विश्राम नांदेडकर**



# विशुद्ध संत पूज्य स्वामी वरदानंद भारती

**डॉ. श्री. कमल बाळकृष्ण वैद्य**

मराठीत 'एकनाथी भागवता'वर पीएच.डी., ब्रह्मलीन प.पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी महाराज यांचा अनुग्रह. त्यांच्या 'मानसगूढार्थ चंद्रिका- प्रस्तावना खंड'चे (१९५१) मध्ये हिंदी भाषांतर व दासबोध-गद्य रूपांतर व इतर ८/१० ग्रंथ गीताप्रेसतर्फे प्रकाशित. अनेक नियतकालिकांतून लेख, प्रज्ञानंद व गोस्वामी, संपूर्ण वाल्मीकी रामायणाचा मराठी अनुवाद इंटरनेटवर उपलब्ध. तुलसीदास चरित्र व प्रबंध प्रकाशित.

।। श्रीसद्‌गुरू प्रसन्न ।।

।। राम ।।

गोस्वामी तुलसीदास 'श्रीरामचरितमानसा'त लिहितात-

**'संत बिसुद्ध मिलहि परि तेही ।**
**चितवहि रामकृपा करि जेही ।।७।।**

(उत्तरकांड दोहा ६९ चौपाई ७)

याला अनुसरून महाराष्ट्राच्या भाग्याने अशा विशुद्ध संतांची मांदियाळीच येथील लोकांना निरंतर लाभत आली आहे. ही भगवंताची फार मोठी कृपा आहे. आधुनिक काळातील अशा संतांमध्ये पूज्य दासगणूमहाराज आणि त्यांचे परम शिष्य पूज्य श्री.अनंतराव आठवले ऊर्फ प.पू. वरदानंद भारती स्वामी यांचा प्रामुख्याने उल्लेख करावयास हवा.

'श्रीरामचरितमानस'मध्ये अरण्यकांडात नारदांनी रामप्रभूंना विनंती केली आहे की, **'संतन्ह के लच्छन रघुबीरा । कहहु नाथ भव भंजन भीरा'** (दोहा ४५, चौ.५) व यावर रामप्रभूंनी त्यांना **'सुनु मुनि संतन्ह के गुण कहऊँ । जिन्ह ते मैं उन्ह के बस रहउँ ।।६।।** असे म्हणून संतांच्या गुणांचे वर्णन केले आहे. तेथे वर्णन केलेले, ज्यामुळे भगवान् वश होतात ते सद्‌गुण परम पूज्य स्वामी वरदानंद भारती यांच्या ठिकाणी कसे होते याचा विचार आपण या लेखात करणार आहोत.

पूज्य श्री. अनंतराव आठवले ऊर्फ पूज्य स्वामी वरदानंद भारती हे श्रीमद् भगवत् गीतेत म्हटल्याप्रमाणे योग्यांच्या कुळातच जन्मले होते आणि त्यांचे बालपणच नव्हे तर आयुष्यातील ४२ वर्षांपर्यंतचा काळ परम पूज्य श्रीदासगणू महाराजांच्या कृपाछत्राखाली गेला होता. त्यामुळे त्यांनी परमार्थाचे अत्युच्च शिखर गाठले हे अगदी स्वाभाविक आहे. भगवंताप्रमाणेच त्यांच्या विशुद्ध भक्तांची चरित्रे म्हणजे एक प्रकारची लीलाच असते व त्यांच्या पठणाने, अभ्यासाने साधकांना मार्गदर्शन मिळते यात संशय नाही.

त्यामुळेच समर्थांच्या करुणाष्टकात ते जसे म्हणतात की,

**'अनुदिन अनुतापे तापलो रामराया ।**
**परम दिन दयाळा निरसी मोहमाया ।**
**अचपळ मन माझे नावरे आवरीता ।**
**तुजविण शिण होतो । धाव रे धाव आता ।।** किंवा

स्वामी गोस्वामी तुलसीदास म्हणतात की,

**'बंचक भगत कहाई रामके । किंकर कंचन कोह कामके ।**
**तिन्ह महँ प्रथम रेख जग मोरी । धींग धरमध्वज धंधक धोरी ।।**

(१/१२/३-४)

तसेच पूज्य अनंतरावांनी इ.स.१९६६ मध्ये उत्तरकाशी येथे जी प्रार्थना केली आहे त्यात ते म्हणतात,

**'मदीय हृदयी स्फुरो शुभ विचार देवा सदा।'**

'देवा तुझ्याकडे एकच याचना आहे. आम्हांला हित काय आहे ते कळतं पण वळत नाही. हे कुटिल मन सैरभैर धावून नको ती संकटे ओढवून घेतं. ते कधी धन मागतं तर कधी स्तुती, कधी मदमत्सरात रुततं तर कधी दंभात फसतं. भजनात काही केल्या रंगत नाही. देवा या माझ्या मनात सदा शुभ विचार स्फुरावेत असे कर. अजूनही कुणाचे उणे दिसले की, ते दवंडी देत फिरतं, निंदा करीत सुटतं. पराचे गुण न बघता त्याचेविषयी विकृत अशा कल्पना करीत बसतं. अशा या चंचल मनाला सरळ कर. देवा, आता फक्त तुझे भजन घडावे, मुखी तुझे नाम असावे, अंत:करणात तुझी भक्ती असावी, बुद्धी स्थिर व्हावी. देवा, हे मन प्रसन्न राहील असे काहीतरी कर. आता हे मन विषयापासून तृप्ततेने अलग कर. माझ्या मनातील विवेकाचे बळ वाढू दे. आता माझ्या भावना पवित्र होऊ देत, शुभ होऊ देत; उज्ज्वल होऊ देत, मधुर होऊ देत. हे परमेश्वरा, हे सद्‌गुरो, आता एकच याचना आहे की, माझ्या हृदयात सदैव शुभ विचार स्फुरोत. हे प्रणतवत्सला, पांडुरंगा, हा अनंत तुला हे एकच मागणे मागतो आहे.'

श्री.अनंतराव यांनी लौकिकदृष्ट्या उत्तम प्रकारे प्रपंच केला. प्रपंच आणि परमार्थ यांचा उत्तम समन्वय त्यानी श्रीएकनाथमहाराजांप्रमाणे साधला. प्रपंचात असूनही जलातील कमल पत्राप्रमाणे त्यापासून ते अलिप्त राहिले. गोस्वामी तुलसीदासांनी अरण्यकांडात (श्रीरामचरित मानसाच्या) रामप्रभूंनी नारदांना जी संतलक्षणे सांगितली आहेत ती आपण प्रथम पाहू आणि ती पूज्य स्वामी वरदानंद भारती यांच्या ठिकाणी स्पष्टपणे कशी दिसून येतात तेही पाहू.

**'षट बिकार जित अनघ अकामा ।**
**अचल अकिंचन सुचि सुखधामा।।७।।**
**अमित बोध अनीह मितभोगी । सत्यसार कबि कोबिद जोगी ।।८।।**

**सावधान मानद मदहीना । धीर धर्म गति परम प्रबीना ।।९।।**
**दोहा– गुनागार संसार दु:ख रहित बिगत संदेह ।**
**तजि मम चरन सरोज प्रिय तिन्ह कहुँ देह न गेह ।।४५।।**
**निज गुन श्रवन सुनत सकुचाहीं । पर गुन सुनत अधिक हरषाही।।१।।**
**सम सीतल नहिं त्यागहिं नीती। सरल सुभाउ सबहि सन प्रीती ।।२।।**
**जप तप ब्रत दम संजम नेमा । गुरू गोबिंद बिप्र पद प्रेमा ।।३।।**
**श्रद्धा छमा मयत्रि दाया । मुदिता मम पद प्रीति अमाया ।।४।।**
**बिरति बिबेक बिनय बिग्याना । बोध जथारथ बेद पुराना ।।५।।**
**दंभ मान मद करहिं न काऊ । भूलि न देहिं कुमारग पाऊ ।।६।।**
**गावहि सुनाहिं सदा मम लीला । हेतु रहित परहित रत सीला ।।७।।**
**मुनि सुनु साधुन्ह के गुन जे ते । कहि न सकहि सारद श्रुति ते ते ।।८।।**

अरण्यकाण्ड (दोहा ४६/१-८ चौपाई)

पूज्य श्री. अनंतराव ऊर्फ ती.अप्पांच्या तीन्ही मुलींची लग्ने झाल्यानंतर त्यांचा जीवनक्रम वानप्रस्थ वृत्तीनेच चालला होता. ज्येष्ठ पुत्र चि. शेखरचा विवाह झाल्यावर त्यांनी जे आत्मनिवेदनपर मनन चिंतन केलेले त्यांच्या चरित्रग्रंथात आढळून येते त्यावरून त्यांच्या ठिकाणी असलेल्या संत लक्षणांची यथार्थ कल्पना येते. ते लिहितात–

'नारायणा, मी कधी आयुष्यात नीतीन्यायाच्या मर्यादांचे उल्लंघन केले नाही, कधी कुण्या सज्जनाला दुखविले नाही, चांगल्यासाठी सत्ता राबवली, अकारण कुणी निंदा केली तर तीही सहन केली. पण कुणाला कधी स्वार्थासाठी फसविले नाही. देवा! प्रापंचिक अशी सर्व उत्तरदायित्वे मी कर्तव्यबुद्धीने पार पाडली. भार्येला सुख दिले. कन्यांना चांगल्या स्थळी दिले. मुलांना घेतील तेवढे शिक्षण दिले; त्यांचे लाड पुरविले, त्यांना अनाथ वाटणार नाही एवढे धनही त्यांच्यासाठी सांभाळून ठेवले. आता हे नारायणा, माझे चित्त तुझे पायी जडू दे. **कर्तव्यबुद्धीने घरात राहिलो खरा, पण ते मनाला आवरूनच. माझ्या मनाची खरी ओढ तुझ्या पायांकडेच आहे.**

देवा, माझ्यातले दोष मी नाकारीत नाही. हट्टीपणा, तापटपणा, तुसडेपणा या दोषांमुळे माझ्यावर बरेचजण रूष्ट आहेत. असो. ज्यांच्यावर प्रेम केले त्यांनीही आपदा आणल्या. पण मी कर्तव्य सोडले नाही. रागाने कुणी दूर गेले तरी त्यांचे दु:ख मी वाहात बसलो नाही. ज्यांनी आयुष्यात माझ्यावर उदंड प्रेम केले, आर्थिक, शारीरिक सहाय्य केले तेही काहीतरी निमित्त करून माझ्यापासून दूर गेले. तरी मी शोक केला नाही. मी माझे जीवन अत्यंत साधेपणाने कुठलेही अवडंबर न माजवता व्यतीत केले. संबंध टिकविण्यासाठी, वाढविण्यासाठी उदंड पत्रव्यवहार केला, पण प्रभो, मी माझा वेळ वाया घालविला. माझा लौकिक वाढला तरी ज्यात सार नाही ते उपचार आता नको वाटतात. तेव्हा देवा, आता एकच इच्छा आहे, माझे चित्त तुझ्या चरणी जडू दे.

देवा, मी सामाजिक हिताची कामेही भरपूर केली. व्याख्याने दिली, कीर्तने, प्रवचने केली. या सर्व कार्यक्रमांना प्रचंड गर्दी होत असे. परिवारातही खूप वृद्धी झाली, सर्वत्र मला सन्मानही मिळाला. पण प्रभो, मला त्याचा लोभ नाही. आणि प्रभो, वाणीबरोबरच माझी लेखणीही कार्यरत होती.

**काव्ये कृष्णकथामृतादि रचिली, स्तोत्रेहि भावापरी ।**
**ज्ञानेशी अनुवादिली, विवरणे श्रीब्रह्मसूत्रावरी ।।**
**गीताध्याय तृतीय तो, विवरिला जो बोध केला मना ।**
**आता चित्त जडो तव पदी हे नाथ नारायणा ।।**
**स्वत्वाचा नित बुद्धिभेद करण्या जे तर्कटे मांडिती ।**
**त्यांना उत्तर मी दिले न थकता दावून वस्तुस्थिति ।।**
**नाही हे परि संपणे वळण जो लागेना ना शिक्षणा।**
**आता चित्त जडो सदा तव पदीं हे नाथ नारायणा ।।**

देवा आता या सगळ्या लौकिकाला मन विटले आहे असे वाटते. हिमालयात, भागीरथीच्या रम्य तीरावर, एकान्तात गायत्री–उपासना करावी, उपनिषदे अभ्यासावी, ती माझी इच्छा पूर्ण व्हावी.

श्रीदासगणुमहाराजांचा परिवार मी सांभाळला, त्यात माझ्याही नवीन संबंधांची भर पडली, त्यांनाही सांभाळले. त्यांना योग्य शंकांना उत्तरेही दिली. करता येईल तसे सहाय्यही केले. पण देवा, तेथेही मद, मत्सर, लोभ पाहून, एकमेकांवर दोषारोप करण्याची वृत्ती पाहून आता मला उत्साह राहिला नाही. देवा, ही अशी मने सांभाळण्याचे मला फार श्रम झाले. आता तो भार मी घेणार नाही. आता हे अंत:करण तुझ्या पायांजवळ राहू दे. माझ्या ह्दयावर ही तुझी पाऊले स्थिर राहू देत. खरे सांगू–

**झालासे नुकता वडील मुलगा माझा गृहस्थाश्रमी ।**
**आता योग्य न राहाणे मज गमे मोहे प्रपंचात मी ।**
**वानप्रस्थ न शब्दश: परि तशा वृत्तीत काठिण्य ना ।**
**आता चित्त जडो सदा तव पदीं हे नाथ नारायणा ।।**

नारायणा! मी माझ्या वयाच्या पन्नाशीतच, वयाच्या साठीनंतर काय काय करावयाचे याचे नियोजन केले आहे. त्याच मार्गावर आता माझी पाऊले पडोत. त्यासाठी प्रभो, मला धैर्य दे, बल दे, विवेकबुद्धी दे एवढी एकच प्रार्थना आहे. मी मला लाभलेला सर्व वेळ, मला लोकेषणा नसतानाही, त्यांनी सुधारावे म्हणून कारणी लावला. परंतु त्याचा कुठलाही ऐहिक, पारलौकिक लाभ झाला नाही. मी बालपणी रोगी होतो, पण पथ्याने वागून आरोग्य सांभाळले. त्यामुळे नियोजिलेली सर्व कार्ये सिद्धीस गेली. आता येथून पुढे हे आरोग्य असेच राहील याचा भरवसा नाही मग उगीच लोकसंग्रह कशासाठी वाढवू?

हे नारायणा, तुझ्या कृपेकरून–

**संसारात उणे नसे, मज मिळे जे का हवे वाटले ।**
**कार्ये उत्तम सर्व पार पडली, मी गौरवा भोगिले ।।**
**आता तृप्त खराच तेथ, दुसरी आहे तुला याचना ।**
**आता चित्त जडो सदा तव पदी हे नाथ नारायणा ।**

देवा, मी संसारात तृप्त आहे. तुला जे मागायचे आहे ते वेगळेच आहे. मला समजत नाही, तुला माझे योग्यायोग्य जास्त कळते. मी मागे तुला असे म्हणलो होतो,

**'विश्वासून पुरा तुझ्यावर हरी काही न मागे तुला ।'**

आणि देवा, मी प्रपंचात तसाच वागलो, पण आता जे मागतो आहे ते वेगळे आहे. तेव्हा तू मला दोष देऊ नकोस; मला हवे ते दे देवा! माझी याचना पूर्ण कर.

**माझे सर्व हवे नको सरुनिया जावो पुरे श्रीहरी ।**
**उंची संभव जी असेल पुरती द्या ती न ठेवा उरी ।**
**लोभी मी, मजसी अधीर हावरा जे पाहिजे ते म्हणा ।**
**आता चित्त जडो सदा तव पदी हे नाथ नारायणा ।।**

आता हे पूज्य स्वामी वरदानंद भारती यांचे आत्मनिवदेनपर काव्य व या लेखनात व्यक्त झालेले विचार यावरून त्यांच्यातील संतलक्षणे कशी व्यक्त होत आहेत हे आपण पाहू...

पू.वरदानंद भारती स्वामी जेव्हा म्हणतात की, मी कधी आयुष्यात नीति न्यायमर्यादेचे उल्लंघन केले नाही तेव्हाच आपल्या लक्षात येते की, त्यांनी षड्विकारांवर ताबा मिळविला होता. कारण या षड्विकारांना वश होऊनच माणूस पाप करत असतो व मग त्याच्या हातून नीति धर्माच्या मर्यादांचे उल्लंघन होत असते. म्हणूनच षट्विकारजित, अनघ, अकाम असे ते होते. 'सम सीतल नहि त्यागहि नीति', **'दंभ, मान मद करहि न काऊ । भूलि न देहि कुमारग पाऊ'** ही लक्षणेही स्पष्ट दिसून येतात.

ते म्हणतात की, कुणी अकारण निंदा केली तरी तीही मी सहन केली. तसेच ज्यांच्यावर प्रेम केले त्यांनीही आपदा आणल्या तरी मी कर्तव्य सोडले नाही. रागाने कुणी दूर गेले तरी त्यांचे दु:ख मी वाहात बसलो नाही किंवा ज्यांनी माझ्यावर उदंड प्रेम केले, आर्थिक, शारीरिक सहाय्य केले तेही काही तरी निमित्त करून दूर गेले तरी मी शोक केला नाही. यावरून ते 'संसार दुख रहित विगत संदेह, मदहीन, धीर धर्म पालनात परम प्रवीण होते. एक प्रकारे स्थितप्रज्ञ व स्वधर्मनिष्ठ, कर्तव्य तत्पर, निष्काम कर्मयोगी कसे होते ते स्पष्ट दिसून येते. अचल म्हणजेच, ज्याची बुद्धी, प्रज्ञा स्थिर आहे असे होते. 'शुचि व सुखधाम' होते हे 'मी माझे जीवन अत्यंत साधेपणाने कुठलेही अवडंबर न माजवता व्यतीत केले' असे ते म्हणतात त्यावरून कळून येते. संबंध टिकविण्यासाठी वाढविण्यासाठी पू.आप्पांनी उदंड पत्रव्यवहार केला पण त्यात आपला वेळ वाया गेला असे त्यांना वाटू लागले. त्यातून लौकिक वाढला तरी ज्यात सार नाही ते उपचार त्यांना नंतर नकोसे वाटू लागले. यावरून गोस्वामी तुलसीदास म्हणतात त्याप्रमाणे धर्माचरणाने त्यांना आपोआप वैराग्य प्राप्त झाले होते आणि योगाभ्यासाने ज्ञानप्राप्ती झाली होती (मानस अरण्यकांड) 'धर्म ते बिरति जोग ते ग्याना । ग्यान मोच्छप्रद बेद बखाना।। (१६/१) त्यामुळे खरे तर ते जीवन्मुक्तच झाले होते. त्यामुळे 'अमित बोध अनीह मितभोगी । सत्यसार कवि कोबिद जोगी' ही लक्षणेही दिसून येतात. 'सावधान'च्या लक्षणावरून प्रत्येक बाबतीत ते सावध-दक्ष होते. समर्थ रामदासांनी 'पहिले अध्यात्म निरूपण। दुसरे ते राजकारण । तिसरे ते सावधपण । सर्व विषयी।।' असे म्हटले आहे. पू.वरदानंद भारती यांनी सामाजिक हिताची कामे भरपूर केली. व्याख्याने दिली, कीर्तने, प्रवचने केली. या कार्यक्रमांना प्रचंड गर्दी होत असे. त्यांना सन्मानही मिळाला. पण त्यांना त्याचा लोभ नव्हता. वाणी बरोबर त्यांची लेखणीही कार्यरत होती. उपनिषदे, गीता, ब्रह्मसूत्रावर भाष्ये लिहिली. त्यांना लोकेषणा नसतानाही लोकांनी सुधारावे यासाठी वेळ सत्कारणी लावला. ज्यांनी वेदपुराणांचा नीट अभ्यास न करता हवे तसे अर्थ काढून लोकांची दिशाभूल केली त्यांचा पू.स्वामी वरदानंदांनी खरपूस समाचार घेतला. निर्भयपणे त्यांच्या मतांचे खंडण करून वास्तवाचे दर्शन घडवले. अध्यात्म व सामाजिक, राजकीय सर्वच क्षेत्रात त्यांचे सावधपण स्पष्ट दिसून येते. पूज्य दासगणू महाराजांच्या सल्ल्यावरून नंतर त्यांनी राजकारणात सक्रिय भाग घेण्याचे टाळले तरी त्यांच्या ठिकाणची देशभक्ती त्यांच्या वाणी व लेखणी यांच्या द्वारा प्रकट झाली. सिंधूच्या दर्शनाने त्यांची जी स्थिती झाली यावरून हे स्पष्ट होत आहे. यासर्व गोष्टीवरून त्यांची सावधानता 'बोध जथारथ वेद पुरान्त । 'बिरति बिबेक बिनय विग्याना । ' तसेच 'गावहि सुनहि सदा मम लीला । हेतु रहित परहित रत सीला ।।' 'सरल सुभाउ सबहि सन प्रीती । जप तप व्रत दम संजम नेमा । गुरू गोविंद विप्र पद प्रेमा ।। श्रद्धा छमा मयत्रि दाया। मुदिता मम पद प्रीति अमाया ।। आणि मुख्य म्हणजे 'तजि मम चरन सरोज प्रियतिन्ह कहुँ देह न गेह ।। हे भक्तलक्षण स्पष्ट होत आहे. पूज्य दासगणू महाराजांची संन्यास ग्रहण करण्याची इच्छा त्यांच्या या शिष्योत्तमाने पूर्ण केली आणि ज्या वरद नारायणाचे साक्षात दर्शन त्यांना झाले होते त्यांच्या चरणी मस्तक ठेवून त्यांना प्रिय असणाऱ्या गंगा भागीरथीच्या रम्य तीरावर आपल्या पार्थिव शरीराचा त्याग करून ते ब्रह्मलीन झाले! त्यांच्या चरणी सादर सप्रेम कोटी कोटी कोटी प्रणाम!

हरि: ॐ तत्सत्

**- डॉ. श्री. कमल बाळकृष्ण वैद्य**
श्रीसिद्धी विनायक पुरम, बी विंग, ७ वा मजला,
फ्लॅट नं. ७ डी, ज्ञानेश्वर चौक, दत्तनगर, विश्रामबाग,
सांगली ४१६४१५. मो. ९२७२२०१७८९

•••



# प्रकाश पराते कराया!

**डॉ. सच्चिदानंद शेवडे**

प. पू. स्वामी वरदानंद भारतीचे अनुग्रहीत शिष्य, आंतरराष्ट्रीय ख्यातीचे व्याख्याते व साहित्यिक.

मावळवीत विश्वाभासु! नवल उदेला चंडाशु! असे गुरूंचे अत्यंत समर्पक वर्णन ज्ञानेश्वर माऊलींनी केले आहे. गुरु या शब्दाचा अर्थ अज्ञानरूपी अंधकाराचा ज्ञानरूपी प्रकाशाने नाश करणारा असा होतो. आपल्या परंपरेत भगवद्‌गीता, उपनिषदे आणि ब्रह्मसूत्रे या प्रस्थानत्रयींवर जो भाष्य लिहितो, तो आचार्यपदाला जाऊन पोहोचतो अशी मान्यता आहे. प. पू. वरदानंद भारती हे निर्विवादपणे गुरु व आचार्यपदाचे मानकरी होते. आधुनिक युगातले ते संत होते. ज्ञानेश्वर, वाधिराज व राघवेन्द्र स्वामी यांनी संजीवन समाधी घेतल्याचे सांगितले जाते. या गोष्टीला शेकडो वर्षे उलटली. आजच्या काळात अशी समाधी कोणी घेतल्याचे निदान माझ्या तरी ऐकण्यात नव्हते. ते प. पू. वरदानंदभारतींनी करून दाखवले. ही सहजसाध्य वा सोपी गोष्ट नव्हे. मंगळवार, दि. ३ सप्टेंबर रोजी श्रावणी एकादशीचा मुहूर्त साधून सकाळचे स्नान झाल्यावर स्वामीजींनी आपण समाधिस्थ होणार असल्याचे सांगितले. गुरुवारी ५ सप्टेंबर दिवशी पहाटे ५.३० वाजेपर्यंत ते एकाच स्थितीत निश्चल होते. त्यांचा श्वास व नाडी थांबताच ते ब्रह्मलीन झाल्याचे उपस्थितांच्या लक्षात आले. संन्यास धर्मानुसार दुसऱ्या दिवशी त्यांच्या शरीराला जलसमाधी देण्यात आली. उत्तरकाशीच्या थंड हवेत उपस्थितांना दु:खाचे कढ येत होते.

प्राचार्य अ. दा. आठवले तथा पू. अप्पा यांनी संन्यास घेतल्यानंतर त्यांचा मुक्काम प्राय: उत्तर काशी येथील कैलासाश्रमात असे. क्वचित ते मुंबई, ठाणे, पुणे व नांदेड येथे येत असत. मी त्यांना १९९६ मध्ये उत्तरकाशीतच भेटलो होतो. माझ्या रक्तलांच्छन व पुनरुत्थान या दोन पुस्तकात त्यांची आशीर्वादपर पत्रे समाविष्ट केली आहेत. पू. अप्पांच्या एकूण जीवनपटावर दृष्टिक्षेप टाकला तरी त्यांचे जीवन म्हणजे परमार्थ पथावरून मार्गक्रमण करणाऱ्यांसाठी दीपस्तंभासारखे आहे हे लक्षात येते. जीवन कसे जगावे, म्हणजे त्यास धन्यता प्राप्त होते, आत्यंतिक समाधान व प्रसन्नता लाभते याचा एक वस्तुपाठ म्हणून पू. अप्पांच्या जीवनाचा उल्लेख करता येईल. भावनात्मकतेबरोबरच कर्तव्यदक्षतेला त्यांच्या जीवनात एक वेगळेच स्थान असल्याचे दिसून येते. 'नर करनी करे, तो नर का नारायण बन जाए' हे वचन त्यांनी सत्य करून दाखविले. त्यांच्या वागण्या-बोलण्यातून, त्यांच्या साक्षेपातून व त्यांच्या समग्र वाङ्मयातून माणसाच्या विचारांना दिशा देण्याचे व आचरणाला प्रेरणा देण्याचे सामर्थ्य आहे यात शंकाच नाही. आपली संस्कृती व धर्म यांचा त्यांना सार्थ अभिमान होता आणि तो इतरांमध्ये संक्रमित करण्याची त्यांची धडपड होती.

त्यांची ओळख प्राचार्य अ. दा. आठवले, जन्म - अनंत चतुर्दशी, १८ सप्टेंबर १९२० व समाधी ५ सप्टेंबर २००२ एवढ्याच मर्यादेत बसत नाही.

त्यांच्या जीवनाचे प्राचार्य, सफल वैद्य, तत्त्वज्ञ, महाकवी, व्याख्यान, प्रवचन-कीर्तनकार, संपादक आणि गाढे व्यासंगी असे अनेक कप्पे आहेत. यांचा परामर्शही 'अनंत संपदा' या डॉ. ग. प्र. परांजपे संपादित ग्रंथात घेतला आहे. त्याच ग्रंथाच्या आधारे ओळख करून देत आहे.

पुणे येथील टिळक आयुर्वेद महाविद्यालयात विद्यार्थिप्रिय प्राध्यापक व पुढे काही काळ प्राचार्यपदावर पू. अप्पांची नेमणूक झाली. त्यांचे वडील बालपणीच निर्वतल्यामुळे दासगणू महाराजांकडे त्यांचे शिक्षण झाले. ऐन तारुण्यात पू. अप्पा नास्तिकतेकडे झुकले होते. त्या वेळी दासगणू महाराजांनी त्यांना सांगितले की, 'अनंता, तुझ्यासारखा निरुत्तर करणारा युक्तिवाद मला करता आला नाही तरी एक लक्षात ठेव, कैक हजार वर्षांहून अधिक काळ जी ज्ञानपरंपरा अक्षुण्णच राहिली, असंख्य तपस्वी, चिंतक, प्रखर बुद्धिनिष्ठांनी जी प्रमाण मानली आणि अनेक आक्रमणानंतरही जी टिकून राहिली ती निरर्थक असेलच कशी? बुद्धी माणसाला समाधान देऊ शकत नाही. सुख श्रद्धेमुळेच लाभते.' या दासगणू महाराजांच्या बोलण्यामुळे पू. अप्पांना नवी दृष्टी लाभली. ते संस्कृतीच्या आधार मूल्यांचा शोध घेऊ लागले.

वैद्यकीय क्षेत्रात असताना पू. अप्पांनी अष्टांगसंग्रह व निदानपंचक (व्याधिविनिश्चय) असे दोन ग्रंथ लिहिले. ते मान्यताप्राप्त आहेत. दासगणूमहाराजांची परंपरा त्यांनी समर्थपणे पुढे चालविली व वाढविली. त्यासाठी त्यांनी प्राचार्यपदाचे त्यागपत्र दिले. दासगणूमहाराजांनी, 'अनंताने मला मागे टाकले' अशी प्रशस्ती देण्यासारखे कार्य पू. अप्पा करीत होते.

**एक तत्त्वज्ञ**

तत्त्वज्ञ म्हणजे तत्त्वाचे ज्ञान, तत्त्वाच्या अस्तित्वाचा अनुभव घेण्यामुळे त्या तत्त्वाचे ज्याला पूर्णज्ञान झाले आहे असा!

तत्त्वज्ञानातल्या या अनुभूतीची साक्ष 'भावार्चना' या भावकाव्य संग्रहात आपल्याला सापडते. 'ब्रह्मसूत्रार्थदर्शिनी' हा पू. अप्पांचा ओवीबद्ध ग्रंथ आहे. उपनिषदर्थ कौमुदीचे तीन खंड पद्यरचनेत तर दोन खंड गद्यरचनेत आहेत. यात ईश, केन, कठ, प्रश्न, मांडुक्य, मुंडक, तैत्तिरीय, ऐतरेय, छांदोग्य व बृहदारण्यक या दशोपनिषदांप्रमाणेच महानारायण व श्वेताश्वतर यांचाही परामर्श घेतला आहे. भगवद्गीतेच्या अध्यायावर पृथक भाष्य ग्रंथांचे लेखनही त्यांनी केले.

प्रस्थानत्रयीवरील हे समृद्ध लेखन त्यांच्यातील तत्त्वज्ञाचा परिचय करून देण्यास पुरेसे सक्षम आहे.

**एक महाकवी**

पू. अप्पांनी 'श्रीकृष्ण कथामृत' या महाकाव्याची रचना केली. ऐन तारुण्यात रचलेल्या या महाकाव्यात कल्पकता, रसाविष्कार, समर्पक अलंकार, ठोस व्यक्तिचित्रण, मनोरम निसर्गवर्णन, हृद्य संभाषणे, नर्म विनोद, देशहिताचा विचार, उत्कट भक्तिरस व प्रासादिक भाषा हे गुण आहेत. त्यांचे दुसरे महाकाव्य 'शककर्ता शालिवाहन' हे १५ सर्गांचे व अडीच हजारांवर कविता असलेले असून अप्रकाशित आहे.

त्यांचा स्वराज्याचा पोवाडा हा अकरा चौकी व राष्ट्रसंरक्षण पोवाडा हा बावीस चौकी आहे. स्वराज्यातील पोवाड्यात आद्य क्रांतिवीर वासुदेव बळवंत फडके यांपासून थेट स्वातंत्र्याच्या पंचविशीपर्यंतचा वेध घेतला आहे. राष्ट्रसंरक्षण पोवाड्यात त्यांनी प्राचीन हिंदुस्थानपासून अर्वाचीन दयनीय हिंदुस्थानपर्यंतचे वर्णन केले आहे. त्यात स्वराज्याकडून सुराज्याकडे जाण्यासाठी ते हिंदूंना आवाहन करतात की, **उठा हिंदूंनो ! जागृत व्हा रे, राज्य आपुले स्थापावे।**
**त्याविण नाही गतीच दुसरी, परिस्थितीसी जाणावे।।**

हे त्यांचे दोन्ही पोवाडे म्हणजे राष्ट्रभक्तीचे अद्भूत रसायनच आहेत. हे वाचले वा ऐकले तरी अंगात रक्त सळसळू लागते. नांदेडच्या संस्कृतीसंरक्षक मंडळाने राष्ट्रसंरक्षण पोवाड्याचा डबल कॅसेट अल्बम काढला आहे. ज्ञानेश्वरीवर त्यांनी 'अनुवाद ज्ञानेश्वरी' हा समओवी ग्रंथ लिहिला. ज्ञानेश्वरीपेक्षा यात बाराशे ओव्या जास्त आहेत. या ग्रंथामुळे ज्ञानेश्वरी समजणे सुबोध सोपे झाले आहे. या शिवाय त्यांनी शेकडो पदरचना केल्या. मराठीप्रमाणेच संस्कृतातही त्यांनी पद्यरचना सहजपणे केली. पंढरपूरच्या रुक्मिणी मंदिरात पू. अप्पांनी केलेले रुक्मिणी अष्टक मोठ्या फलकावर लावले आहे. त्यांच्या शेजारीच आद्य शंकराचार्यांचे पांडुरंगाष्टक लावले आहे. दोन्ही अष्टके रसाळ आहेत.

**एक व्यासंगी**

पू. अप्पा हे महाभारताचे व्यासंगी होते. श्रीकृष्ण हाच त्यांच्या जिव्हाळ्याचा विषय होता. मराठी वाङ्मयातील दिग्गजांचे आपल्या संस्कृतीवरील व महाभारतावरील आक्षेपांचे त्यांनी सडेतोड खंडन केले. 'महाभारताचे वास्तव दर्शन' (आक्षेपांच्या संदर्भात) हा त्यांचा ग्रंथ खूपच गाजला.

'भगवान श्रीकृष्ण - एक दर्शन' हा त्यांचा ग्रंथ प्रत्येकाने अभ्यासायला हवा. विशेषत्वाने राजकारणात असलेल्यांनी व जाऊ इच्छिणाऱ्यांनी हा ग्रंथ वाचायला हवा. यात युगकर्ता, राजकारणी, मुत्सद्दी, तत्त्ववेत्ता, योगेश्वर असलेल्या श्रीकृष्णाने धर्मपालनासाठी काय केले व कोणते डावपेच रचले, याचे साधार दर्शन घडते. श्री समर्थ रामदासस्वामींनी रचलेल्या मनाच्या श्लोकांचा अर्थ नीटपणे जाणून घ्यायचा असेल तर 'मनोबोध' हा ग्रंथ वाचला पाहिजे.

'वाटा आपल्या हिताच्या' व 'यक्षप्रश्न' हे पू. अप्पांचे दोन्ही ग्रंथ प्रश्नोत्तरात्मक आहेत. यात अनुक्रमे हिंदुधर्माबद्दल सर्वसामान्य लोकांनी विचारलेले १०५ प्रश्न व यक्ष युधिष्ठिर प्रश्नोत्तरे आहेत. हे दोन्ही ग्रंथ वाचनीय व मननीय आहेत. यातील विवेचनात हिंदू समाज व राष्ट्र यांची आजची स्थिती लक्षात घेतलेली आहे. आजच्या तरुण मनाचा धर्माबद्दलचा संभ्रम व गोंधळ नष्ट करण्याचे बळ या ग्रंथामध्ये आहे. आपला धर्म व संस्कृती याबद्दल जिज्ञासा असलेल्या प्रत्येकाने ते आपल्या संग्रहात ठेवायला हवेत.

**एक कीर्तनकार-प्रवचनकार**

श्रीदासगणूमहाराजांची कीर्तनोपयोगी आख्याने व पदे पू. अप्पांनी आत्मसात केली आणि नवी आख्याने रचून त्यात भरही घातली. दासगणूमहाराजांच्या एकेका आख्यानात ७० ते ८० पदे, त्यातील काही अनवट चालीतली आहेत. ही सर्व आख्याने पू. अप्पांनी आपल्या प्रभावी व प्रासादिक वाणीने सादर केली. 'काल्याचे कीर्तन' हे श्रीदासगणू परंपरेचे वैशिष्ट्य आहे. हे कीर्तन पू. अप्पा बहारीने सादर करीत असत. यात खेळ खेळले जात. या कीर्तनावर पू. अप्पांचे पूर्वरंग-तरंग व तरंगिणी असे दोन ग्रंथ प्रकाशित झाले आहेत. संदर्भासहीत समृद्ध विवेचन, तर्कशुद्ध मांडणी, चपखल दृष्टांत, नर्म विनोदाची पखरण, आक्षेपांचे स्पष्ट खंडण, साम्यवाद व समाजवादातील फोलपणाचे दर्शन, अमोघ वक्तृत्व व धार्मिकतेत शिरलेल्या दांभिकपणावर प्रहार ही त्यांची खास वैशिष्ट्ये होती. पुणे विद्यापीठाच्या ज्ञानदेव अध्यासनासाठी त्यांनी अवघ्या वीस दिवसांत साडेतीन लक्ष रुपयांचा निधी आपल्या प्रासादिक वाणीच्या जोरावर मिळवून दिला. पण स्वत:च्या स्वार्थासाठी मात्र त्यांनी कधीच पैसा जमा केला नाही. कीर्तन-प्रवचन व पैसा यांचा परस्परसंबंध स्वत:च्या जीवनात त्यांनी येऊ दिला नाही. हा त्याग केवढा मोठा आहे? कीर्तनाप्रमाणेच त्यांची प्रवचनेसुद्धा अत्यंत रसाळ होत असत. लोक मंत्रमुग्ध होऊन जात.

**एक संपादक**

आधुनिक महीपती म्हणून ओळखल्या जाणाऱ्या दासगणू-महाराजांकडे अपार कवित्व शक्ती होती. त्यांनी दीड/दोन लक्ष रचना सहजपणे केल्या. या रचना प्रसिद्ध झाल्या; पण प्रदीर्घ काळामुळे त्या विखुरलेल्या होत्या. त्या सर्वांचे पू. अप्पांनी नीट संपादन केले व दहा खंडांमध्ये 'दासगणूमहाराज वाङ्मय' प्रकाशित केले. ही मराठी सारस्वतात पडलेली मौलिक भरच होय. पू. अप्पांचे हे कर्तृत्व मराठी वाङ्मयाच्या दृष्टीने मोलाचेच आहे. समाजाच्या सर्वांगीण विकासाच्या दृष्टीने संपादकांनी केलेली ही धडपड महत्त्वाची ठरते. विष्णुसहस्रनामाचेही त्यांनी संपादन केले आहे.

नांदेडजवळील श्रीक्षेत्र गोरटे येथे त्यांनी श्री दासगणू प्रतिष्ठान निर्माण केले. हे प्रतिष्ठान म्हणजे सामाजिक सेवाभावाचा त्यांनी घालून दिलेला आदर्शच आहे. संतविद्या प्रबोधिनीमागे त्यांचीच प्रेरणा होती.

पू. अप्पांच्या राजकीय विचारांवर लो. टिळक आणि स्वा. सावरकरांचा स्पष्ट प्रभाव होता. ते कट्टर हिंदुत्ववादी होते. गांधीवाद स्वीकारल्यामुळे देशाची अधोगती झाली व काँग्रेसने समाजवादाचा उद्घोष करून या देशात वंशवाद आणल्याचे त्यांचे मत होते. पू. अप्पांचे राजकीय व सामाजिक विचार हे भारतीय संस्कृतीतील शाश्वत मूल्यांवर आधारलेले होते.

पू. अप्पांशी विविध विषयांवर चर्चा करीत असताना त्यांना कोणताही विषय सामान्यत: अज्ञात नाही हे पाहून विस्मय वाटत असे. अफाट वाचन, विलक्षण स्मरणशक्ती, अमोघ वाणी, तर्कशुद्ध विचारसरणी, प्रखर राष्ट्रनिष्ठा, समाजहिताची तळमळ व काटेकोर वक्तशीरपणा हे सारे गुण त्यांच्या ठायी एकवटले होते. आम्ही अनेक विषयांवर कैक तास चर्चा करीत असू. त्यातून अत्यंत अमोल असे ज्ञानकण मी जमा करून ठेवले आहेत.

दासगणूमहाराज व पू. अप्पा हे दोघेही आपल्यात नाहीत. पण ग्रंथरूपाने ते सतत असणारच आहेत. दोघांचे ग्रंथ व विचार हे परस्परपूरकच आहेत. शिष्यबोधात वर्णन केल्यानुसार –

**तेलवात एक्याठायी। जै झाली पोरापायी।**

**तै तदंगी सामर्थ्य येई। प्रकाश पराते कराया।**

या ओळीमधला शेवटचा १/४ भाग पू. अप्पांचे जीवन होते. त्यांच्या ग्रंथरूपी विचारांच्या प्रकाशाचा लाभ माझ्यासह सर्व शिष्यांना व अन्यांना होवो ही वरदनारायणाच्या चरणी प्रार्थना आहे.

प. पू. स्वामी म्हणतात,

**मी म्हणजे ना शरीर । मी मद्ग्रंथाचा सांभार।**

**त्याचे वाचन चिंतन । यथाशक्ती आचरण।**

**हीच गुरुपुजा खरी । हेच जाणावे अंतरी ।**

(सदरचा लेख लेखक डॉ. श्री. सच्चिदानंद शेवडे यांचे 'प्रहार' पुस्तकातून घेण्यात आलेला आहे.)


**डॉ. सच्चिदानंद शेवडे**

१६, भैरव अपार्टमेंट, कस्तुरी फ्लाझाच्या मागे,

टाटा पॉवर लेन पथ, रामनगर, डोंबिवली (पूर्व), जि. ठाणे

४२१ २०१. मो. ९८९२३२१७०४.

मेल – drshevade@gmail.com.

वेब – www.drshevade.com


•••

**मना वासना दुष्ट ही भ्रष्टवीते ।**

**जशी ती सुरा मद्यपां नाचवीते ।।**

**म्हणूनी अधीं दुष्टशा वासनेला ।**

**पिटाळूनिया लावि देशांतराला ।।**



# पू. अप्पांची जाज्वल्य राष्ट्रभक्ती

**विद्याधर मा. ताठे**
(एम.ए.; बी.जर्नालिझम) संपादक 'एकता' मासिक पुणे
१८ ग्रंथांचे संपादन, विविध पुरस्कारांनी सन्मानित, माजी कार्यकारी संपादक, साईलाला मुंबई

राष्ट्रभक्ती ही अप्पांना पू.दादांकडून बाळकडू म्हणूनच लाभलेली होती. देवभक्ती आणि राष्ट्रभक्ती एकसमयावच्छेदक मानून दादांनी धर्माभिमानाबरोबरच देशाभिमानाचे संस्कार अप्पांवर केलेले होते. पू.अप्पा प्रखर-जाज्वल्य राष्ट्रभक्त होते. वीर सावरकरांचा वैचारिक वसा त्यांनी स्वीकारलेला होता. संतांचा भक्तियोग, टिळकांचा कर्मयोग आणि सावरकरांचा राष्ट्रयोग यांचा त्रिवेणी संगम म्हणजे पू.अप्पा ! त्यांनी ३ वेळा संपूर्ण भारतभ्रमण केले, ते पर्यटन नव्हते तर भारतमातेचे विश्वरूप दर्शन, वंदन होते. भारत देश हा केवळ भूभाग नसून आमची प्राणप्रिय पुण्यभू आहे अशी त्यांची दृढ धारणा होती. 'देश हा देव असे माझा' अशी त्यांची जाज्वल्य राष्ट्रभक्ती व कृतिरूप आचार पाहून 'भाग्ये आम्ही अप्पा देखियले ।' असे म्हणावेसे वाटते.

पू.अप्पांच्या प्रेरणेने पत्रकारितेत कार्यरत पत्रकार विद्याधर ताठे यांचा विशेष लेख –

**भक्ती भाग्य प्रेमा साधीन पुरुषार्थ ।**
**भाग्ये आम्ही तुका देखियेला ।।**

श्री जगद्गुरु तुकाराममहाराज यांच्या या अभंगचरणामध्ये, त्यांची क्षमा मागून थोडासा बदल करुन **'भाग्ये आम्ही अप्पा देखियेले ।'** असे म्हणावे वाटते. परमहंस स्वामी वरदानंद भारती तथा प्राचार्य अनंतराव दामोदर आठवले, पीठाधीश, मठाधिपती म्हणून कधीच मिरवले नाहीत. त्यांच्या भक्त परिवारामध्ये ते कुटुंबातील वडिलधाऱ्या माणसासारखे, आदरणीय –आपले बनूनच राहिले. म्हणूनच बहुतेकजण त्यांना **'अप्पा'** म्हणत. ते 'अप्पां'चे 'अप्पामहाराजही' झाले नाहीत. **महाराज–मठाधिपती** या बिरुदावलीपासून ते कटाक्षाने दूर राहिले, हे अप्पांचे खास वैशिष्ट्य होते. पू. अप्पा म्हणजे एक अलौकिक असे आगळे-वेगळे रसायन होते. ऋषिमुनी व संतांचा भक्तियोग, वीर सावरकरांचा राष्ट्रयोग आणि लोकमान्य टिळकांचा कर्मयोग यांचा पू. अप्पांच्या ठायी त्रिवेणी संगम झालेला होता. अप्पा म्हणजे अखंड सावधता, अप्पा म्हणजे साक्षेप, अप्पा म्हणजे विवेक, अप्पा म्हणजे समन्वय, अप्पा म्हणजे स्थितप्रज्ञता, आणि अप्पा म्हणजे मूर्तिमंत दातृत्व होते. या लेखाचा मला दिलेला प्रतिपाद्य विषय **'अप्पा'** नसून **'अप्पांची राष्ट्रभक्ती'** आहे. पण त्या विषयाची पूर्वपिठिका म्हणून अप्पांच्या गुणगौरवाचे पुण्यस्मरण हे अत्यंत अगत्याचे व प्रेरक आहे.

पू.अप्पांच्या राष्ट्रभक्तीचा विचार मनात येताच मला स्वामी गोविंददेवगिरी उर्फ आचार्य किशोरजी व्यास यांनी अप्पांच्या देशभक्तीबद्दल नांदेडच्या स्मृतिव्याख्यानात काढलेले गौरवोद्गार आठवतात. **स्वामी गोविंददेव म्हणाले – ''पू.अप्पांच्या कार्यात सतत एकच विचार होता. एकच ध्यास होता. तो म्हणजे हा भारत देश पूर्वीप्रमाणे परमवैभवाला पोचला पाहिजे, या देशाची मूळ संस्कृती मूळ तेजाने प्रकट झाली पाहिजे. त्यासाठी मला कार्य करायचे आहे. म्हणूनच इतकं विशाल कार्य करूनही ते भगवंताच्या चरणी शांतपणे विलीन झाले. याचं एकच कारण, आणि ते म्हणजे त्यांनी देवभक्ती व देशभक्ती यात कधीही अंतर मानले नाही. त्यांची अशी धारणा होती की हे राष्ट्र एक भूमी नसून चैतन्यमय माता आहे.''**

### देशभक्तीचे बाळकडू

पू. अप्पांचे भाग्य एवढे थोर होते की त्यांचे सर्व बालपण थोर संतकवि दासगणूमहाराज तथा पू. दादांच्या अंगाखांद्यावर खेळत गेले होते. दादांचा नित्य सहवास व दादांचे संस्कार अशा वातावरणामध्ये अप्पांची जडणघडण झालेली होती. खुद्द दादा जेव्हढे प्रखर धर्माभिमानी होते तेव्हढेच जाज्वल्य देशाभिमानीही होते. देवभक्ती बरोबर देशभक्तीचे बाळकडू अप्पांना दादांकडूनच लाभलेले होते. पण राजकारणाबद्दल दादांना कमालीचा तिटकारा होता. आणि हाच उपदेश पू. दादांनी अप्पांना 'छात्रबोध' मधून केलेला आहे. इ.स.१९५० साली अनंत चतुर्दशीच्या मुहूर्तावर म्हणजे अप्पांच्या वाढदिवशी श्रीक्षेत्र पंढरपूर येथील वाड्यात दादांनी अप्पांना हा १७९ ओव्यांचा 'छात्रबोध' केला असून अप्पांच्या एकूण जीवनात या छात्रबोधाचे स्थान अनन्यसाधारण आहे. त्यामध्ये ७२ व्या ओवीत पू. दादा म्हणतात –

**देशसेवा, शास्त्रसेवा । यात उपयोग करावा ।**
**तव उत्तम बुद्धीचा बरवा । तरीच बाळा, सार्थक ।।७२।।**

या ओवीतही दादा शास्त्रसेवेआधी देशसेवेला अग्रक्रम देतात हेही लक्षात घेण्यासारखे आहे. देशसेवा-शास्त्रसेवेत तुझ्या उत्तम बुद्धीचा उपयोग करण्यात जीवनाचे 'सार्थक' आहे असे स्पष्टपणे दादा सांगतात. पू.दादांच्या या उपदेशाच्या ओव्या वाचून अनेकांना वीर सावरकरांच्या

एका काव्यातील पुढील ओळी आठवल्या नाहीत तरच नवल. वीर सावरकर म्हणतात –

**जरि उद्धरणी व्यय न तिचा हो साचा । हा व्यर्थ भार विद्येचा ।**

भारतमातेच्या उद्धरणी जर विद्येचा उपयोग होणार नसेल तर ती विद्या केवळ भार आहे. दादांनी हाच आशय त्यांच्या काव्यातून व्यक्त केलेला आहे. आणि हाच गुरु-उपदेश शिरसावंद्य मानून पू. अप्पांनी देशसेवेने म्हणजे राष्ट्रभक्तीद्वारे आपले जीवन सार्थ केलेले आहे आणि कटाक्षाने ते सक्रिय राजकारणापासून दूर राहिले.

पू.दादांनी अप्पांना जसा **'छात्रबोध'** केला तसा पुढे संन्यास घेण्यापूर्वी अप्पांनी आपल्या २ मुलांना **'पुत्रोपदेश'** करून देव, देश आणि धर्म-संस्कृतीसाठी सावध राहून डोळसपणे भक्ती करण्याचा उपदेश केलेला आहे. हा **'पुत्रोपदेश'** एक निमित्त आहे. मुलांच्या निमित्ताने पू. अप्पांनी हा सर्वांना-सार्वकालिक केलेला उपदेश आहे. अर्जुनामुळे समाजाला भगवद्गीतेचा लाभ झाला तद्वत् 'पुत्रोपदेश' हा समाजासाठीच आहे. त्यातील पुढील ओळी अप्पांच्या राष्ट्रभक्तीचे मूर्त रूप आहे. पू. अप्पा म्हणतात-

* **स्वदेश धर्मनीताचा स्वाभिमान धरा मनी ।**
**तरीच भारतीयांच्या अर्थ राहिल जीवनी ।।३१।।**

* **देश धर्म कुटुंबाच्या रक्षणास अनुक्रमे ।**
**सामर्थ्य कारणी लावा खंतावे तेथ ना श्रमे ।।६०।।**

एवढेच नव्हे तर पुढे १९९१ मध्ये नातू समीहनच्या मुंजीत अप्पांनी मंगलाष्टक केले त्यातही त्यांनी बटूस आशीर्वाद देतानाही **'राष्ट्रप्रेम हृदी वसो सुगुण हे कुर्वन्तु ते मंगलम् ।।'** असे म्हटलेले आहे.

**राजकारण नको, राष्ट्रकारण**

'देशसेवा', 'देशभक्ती' म्हटले की बहुतेकांना राजकारण आठवते पण दादांना राजकारण विरहित देशभक्ती हवी होती, अपेक्षित होती. 'सत्ता स्थानासाठी **'वाट्टेल ते'** करणे म्हणजे राजकारण.' म्हणूनच कदाचित दादांनी अप्पांना राजकारणात थेट भाग न घेण्याचाही उपदेश केला होता. 'छात्रबोध' मध्ये दादा म्हणतात –

**राजकीय पुढारीपण । नको आपणालागुन ।**
**रंग पालटे वत्सा क्षणोक्षण । राजनीतीचा ।।**

खरं तर राजकारण हा अप्पांचा आवडीचा विषय होता तरी पण गुरूचा उपदेश प्रमाण मानून अप्पा अखेरपर्यंत त्यापासून कटाक्षाने दूर राहिले. मात्र वा.ना.उत्पात, बापू जोशी अशा सारख्या अनेक तरुणांना त्यांनी राजकारणात सक्रिय भाग घ्या म्हणून मार्गदर्शन केले. नव्हे तर प्रोत्साहन दिले. सज्जन-साक्षर-सुसंस्कृत माणूस राजकारणापासून दूर राहिला तर भ्रष्ट-गुंडांना सारे रान मोकळेच सापडेल असे पू. अप्पांचे मत होते. म्हणून सुशिक्षितांनी मोठ्या प्रमाणावर मतदान केले पाहिजे यावर अप्पांचा भर होता. **अप्पा कोणत्याही पक्षाचे नव्हते. त्यांना संकुचित पक्षीय राजकारण मान्य नव्हते तर व्यापक देशहिताचे राष्ट्रकारण त्यांच्या डोळ्यापुढे होते.** त्यामुळे काँग्रेस पक्षातील कै. बाबासाहेब गोरटेकर, पंढरपूरचे काँग्रेसचे आमदार पांडुरंगराव डिंगरे अशा अनेकांशी त्यांचे निकटचे जिव्हाळ्याचे संबंध होते. आमदार डिंगरे अप्पांच्या बहुतेक सर्व व्याख्यानांना प्रमुख श्रोते म्हणून न चुकता हजर राहत होते. एवढेच नव्हे तर पू.अप्पांच्या संन्यास ग्रहण-दीक्षा विधी नंतरच्या शिबिरास उत्तरकाशीलाही ते उपस्थित राहिलेले होते. **'अप्पांच्या भेटीने व संवादाने आमची बॅटरी चार्ज होते' असे आमदार डिंगरे भर सभेत सांगत.** १९९१ साली आमदार डिंगरे यांनी गुरुपौर्णिमेनिमित्त पू.अप्पांना पत्र लिहिले आणि पू.स्वामी विद्यानंदगिरींशी झालेला संवाद उद्धृत करून **'आपण मला अखंड हिंदुस्थान करण्यासाठी आशीर्वाद द्या'** अशी विनंती केली होती. एक काँग्रेस आमदार पू. अप्पांना 'अखंड हिंदुस्थाना'साठी प्रयत्न करण्यास आशीर्वाद मागतो हे पू.अप्पांच्या ठायी वसत असलेल्या जाज्वल्य राष्ट्रभक्तीचेच दर्शन आहे. श्री डिंगरे यांच्या पत्रास पू.अप्पांनी दिलेले उत्तरही अप्पांच्या मनातील राष्ट्राविषयीची तळमळ व भक्तीचे शद्बरूप आहे.

**अप्पांच्या राष्ट्रभक्तीची विविध रुपे :**

**१) भारतभ्रमण**
**२) राष्ट्रभक्तीपर लेखन-विचार**
**३) संस्कृत भाषा व आयुर्वेद अभ्यास-प्राविण्य, प्रज्ञता**
**४) देश आणि संस्कृतीविषयी जनजागरण/प्रबोधन**
**५) विविध ठिकाणी घेतलेली शिबिरे**
**६) राष्ट्रीय कार्यात प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष सहभाग – मदत**
**७) तरुणांना विशेष मार्गदर्शन, प्रोत्साहन**

पू. अप्पांच्या राष्ट्रभक्तीची अशी अनेक अंगे आहेत, रूपे आहेत. **'देश हा देव असे माझा'** या काव्यपंक्ती प्रमाणे **अप्पांच्या प्रत्येक उक्ती व कृतीचे अधिष्ठान त्यांच्या ठायीची राष्ट्रभक्ती आहे.**

**१) भारतभ्रमण** : समर्थ रामदास स्वामी ,स्वामी विवेकानंद आणि श्रीमद् शंकराचार्य यांच्या प्रमाणेच पू.अप्पांनी एक वेळ नव्हे, दोन वेळ नव्हे तर चक्क तीन वेळा भारतभ्रमण केलेले आहे. पू. अप्पांचे भारत भ्रमण म्हणजे पर्यटन नव्हे तर त्यामागे एक आगळीवेगळी भावात्मक दृष्टी आहे. हे भारतभ्रमण म्हणजे भारत मातेचे दर्शन आहे. आपल्या पूर्वजांच्या वैभवशाली प्राचीन वारशाचे – पाऊलखुणांचे – श्रद्धास्थानांचे – कर्मभूमीचे – पुण्यभूमीचे दिव्यदर्शन व त्या त्या स्थळांचे अपार कृतज्ञतेने वंदन, असा उदात्त विचार पू.अप्पांच्या भारत भ्रमणामागे होता. त्यांनी एका भाव कवितेत म्हटले आहे की –

**पूर्व पश्चिम दक्षिणेसह मध्यभाग नि उत्तरा ।**
**देश मी अवलोकिला मम या दिशामधुनी पुरा ।**
**ऐक्य आंतुन नांदते तित बाह्यरूपचि वेगळे ।**
**भारत माते प्रिय दाविले मज विश्वरूपहि आगळे ।।**

विविध प्रांत, विविध चालीरीती, विविध भाषा, विविध प्रकारच्या आहारपद्धती, विविध वेषभूषा, विविध प्रथा अन् रुढी या देशात दिसत असल्या तरी या विविधतेतच एकता दडलेली आहे. विविधता हे बाह्यरुप आहे व तिच्या मुळाशी एकात्मता नांदत आलेली आहे, असे पू.अप्पांनी

अनुभवले. अरुणाचल प्रदेशातील तेजू जवळचे 'परशुराम कुंड' हे पू. अप्पांचे भारतातील सर्वात अधिक आवडते ठिकाण होते.

**हिमालय** हा अप्पांचा बहिश्चर प्राण होता. **देवतात्मा हिमालयः।** हा त्यांच्या निजविश्रांतीचे आनंदनिधान होते. लेह मधील सिंधू नदीपासून थेट दक्षिणेला कन्याकुमारीपर्यंत आणि द्वारके पासून पूर्वोत्तर भारतातील मणिपूरपर्यंत अप्पांनी सर्व स्थळांना भेटी दिलेल्या आहेत. विश्वकवी गुरुदेव रवींद्रनाथ टागोर म्हणतात ''भारतीयांचा इतिहास पाश्चात्य इतिहास लेखक, अभ्यासक यांच्या कसोटीवर घासून पाहणे योग्य नाही.'' पू.अप्पा अशाच मताचे होते म्हणून त्यांनी उभा हिंदुस्थान स्वतःच्या डोळ्यांनी पाहिला-प्रत्यक्ष अनुभवला. तीर्थक्षेत्रे पाहिली, समाजजीवन पाहिले, मोगल व ब्रिटीश परवशतेमुळे झालेला ऱ्हास पाहिला.

### राष्ट्रभक्तीपर लेखन

**जसा मोर घेऊन येतो पिसारा । जशा जन्मती तेज घेऊन तारा।** तसे पू.अप्पा काव्यशक्ती घेऊनच जन्माला आले होते. अगदी बालवयात त्यांनी छंदोबद्ध कविता करून पू.दादांसह सर्वांनाच आश्चर्याचा सुखद धक्का दिलेला होता. निसर्गदत्त काव्यशक्ती लाभलेली असल्यामुळे अप्पा भारतभ्रमण करीत जेथे गेले तेथे त्यांनी त्या स्थळाचे, देवतेचे, तेथील इतिहासाचे, महात्म्य कथन करणारे काव्य केलेले आहे. म्हटले तर हे काव्य त्यांचे भक्तिकाव्य आहे पण त्यातून त्यांची देश व समाजा विषयीची तळमळ तितक्याच उत्कटपणे व्यक्त झालेली दिसते. त्यांची देवभक्ती व देशभक्ती याचा एकसमयावच्छेदक आविष्कार या साहित्यातून मनाला भावतो. पू. अप्पांनी रचलेली काव्ये इतकी विपुल आहेत की त्यांचे वेगवेगळे ग्रंथही प्रकाशित झालेले आहेत. कुठे त्यांना कविता सुचली, कुठे अभंग, कुठे ओव्या, कुठे स्तोत्रे, कुठे अष्टके आणि कुठे आख्याने असे त्यांच्या काव्याचेही अनंत प्रकार आहेत. लेखाची मर्यादा लक्षात घेऊन आपण वानगीदाखल एक दोन दाखले पाहुयात -

इ.स.१९७६ साली पू. अप्पांना लेहला जाऊन परमपावन सिंधू नदीत स्नान करण्याचे भाग्य लाभले. १९५२ साली अप्पांनी वीर सावरकरांच्या भाषणात सिंधूनदीचे अनन्यसाधारण महत्त्व ऐकले आणि सिंधूस्नान करण्याचा मानस केला. पण तो भाग्ययोग लाभण्यास २५ वर्षे गेली.

**'पूर्ण जाहले आज मनोरथ कितीक वर्षाचे ।**
**स्नान मज घडले सिंधूचे ।।धृ.।।'**

असे उत्स्फूर्त काव्य अप्पांच्या ओठी तरळले. या कवितेत अप्पा म्हणतात - **अम्बितमे । हे देवितमे । हे नदीतमे । माते ।**
**कसे तोडिले प्रागितिहासापासूनचे नाते ।**
**केविलवाणे झाले तुजविण स्वराज्य हिंदूंचे ।**
**स्नान मज घडले सिंधूचे ।।**

पू. अप्पांच्या मनी सिंधू नदीविषयी विलक्षण श्रद्धा व आकर्षण होते. त्यामुळे त्यांनी तीन वेळा लेहची यात्रा केली व तीन वेळा सिंधूस्नानाचा परमानंद अनुभवला.

अप्पा भारत भ्रमण करीत ईशान्य भारतातील त्रिपुराला गेले. तेथील त्रिपुरसुंदरी देवीची जीभ बाहेर काढलेली भव्य मूर्ती अप्पांनी पाहिली आणि त्यांच्या मनातील राष्ट्रभक्तीतून प्रसवलेला विचार काव्यरूप घेऊन अवतरला - 'तुझ्या देखत आमची भारतभूमी परकीय आक्रमकांनी हरली आणि आता तू एवढी जीभ बाहेर काढून कोणाला भय दाखतेस?'

**तुझ्या समोरी प्रिय भूमी तव दुष्टांनी हरली ।**
**क्रुद्ध जिभेने आता कोणा भय दावसी काली ।।**

अशाप्रकारे अप्पांचे कोणत्याही प्रकारचे लेखन असूदे त्यामध्ये त्यांच्या भारतभक्तीचे हमखास दर्शन होते. आपली सिंधूनदी, हिंगलजा देवी व आपली गंगा ७ मुखानी सागरास मिळते तो सुंदरबन प्रदेश फाळणीनंतर पाकिस्तान-बांग्लादेशात गेला व आपण त्यांना कायमचे दुरावलो याचे अप्पांना शल्य वाटत होते. त्यामुळे अखंड भारत हे अप्पांचं स्वप्न होते. अर्थात अप्पांच्या स्वप्नातील हा अखंड भारत म्हणजे प्राचीन बृहत भारत आहे. केवळ फाळणीपूर्वीचा हिंदुस्थान नव्हे. अप्पा एका कवितेत म्हणतात -

**अखंड भारत हिंदुत्वाच्या तेजे तळपावा ।**
**दुष्टावा उन्मत्तपणासह सर्व नष्ट व्हावा ।।**

अप्पांनी लिहिलेले **'स्वराज्याचा पोवाडा'** आणि **'राष्ट्रसंरक्षक पोवाडा'** छोट्या पुस्तिका रूपात प्रकाशित झालेले आहेत. हे २ पोवाडे अप्पांच्या जहाल, जाज्वल्य राष्ट्रभक्तीच्या धगधगत्या मशाली आहेत. **देवमस्तकी धरावा । अवघा हलकल्लोळ करावा।** अशा वीरवृत्तीचाच तो अंगार आहे. **'हिंदूंची एकही देवता निशस्त्र नाही'** याचे सतत भान ते भक्ती रंगात रंगून गेलेल्या भाविकांना करुन देत असत आणि अशा सशस्त्र देवदेवतांचा भक्त त्याचा देश असा दीन का? असा प्रश्न करीत असत. लेखाच्या मर्यादेत त्या दोन पोवाड्यांबद्दल मनात असूनही लिहिता येत नाही. जिज्ञासू वाचकांनी पू. अप्पांचे ते दोन पोवाडे आवर्जुन वाचावेत.

### अप्पांनी केलेले राष्ट्रजागरण/प्रबोधन

पू.अप्पांचे कीर्तन असो, प्रवचन असो, व्याख्यान असो वा कोणत्याविषयीचे लेखन असो. त्यामध्ये मुख्य प्रतिपादनाबरोबरच अप्पा देशस्थितीचे चिंतन मांडून लोकांचे प्रबोधन करीत असत. आपल्या वैभवशाली वारशाचे आत्मभान घडवीत असत. अनेक संत, महंत, मठाधिपतींचे कार्य केवळ धार्मिक कर्मकांड-पूजापाठ-पारायण-पुरश्चरणे एवढ्याच पुरते संकुचित असते. त्यांना ना देशाची, ना समाजाची दशा आणि दिशा चिंतीत करीत असते. देश स्वतंत्र राहिला तरच आपली मठ-मंदिरे सुरक्षित राहतील व आपणास धर्माचरणाचे स्वातंत्र्य राहिल याचे भानही त्यांना नसते. 'मला काय त्याचे' अशी उदासीन वृत्ती हीच आपल्या साऱ्या अवनतीचे-पराधीनतेचे मूळ आहे, हे अप्पा आपल्या प्रवचनातून - व्याख्यानातून लोकांना सांगत होते व विविध राष्ट्रीय प्रश्नावर जनजागृती घडवित होते. अर्थात त्यात कोणताही प्रचारकी प्रदर्शनीयतेचा भाग नसे.

पू. अप्पांच्या प्रेरणेने भारतात अनेक ठिकाणी शिबिरांचे आयोजन झाले. उत्तरकाशी, श्रृंगेरी, संत तुकोबांचा भंडारा डोंगर अशा अनेक ठिकाणी झालेली ही शिबिरे सहभागी भाविकांना पारमार्थिक पर्वणी होतीच त्याशिवाय अप्पांच्या विद्याव्यासंगी प्रवचनातून त्या भाविकांमध्ये देशभक्तीची भावना प्रज्वलित होत असे.

**'दीपकलिका धाकुटी । परि बहुतेजाते प्रगटी ।**

**तैसी सद्‌बुद्धी थेकुटी । म्हणू नये ।।'** असे संत ज्ञानदेवांनी म्हटलेले आहे. केवळ धार्मिक-पारमार्थिक एवढ्याच मर्यादित दृष्टीने शिबिरात आलेला भाविक शिबिरार्थी अप्पांच्या व्याख्यानातून-प्रवचनातून बहुश्रुत होत असे व त्याला धर्मतत्त्वाबरोबर, देवा बरोबरच देशाचेही 'भारतमाता' म्हणून शद्धदर्शन घडत असे. आणि त्याच्या मनोमंदिरात इष्ट देवतेबरोबरच भारत मातेची प्रतिमा विराजमान होण्याचे भाग्य सहजपणे घडत असे. संत आदेशाने नव्हे तर सलगीच्या संवादाने समाज परिवर्तन घडवित असतात. ती समाज उत्क्रांती असते. ती प्रक्रिया अनंत काळाची असते पण शाश्वत स्वरूपाची असते. पू.अप्पांचे प्रबोधन अशाच संतकुळीतील होते.

पू.अप्पांच्या व्यक्तिगत मार्गदर्शन व प्रबोधनाचा प्रस्तुत लेखक एक भाग्यवंत आहे. पंढरपूर मधील बँकेच्या नोकरीचा राजीनामा देऊन आसाम, नागालँड भागात वनवासी कल्याण आश्रमाच्या सेवा कार्यासाठी मी जावे का जाऊ नये याविषयी जेव्हा संभ्रम-वाद निर्माण झाला होता तेव्हा अप्पांनी मला बोलवून सर्व विषय-वाद ऐकून घेतला आणि मला म्हणाले-''कुणी काही म्हणोत पण हा देशभक्तीचा मनोदय काळाची गरज आहे. तू राजीनामा देऊन पूर्णवेळ कार्यकर्ता हो. बँकेला काय अनेक नोकर मिळतील पण सुदूर आसाम-नागालँड मध्ये जाऊन निःस्वार्थपणे काम करणारे कार्यकर्ते कल्याण आश्रम संस्थेला मिळणे अवघड आहे. विदेशातून अनेक पाद्री घर, देश सोडून भारतात येतात व वनवासीमध्ये सेवा कार्याचे निमित्त करून त्यांना धर्मांतरित करतात आणि आपण ते मूकपणे पाहतो. तूच नव्हे तर तुझ्यासारख्या अनेकांनी देशसेवेसाठी काही वर्षे दिली पाहिजेत. तू निःशंकपणे जा माझा तुला आशीर्वाद आहे.'' त्यानंतर मी ५ वर्षे वनवासी कल्याणार्थ कार्य केले. अप्पांनी अशी अनेकांना राष्ट्रभक्तीची दीक्षा दिलेली आहे. त्या दीक्षितांपैकी मी एक आहे हे माझे भाग्य आहे.

अप्पांच्या राष्ट्रभक्तीचे आणखी एक अंग म्हणजे देशात **प्रखर हिंदुत्ववादी प्रभावी दैनिक वृत्तपत्रे नाहीत याची त्यांना मोठी खंत होती.** सर्व सरकारी प्रसार माध्यमे आणि भांडवलदारांची वृत्तपत्रे तथाकथित पुरोगामी पत्रकारांच्या हातात आहेत. त्यामुळे हिंदूंना कोणी वालीच नाही. कोणी पुरोगामी पत्रकाराने उठावे आणि आमच्या श्रद्धा, परंपरांवर वाट्टेल ते प्रहार करावेत आणि त्यांना सडेतोड प्रत्युत्तर देण्यास एकही हिंदुत्वाचे मुखपत्र नसावे याचे शल्य अप्पांना होते. पत्रकार पु.भा.भावे, पत्रकार ग.वा.बेहेरे, स्तंभलेखक दादुमिया, भिशीकर या हिंदुत्ववादी लेखकांचा त्यांना विशेष अभिमान होता व त्यांच्याशी अप्पांचा जवळीकतेचा स्नेहसंबंधही होता. अनेकांना त्यांनी सढळ हाताने सक्रिय मदतही केलेली आहे. पंढरपूरचे वा.ना.उत्पात व बापू जोशी यांनी पंढरपूर येथे सुरू केलेल्या **साप्ताहिक 'प्रहार' मागे मुख्य प्रेरणा अप्पांचीच होती.** भागवताचार्य, सव्यासाचि पत्रकार-लेखक, हिंदुत्वाचे प्रखर प्रवक्ते म्हणून उभ्या महाराष्ट्रात वा.ना.उत्पात यांचे नाव आहे. पू. अप्पांचा त्यांच्याशी आर्य चाणक्य-चंद्रगुप्तासारखा गुरु-शिष्य संबंध आहे. अप्पांच्या प्रखर राष्ट्रभक्तीचा अनुग्रह घेणारे आणि, तर तो तितक्याच त्वेषाने -वीरत्वाने मिरवणारे एक शिष्य म्हणजे वा.ना.उत्पात होत! मी ५ वर्षानंतर वनवासी कल्याण आश्रमाच्या कार्यातून मुक्त झाल्यावर पुन्हा बँकेत जाण्याच्या विचारात होतो. पण उत्पात-जोशींनी हा विषय अप्पांकडे काढून मला बँकेऐवजी 'दैनिक तरुण भारत' मध्ये उपसंपादक होण्यास सांगितले. मला पत्रकार होण्यास पू. अप्पांनी प्रवृत्त केले. पत्रकारितेच्या क्षेत्रात हिंदुत्ववादी तरुणांची वानवा आहे ही अप्पांची खंत होती. हीच त्यास मुख्य कारणे होती. १९९० मध्ये पुण्याचा 'तरुण भारत' बंद पडल्याचे वृत्त अप्पांना कळले तेव्हा त्यांना अपार दुःख झाले. ते त्यांनी एक पत्र लिहून व्यक्त केले. ते पत्र त्यांच्या चरित्रग्रंथात प्रकाशितही झालेले आहे. (तेजाचे चांदणे, पान ४४७). त्या पत्रात अप्पा लिहितात - **''तरुण भारत दैनिक बंद झाले ऐकून फार वाईट वाटले. हिंदुत्व विचाराच्या प्रसाराचा एक ओघ आटला. हे दुष्काळात तेरावा मास यावा असे झाले. धर्म म्हणून हिंदुत्व नष्ट होणार नाही, हे कितीही खरे असले तरी हिंदू समाजाचा अभ्युदय होईल ही आशा छिन्नविछिन्न झाली. निदान फार दुरावली. असो. बहुसंख्य हिंदूंना आपले सामाजिक हित कशात आहे ते इतरांप्रमाणे जेव्हा उजाडेल तो सुदिन.''** संन्यास आश्रमाच्या उंबरठ्यावर उभ्या एका कृतार्थ-धन्य अशा पुरुषार्थी चिंतकाला खर तर कोणत्याच गोष्टीचे सुखदुःख होण्याचे कारण नव्हते, पण अप्पांना झालेले दुःख व्यक्तिगत नव्हते, तो त्यांचा **देशभक्तीच्या** खोलवर रुजलेल्या भावनेचा सहज उद्‌गार होता. यावरूनच त्यांची देशभक्ती श्रेष्ठ प्रतीची व किती उत्कट होती हे दिसून येते. (वरील घटना व प्रसंगातील व्यक्तींची नावे महत्त्वाची नाहीत. ती केवळ घटना-प्रसंगाची विश्वसनीयता सिद्ध व्हावी म्हणून उद्‌धृत केलेली आहेत.)

### अप्पांची कृतीरुप राष्ट्रभक्ती

आपल्याकडे विचारापेक्षाही कृतीला विशेष स्थान दिलेले आहे. त्यामुळे **बोले तैसा चाले, त्याची वंदावी पाऊले।** असे म्हटले जाते. तसेच **'आचार-प्रभवो धर्मः', 'आचारः परमो धर्मः।'** असेही म्हटलेले आहे. पू.अप्पा निष्क्रिय चिंतक नव्हते तर कृतिशील-सक्रिय मार्गदर्शक -सांगाती होते. त्यांच्या उक्तीत आणि कृतीत एकरूपता होती. देशात रामजन्मभूमीमुक्तीचे आंदोलन सुरु झाले, तेव्हा त्याच्या विविध टप्प्यावर - विविध प्रकारे पू.अप्पांनी सक्रिय भाग घेतला होता. मग ते संत संमेलन असो, रामभक्तांचे मेळावे असोत, जनजागरण यात्रा असो, वा घंटानाद असो.

नांदेड जिल्ह्यातील 'भोकर' येथे श्रीराम पादुका पूजन यात्रेस स्वतः अप्पा उपस्थित होते, नव्हे अप्पांच्या प्रेरणेनेच हा कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता. दि. ६ डिसेंबर १९९२ रोजी देशभर दुपारी १२वा.

घंटानाद करण्याचे आवाहन सर्वांना करण्यात आले होते. पू. अप्पा संन्यास घेतल्यानंतर गोरट्यास आलेले होते. यावेळी त्यांनी वयाची सत्तरी ओलांडलेली होती. तरीही अप्पांनी प्रखर राष्ट्रभक्ती स्वभावामुळे या घंटानादामध्ये सक्रिय भाग घेतला. गोरट्याचे मंदिर व परिसर घंटानादाने निनादून टाकला. रामनामाचा जयजयकार केला.

अप्पांच्या राष्ट्रभक्तीचे आणखी एका प्रसंगाने जे दर्शन घडते ते राष्ट्रकार्यार्थ कार्यरत लोकांना उदार मनाने अर्थसहाय्य करणाऱ्या दात्या अप्पांचे. पुण्यामध्ये एका भक्ताकडे पू. अप्पांचे आणि देशकार्यार्थ झिजणाऱ्या एका थोर धार्मिक व्यक्तीचे संयुक्त संतपूजन करण्यात आले. पूजनाच्या विधीनंतर त्या भक्ताने दोघा संतांना त्यांच्या सत्कार्यार्थ काही दानदक्षिणा द्यायची या भावनेने बंद पाकीटात घालून मोठी रक्कम दिली. पू.अप्पांनी शाल, श्रीफळ आदी वस्तूंचा स्वीकार केला व रकमेचे पाकीट त्यांच्या समवेत ज्या दुसऱ्या सत्पुरुषाचा सत्कार झाला त्यांनाच दिले. अप्पा म्हणाले मला माझ्या कार्यासाठी धनाची गरज नाही. हे सत्पुरुष जे महान राष्ट्रकार्य करीत आहेत त्यांना मात्र त्या कार्यासाठी खूप मोठ्या धनाची गरज आहे. या पाकिटाची खरी गरज त्यांच्या कार्याला आहे. पू.अप्पांचे देशकार्यार्थ मदत दिल्याचे हे केवळ एक प्रातिनिधिक उदाहरण आहे. आपण कोणाला केलेल्या मदतीचा अप्पा कधीही स्वतः उच्चार करीत नसत, हा सुद्धा त्यांच्या राष्ट्रभक्तीचाच एक वेगळा पैलू आहे.

संस्कृतभाषा, राष्ट्रीय शिक्षण, भारतीय विद्या आणि कला याचे अप्पा प्रखर अभिमानी होते. राष्ट्रभावनेच्या स्वाभिमानातूच त्यांना संस्कृतभाषा शिकून तीवर प्रभुत्व मिळविण्याची विद्यार्थीदशेत पू.दादांकडून प्रेरणा प्राप्त झालेली होती. पू.दादांना संस्कृत येत नव्हते त्यामुळे झालेली गैरसोय अप्पा ऐकून होते. संस्कृत ही भारतीय बहुतेक भाषांची जननी मानली जाते. पू.अप्पांचा मेकॉले शिक्षण पद्धतीला तीव्र विरोध होता तो राष्ट्रभक्तीपोटी. इंग्रज गेले तरी आपण आजही गुलामांसारखेच वागतो त्याचे कारण मेकॉलेंनी देशावर लादलेली इंग्रजी शिक्षण पद्धती, असे अप्पांचे निदान होते. भारतीय चिंतन, शिक्षण, विचार, वेशभूषा, भाषा यांना इंग्रजांनी नियोजनपूर्वक नष्ट केले व भारतीयांना इंग्रजी शिक्षणाद्वारे कायमचेच गुलाम करून टाकले आहे. त्यामुळे स्वाभिमानाने आपले स्वत्व जतन केले पाहिजे यासाठी अप्पा सदा-सर्वदा जनजागृतीच्या कार्यातच व्यस्त असत. इंग्रजांनी भारताला एक केले व राष्ट्रभावनेचा परिचय करून दिला या तथाकथित बुद्धिवादी लोकांच्या प्रतिपादनाला अप्पांचा साधार विरोध होता. 'आपली राष्ट्रभावना वेदकालापासून अक्षुण्ण आहे. **'माता भूमिः पुत्रोऽहं पृथिव्या:'** हे अथर्ववेदातील वचन आणि आमच्या नित्यनैमित्तिक धार्मिक कार्यातील **संकल्पाचे मंत्र** व **मंत्रपुष्पांजली** हे आमच्या राष्ट्रभावनेचे द्योतक आहे. आजही नेपाळमध्ये सुद्धा धार्मिक कार्याचा संकल्प करताना 'अस्मिन राष्ट्रे भरतखंडे जंबूद्वीपे...' असाच केला जातो, असे सांगून पू.अप्पा इंग्रजधार्जिण्या विचारवंतांना (?) निरुत्तर करीत असत. असो. पू. अप्पांची राष्ट्रभक्ती हा विषय एका स्वतंत्र ग्रंथाचा मोठा विषय आहे. त्याबद्दल या मर्यादित स्वरूपाच्या लेखात जेव्हढे शक्य आहे त्या त्या गोष्टींचा समावेश करण्याचा प्रयत्न केलेला आहे. तरीही अनेक उल्लेख राहून जाणार आहेत. 'न्यून ते पुरते ।' करुनि घ्यावे, ही प्रार्थना करून पू.अप्पांच्याच एका उताऱ्याने या लेखाची सांगता करतो.

उत्तरकाशी येथे संन्यासविधी पूर्ण झाल्यानंतर पू.अप्पांनी म्हणजेच स्वामी वरदानंद भारती यांनी व्यक्त केलेले मनोगत आता ग्रंथबद्ध झालेले आहे. त्यात त्यांनी आज माझ्या जीवनाचे साफल्य झाले, पू.दादांच्या सर्व इच्छा मी पूर्ण केल्या अशी कृतार्थता व्यक्त केली पण ती कृतार्थता व्यक्तिगत जीवनाविषयीची होती. यावेळी सुद्धा त्यांनी देशाची स्थिती हिंदू समाजाची अवस्था याविषयी चिंता व्यक्त केली. स्वामीजी (पू.अप्पा) पुढे म्हणाले "....**ऐकल्याप्रमाणे वागावे वाटेल तेव्हाच देश बदलेल. मी देशासाठी काय करतो याचे प्रत्येकाने गणित मांडावे. आपला देश निसर्गसंपत्तीने एवढा संपन्न, आपले तत्त्वज्ञान एवढ्या उच्च कोटीचे आहे मग आम्ही असे विपन्न का? 'बोले तैसा चाले' असे वागल्याशिवाय देशाचा उद्धार होणार नाही.**"

**किंबहुना तुमचे केले । धर्मकीर्तन हे सिद्धी गेले ।**
**येथ जी माझे उरले । पाईकपण ।।**

**विद्याधर मा. ताठे**
निवास : ओंकार अपार्टमेंट, ७३५/१४, पोस्टाजवळ,
धनकवडी, पुणे ४४ भ्रमणध्वनी - ९८८१९०९७७५,
Email: vidyadhartathe@gmail.com



# जीवनविद्यापीठाचे प्राचार्य स्वामी वरदानंद भारती

**श्री. दिलीप करंबेळकर**
प्रबंध संपादक साप्ताहिक 'विवेक', मुंबई तरूण भारत

जीवन कसे जगायचे ? हा कोणत्याही माणसापुढे पडलेला मूलभूत प्रश्न असतो. माणसांच्या क्षमतेनुसार त्याची उत्तरे बदलत असतात. सर्वसाधारण व्यक्तींना फक्त मार्गदर्शनाची आवश्यकता असते. असे मार्गदर्शन करणाऱ्या व्यक्ती ते शोधत असतात. या उलट बुद्धिमान व विचारी माणसे आपल्या अनुभवांची संगती लावून ती उत्तरे शोधण्याचा प्रयत्न करीत असतात. ही संगती कशी लावायची ? या प्रश्नांची उत्तरे त्यांना हवी असतात. या दोन्हीच्या मध्ये अनेक वेगवेगळ्या स्तरांवर अनेक माणसे उभी असतात. या सर्वांना त्यांच्या त्यांच्या स्तरावर जाऊन जीवनाचा अर्थ समजावून सांगणारा भाष्यकार हवा असतो. जन्मलेल्या प्रत्येक व्यक्तीला जीवनविद्यापीठातील या परीक्षेला बसावेच लागते. त्यामुळे प्रत्येक व्यक्ती आपल्यासाठी भाष्यकार शोधत असते. परंतु असे भाष्यकार होण्याची क्षमता फार कमी व्यक्तींमध्ये असते. कारण यासाठी जीवनाचा अर्थ लावण्याइतका अभ्यास व अनुभव तर लागतोच, त्याहीपेक्षा या अभ्यासाच्या व अनुभवाच्या आधारावर आपल्या जीवनाकडे तटस्थतेने पहाण्याची वृत्ती लागते व अशी वृत्ती येण्यासाठी संन्यस्त मन:स्थिती लागते. यासोबतच ज्या काही निवडक व्यक्तींपाशी नेतृत्वगुण असतात, ते अशा भाष्यकारांचे भाष्यकार बनतात. त्यांना जीवनविद्यापीठाचे प्राचार्य म्हणता येईल अशी योग्यता त्यांनी मिळविलेली असते. स्वामी वरदानंद भारती असेच एक जीवनविद्यापीठाचे प्राचार्य होते.

हिंदू धर्माने व्यक्तीच्या जीवनाचा सर्वांगाने मूलभूत अभ्यास केला आहे. मानवी प्रवृत्ती, त्याच्या ऐहिक व पारमार्थिक गरजा, समाज म्हणून राहण्याकरिता त्याच्यावर करावे लागणारे संस्कार या सर्वांचा विचार करून असंख्य ऋषिमुनींनी आपल्या जीवनातील अनुभवांच्या आधारे अनेक जीवनदर्शने समाजासमोर उभी केली. ही जीवनदर्शने म्हणजे केवळ शुष्क वैचारिक चर्चा नव्हती, तर त्यास जीवनविषयक अनुभवाचा व अनुभूतीचा आधार होता. या अनुभवातून व अनुभूतीतून हजारो वर्षांपासून पिढ्यामागून पिढ्यांनी या जीवनरसाचा वारसा केवळ कायमच ठेवला नाही, तर त्यात आपली भर टाकून तो अधिक समर्थ केला. परंपरेचा हा वारसा म्हणजे केवळ कर्मकांडे नव्हेत, तर ते पिढ्यानपिढ्याचे अनुभवसंचित असते. या अनुभवसंचिताच्या परंपरेकडे विनम्रपणे पाहून, त्यातील जीवनरसाचे अमृतपान करून, तो वारसा पुढील पिढीकडे देण्याचे काम आपल्या जीवनात ज्यांनी केले, त्यांची जीवने कृतार्थ झाली असे आपली संस्कृती मानते. केवळ तत्त्वज्ञानावर नव्हे, तर असे तत्त्वज्ञान प्रत्यक्षात जगणाऱ्या ऋषितुल्य व्यक्तिमत्त्वांमुळे हजारो वर्षांनंतरही हिंदू संस्कृतीचा जिवंतपणा व नवनिर्मितिक्षमता टिकून आहे. हिंदू संस्कृतीचा हा आशय अनुभवल्या-शिवाय अनंतराव आठवले यांच्या जीवनाच्या महत्त्वाचे पुरेपूर आकलन होणार नाही.

हिंदू संस्कृतीने प्रवाहित केलेल्या व हजारो वर्षांच्या परंपरेने प्रगल्भ बनलेल्या या आंतरिक चैतन्याची अनुभूती येण्यासाठी माणसाला दिव्यत्वाचा स्पर्श व्हावा लागतो. माणूस जेवढा बुद्धिमान, तेवढा तो आपल्या अहंकारभावाने एकाकी असतो. अनंतरावांच्या जीवनाला झालेला दासगणू महाराजांचा स्पर्श हा असाच महत्त्वपूर्ण होता. वसुधा देशपांडे यांनी 'तेजोनिधी' या नावे अनंतरावांचे जे चरित्र लिहिले आहे, त्यात अनंतरावांच्या जीवनात जे आंतरिक परिवर्तन झाले, त्याचे वर्णन दिलेले आहे. एकेकाळी पूर्णपणे नास्तिक असलेल्या, परंपरेच्या संबंधात आजच्या परिभाषेत सांगायचे तर विद्रोही भूमिका घेणाऱ्या अनंतरावांच्या वैचारिक भूमिकेत जे क्रांतिकारी परिवर्तन झाले, त्याची माहिती देताना वसुधा देशपांडे लिहितात,

'सनातनी दादा आणि सुधारक विचारांचा अनंत अशा दोघांच्या वादविवादात अनंत वीस-बावीस वर्षांचा होईपर्यंत कधी खंड पडला नाही. या वयापर्यंत अनंत पूर्ण नास्तिक होता. केवळ दादांच्या प्रेमाखातर तो घरातल्या धर्मकृत्यात भाग घेई. दादांशी वाद करीत असताना तो निरनिराळ्या ग्रंथांतील पुराव्यांचा, सुभाषितांचा ढीग रचत असे. मग दादाही निरुपायाने वाकड्यात शिरून शिव्यांचा भडिमार करीत. याचा अनंताला फार राग येई. मग हसून ते म्हणत, ''बाळ, मी तुझ्याइतके वाचलेले नाही. तेव्हा तुझे म्हणणे मला पुराव्यानिशी खोडता येणार नाही. पण माझे मत सत्यावर आधारलेले आहे, अशी माझी दृढ श्रद्धा आहे. अनंता, तू शहाणा आहेस. पण एकाच गोष्टीचा विचार कर. मी ज्या गोष्टी चांगल्या म्हणतो त्या गेल्या हजारो वर्षात, शतकानुशतके लोकांनी चांगल्या म्हणून मान्य केल्या आहेत. तुझे मात्र उलटे आहे. अरे, या इतक्या दीर्घकाळात कुणी बुद्धिमान, विचारवंत जन्मालाच आला नाही का! बुद्धी काय ती मलाच मिळाली आहे, माझ्या आधीचे, माझ्यापेक्षा वेगळे मत स्वीकारणारे सगळेच लोक मूर्ख होते असे मानणे अहंकाराचे, उर्मटपणाचे लक्षण आहे, अशा भावनेने विचार करशील तर परंपरेने

स्वीकारलेली मतेच योग्य असल्याचे पुरावे तुला तुझ्या वाचनातून मिळू शकतील.''

दादांच्या शब्दातील कळकळीने अनंतरावांच्या मनात विचारमंथन सुरू झाले व त्या विचारमंथनाचा परिणाम म्हणजे त्यांच्या विचारांची दिशा बदलली. ते अशा निष्कर्षाला आले,

'सिद्धान्ताच्या दृष्टीने परंपराविरोधी मते फसवी आणि पक्षपाती आहेत. भारतीय संस्कृतीने स्वीकारलेले तात्त्विक सिद्धांत आणि सामाजिक आचारपद्धती इतर कोणत्याही समाजरचनेपेक्षा अधिक चांगली आहे. तिच्यातील दोष इतरांपेक्षा अल्प आहेत. चुका घडल्या असतील तर त्या तत्त्वज्ञानाच्या अपूर्णतेमुळे घडलेल्या नसून व्यक्तीच्या अविवेकामुळे घडलेल्या आहेत. दीर्घकालीन पारतंत्र्याचा परिणाम म्हणूनही काही दोष निर्माण झाले आहेत.'

हे वर्णन वाचल्यावर श्रीरामकृष्ण परमहंस व विवेकानंद यांच्यातील संवादाच्या आठवणी जाग्या होतात.

आपल्या चिंतनातून अनंतरावांनी तीन गोष्टी स्पष्ट केल्या आहेत. भारतीय संस्कृतीने स्वीकारलेले सिद्धान्त जगातील अन्य सिद्धान्तापेक्षा कमी दोषपूर्ण आहेत, ही पहिली. घडलेल्या चुका व्यक्तीच्या अविवेकामुळे घडलेल्या आहेत आणि काही दोष दीर्घकालीन पारतंत्र्याचा परिणाम म्हणून आले आहेत.

राजकीय, सामाजिक व कायद्याद्वारे मिळालेली समानता हे आधुनिक समाजव्यवस्थेचे महत्त्वपूर्ण मूल्य आहे, ही पाश्चात्त्य संस्कृतीची सर्वात मौलिक देणगी आहे. पण तिथेही या समानतेचा प्रत्यय येत नाही, कारण निखळ बौद्धिक तत्त्वज्ञानातून व त्यातून निर्माण झालेल्या व्यवस्थेतून मनाच्या षड्रिपूंवर मात करील असा आंतरिक जिव्हाळा तयार होत नाही. त्यासाठी मानवी मनाचा आध्यात्मिक विकास होणे आवश्यक आहे व त्या विकासाच्या प्रकाशात व्यक्तीचे विचारदर्शन उजळून निघाले पाहिजे. आध्यात्मिक विकास न होणे हे अविवेकाचे कारण आहे. इस्लामी राजवटीमुळे निर्माण झालेली जीवनविषयक असुरक्षितता व ब्रिटिश राजवटीचा परिणाम म्हणून तयार झालेला बौद्धिक न्यूनगंड यामुळे भारताची आध्यात्मिक विकासाची परंपरा खंडित झाली. तिचा प्रवाह पुन्हा एकदा जोमदार करणे व आधुनिक ज्ञानाच्या प्रकाशात ती पुन्हा उजळून काढणे, हे आप्पांच्या जीवनाचे अधिष्ठान होते. त्यांनी घेतलेल्या संन्यासाकडे या दृष्टीने पाहिले पाहिजे. त्यांचा संन्यास हा आद्य शंकराचार्यप्रणित संन्यासधर्म व लो. टिळकप्रणीत कर्मयोग यांचा समन्वय होता.

भारत महासत्ता होणार का? ही चर्चा आता कमी झाली असली तरी लोकसभा निवडणुकीनंतर तिच्यात पुन्हा रंग भरू शकतो. केवळ आयटी, उद्योग, आर्थिक विकास याद्वारे ती होणार नाही. झाली तरी अमेरिका किंवा चीन यांच्याप्रमाणे ती शोषक किंवा आक्रमक बनेल. तशी ती न बनता जगाला आश्वासक अशी आधारशक्ती बनायची असेल, तर स्वामी वरदानंद भारती ज्या जीवनविद्यापीठाचे प्राचार्य होते, त्या विद्यापीठाच्या अभ्यासक्रमाच्या आधारेच ती बनविता येईल.

**श्री. दिलीप करंबेळकर**
सी-७०४, मीना टॉवर्स, स्वस्तिक पार्क,
चेंबूर, मुंबई ४०००७१. मो. ९५९४९६९६३१

• • •



# गुरुवर्य अनंतराव आठवले यांचे सामाजिक व राजकीय विचार

**श्री. वा. ना. उत्पात (भागवताचार्य)**

श्रीज्ञानेश्वरी लेखक, श्री सच्चिदानंदबाबा यांचे १६ वे वंशज, ५६ वर्षे ज्ञानेश्वरी व इतर ग्रंथावर प्रवचने व कीर्तने. ३३ वर्षे सहकार खात्यात नोकरी करून निवृत्ती, सोलापूर येथे श्रीज्ञानेश्वर, तुकाराम महाराज मंदिर, श्री संत साहित्यसेवा संघ, सोलापूर

(कै. अनंतराव आठवले तथा स्वामी वरदानंद भारती यांचा उल्लेख लेखात अप्पा या नावाने केला आहे.)

अप्पा आयुर्वेद महाविद्यालयाचे प्राचार्य होते. आयुर्वेद हे पूर्ण विज्ञान आहे. त्यामुळे ते विज्ञान मानणारे होते. त्यांचे सामाजिक विचार व राजकीय विचार लोकमान्य टिळकांच्या विचारांशी जुळणारे आहेत. नागपूरच्या 'प्रज्ञालोक' कालिकाचे भूतपूर्व संपादक व महान पंडित अप्रबुद्ध यांच्या काही विचारांचा त्यांच्यावर प्रभाव होता. प्राचीन भारतीय शास्त्रांनी जो सनातन म्हणजे नित्यनूतन विचार सांगितला, तोच त्यांनी आधुनिक विज्ञानाच्या आधारे प्रतिपादला.

इंग्रजी राजवटीने संभ्रमित झालेल्या साऱ्या समाजसुधारकांनी जे तथाकथित पुरोगामी विचार मांडले ते इंग्रजी वळणाचे होते. अप्पा म्हणत, ''समाज सुधारकांनी आपल्या बुद्धीची सुरी शल्यविशारदा-सारखी वापरायला पाहिजे होती. ती त्यांनी खाटकाच्या सुरीसारखी वापरली.'' मार्क्स, एंगल्स यांच्या विचारांना मानणे म्हणजे पुरोगामी व व्यास, वाल्मिकी, शंकराचार्य यांना मानणे म्हणजे प्रतिगामी हे चूक आहे. जे नवे असते ते चांगलेच असते असे नाही किंवा जे जुने आहे ते सर्व वाईट आहे, असेही नाही. समाजहिताच्या दृष्टीने जे चांगले ते चांगले, जे वाईट ते वाईट असे ठरविले पाहिजे.

जातीव्यवस्थासुद्धा पूर्ण शास्त्रीय आहे. त्यात आनुवांशिकतेचे तत्त्व आहे. पिढ्यान्‌पिढ्या एखादे काम केल्याने त्यातील कौशल्य वाढत जाते. त्यामुळे कारागीर घरच्या घरी फुकट शिक्षण मिळाल्याने कुशल होतो. जातीव्यवस्थेत कोणी बेकार राहात नाही. प्रत्येकाला त्याच्या पिढीजात व्यवसायाची हमी असते. घरच्या घरी अभियांत्रिकी, स्थापत्य शिक्षण मिळालेल्या कारागिरांनी वेरुळची लेणी, हजारो मंदिरे, पूल, गड, कोट बांधले. ते शेकडो वर्षे टिकले आहेत. आजच्या स्थापत्य महाविद्यालयातून शिकलेल्या लोकांना हे बांधता येतील का? हजारो वर्षे न गंजलेला लोहस्तंभ लोहार जातीतील कारागिरांनी तयार केला आहे. जातीव्यवस्थेतील कारागीरांनीच देशातील सुंदर शिल्पे घडविली. जातीव्यवस्था वाईट नाही. जातीभेद वाईट आहेत. एका जातीने स्वत:ला उच्च मानणे, दुसऱ्याला नीच मानणे हे वाईट आहे. स्वातंत्र्य मिळून ६६ वर्षे झाली. जातीव्यवस्था संपली का? राजकीय पक्षामुळे व जातीप्रमाणे आरक्षण दिल्याने जाती घट्ट होत आहेत. प्रत्येक राज्यात एकेका जातीचे राज्य आले आहे. म्हणून लग्नात जात पाहा, राजकारणात समाजकारणात जात पाहू नका, पण आपण बरोबर उलटे केले.

सामाजिक विचारात समतेचे फारच प्रस्थ माजले आहे. पण निसर्गात समता आहे का? एकाच आई-बापाच्या पोटी जन्मलेली मुले रूप, गुण, बुद्धी यात समान आहेत का? माणसात, निसर्गात, प्राण्यात विविधता आहे. विषमता नाही. विषमतेच्या नावाखाली विविधता नष्ट करण्याचा समाजसुधारकांनी प्रयत्न केला. एकता पाहिजे, एकरूपता नको Unity Uniformity यातील फरक कळला पाहिजे.

प. पू. अप्पा म्हणतात, ''आपण नेहमी काळाप्रमाणे बदलले पाहिजे'' ही विसंगती आहे. बदल नेहमीच चांगला असतो असे नाही. निसर्गाचे नियम बदलले का? चूल जाऊन गॅस आला म्हणून कोणी तांदळाऐवजी वाळू शिजवितो का? कपडे बदलले पण आतले शरीर बदलले का? परिवर्तन म्हणजे प्रगती आहे का? शारीरिक पातळी, मानसिकता, बौद्धिकता, नातेसंबंध, कुटुंब व्यवस्था यात बदल होत नाही. सामाजिक जीवनाची अपेक्षा नीतिमूल्ये अथवा शिष्टाचार यात बदल घडत नाही. माणसाने माणसाशी माणसासारखेच वागावे हीच अपेक्षा कायम असते.

स्त्रीमुक्ती चळवळीला दिलेले वळण अप्पांना खेदजनक वाटत असे. आजही स्त्री असुरक्षित आहे. म्हणून तिला संरक्षणाशिवाय ठेवू नये, हा 'न स्त्री स्वातंत्र्यं अर्हति' या वचनाचा अर्थ आहे. आम्ही तो विपरीत केला. स्त्रीचा स्त्री म्हणून विकास झाला पाहिजे, तिचा पुरुष होता कामा नये. मातृत्व हे श्रेष्ठ व मंगल आहे. स्त्रिया शिकल्या पाहिजेत पण त्यांचे शिक्षण त्यांच्यातील स्त्रीत्वाचा विकास करणारे पाहिजे. ज्या संस्कृतीने गार्गी, मैत्रेयी, सुलभा या सारख्या ब्रह्मवादिनी, जिजाबाई, अहल्याबाई, झाशीची राणी लक्ष्मी यांच्या सारख्या शूर स्त्रिया निर्माण केल्या, त्या संस्कृतीने स्त्रीवर सतत अन्यायच केला हे म्हणणे अयोग्य आहे.

ज्या जुन्या रुढी परंपरा, चालीरीती मानवी हिताच्या आहेत, संस्कार करणाऱ्या आहेत, उच्च नैतिक मूल्ये शिकविणाऱ्या आहेत, त्या चालल्या पाहिजेत. 'जुने जाऊ द्या मरणा लागुनी' हे योग्य नाही. आपण जुने सोडले व आपल्याला नवीन सापडले नाही, निर्माण केले नाही. कोणतीही जुनी रूढी, परंपरा मोडताना त्या मागचे विज्ञान समजावून

घ्या. जुने ते सर्व सोने हे जसे खरे नाही, तसे नवे ते सर्व चांगले हेही खरे नाही. विचार व मानवी हित यांच्या निकषावर उतरले तरच ते ग्राह्य. सत्य सुद्धा मानवी हितासाठी असेल तर बोलावे. 'यद् भूतहितमत्यन्तं तत् सत्यं' ज्यात प्राणीमात्राचे आत्यंतिक हित आहे, तेच सत्य.

अप्पांच्या सामाजिक विचारात संघर्ष नाही तर समन्वय आहे. आणि आपल्या वैदिक परंपरेत तो योग्य साधला आहे, अशी त्यांची निश्चित धारणा आहे. अनिष्ट चाली, खुळचटपणा, ढोंग यावर त्यांनी कीर्तनातून कठोर प्रहार केले. पण त्यातील जे चांगले आहे ते विज्ञानाच्या आधारे त्यांनी विशद केले. त्यांनी जन्मभर भारतीय मूल्यांची बाजू मांडली. आक्षेपकांना सडेतोड उत्तरे दिली. कोण किती मोठा याची पर्वा केली नाही.

**पूजनीय अप्पांचे राजकीय विचार**

अप्पांच्या राजकीय विचारावर लोकमान्य टिळक व स्वातंत्र्यवीर सावरकर यांचा प्रभाव आहे. अप्पा कट्टर हिंदुत्ववादी होते, पण त्यांची हिंदुत्वाची कल्पना सावरकरांपेक्षा, टिळकांच्या कल्पनेच्या जवळची आहे. हिंदुत्व हे हिंदूधर्म सोडून कसे असेल? असा त्यांचा प्रश्न आहे. सावरकरांच्या हिंदुत्वाच्या व्याख्येत 'पुण्यभूमी' शब्दाने हिंदू धर्माचाच बोध होतो.

पू. अप्पा म्हणत, म. गांधींचे सामाजिक धोरण अत्यंत कल्याणकारी होते. विकेंद्रित राज्य व्यवस्था, स्वयंपूर्ण खेडी, साधी राहणी, ग्रामोद्योग, भारतीय विचार या सर्व गांधीवादातील चांगल्या गोष्टी होत्या.

सध्या लोकशाही, स्वातंत्र्य याचे ढोल पिटले जात आहेत. अप्पा म्हणतात, लोकशाही ही काही सर्वोत्कृष्ट राज्यव्यवस्था नाही. लोकशाही आपल्या देशाला नवीन नाही. पूर्वी गणराज्ये होतीच, पण ती परकीय आक्रमणापुढे टिकली नाहीत. म्हणून राजेशाही आली. महाभारतात अशा लोकशाहीचे वर्णन आहे.

त्यांचे सुयोग्य राष्ट्रजीवनाविषयीचे मत असे होते की नेते अधिक व अनुयायी कमी अशी स्थिती झाली तर त्या राष्ट्राच्या ऱ्हासास अधिक काळ लागत नाही.

अप्पांच्या मते साम्यवाद, समाजवाद, भांडवलशाही हे सारे विचार कालबाह्य झाले आहेत. इंग्लंड, अमेरिकेची भांडवलशाही मानवाचे कल्याण करू शकत नाही. त्यात जीवघेणी स्पर्धा, वाढती महागाई, नैतिक अध:पतन आहे. रशिया व चीनचा साम्यवाद अपुरा व राक्षसी अत्याचार करणारा आहे. जगात मुस्लीम राष्ट्रे धर्मावर, साम्यवाद अर्थावर, भांडवलशाही कामावर आधारलेली आहे. आम्हाला धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चतुर्विध पुरुषार्थावर आधारलेली राज्यव्यवस्था पाहिजे आहे. मग ती लोकशाही असो वा राजेशाही असो. राज्यव्यवस्था कोणतीही असो. ती लोककल्याणाची असली पाहिजे. राज्य व्यवस्था महत्त्वाची नाही. त्यामागची जनकल्याणाची प्रेरणा महत्त्वाची आहे. राम, कृष्ण, युधिष्ठिर, चंद्रगुप्त, समुद्रगुप्त, शालिवाहन, शिवाजी यांची राज्ये राजेशाही होती, पण जनतेचे कल्याण करणारी होती. म्हणून ती लोकशाहीपेक्षा श्रेष्ठ होती. प. पू. अप्पा म्हणत, लोकशाही व्यवस्था ही प्रशस्त पायावर आधारित आहे. परंतु लोकशाही व्यवस्थेत लोकांचे कल्याण होत नसेल, भ्रष्टाचार बोकाळला असेल, अयोग्य माणसे सत्तेवर असतील तर त्या लोकशाही राज्याला काय अर्थ आहे?

ते पुढे असेही म्हणत, भारतीय लोकशाही मतप्रधान आहे. जागरूक मतदारांचे मतपेटी हे महत्त्वाचे हत्यार आहे. त्याचा उपयोग सुजाण नागरिकांनी अत्यंत सावधपणे केला पाहिजे. देशाला स्वातंत्र्य मिळाले, पण सुराज्य स्थापन झाले नाही याची पू. अप्पांना खंत वाटत असे. ते म्हणत परकीय कर्ज, तंत्रज्ञान, व्यवस्थापन, परकीयांच्या लाभाच्या योजना स्वीकारून या देशात सुराज्य येणार नाही. या देशातील तरुण त्यांच्या प्रज्ञेतून, संशोधनातून ध्येय धोरणातून या राष्ट्राला निश्चित प्रगतीपथावर नेऊ शकतो. छोट्या छोट्या योजना सहकारी तत्त्वावर राबवून सर्व समाजाचे कल्याण आपण साधू शकतो.

इस्राईलचे उदाहरण देऊन पू. अप्पा नेहमी म्हणत की, देशाची. भाषा, देशाचे प्रेम आणि देशाची भूमी कितीही संकटात असली तरी देशवासियांच्या अंत:करणात ज्वलंत राष्ट्रभक्ती जीती जागती असेल तर देश पुन्हा बेचिराख अवस्थेतून समृद्धीकडे येऊ शकतो. युरोपमध्ये छोटे छोटे देश आहेत. आपली भाषा टिकवून आहेत. प्रगत आहेत. जपानसारखा देशही स्वभाषेच्या बळावर जगात देदिप्यमान यश प्राप्त करीत आहे. मग आमच्या खंडप्राय देशाला एक राष्ट्रभाषा, प्राचीन संस्कृत भाषा का समृद्धीला नेता येत नाही? परकीय भाषेचा का आधार घ्यावा लागतो? यासाठी आम्हाला आत्मपरीक्षणाची आवश्यकता आहे.

या देशातील निधर्म राज्य व्यवस्था सर्व धर्म, संप्रदाय यांच्याकरिता कशी कल्याणकारी होईल हे पाहणे आवश्यक आहे. त्यामध्ये कोणत्याही धर्म वा पंथावर अन्याय होणार नाही हे सावधपणे पाहिले पाहिजे. भारतीय तत्त्वज्ञानातील प्रशस्त मानवतावाद ज्या अद्वैत भूमिकेतून मांडला आहे, त्यातील मूल्यांच्या आधारे जर भारतीय निधर्मी राज्य व्यवस्था वाटचाल करील तर जगाला एक आदर्शभूत राष्ट्र ठरेल.

अप्पांचे सामाजिक व राजकीय विचार भारतीय संस्कृतीच्या शाश्वत मूल्यावर आधारलेले आहेत. ऋषी, मुनी, टिळक, योगी अरविंद, पू. गोळवलकर गुरुजी यांच्याप्रमाणे त्यांनी आपले उत्कृष्ट देशभक्तीपूर्ण जीवन राष्ट्राला समर्पण केले. सावरकरांचे जहाल हिंदुत्व, काव्य, तेजस्वी विचार, पुरुषार्थ यांचे ते भक्त आहेत. समर्थ रामदास हे त्यांचे दैवत आहे. चार वर्ण, चार आश्रम, चार पुरुषार्थ या खांबावर त्यांच्या विचारांचे मंदिर उभे आहे. त्यांच्या अंत:करणात ज्ञानेश्वर, बुद्धीत शंकराचार्य, फटकळपणात तुकाराम, प्रचारात समर्थ व वक्तृत्वात सावरकर असा अनेक गुणांचा मनोहर संगम झालेला होता.

**श्री. वा. ना उत्पात (भागवताचार्य)**
राधानारायण मंदिराचे पश्चिम द्वार,
पंढरपूर, जि. सोलापूर.
भ्र. ९४२२६४७५०७





# दिव्य अनुभूतीची आदर्श वाटचाल

**डॉ. श्री. ग. प्र. परांजपे**

एम. ए., बी. एड., पीएच. डी. (संत दासगणू वाड्मयांत अभ्यास) न्यू इंग्लिश स्कूल येथे उपप्रमुख म्हणून ३२ वर्षे सेवा. विपुल लेखन. मुख्यत: संत व त्यांचे वाड्मय आणि धार्मिक विषय. श्रीकृष्ण कथामृतातील संस्कृत वंदनांचे मराठी रूपांतर.

पू. अप्पांना दिव्य अनुभूती मिळाली. - ईश्वर साक्षात्कार झाला याचा अप्पांनीच स्वत: उल्लेख केला आहे. 'धावली हो पावली हो ही विठाई माऊली।' किंवा 'झाले सार्थक पावलास हरि तू आनंदले जीवन।' माऊलींनीही 'देखिला देखिला माय देवाचाही देव' असे धन्योद्गार काढलेले आहेत. अशा त्या दिव्य अनुभूतीविषयी या निबंधामध्ये मला विचार करायचा आहे. कोणालाही सहज पटेल की हा विषय अतिशय अवघड आहे आणि विशद करू इच्छिणारा मात्र अगदीच अनघड! तथापि जाणकारांनी आज्ञा केली आहे - आता 'आज्ञा कैसी मोडू, यास्तव धजलो, मद हा नोहे' हे विचक्षणांनी जाणून क्षमाशील व्हावे!

'त्वदीय वस्तु गोविंद...' या न्यायाने त्यांच्याच 'भावार्चने'तून शोध घेत घेत लिहिण्याचा प्रयत्न करणार आहे. ते साह्यभूत होतील यात संदेह नाही!

वेदांनाही हा विषय अनिर्वचनीय आहे. तेही 'नेति नेति' म्हणत बोलायचेच थांबले. पण परमार्थ प्रयोगाचे शास्त्र आहे. त्यामुळे अंतिम अनुभव जरी अनिर्वचनीय असला तरी तेथपर्यंत पोहोचण्यासाठी उमटलेल्या काही खुणा शब्दग्राह्य असतातच असे पू. गुरुवर्य सोनोपंत दांडेकर म्हणतात. त्यामुळे मलाही थोडा धीर मिळाला. या गूढ विषयाच्या अभ्यासात खरं तर प्रत्येक मानवाने प्रयत्नशील व्हावे अशीच ईश्वराचीही अपेक्षा आहे. म्हणूनच प्रारंभापासून सारेच अनिर्वचनीय असणार नाही, हे खरे असले तरी त्यासाठी ज्यांनी विशिष्ट मार्ग चोखाळला आणि त्याच दिशेने वाटचाल करीत यशस्वी झाले त्यांच्या त्या मार्गावरच्या पाऊलखुणा आपल्याला पहाता येतात. प्रयत्नशील अशा प्रत्येकाला त्या मार्गदर्शक ठरतात. प्रत्येकच मानवाचे हे कर्तव्य असल्यामुळे या लेख रूपाने मांडला जाणारा अभ्यास मलाही हिताचाच ठरेल असे म्हटले तर ते वावगे ठरणार नाही! अक्ष म्हणजे नेत्र पण सर्व इंद्रियांनाही तो लावता येतो असे परमार्थी अधिकारी सांगतात. अर्थात भगवान समोर आहेत आणि भक्त त्यांना पाहतो आहे - किंवा अनुभवतो आहे असा साक्षात्काराचा अर्थ! संतांनी आणि अप्पांनीही तो तसा पाहिला आहे, असे त्यांच्या कवितेतून स्पष्ट आहे. उपनिषद्कारांनी मन व बुद्धी दोन्हीही एकाच अर्थाने साक्षात्काराची साधने मानली आहेत. 'मनसा एवेदं आप्तव्यं - नेह नानास्ति किंचन' किंवा 'दृश्यते त्वग्र्या बुध्द्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभि:।' अशी वचने कठोपनिषदात (अ २/१/११ व १/३-१२) आलेली आहेत. साक्षात्काराच्या अवस्थेला पोचणारा मनुष्य परिणतप्रज्ञ किंवा ऋतंबरा प्रज्ञाप्राप्त असतो. अत्यंत श्रेष्ठ दर्जाची शांती त्याला लाभते. मग मिळवायचे असे काहीच उरत नाही. (गीता अ.६/२२) मात्र या परिणतप्रत स्थितीपर्यंत पोचण्यासाठी साधकाने जे सूत्र जीवनभर अवलंबिलेले असते ते पतंजली महामुनींनी असे दिले आहे. 'स तु दीर्घकालनैरंतर्यसत्कारासेवितो दृढभूमि:' याचा अर्थ अत्यंत कर्तव्यदक्षतेने, निश्चयाने, निग्रहाने, निष्ठेने, निरंतर (केव्हाही खंड पडू न देता) केलेली साधना! निष्ठेमध्ये प्रेम अनुस्यूत आहे. (निजनिष्ठे नाम घ्यावे - तुका.) असा हा साधक अनेक जन्मांनी एखाद्या जन्मात ते फल प्राप्त करतो. त्या दिव्य तेजाचे - ईश्वराचे दर्शन त्याला घडते - ती दिव्य अनुभूती त्याला मिळते आणि त्यामुळेच आनंद विभोर झालेले श्रीनिवृत्तिनाथ म्हणतात,

**'ते सुख काय सांगो। वाचे बोलता न ये।।'**

ईश्वराव्यतिरिक्त सर्व गोष्टी - मग त्या लौकिक पातळीवर कितीही चांगल्या-थोर असल्या तरी जीवनसाफल्याच्या दृष्टीने त्या व्यर्थ आहेत, म्हणून उपेक्षणीय आहेत ही भावना किंवा विवेक तीव्रतेने ज्याला करता येतो, त्याला साधतो, त्यालाच या मार्गात प्रगती करता येते.

**'कामक्रोधौ लोभमोहौ देहे तिष्ठन्ति तस्करा:।**

**ज्ञानरत्नापहाराय तस्मात् जाग्रहि जाग्रहि।।'** असा स्पष्ट निर्देश शास्त्रकारांनी मांडून साधकाला जागे केले आहे. संसार टाकायचा नसतो, सावधानपणे करण्याचा असतो. शास्त्रीय परिभाषेत यालाच नित्यानित्यवस्तुविवेक असे म्हटलेले आहे. (सदसद्विवेक)

या विवेकाची परिणती वैराग्यात होत आहे ना, याकडे साधकाने बारकाईने लक्ष ठेवावे हीच शास्त्राची अपेक्षा. कारण तेच वैराग्य साधकाच्या निश्चयाला अधिकाधिक कार्यक्षम करीत असते. चिंतन-मनन-निदिध्यास यामुळे ही प्रगती संभवनीय असते. ईशानुभूतीचा हा विषय कधीच असाध्य नसतो तर तो कष्टसाध्य असतो.

चिंतनाचा अप्पांचा एक दृष्टिकोन आहे. एके ठिकाणी ते म्हणतात,

**'नको ते वाटते पाहिजे। गोड वाटते अनिष्ट जे जे।**
**त्याच विषयाच्या चिंतनी राहिजे। निमग्न जीवे, सुखेच्छया।।**
**मृगजलापाठी धावणे। काम क्रोधा बळी पडणे।**
**उरी फुटून अंती मरणे। नाना योनी हिंडावया।।'**

सामान्य संसारी माणसाचे हे वर्णन रास्त आहे. पण हे कळले तर विवेक होणार! सदसद्विवेकाची आवश्यकता सांगताना ते एकदा म्हणाले, 'योग्य काय ते कळावे लागते. अयोग्य काय तेही कळावे लागते. मात्र अयोग्य टाकून योग्य स्वीकारावे लागते. या चार प्रक्रिया झाल्या की तो विवेक झाला. यातच मग सद् म्हणजे शाश्वत व असद् म्हणजे अशाश्वत याचा विचार अंतर्भूत असतो. शाश्वत फक्त ईश्वर बाकीचे सारे काही अशाश्वत. अगदी आपल्या देहासह! आणि नेमके हे समजण्याचा अभ्यास प्रयत्नपूर्वक करावा लागतो.

मागे 'ज्ञानरत्नापहाराय' हा उल्लेख यासाठीच आला आहे. 'तुका म्हणे काय नाशिवंतासाठी। देवासंगे तुटी करितोसी?' काम, क्रोधादि सारे प्रगतीच्या आड येतात, हे जाणले पाहिजे.

एके ठिकाणी अप्पा म्हणतात, 'शरीरस्थ चैतन्य हा ईश्वराचाच अंश असल्याने कर्तृत्व शेवटी ईश्वराचेच असते हे माणसाला खऱ्या अर्थाने कळले तर त्याला कर्तृत्वाचा अहंकार कधीच होणार नाही.' अप्पांची यावर टिप्पणी अधिक लक्षणीय आहे. म्हणाले, 'माणूस मोठा लबाड! चांगल्या कर्माचे चांगले फळ त्याला हवे असते, मात्र आपल्या दुष्कृत्याचे फळ त्याला नको असते! मी खऱ्या अर्थाने म्हटले ते तेवढ्यासाठी!' सदसद्विवेकाच्याही मुळाशी निरहंकारता असणे महत्त्वाचे असते. ध्यान मंदिरातल्या प्रार्थनेवर बोलताना ते म्हणाले, 'अनुदिनि अनुतापे तापलो म्हणजे प्रत्येक दिवशीच्या आपल्या दुष्कृत्यावर चिंतनपूर्वक पश्चाताप होणे – दुसऱ्या दिवशी पुन्हा तोच दोष न करणे हा खरा अनुताप! म्हणूनच रोज थोडा वेळ – एका ठराविक वेळी – देवासमोर बसा. आत्मनिरीक्षण करा. त्याचा लाभ मोठा आहे. ज्ञान निर्मल चित्त म्हणजेच मोक्ष, असे आचार्यही म्हणतात.'

हे साधावे यासाठी त्यांनी व्यवहाराची एक चतु:सूत्री सांगितली आहे. १) हितकर अन्नसेवन, २) एकान्तप्रियता, ३) हिताहिताचा (फायद्या–तोट्याचा नाही) विचार करून आचार आणि ४) (अगदी लहानशीही का होईना पण) नियमबद्ध साधना! अर्थात् हे सांगणारे ते.... त्यांनी हे सारे केलेच असले पाहिजे यात शंकाच नाही. ही त्यांची नियोजनबद्धताच त्यांना यशस्वी करून गेली. असा ह्या वंदनीय महापुरुषाने केलेल्या साधनेच्या पाऊल खुणा त्यांच्याच मृदु–मधुर भाषेत उल्लेखिलेल्या आता पाहू या –

'सहस्रनामावाचुनि काही ना अन्य साधना केली' असे सांगून व्रत, उपवास, यमनियम किंवा इंद्रिय नियमन असे विशेष काही केले नाही – कटाक्षाने केले नाही पण साधना करताना 'भय–लोभ दूर सारून विश्वासे चाललो यथाशक्ती' असे मात्र म्हटले आहे. 'यथाशक्ती' म्हणजे आहे त्या सर्व शक्तीनिशी, निग्रहाने, निश्चयाने! प्रखर अशा आत्म–विश्वासाने. तसेच साधनेचा दुसरा मुद्दा म्हणजे 'सामान्य सदाचरणी, मग्न विचारात सर्वदा राही' असे म्हटले आहे. सदाचाराची शास्त्रकारांची व्याख्या अशी– **'अत्याचार स्तु मालिन्यं अनाचारस्तु मूर्खता।**
**विचाराचार संयोग: सदाचार: स उच्यते।।'**

आचारात अतिरेक झाला की मनोमालिन्य येते, कठोरता येते. तर अनाचार–आचारहीनता – मूर्खपणाच ठरतो. म्हणून दोहोंचा समन्वय हवा. नेमके अप्पांचे हे वैशिष्ट्य होते असे म्हणणे अयोग्य ठरणार नाही. त्यांनी आपण जीवन कसे व्यतीत केले हे लिहिले आहे.

**'अस्मिन्शरीरे यत् शक्यं सर्वं तत् यत्नत: कृतम्।**
**गीताया: नियतं कर्म न कदाचिदुपेक्षितम्।।'**

यातून त्यांचा दांडगा आत्मविश्वास ध्यानात येतो. शास्त्राने स्वधर्म म्हणून सांगितलेले कर्म त्यांनी आयुष्यभर केले. ज्ञानोबांच्या म्हणण्यानुसार 'म्हणोनि जे जे उचित। आणि अवसरे करून प्राप्त। ते कर्म हेतुरहित।' अप्पांनी पूर्ण केले. कर्माच्या ठायींची त्यांची हेतुरहितता त्यांना यशस्वी करून गेली. ही कर्मे करताना त्यांनी अप्पांनी पर्याय शोधले नाहीत हे विशेष लक्षात येते. केवळ कर्तव्य परायणता. जीवनातले सारे व्यवहार सोत्साहे, सानंदे स्वीकारले गेले, वृत्तीने अलिप्त राहून!

घराच्या शेतीच्या एका व्यवहारात रुढ अर्थाने केलेल्या – स्टँप ड्युटीत वाचलेला सर्व पैसा त्यांनी शासनाच्या बिहार दुष्काळ फंडात जमा करून पावती केली! ही कथा त्यांच्या सामान्य सदाचरणावर प्रकाश टाकते. गोरट्यामध्ये रुद्रयाग केला. नैवेद्याचा शिरा देवाच्या ताम्हणात घालून नैवेद्यासाठी देवापुढे येताच अप्पांची मुद्रा क्षणार्धात बदलली. जाणकार स्त्रियांना ते जाणवले. कार्यक्रमानंतर सर्वांसमोर आपल्या पत्नीकडे तोंड करून ते म्हणाले, 'उद्यापासून आंघोळीच्या बादलीत तुम्हाला जेवायला वाढले पाहिजे!' बहुतेकजणी अधोवदन झाल्या होत्या. गीतोक्त नियतकर्मात 'आत्मौपम्येन सर्वत्र' बघावे लागते – अप्पा तसे बघत–वागत म्हणूनच ते सर्वांना आपलेच वाटत!

भय सारून दूर केले – प्रयत्नपूर्वक! कथा सांगते की बूढा केदार मंदिरात एक भयंकर उग्र कापालिक बसला होता. अनेकजण भयाकुल ते सांगत होते – अप्पा मंदिरात जाऊ नका हो! पण अप्पा शांतपणे गेले. पाठ म्हटले नि परतले! भय सारूनच या मार्गावरून चालावे लागते याचे हे सक्रिय उदाहरण! कबीरांचा दोहा मला आठवला – या परमार्थात यायचे तर कसे? – **'सीस उतारे भुईधरे तापर राखे पाव। दास कबीरा कह गये ऐसा होतो आव।।'**

'लोभमूलानि पापानि' हे तर त्यांना आधीच ज्ञात होते. 'यथालाभात संतोष' सांभाळला होता. **'अपने मजेके खातीर गुरुछोडही दिये जब । सारे जहाँ के गुलशन मेरे ही हो गये तब।।'** हा रामतीर्थांचा शेर त्यांनी स्वानुभवाने अनेकदा सांगितला होता. देवाला ते म्हणत, 'अधिकं नाप्यहं याचे यद्दत्तं तत् बहु त्वया।' म्हणून तर दैवी संपत्तीचे पहिले लक्षण 'अभयं' आणि यथालाभात संतोष हेच त्याचे जीवनसार होते. या सगळ्या मागे – 'सहस्रनामाची भक्तीच मला हाताला धरून चालवीत होती' असे त्यांचे म्हणणे आहे. (.... सांगाती / चालविसी हाती धरोनिया ।। तुका।।)

मुळातच एक निर्धार लागतो. एकाला लिहिलेल्या पत्रात त्यांनीच म्हटले आहे की मी चालण्याचा निर्धार केला आहे. **'नच निवास ठाऊक अजून केवढा दूर। मार्ग ना सोडवे तरी, हाच निर्धार।।'** असे त्यांचे सामान्य सदारण होते.

आता 'मग्न विचारात सर्वदा राही।' अप्पांच्या अंत:करणात सातत्याने ईशसत्तेचा त्याच्या सर्वज्ञतेचा विचार जागा असे. 'सामर्थ्यासह

ईश्वरा अघटिता सर्वज्ञता ही असे' ही जाण पक्की, म्हणून 'मागायाचे सर्व संपले कधीच तत् जीवनी।' प्रत्यक्षात साऱ्या सिद्धी, पुढे आल्या तरी त्यात - त्या मोहात मी अडकलो नाही असे ते म्हणतात. धीर सुटला नाही म्हणून मी सुटलो. तरलो. सात्विक कर्त्याची सर्व लक्षणे त्यांनी पूर्ण बाणवली होती यात शंका नाही.

ती. दादांची परंपरा चालवायची तर दादांसारखेच व्हायला पाहिजे. ती. दादांची ईशभेटीची तगमग म्हणून वाळिंबे मास्तरांनी सांगितलेल्या कथेची आठवण अप्पांना एकदा झाली. दादांच्या चरित्रात त्यांनीच लिहिलेली आहे! एकान्तप्रियतेचा - सुखाचा मार्ग त्यांनी शोधला. दादांच्या आज्ञेने हिमालयाची वाट धरली ती कायमची! तेच मग त्यांचे जीवन झाले. नोकरीत दादानंतर तर खूप कटकटी वाढल्या. मनस्ताप झाला. तरी ही वाट सोडली नाही.

तारुण्यातच त्यांच्या चिंतनशीलतेचे दर्शन 'मज नुपेक्षी हरी' या प्रार्थनेत दिसते. प्रगतीतली मोठी अडचण स्तुती. तीच घात करते. देवा, ती मला पचेल का याचा विचार तू कर! उपेक्षा नको ती त्या अर्थाने! 'करी अंधार बाहेरी' यातले चिंतन अंतर्मुखतेसाठीच आहे हे स्पष्टच आहे. हे हवं ते हवं, हे कधीच संपत नाही म्हणून ते दिसायलाच नको म्हणून अंधार कर! 'अंतर्मुख वृत्ती करी' या विषयावरचे त्यांचे पूर्वरंग वाचावेत! औद्योगिक प्रगतीच्या आग्रहाचा विषय पंडित नेहरूंचा! त्या काळातली ही कविता. 'बांधिले पाय तव नियतीने केंद्रासी।' यातही बाह्य साधनांच्या विकासाने मानवाची खरी प्रगती झाली असे मानता येणार नाही - प्रगतीचे माप साधनांच्या वाढीने मोजणे योग्य नाही. सात्विक गुणांच्या वाढीने प्रगती मोजली पाहिजे. हाच मुख्य विचार आहे. माणसाच्या या अहंकाराला त्यांनी 'मधुर मुखी फसवी अहंता' म्हटलेले आहे हे येथे लक्षणीय आहे. थोर शास्त्रज्ञ रमण महर्षींनी याच काळात 'अंतराळ संशोधने थांबवा' असे सांगितल्याचे जाणकारांच्या ध्यानात असेलच!

श्रीहरिस्तोत्रात त्यांची देवदर्शनाची ओढ व्याकुळतेच्या टोकाला पोहोचलेली आहे, हे ध्यानात येते. 'योग्य होइन केधवा तरि' या तळमळीची जात थेट शंकराचार्यांनी व्यक्त केलेल्या 'दीनते' जवळची आहे. ते म्हणतात,

**'भवपाश निबद्धस्य मम मुक्तिः कथं भवेत्।**

**इत्याकुलं मनो यस्य स दीनः कथ्यते बुधैः।।'**

बदरिकाश्रमात त्यांना पदस्पर्शपूर्वक दर्शन घडले. इतरांना अशी संधी कधी मिळत नाही. ही घटना अलौकिक आहे. येथे ते त्यात समाधान मानतात. 'एवढे पुरे' म्हणतात. 'अधिक सोसण्याची शक्ती नाही' असे सांगतात. पूर्वाभ्यासातली एक घटना लक्षणीय म्हणून आठवली. रामकृष्णांनी नरेंद्राला त्याच्या प्रश्नाचे उत्तर देताना म्हटले 'तू जसा मला पाहतोस तसा मी देव पाहिला' आणि त्यांनी नरेंद्राच्या छातीला स्पर्श केला. त्याच्यासह सारे विश्व ईश्वर स्वरूप असल्याचा प्रत्यय नरेंद्राला आला. ही गोष्ट माथुरांना कळली. त्यांनी रामकृष्णांना आग्रह केला. रामकृष्णांनी त्यालाही स्पर्श दिला. तासभरही झाला-नसेल; तो धावत आला म्हणाला गुरुदेव, हे परत घ्या सोसत नाही! अप्पा अधिक नको म्हणाले त्यातले रहस्य हे आहे. हे समजण्याएवढी योग्यता अप्पांनी संपादिली होती!

'मी अन् माझे' या अहंमधून सारे जन्मते. तूच तो (अहं) देवा उचलून घे म्हणजे माझे यथार्थ पूजन घडेल! 'मी माझे विरल्यावर उरले ते हृदय मंदिरी शोभो।' असे ते म्हणताहेत. 'पारडी समेसी येतात पण काटा पूर्णपणे स्थिरावत नाही' म्हणून त्यांची खंत आहे. विश्वातली विविधता कळावी म्हणून वेड्यासारखा फिरलो पण मी अर्जुन नाही याची जाणीव होते. अशा प्रकारे त्यांची तळमळीतली उत्कटता वाढत होती. शेवटी सोक्षमोक्ष एकदा करायचाच म्हणून ते गंगेवर आले.

गंगापूजनाची त्यांची वाग्गंगा म्हणजे त्यांचे प्रातिभ दर्शनच! त्या पूजेची भव्यताही विलक्षण. म्हणाले, 'आई आता वेळ करू नको. प्रसन्न हो. माझी भूक भागव.' गंगागंगेति यो ब्रूयात् म्हणताच त्यांचा उद्धार तू करतेस तर येथे मी सतत तुझ्या प्रवाहात असून कोरडाच का? अशी वंचना का? मागे एकदा पाय घसरून पडणार तो तूच बालिकेच्या रूपाने मला सावरलेस! माय आज तळमळून मागतोय तर देईनास! आई, खरं सांगू, ''लाथ झटकोनिया दूर होई कशी झट्दिशी वा उरी लाव लोभे।'' बोलक्या शंखाप्रमाणे हे कातडी ढोलके किती काळ बडवू? आई, मला हवे ते देणार नसलीस तर आजवर दिलेस ते सारे परत तरी घे. आता धीर धरवत नाही.

गंगोत्रीवरील त्या गुहेपाशी (उत्तरेकडे) अप्पा बसलेत - नारायणालाच साद घातली. गंगोत्रीवरचे त्यांचे हे आत्मनिवेदन कारुण्याने पूर्ण आहे. काठोकाठ ओथंबलेले! एक उच्च दर्जाची वेगळीच जाणीव वाचकालाही होते. 'अनेकजन्मसंसिद्धः' हेच खरे.

आता उतावीळ अशी व्यक्त झाली. 'देवा, कीर्तनात तूच मला रंगविलेस, अंतःकरणाची प्रतिबिंबेच जणू अशी स्तोत्रे झाली. ऐन तारुण्यात कृष्णकथेकडे वळविलेस! मोठेपणा कमालीचा मिळाला. पण देवा खरा आनंद त्यात नाही. शपथेवर सांगतो, आत्मप्रशंसा मी कधी केली नाही - करूही दिली नाही, कोणी करू धजला तर त्याला परावृत्त केले! बदरिकाश्रमात तू दिलेस तो विसार समजून मी थांबलो पण ते तेवढेच? तूही स्वस्थ राहिलास! का? देवा ही वंचना का? गोपी तुला शठ म्हणतात ना त्यातले मर्म आज अनुभवले! (गोपींच्या 'त्या' पातळीवर ते आता पोहोचलेत हे येथे लक्षणीय आहे.)

ते दीनपणे म्हणतात, 'आता ही कासाविशी सहन होत नाही. दारी मरण येऊन ठेपल्यासारखे झाले आहे. उशीर का देवा? तुझ्या स्मरणाने मन भारावते, लोचने वाहतात, विरक्तीही येते - पण ही सारी मधाची बोटे! अनुभव नाही तो नाहीच! मला प्रपंचात समृद्ध करणारा तू, इथे या परमार्थात दरिद्री का ठेवतोस? संतापून तुला काही म्हणावे असा मी काही तुकोबा नाही, नामा नाही, जनाई तर नाहीच नाही.' ('तुझं गेलं मढं। तुला पाहून काळ रडं -' जनाबाई)

(तू मेल्या कपटी खरा.... दासगणू) (देवाला या संतांच्या शिव्या ही ओव्यांसारख्या गोड वाटल्या!!) पण देवा आता शेवटचं सांगतो, आता येथून मी भुकेला परतणार नाही! (समर्थांचे शब्द येथे स्मरतात - देवाच्या सख्यत्वासाठी। पडाव्या जिवलगांसी तुटी। सर्वही अर्पावे शेवटी। प्राण तोही वेचाना)

त्या गुहेच्या मुखाशी तेथेच ठाण मांडले अप्पांनी! अनशने घडली

होती. थकवा जाणवत होता. मस्तक भणभणत होते. कंठ दाटत होता. आसू वाहात होते. श्रावण वद्य एकादशीचा उत्तररात्रीचा समय होता....!

अचानक एक तेज:पुंज प्रकाशित झाला. त्यातच मंडलाकृती निर्माण झाली अन् त्या तेजोवलयात भगवान नारायण प्रकटले! देवही प्रसन्नहास्य उभे. अप्पा ते नयन मनोहर रूप पहातच राहिले. तो तेजोनिधी समीप आला - अप्पांनी धाव घेतली - ती त्यांची माऊली विठाई होती. गळा-मिठी झाली. अप्पांनीच अन्यत्र विवरले होते ही मिठी म्हणजे 'मी' त्या चरणापाशी 'ठी' म्हणजे ठेवला! (मैं हूँ तो हरि नही हरि है तो मै नही!) त्या 'अनंताने' या लेकराला अनंताला आलिंगन दिले! 'चंदनाने मोगऱ्याची माळ कंठी घातली!' उराउरी भेट म्हणून माळ घातली.

अप्पांचे अफाट वाचन - विलक्षण धारणा - पूर्ण एकाग्रता यामुळे त्यांच्या वाणीचे प्रभुत्वही अलौकिक! हीच दिव्य अनुभूति। हाच ईश्वर - साक्षात्कार - 'याचसाठी केला होता अट्टाहास' ते मिळाले! अप्पा आनंदरूप झाले!

या पदाचे सर्व विवरण निबंध-मर्यादेत करण्याची गरज नाही. शिवाय वर्णिलेल्या प्रतीकामध्ये अभ्यासकांच्या मतानुसार मतभेदांची शक्यताही असते. तथापि थोडक्यात त्या पदाचा मी केलेला अर्थ असा-

**शाश्वताचे अशाश्वतेवर केलेले रूपक :**

शाश्वत ईश्वराने - कस्तुरीने अशाश्वत अशा कुंकवाला (अनंत भक्ताला) भाल भागी रेखिले आहे. सूर्यतेजाने सामान्यशा चांदण्याने आपले अंग माखून घेतले. अमृतालाच तहान लागली अन् ती पुरविली अनंताने, गायीने! मुळातली उन्मनी- म्हणजे तूर्यगा ती विश्वात्मैक्याच्या जाणीवेला जागी करीत आहे. तृप्तता (ईश्वर) आता लाचावली - तिला ओढ लागली. चिंतेला आता चिंता वाटते आहे की चिंता कशाची करणार? भास्कराने काजवा जवळ केला. सागराने थेंबुटा जवळ केला गंगा देवाच्या पायापासून निघाली आहे. येथे ती भक्तासाठी वर आली (उर्ध्वगा) (भक्त देवा जवळ आहे ना म्हणून) आपल्या तुषारांनी तिने अप्पांना न्हाऊ घातले. ती कामधेनू आता (अनंत) वत्सासाठी पान्हावली आहे.

विश्वरूप पाहून अर्जुनाची झालेली मन:स्थिती, पार्वतीच्या तपश्चर्येने प्रसन्नलेले व त्यामुळे तिच्यापुढे नृत्य करणारे शंकर, वेदामध्ये असलेले माधुर्य - त्याचा वर्षाव - अशी एकापेक्षा एक अधिक मधुर सुखे अनंताने भोगली. (अनुभविली) - त्या सर्व सुखांचे स्पर्श अनुभवले - आता भोगायचे काय राहिले? धावली हो पावली हो ही विठाई माऊली।। 'झाले सार्थक पावलास हरि तू आनंदले जीवन' असा हा आनंदाचा अक्षय्य ठेवा किंवा अक्षय्य आनंदाचा ठेवा घेऊन अप्पा परतले! (श्रावण व।। ११-१२ शके १८९३)

समाज जागरण, संस्कृती-परंपरा रक्षण अशी कार्ये शिरावर घेतलेलीच होती. थोरल्या मुलाचा प्रपंच सुरू झाला होता. 'वानप्रस्थ न शब्दश: परि तशा वृत्तीत काठिण्य ना' ही स्वानुभूती व्यवहृत झाली. उत्तर काशी जवळ केली. काव्यलेखन, ग्रंथनिर्मिती, व्याख्यान, प्रवचने, कीर्तने चालूच होती. प्रवासात खंड नव्हता. संन्यासोत्तर बाह्य रूप पालटले होते आणि घर सुटले होते. या प्रदीर्घ काळात नारायण पुनर्दर्शन - पुन:प्रत्यय येत होते. 'धन्य जाहलो', 'साधना भिन्न साध्याहून', 'व्हावे वाटे मनी अनंता...', 'प्रसन्नता कौमुदी' आदी रचना याच काळातल्या. एका संबंधाचा विषय तो. येथे विवरण केले नाही ते निबंध मर्यादेसाठी!

साक्षात्कारानंतरही पुन:प्रत्ययाने जन्मलेल्या 'राधे तुझ्या विण', व 'कृष्णा दुजे तुजविणे' या कविता भावार्चनेच्या दुसऱ्या आवृत्तीत ही आल्या नाहीत. का बरे? 'महंतीमुळे नाश होतो तपा रे' असे काहीसे त्यांना वाटले असेल का? मात्र या दोन्ही कवितांमधला मधुर भाव थेट तुकारामांच्या विराण्यांच्या जातीतला आहे! 'यतस्तन्मय:' या नारद भक्तिसूत्राप्रमाणे! उपरोक्त साऱ्याच कविता एखाद्या प्रज्ञावंताने स्वतंत्र विस्तृत लेखनात त्या लोकासन्मुख कराव्या अशा योग्यतेच्या आहेत. याची चुणुक मात्र अप्पांनी 'मानसस्तवा' मध्ये दिली आहे. ती अशी -

**'सम शांत समाहित वृत्ति बने, मधुरामृत वर्षत शीतकणें।**
**नरभक्ति इथे विलसे मधुरा - परतत्त्व सुखें शिवतेच उरा।**
**लय पावतसे मन सर्वसहे करुणामृत सागर मानस हे ।।'**

असे सद्गुरु लाभले या भाग्याला तोड नाही! म्हणून **'अर्पितो वंदने भावे वरदानंद पदावरी।'**

**''दोहीवरी दोनी। भुजा आलो घेओनी। आलिंगावया लागोनी। तयाचे आंग''** - ज्ञाने. तृप्तता लाचावली.

**डॉ. श्री. ग. प्र. परांजपे**
ब्लॉक नं. ७, विठ्ठल नगरी, उपाशी विठोबा मंदिराशेजारी,
पुणे ४११ ०३०. फोन - २४४७११०९



# अलौकिक अनुभूती

**कु. गार्गी (वसुमती) देशपांडे**

एम.ए. संस्कृत, दासगणु प्रतिष्ठान, गोरटे येथे सहसचिव.
प.पू. अप्पांच्या लेखनिका म्हणून काम केलेले आहे.

मानवी जीवनाच्या श्रेष्ठत्वाचे मूल्यमापन त्याने गाजविलेला पराक्रम, त्याने मिळविलेली अफाट संपत्ती, त्याने बांधलेल्या भव्य इमारती, त्याने घेतलेले विज्ञानातील उच्च शिक्षण, त्याने मिळविलेली निरंकुश सत्ता यावर केले जात नाही तर अंत:करणात असलेले सात्त्विक समाधान हेच त्याच्या मूल्यमापनाचे साधन आहे. त्यामुळे यातील सगळे ज्याच्याजवळ आहे त्यालाही समाधान असेलच असे नाही किंवा यांतील काहीही ज्याच्याजवळ नाही तोही सुखी, समाधानी, आनंदी असू शकतो. म्हणून सृष्टीनिर्मितीपासून आजपर्यंत ऋषिमुनि, साधुसंत, तपस्वी महात्मे, विरक्तपुरुष हे या समाधानप्राप्तीसाठीच मार्गदर्शन करीत आले आहेत. सर्वांचे उद्घोषून सांगणे एकच की अंत:करणात सात्त्विक सुखाचा, समाधानाचा, आनंदाचा आविर्भाव होण्यासाठी माणसाला अंतर्मुख होऊन अध्यात्मज्ञानाची प्राप्ती, ईश्वराचे स्वरूप जाणण्याचा प्रयत्न करणेच अपरिहार्य असते. साम्राज्यप्राप्ति, राजसुख, संसारोपभोग इत्यादीमध्ये खरा आनंद असता तर प्राचीन काळच्या अनेकानेक राजांनी उपभोगांचा त्याग केलाच नसता. त्यांनी पृथ्वीचे निष्कंटक राज्यही कस्पटाप्रमाणे मानून, ऋषि-मुनींच्याकडून आत्मस्वरूपाचे ज्ञान करून घेऊन राहिलेले आयुष्य भगवंताच्या स्वरूप चिंतनात, नामस्मरणांत आनंदात घालविले. याशिवाय दु:खाचा अंत होणे अशक्य आहे यावर त्यांचा पूर्ण विश्वास होता. श्रीज्ञानेश्वर-तुकारामादि संतांनी तेच केले व म्हणून सांगितलेही तेच-

**आपुला तो देव एक करुनि घ्यावा ।**
**तेणेविण जीवा सुख नाही ।।**
**काळ सार्थक केला त्यांनी ।**
**धरिला मनी विठ्ठल ।।**

असे श्रीतुकाराममहाराज म्हणतात,

**देवा माझे मन लागो तुझे चरणीं ।**
**संसार व्यसनीं पडो नेदी ।।**
**अवघेचि त्रैलोक्य आनंदाचे आतां**
**चरणीं जगन्नाथा चित्त ठेले ।।**
**ओळखिला हरी साठविला पोटी**
**होता त्याची भेटी दु:ख कैचे ।।**

असे श्रीएकनाथमहाराज म्हणतात. श्रीज्ञानेश्वरमहाराज **'सर्व सुखाचे आगर । बाप रखुमादेवीवर ।।'** असे म्हणतात.

ज्ञाता-ज्ञेय-ज्ञान यांतील ज्ञानाच्या पलिकडील ज्ञान हे तात्त्विक ज्ञान, तेच अध्यात्मज्ञान, तोच परमार्थ व तोच खरा अनुभव असे शंकराचार्य म्हणतात.

अध्यात्मज्ञानाशिवाय इतर सर्व शास्त्रांचे ज्ञान हे कसे व्यर्थ ठरते त्यासाठी श्रीमाऊलींनी दिलेली उपमा मोठी मार्मिक आहे. ते म्हणतात-

**मोरा अंगी असोसे । पिसें असती डोळसे ।**
**परी एकली दृष्टी नसे । तैसे ते गा ।।**
**तैसे शास्त्रजात जाण । आघवेचि अप्रमाण**
**अध्यात्मज्ञानेविण । एकलेनि ।।**

काही पाश्चात्त्य तत्त्वज्ञानीही अतींद्रिय प्रत्यक्ष हे एक निर्विवाद सत्य आहे व तेच अध्यात्मज्ञान होय असे म्हणतात.

**यदा चर्मवदाकाशं वेष्टयिष्यन्ति मानवा: ।**
**तदा देवमविज्ञाय दु:खस्यान्तो निगच्छति ।।**

एखाद्या मृगाजिनाप्रमाणे आकाशाचीहि घडी घालणे एकवेळ शक्य आहे. पण देवाला न जाणता दु:खाचा नाश होणार नाही.

त्यामुळे विवेकी माणूस हे जाणून आसक्ति न ठेवता प्रपंच करून देवाचे स्वरूप जाणण्याचा प्रयत्न करतो. त्यासाठी त्याला भावेल त्याप्रमाणे तो साधना करीत राहतो. त्यासाठी अहिंसा- सत्य- अस्तेय- ब्रह्मचर्य- अपरिग्रह हे यम, शौच- संतोष, तपस्वाध्याय, ईश्वरप्रणिधान हे नियम यांचे सामान्यपणे आचरण करतो. नामस्मरणाने ईश्वरीकृपा संपादण्याचा प्रयत्न करतो. या सर्वांमध्ये ईश्वराच्या चरणी उत्कट भाव, त्याच्या सर्वज्ञतेवर- सर्वसमर्थतेवर- सर्वव्यापकत्वावर पूर्ण विश्वास ठेवणे महत्त्वाचे असते. ते या साधकाचे होते. ''जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत' ही सहजवृत्ति होऊन त्याच्या जीवनात सर्वसामान्यांच्या जीवनात आढळणार नाहीत असे विशेष अनुभव येत जातात.

'संकल्पादेव तु तच्छ्रुते:' या ब्रह्मसूत्रावरील भाष्यात प.पू. अप्पांनी म्हटल्याप्रमाणे-

**ब्रह्मवेत्त्याचिया चित्ती । संकल्प जे जे उठती ।**
**ते सर्वहि पूर्ण होती । ऐसे कथिले वेदाने ।।**

**क्षुद्र सिद्धीच्या बळावरती । जादुटोणा कोणी करिती ।**
**परी म्हणून त्यांची गणति । ब्रह्मवेत्त्यांत करूं नये ।।**
**सर्व वासना जिंकुनी । प्रयत्नबळे जे कष्टांनी ।**
**झाले जगती ब्रह्मज्ञानी । ते न यात पडती की ।।**
**मन ज्यांचे झाले अमन । अहंता गेली मावळून ।**
**आतां संकल्प करी कोण । कांहीं घडावे कोण इच्छी ।।**
**त्यांचे करण्या संरक्षण । वा वाढविण्या महिमान ।**
**चमत्कार येती घडून । परी ते ईश्वरी इच्छेने ।।**

म्हणजे ईश्वरी इच्छा हीच त्यांची इच्छा होते.

प.पू. अप्पांनी सांगितलेली एक गोष्ट या संदर्भात आठवते. शकुनि-दुर्योधन-दुःशासन-कर्ण या चांडाळ चौकडीच्या कारस्थानामुळे युधिष्ठिर पुन्हा द्यूत हरला व १२ वर्षे वनवास आणि एक वर्ष अज्ञातवास पांडवांच्या वाट्याला आला. १२ वर्षे वनवासासाठी पांडव वनात गेले. त्यांचे दुःख थोडे हलके व्हावे म्हणून भगवंत त्यांना भेटण्यासाठी वनांत गेले. त्यांचेसवे त्यावेळी सत्यभामा होती. सत्यभामेने द्रौपदीला प्रश्न केला की, 'द्रौपदी! हे पाचीजण तुझे पती तुझ्याच मनाप्रमाणे कसे काय वागतात.' तेव्हा द्रौपदीने उत्तर दिले की, 'मी त्यांच्या मनाप्रमाणे वागते म्हणून तुम्हाला ते माझ्या मनाप्रमाणे वागतात असे वाटते.'

भक्त-भगवंत संबंधातही असेच होते. म्हणून लौकिकामध्ये त्याच्या इच्छा पूर्ण होतात असे दिसते व त्याला अलौकिकत्व प्राप्त होते. अलौकिक म्हणजे अद्‌भुत-अपूर्व-विलक्षण-प्रचारात नसलेला.

प.पू. अप्पांच्या जीवनात असे पुष्कळ अनुभव आले आहेत. श्रीब्रह्मसूत्रार्थदर्शिनीच्या लेखनासाठी प.पू.अप्पा व आम्ही २-३ जण बदरीनाथ येथे होतो. १९७७ सालचा ऑगस्ट महिना. तेथील वेळापत्रक आमचे निश्चित झाले होते. आषाढ शु.दशमीला लेखनाला आरंभ झाला. पहाटे ४।। लाच उठावे. ६ वाजेपर्यंत शौचमुखमार्जन स्नानादि उरकावे. ६। ला प्रार्थना म्हणून ईशस्मरण करावे व लेखनास आरंभ करावा. ९।। वाजेपर्यंत लिखाण करून मधली सुट्टी थोडा वेळ घेऊन पुन्हा १२ वाजेपर्यंत लिहावयास बसावे. १२ ते २।।- स्वयंपाक-जेवण इत्यादी सर्व व पुन्हा ४।। पर्यंत लेखन. नंतर १-१।। मैल फिरून देवदर्शन घेत असू. व परत येऊन ६।। ते ९।। लेखन. प्रतिदिनी पहाटे ४।। ते रात्री १०।। वेळ कसा जात असे समजतच नसे. उजाडलेला प्रत्येक दिवस वेगळाच आनंद घेऊन उदयास येत असे. प.पू.अप्पांची अवस्था तर अवर्णनीय होती. श्रीआचार्यांनी म्हटल्याप्रमाणे 'यद् यद् कर्म करोमि तद् तदखिलं शंभो तवाराधनाम्' अशीच त्यांची स्थिती होती.

अधिक शु.षष्ठीचा दिवस उजाडला. प.पू.अप्पा त्यांचे सर्व आवरून पांघरूण घेऊन पडून राहिले. मी व भारती नेहमीप्रमाणे कुंडावर जाऊन स्नानादि उरकून कपडे धुवून परत आलो. कपडे वाळत टाकण्यासाठी म्हणून मी अप्पांच्या खोलीत गेले तो अतिशय विलक्षण दृश्य नजरेस पडले. प.पू.अप्पा लोडाला टेकून बसले होते. डोळे मिटले होते. आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे श्रीवरदनारायणाच्या प्रतिमेला घातलेला हार अप्पांच्या गळ्यात दिसत होता. प्रतिमेपासून अप्पांच्यापर्यंत ४-५ फुले पडलेली होती. मनामध्ये विचारतरंग हलकल्लोळ करीत होते. तरी ती भावसमाधी मोडावी असे वाटेना. आम्ही सर्वांनीच ते दृश्य पाहिले. मनूला राहवेना. त्याने पू.अप्पांना हालवून ध्यानावस्थेतून बाहेर ओढून काढले. अप्पांनी डोळे उघडून एकदा नारायणाच्या प्रतिमेकडे पाहिले, आमच्याकडे पाहिले आणि आमच्या इतक्याच आश्चर्याने गळ्यातील हाराकडे पाहिले. व म्हणाले, 'चला! आपल्याला खाली जावयाचे आहे.' एखादा धक्का बसावा त्याप्रमाणे झाले. प्रकृतीविषयी अप्पांना विचारले तर म्हणाले, 'मला काही होत नाही. पण आपल्याला खाली गेलेच पाहिजे. आणि ते ओक्साबोक्सी आक्रंदन करू लागले. आम्हाला याचा काहीच उलगडा होत नव्हता. आम्ही अगदी भांबावून गेलो होतो. अप्पांच्या मुद्रेवर मात्र संवाद चालल्याप्रमाणे भाव दिसू लागले. त्यांच्या मुखातून निसटलेल्या-

**'स्वप्न वा ध्यान हे भरवंशाचे नसे । म्हणुनिच कां दिली ही प्रचीति।।**

या काव्यपंक्तीने माझ्या बुद्धीपुढे पसरलेला अंधार क्षणार्धात दूर झाला. सर्व कोडे उलगडले. एका विशिष्ट दिशेने विचारचक्र फिरू लागले. तेवढ्यात अप्पांनी वरदनारायण स्तोत्र म्हणण्यास प्रारंभ केला. एकामागून एक चरण म्हटले जात होते आणि -

**स्पर्शेन दिव्यमृदुना करनीरजस्य। संवर्धकाय चरणानत भाग्यराशेः।**

या ओळी म्हटल्यावर त्या व्याकुळ अवस्थेतही अप्पा मोठ्याने हसले व म्हणाले- खोटे! अगदी खोटे!! दोन-तीनदा तोच चरण आळवून म्हणू लागले. नंतर जणू आपण हे अधिकार रहिततेने बोललो असे वाटून पश्चात्तापदग्ध मनाने पुन्हा आक्रंदन करीत पुढचे श्लोक म्हणू लागले. थोड्या वेळातच ते शांत झाले. पुन्हा एकदा स्पष्टोच्चाराने त्यांनी पूर्ण वरदनारायण स्तोत्र म्हटले व आमच्याकडे पाहून म्हणाले आपल्याला खाली जायचे आहे. तयारी करा. आम्ही विचारले- का? काय झाले? प्रकृति तर ठीक आहे ना? तेव्हा मोठ्या दुःखाने म्हणाले, मला काही विचारू नका. कुठे जायचे, कसे जायचे तुमचे तुम्ही ठरवा. खाली जायचे एवढे निश्चित. केवढी अद्‌भुतता या घटनेत समाविष्ट झाली होती. आणि त्यासंबंधी अप्पा कांही बोलत नव्हते. मी माझ्या कल्पनेने घटनेची मांडणी केली ती अशी- प.पू.अप्पा ध्यानाला बसले असावेत. आणि श्रीनारायणाने खाली जाण्याचा आपला निर्णय सांगितला असावा. भक्ताने निराश होऊ नये, त्याने राहिलेले लेखनकार्य तितक्याच उत्साहाने करावे म्हणून प्रसाद म्हणून आपल्या गळ्यांतील हार अप्पांच्या गळ्यात घातला असावा. आणि हे सर्व स्वप्नात नाही, ध्यानात नाही तर प्रत्यक्षच घडले असावे असे प.पू.अप्पांच्या मुखकमलातून बाहेर पडलेल्या काव्यपंक्तीवरून समजते. राहिलेले लेखनकार्य पंढरपूरला पूर्ण झाले. ज्यादिवशी प.पू.अप्पांनी हस्तलिखित प्रत श्रीदासगणुमहाराजांचे चरणी समर्पित केली त्याच दिवशी बदरिनाथहून पोस्टाने पाठविलेला प्रसाद मिळाला. हा चमत्कार म्हणा की, योगयोग म्हणा! पण असे घडले हे मात्र निश्चित!

बऱ्याच दिवसांनी अप्पांना विचारले की, ब्रह्मसूत्रार्थदर्शिनीचे पूर्ण लेखन बदरिनाथ येथे न होता पंढरपूरला कसे पूर्ण झाले? तेव्हा ते म्हणाले- बदरिनाथ येथे राहून लेखन केले असते तर आता ते जेवढे सोपे झाले आहे, सर्वसामान्य अभ्यासकाला समजेल असे झाले आहे तसे

झाले असतेच असे नाही. ती व्यवस्था तर भगवंताचीच होती.

पौष वद्य एकादशी शके १९१६ ची आठवण आहे ही! विद्यावाचस्पति ग.प्र. परांजपे यांचे एकादशी निमित्त कीर्तन होते. त्यांनी सावतामाळी हे चरित्र घेतले होते. कीर्तनाला प.पू. अप्पा उपस्थित होते हे परांजपे यांचे भाग्यच. प.पू. अप्पा तल्लीन होऊन कीर्तन ऐकत होते.

**'केनापि गीयमाने हरिगीते वेणुनादे वा ।**

**आनंदाविर्भावो युगपत् स्याद् हृष्टसात्त्विकोद्रेक: ।।**

हेच खऱ्या भक्तीचे, खऱ्या भक्ताचे लक्षण सांगितले जाते. प.पू.अप्पांचे तसेच होते. श्री.परांजपेही समरसून कथा सांगत होते.

सावतामाळी यांचा ऋषितुल्य अधिकार नामदेवांना कळावा म्हणून श्रीपांडुरंग ज्ञानदेव व नामदेव यांना घेऊन सावत्याच्या मळ्यात येतात. सावत्याची मुलगी शेताच्या बांधावर उभी राहून ''अले! मायबापा विथ्थला'' म्हणून हंबरडा फोडीत होती. नामदेव-ज्ञानदेव तिला घेऊन सावत्याजवळ येतात. देव आधीच पोचलेले असतात. त्या सर्वांचे आपसात आपुलकीचे बोलणे सुरू झालेले पाहून मुलगी ही मंडळी कोण म्हणून सावताबुवांना खुणेने विचारते. सावतेबुवा त्या सर्वांची ओळख सांगतात. आपल्या मळ्याचे मालक आहेत हे समजल्याबरोबर मुलगी कोवळी कोवळी कणसे भाजून घेऊन येते व देवाला म्हणते, देवा हे कणीस घ्या हे गोड आहे! देव म्हणतात- तुला कसे समजले. ती म्हणते मी खाऊन पाहिले आहे. देवाला त्या चिमुरडीच्या भावाचे खूप कौतुक वाटते व तिला मांडीवर घेऊन तिच्यासवे कणीस खाऊ लागतात. प.पू. अप्पा ऐकता ऐकता एवढे तल्लीन झाले की त्यांच्या डोळ्यांवाटे धारा वहात होत्या. शरीराला हलकासा कंप होता. अंगावर रोमांच दाटले होते. कीर्तन संपले. आरती झाली. तरी प.पू. अप्पांची ती अवस्था तशीच टिकून होती. कीर्तनाचा श्रोतृवर्ग तसाच तटस्थ बसून राहिला होता. श्वास रोखून सर्वजण सारी शक्ति एकवटून पू.अप्पांकडे पहात होते. श्री.परांजपे यांनी पू.अप्पांच्या पायाला स्पर्श करून नमस्कार केला. आणि त्या स्पर्शानिशी पू.अप्पांच्या मुखकमलातून दिव्य वाणी प्रगटली- ऋषिमुनींना मंत्र स्फुरले, मंत्र दिसले आणि मग त्यांच्या वाणीवाटे प्रगटले असे पुराणादि वाङ्मयातून आपण वाचले पण आजही ऋषितुल्य व्यक्तिमत्त्वाची वाणी स्फुरलेली आम्ही पाहिली असा अनुभव सांगणारे शेकडो भाविक उपस्थित होते. ती दिव्य वाणी अशी होती-

**सावत्याच्या कन्येसंगे पुन: बाळपणा आला ।**
**ज्ञानदेवांच्या शब्दांनी येई पूर्तता तयाला ।।**
**विठ्ठलाच्या दुजा अंकी आरोढोनि मका खातो ।**
**काय गोडी वानावी ती नेत्री आनंद वाहतो ।।**
**रोमांचली गात्रे सारी हृदी प्रेमा माववेना ।**
**भावभरे आली कशी उत्कटता ऐशी ध्याना ।।**
**ध्यान समाधी जाहली वरदानंद अपरोक्ष ।**
**व्यापका भो नारायणा एक तूचि यासी साक्ष ।।**

गीतेच्या सहाव्या अध्यायातील,

**'पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि स: ।**
**जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ।।**

या श्लोकावर भाष्य करताना श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात-

**मग मागील जन्मा शेवटी । जी सद्‌बुद्धि होती निकटी ।**
**तीच आतां उठाउठी । प्राप्त होते नव्याने त्या ।।...**
**इंद्रिये जरी बलवान । होती मनाच्या स्वाधीन ।**
**प्राणवायूत विरे मन । प्राण मिसळतो आकाशी ।।**
**ऐसे सहज येते घडून । अभ्यास साधे यत्नावीण ।**
**समाधि घर विचारून । वरिते त्याच्या चित्तासी ।।**

(अनुवाद ज्ञानेश्वरी)

प.पू. अप्पांनी कवितेत हाच संदर्भ दिला आहे की श्रीज्ञानोबांच्या शब्दाप्रमाणे ध्यान-समाधि झाले. सावतेबुवांच्या मुलीप्रमाणे पांडुरंगाच्या दुसऱ्या मांडीवर बसून मक्याचे कणीस खाण्याचे भाग्य लाभले. हे कसे घडले. मनामध्ये उत्कट इच्छा निर्माण झाली. मन प्राणवायूत विरते व प्राणवायू आकाशात विरून जातो. त्यामुळे जी इच्छा करावी ती पूर्ण होते. हे समाधीच्या पातळीवर घडते. जणू समाधी अवस्था आपल्याला थांबण्यासाठी निवासस्थान शोधीत येते. याला साक्षी म्हणून हृदयस्थ नारायणाशिवाय दुसरे कोण असणार?

खरोखर किती विलक्षण अवस्था असेल नाही! आणि तरी त्याची कुठेही वाच्यता नाही हे तर आणखी कठीण!

**'आथिलेचि गुण वानिता । मान्यपणे मानिता ।**
**योग्यतेचे येता । रूप आंगा ।।'**
**तैं गजबजो लागे कैसा । व्याधे रुंधला मृगु जैसा ।**
**कां बाही तरता वळसा । दाटला जेवी ।।**
**पार्था तेणे पाडे । सन्माने जो साकडे ।**
**गरिमेते आंगाकडे । येवोचि नेदी ।।**

ही श्रीमाऊलींनी अमानित्व शब्दावरील वर्णिलेली वृत्ती, आदर्श ज्ञान्यांची लक्षणे प.पू.अप्पांच्या रूपाने पहावयास मिळाली हे आमचे निश्चितच पूर्वसुकृत!

ज्येष्ठ शु.एकादशी शके १९१६. सकाळी ६-६। च्या सुमाराला 'जय जगदीश हरे प्रभु जय बदरीश हरे । शरणागत-जनवत्सल तारय भवपारे।।' श्रीवरदनारायणाची आरती करून मी चिपळ्या खाली ठेवल्या आणि प.पू.अप्पांनी हाक मारली गार्गी! गार्गी!! सकाळी ८।।-९ वाजेपर्यंत कधी कधी दुपारी १२-१ पर्यंत अप्पा आपल्या खोलीचे दार उघडत नसत. आज आताच कशी हाक आली, गोंधळून जाऊन थोड्या आश्चर्यनेच मी अप्पांच्या निवासकक्षात प्रवेश केला व अंत:करणातले आश्चर्यमिश्रित सर्व भाव प.पू.अप्पांच्या चरणी नमस्कार करून समर्पित केले, वही पेन घे बरं! खूप खूप आनंद झाला. आज कोणत्या प्रसंगाचे दर्शन प.पू.अप्पांच्या दिव्य सरस्वतीच्या माध्यमाने होणार आहे याची उत्कंठा दाटून आली.

पू. अप्पांचे अंत:करण गहिवरून आले. डोळ्यांवाटे अश्रू वाहू लागले. काहीतरी विलक्षण घडले असावे व त्या उत्कट स्मरणाने अप्पा व्याकूळ होऊ लागले व त्यांच्या मुखकमलातून झरझर शब्द वाहू लागले.

विरहे विह्वल होता लाभे नारायण दर्शन ।
ज्यास्तव हृदयीं असे मांडिले शोभित कंजासन ।।
नेत्रकुंभ ढाळिती क्षारजल रूपामृत साठवू ।
नीलसरसिजा पायघड्यास्तव दृष्टि सज्ज पाठवू ।।
निमिषा टाकुन विकसित अक्षी....
आत न मावे उतावीळ ती झाली रोमांकुर ।।

...........................................

अकस्मात बहरली मुखश्री काया थरकापली ।।
प्रसन्नता कौमुदीत झाली करकमलांची कळी ।।

...........................................

बंद कवाडातुनी सुधाजल ओसंडे बाहिर ।
भिजुन चिंब जाहले तेधवा त्याने सारे उर ।।
जिज्ञासू उत्सुक तयी पुसतसे कुणी ।
मौन कां अहो घेतलेत सांगा झणी ।
अर्पिली पूजने कैशी नारायणी ।
कसे तुला ते कथूं सज्जना मिटलेरे लोचन ।
मिटल्या दारातुनी आतले होत न बा दर्शन ।।

मला कविता म्हणायला सांगितली. व म्हणाले, गार्गी! आपल्याला तपोवनला जायचं बरं का! मी म्हटले, अप्पा! तुमची प्रकृति बरी नाहीय, तर कसे काय जाणार आपण? ते म्हणाले, त्याची चिंता नको आणि महेश व डॉ. रामभाऊ कुलकर्णी यांना येण्याविषयी कळविण्यास सांगितले. मला आश्चर्यच वाटले की असा अचानक निर्णय अप्पांनी कसा काय घेतला? पण त्याचे कोडे तपोवनाहून परतल्यावर सुटले.

श्रीवैष्णोदेवीच्या प्रवासात पाण्यातील कांही जंतुसंसर्गामुळे प्रकृती बरी नव्हती. १८ कि.मी. पायी चालत जाऊन वैष्णोदेवीचे दर्शन घ्यावयाचे या निश्चयांत पू.अप्पांनी बदल केला नाही. त्यामुळे शारीरिक थकवा चांगलाच जाणवत होता. पण आता प्रकृती बरीच सुधारली होती. तपोवनाला जायचे म्हणजे १६००० फूट उंचीवर चढून जायचे होते. डॉ.रामभाऊ कुलकर्णी येताच श्रीधरस्वामी आझादींच्यासह प.पू.अप्पांनी उत्तरकाशीतील त्यांच्या निवासस्थानासमोरील डोंगर चढून जाण्याचे ठरविले. पुण्याचे श्री. माधव खिरेही त्यावेळी होते. संध्याकाळी परतल्यावर डॉ. रामभाऊंनी नाडी-रक्तदाब तपासले. व सर्व ठीकठाक असल्याचे सांगितले.

दि. २६ जून १९९४ ला प.पू. अप्पा डॉ. रामभाऊ, श्री. महेश, श्रीधरस्वामी, गंगाधर व मी, तपोवनयात्रेसाठी बाहेर पडलो. गंगोत्री-फलाहारी बाबांचा आश्रम, भोजवासा असा प्रवास करून आम्ही तपोवनला पोचलो. आणि पोचता क्षणी दाव्याला बांधलेल्या वासराला मोकळे सोडता क्षणी ते जसे आनंदाने उंडारते तसे अप्पांचे झाले. वास्तविक १६००० फूट उंचीवर वयाच्या पंचाहत्तरीनंतर चढून जाणे सोपी गोष्ट नव्हती. पण माहीत नाही कशाच्या तरी अनामिक ओढीने पू.अप्पा तेथे येऊन पोहचले. जणू काही सर्व प्रदेश परिचित असल्याप्रमाणे भाव पू.अप्पांच्या मुद्रेवर दिसत होते. निर्मळ अशा अतिशीत अशा अमरगंगेमध्ये स्नान केले. जेथून त्या अमरगंगेचा उगम झाला त्या भगीरथ पर्वताकडे प.पू.अप्पा आसुसल्या नेत्राने पाहात होते. जणू कोणी जवळचा प्रेमी भेटावा अशा आनंदाने अप्पा, मनोमनी त्या पर्वताशी संवाद साधत होते. त्यांनी आन्हिकादि आवरले. भोवताली खुरट्या गवताचा गालिचा पसरला होता. सूर्यनारायण आपले कार्य संपवून परतीच्या मार्गावर होते. त्यामुळे जाता जाता आल्हाद वाटीत जावे म्हणून त्या बर्फाच्छादित शिखरावरील तांबूस कोवळी किरणे दृष्टी खिळवून ठेवत होती. अमरगंगेच्या झुळझुळीने निर्माण झालेल्या मंजुळ नादाने श्रवणेंद्रियाला अमृतरसाचा स्वाद चाखायला मिळत होता. माहीत नाही किती काळ स्वामीजी त्या वातावरणात ठिय्या मारून होते. आम्ही सर्व जण मात्र गारठ्याने काकडून श्रीसंतसुभद्रामातेच्या कुटीत आश्रयाला येऊन बसलो होतो. काही काळाने प.पू.अप्पा आले. सुभद्रामाताजींनी आग्रहाने बनविलेल्या भोजनाचा त्यांनी आस्वाद घेतला व निद्रादेवीने आम्हाला ताब्यात घेतलेच.

सकाळी उठून परतीच्या मार्गावर आलो. प.पू.अप्पांनी मला ती कविता म्हणण्यास सांगितले....

**विरहे विव्हल होता लाभे नारायण दर्शन...**
**निमिषा टाकून विकसित अक्षी...**
**आंत न मावे उतावीळ ती झाली रोमांकुर....**
**अर्पिली पूजने कैशी नारायणी ।**
**भांबावे वरदानंद ते क्षणी ।**
**मिटल्या दारातुनी आतले होत न बा दर्शन ।।**

कविता ऐकता ऐकता प.पू. अप्पा देहभान विसरले व सावध होता होता म्हणाले- **सदा सर्वदा देव सन्निध आहे ।**
**कृपाळूपणे अल्प धारिष्ट पाहे ।।**

ज्यावेळी उत्तरकाशीत या कवितेची रचना झाली, त्यावेळीच पू.अप्पांना ध्यानविश्वामध्ये याच पण पूर्वी कधी न पाहिलेल्या प्रदेशाचे, तपोवन प्रदेशाचे, त्या भगीरथ पर्वताचे, त्या झुळझुळ वाहणाऱ्या अमरगंगेचे दर्शन झाले होते. म्हणूनच तर अप्पांनी शारीरिक प्रकृति तितकी चांगली नसतानाही एका दर्शनाच्या उत्कंठेने, नारायण दर्शनाच्या ओढीने तपोवन यात्रेचा निर्णय घेतला व 'स्वप्न वा ध्यान हे भरवंशाचे नसे।'' म्हणून रोकडी प्रचीति, विलक्षण अनुभूति, सगुणाचे अलौकिक दर्शन, चाक्षुष प्रत्यय हे शब्द शब्द न राहता ज्ञान आणि कृति यांचे सामरस्य पू.अप्पांनी अनुभविले.

प.पू.अप्पांचे जीवन हे श्रीवरदनारायणाच्या आदेशाप्रमाणे चालत होते. प.पू.अप्पांचा तो दृढ विश्वास होता. गंगोत्रीच्या रम्य परिसरात झालेल्या दर्शनानंतर त्यांनी भगवंताला आश्वासनही दिले होते की-

**आदेशा धरूनी शिरी सतत मी वागेन या जीवनी ।**
**व्यापाते उबगेन ना प्रभु कधी वा लौकिकालागुनी ।।**

पण शके १९२०चा दशहरा उत्सव झाला व प.पू.अप्पांना देहत्यागाची विलक्षण ओढ लागली. विलक्षण एवढ्यासाठी की कोणीही माणूस, अगदी व्याधीने जर्जर झालेला माणूसही प्रामाणिकपणे मरणाची इच्छा करीत नाही. वेदना न सोसल्यामुळे तो उपचार करणाऱ्या डॉक्टरला

म्हणतो की, डॉक्टर! मला नको हे वेदना सोसणे, मारून टाका मला! पण त्याला खरे म्हणजे असे म्हणावयाचे असते की, 'मला लवकरात लवकर बरा करा' म्हणून प.पू. अप्पांच्या ओढीला विलक्षण म्हणावेसे वाटले.

आषाढ महिन्यात प.पू. अप्पांच्या समवेत श्रीदासबोधाचे वाचन चालू होते. श्री. विनायकराव, सौ. मुक्ता, सौ. कल्याणी हेही होते. प.पू. अप्पा कधी बसून ऐकत तर कधी आडवे पडून ऐकत. एके दिवशी दासबोधाचे वाचन सुरू होते. अप्पा तक्क्याला टेकून डोळे मिटून ऐकत होते. अचानकपणे त्यांच्या मुखातून शब्द बाहेर पडले.

**परिव्राऽसि वेत्ता त्वत्–कृते न क्षेत्रगौरवः ।**

**लब्धानुभूत्या जिज्ञासून् मुहुः शाधि गुरोः कुले ।।**

**स्वास्थ्यं रक्षन् कुरु दिनान् युक्तान् धर्मप्रबोधनैः।**

पू. अप्पांचे शब्द कानावर पडल्यावर मी वाचन थांबवलेच. त्या ओळी लिहून घेण्यास अप्पांनी सांगितले. आम्ही सर्वही जण स्तब्धच झालो होतो. थोड्या वेळाने विनायकराव म्हणाले, 'अप्पा! श्लोकाच्या तीनच ओळी दिसताहेत, चौथा चरण नाहीय!' अप्पा म्हणाले, 'हा नारायणाचा आदेश आहे आता मला त्याला उत्तर द्यायचे आहे'; किती अलौकिक घटना आहे ना!'

आताशा पू. अप्पा देह त्यागासंबंधी पुन्हा पुन्हा बोलत असत. ती उत्कटता वाढतच चालली होती. म्हणून ध्यानदर्शन श्रीनारायणाने पू.अप्पांना हा आदेश दिला तू परिव्राट आहेस. स्थानमहात्म्य मानून येथे राहण्याचा आग्रह धरू नकोस. तुझ्या गुरूस्थानाला जा. समाज प्रबोधन कर. तुझ्या स्वास्थ्याचे रक्षण करावेस. काही काळा नंतर पुन्हा संवाद झाला असावा व त्याप्रमाणे अप्पांनी गोरट्याला येण्याचे ठरविले. आल्यावर चौथ्या चरणासंबंधी विचारल्यावर त्यांनी सांगितले, **'एष आदेश आचारे यथाशीघ्रं तमानय'** प.पू.अप्पांशी झालेल्या संवादानंतर श्री.नारायणाने या आदेशाचे लवकरात लवकर पालन करावे असे म्हटले व अप्पा गोरट्याला आले. त्यानंतर नांदेड येथे ७ दिवसांचे आध्यात्मिक शिबिर घेतले. संतविद्या प्रबोधिनी या श्रीराधादामोदर प्रतिष्ठानांतर्गत संस्थेची निर्मिती झाली. पंढरपूर येथील गुरूस्थानाचे कार्य तडीला नेले.

श्रावण शु. द्वितीयेला केलेल्या एका काव्यांत प.पू. अप्पा म्हणतात–

**त्रिवार आदेश तरी तयाची । सारैकता हे पुनरुक्तवाची ।**
**लक्षात घेऊनही याचनेते । पुनः पुन्हा सांगसि कां प्रभो ते ।।**
**ऋचा जशा वंद्य ऋषी पहाती । तशा पुढे या दिसल्यात पंक्ति ।**
**हे तीनदा होत असे कसे या । आभास मानू तरि देवराया ।।**
**आज्ञा तुझी मानुनिया प्रमाण । करीन ते, जो बळ, मी न खिन्न ।**
**मी मोकळा या विहरेन लोकी । आहेस जो तू नित पाठीराखी ।**
**विश्वास होताच दृढावला तो । व भारती भाव तुला वहातो ।।**

अप्रकाशित पद्यखंड पृ. १४

कुठेही गूढता नाही. सरळ–स्पष्ट–घटनांचा प्रत्यय. हे सर्वसामान्य माणसाच्या जीवनांत घडत नाही. म्हणूनच केवळ या 'अलौकिक अनुभूती'. इति शम्

**कु. गार्गी (वसुमती) देशपांडे**
श्रीदासगणु प्रतिष्ठान, गोरटे, जि. नांदेड ४३१८०७
फोन : (०२४६७) २०२५१४ मो. ९९७५८७०६७७

•••



# 'श्रीवरदानंद भारती' वंदना


रचना - सौ. शैला सुहास पटवर्धन

एम्.ए.बी.एड्.- सेवानिवृत्त शिक्षिका,
'पार्ले टिळक विद्यालय', सध्या वास्तव्य- पुणे.
आदर्श शिक्षिका म्हणून ३ पुरस्कार प्राप्त. 'शामरंग' श्रीकृष्ण चरित्रावरील १२ गीताची ध्वनिफीत.


।। ॐ नमो भगवते वासुदेवाय ।।

धन्य धन्य तेचि स्थान
'श्रीराधादामोदर प्रतिष्ठान'
श्रीक्षेत्र हे! महाराष्ट्र धन्य!
'आठवले' कुल परमपावन ।।

'श्रीदासगणु' गुरु मूळारंभ,
भक्ति-कर्म-ज्ञान-योगदर्शन-
लोकसंग्रह, जनजागरणी-
'अण्णा, अप्पा' शिष्योत्तम ।।

ज्ञानदीप उजळती,
अध्यात्ममार्ग तेजाळती ।
श्रीदासगणु- कृपादृष्टि,
कल्पतरू बहरला ।।

हरिकथा-कीर्तन-प्रवचन
विद्वज्जनासह भाष्य-प्रयोजन
हिंदुधर्म-राष्ट्रधर्म-प्रसारण
दीपाने दीप उजळती ।।

शीघ्रकाव्याचे रत्नभांडार
संतसाहित्याचा 'प्रशांत-सागर'
वेद-वैद्य विद्या अपरंपार
अतुल्य वाङ्मय प्रपिता-पिता-पुत्राचे ।।

गोदामाई पूज्य माता
पुण्यपावनी गंगेसम होता
उदंड कथा, गौरव गाथा
नेत्र श्रोत्र धन्य होती ।।

गोदामाईचा प्रतिपाळ
तान्ह्या 'अनंता'ला तारिले
बलराम-श्रीकृष्ण गोपगडी
जणु यमुनातीरी लडिवाळिले ।।

पुढे 'पुणे' 'सरस्वती साम्राज्य'
वैद्यकसम्राट शोभले 'अनंतराज'
'लोकमान्य'-'स्वातंत्र्यवीर' वाक्तेज
अणुरेणुतून सळसळले ।।

परि आजोबांची आज्ञा होती-
''राजकारण न घेणे हाती''
पुढे स्वगृही कर्तव्यासाठी
प्राचार्यपदांही त्यागिले ।।

गोरट्यात 'विशेषदिन' 'महोत्सवा'दिक
'विष्णुसहस्रनाम' पाठ सांघिक
'लोकजागर' शिस्तबद्ध प्रत्येक
'अध्यात्म साधना केंद्र' गोरटेग्राम ।।

समस्त संत आणि महंत
श्रीमत् शंकराचार्यांचा वरदहस्त
प्रत्यंतर 'श्रीवरदविष्णु' साक्षात्
'जीवनी'-'देहान्ती'-दर्शन!

उचित वयात संसार
उचित वयात संन्यास
सर्व कर्तव्ये होता पार
निश्चय पूर्ण संन्यासाचा ।।

गोदा पोहोचली गंगेकाठी
'श्रीवरदानंदभारती' संन्यासी यति
अध्यात्मगगनी नवनक्षत्री
'तेजाचे चांदणे' शांतवी ।।

'श्रीवरदानंद चरित्र' कल्पद्रुम शांतिसाध्य, अनंत-हृदये आराध्यां, नम्रभावे वंदना ।।
।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।
।। ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः।।



# प.पू. स्वामी वरदानंद भारती रचित 'श्री सद्‌गुरु षोडशोपचार पूजा'

**सौ. कल्याणी शिवले** (उज्वला काळे)
एम.ए., निवृत्त बँक अधिकारी

'श्री सद्‌गुरु षोडशोपचार पूजा' ही पू. स्वामी वरदानंद भारती रचित ११२ ओव्यांची पुस्तिका आहे. त्याचे स्वरूप लहान असले तरी त्याचा मथितार्थ महान आहे. या षोडशोपचार पूजेचा विचार करण्यापूर्वी अल्पसे प्रास्ताविक.

मनुष्य जन्माला आल्यापासून अंतकाळापर्यंत सतत काहीतरी शिकतच असतो. शिकण्यासाठी त्याला गुरूची आवश्यकता असते. जन्माला आल्यावर खाणे-पिणे, चालणे, बोलणे इत्यादी लहानसहान गोष्टींपासून ते ज्ञानार्जन करून अर्थाजनापर्यंतच्या सर्व शिक्षणासाठी त्याला सतत गुरु लागतात. असे कोणते ना कोणते तरी ज्ञान आयुष्यभर आपल्याला करून देणारे सर्वच गुरु 'सद्‌गुरु' असतात का? नाही! मग गुरु आणि सद्‌गुरु यामधील फरक कोणता? गुरु व्यावहारिक ज्ञान देतो तर सद्‌गुरु 'स्वरूपाची' ओळख करून देतो. भगवत्प्राप्तीचा मार्ग दाखवितो. श्रीसमर्थ म्हणतात, 'नरदेह म्हणजे घबाड' आहे. 'जीवात्म्याचे परमात्म्याशी' ऐक्य घडवून आणण्याचे सामर्थ्य या नरदेहातच आहे. आरशावर धूळ बसली की त्यात प्रतिबिंब नीट दिसत नाही. ती धूळ पुसून टाकावी लागते. आपल्या मन:पटलावरील अज्ञानाची धूळ पुसण्याचे काम 'सद्‌गुरु' करीत असतात. आपल्या हृदयस्थ भगवंताची 'अनुभूती' त्यांच्याच कृपेमुळे येऊ शकते.

अहंकाराने तट्ट फुगलेल्या काहींना प्रश्न असतो की, आपल्याला 'सद्‌गुरूं'ची आवश्यकताच काय? आमचे आम्ही काय ते बघून घेऊ. यासाठीची भगवान् रामकृष्ण परमहंसांच्या जीवनातील एक गोष्ट फार मार्मिक आहे. एकदा एक विद्वान गृहस्थ ठाकूरांकडे आले आणि सद्‌गुरूंची आवश्यकता काय या प्रश्नावर त्यांच्याशी वाद घालू लागले. ठाकूर व्यावहारिक पातळीवर 'अशिक्षित' असा विद्वानांचा (गैर) समज. ठाकूर त्या सद्‌गृहस्थांना म्हणाले, ''हो तुमचे अगदी बरोबर आहे. सद्‌गुरूंची जीवनात अजिबात आवश्यकता नाही. पण मला एक सांगा ते बघा समोर एक गलबत चालले आहे. ते साकोऱ्याला कधी पोहोचेल?'' (त्याच्या शेवटच्या स्थळी) विद्वान म्हणाले, ''पोहोचेल संध्याकाळी ७ वाजता साकोऱ्याला.'' ठाकूर ''हो. का बर? त्या गलबताला मागच्या बाजूला टोकाला एक छोटी होडी बांधली आहे, ती कधी पोहोचेल साकोऱ्याला?''



**श्रीदासगणु महाराजांच्या समाधीचे अंतिम दर्शन घेताना (गोरटे - मार्च २००२)**

गृहस्थ म्हणाले, ''अहो ती पण पोहोचेल त्याच वेळी संध्याकाळी ७ वाजता.'' (मनातल्या मनात त्यांनी भगवान रामकृष्णांच्या बुद्धीची कीव केली) ''बरं मला सांगा'' ठाकूर म्हणाले, ''समजा ती होडी गलबतापासून वेगळी केली तर केव्हा पोहोचेल साकोऱ्याला?'' गृहस्थांनी विचार केला. म्हणाले, ''नाही बुवा काही सांगता येत नाही कधी पोहोचेल ते. सागराच्या प्रचंड लाटांच्या हेलकाव्यात तिच्या छोट्याशा जीवाचे काय होईल, कधी पोहोचेल, का गटांगळ्या खात भरकटत जाऊन पोहोचणार पण नाही, काहीच सांगता येत नाही.'' ठाकूर म्हणाले ''अगदी बरोबर, हीच अवस्था मनुष्य जीवाची होणार. सद्‌गुरु असण्यामुळेची आणि नसण्यामुळेची.''

तात्पर्य - आपले हित साधायचे तर 'सद्‌गुरु' हवाच हवा. सद्‌गुरूंचे लक्षण सांगताना श्रीसमर्थ म्हणतात,

**'बिघडले देव आणि भक्त। जीवशिवपणे द्वैत।**
**तया देवभक्ता येकांत। करी तो सद्‌गुरु।।'**

(दा. द. ५ स. २ ओ १०)

देव आणि भक्त यांच्यातील वियोग नाहीसा करून त्यांची गाठ घालून देऊन त्यांचे ऐक्य घडवून आणणारा तो सद्‌गुरु.

हे सर्व सांगण्याचा हेतू एवढाच की मनुष्य जीवनात 'सद्‌गुरुं'ना अत्युच्च स्थान आहे. त्यांची कृपा हेच खरे जीवन आहे. या कृपेला पात्र होण्यासाठीचे गुण अंगी बाणणे महत्त्वाचे आहे. 'सद्‌गुरु वाचूनी दैवत दुसरे जगती या नाही तरावया भवसागर हा अमोल नौका ही.'

आपल्या हिंदु धर्मात षोडोशोपचार पूजेचे महत्त्व सांगितलेले आहे. १) आसन, २) पाद्य - म्हणजे पाय



# कीर्तने-प्रवचने-व्याख्याने स्वरूप, विषय, आचारसंहिता

**डॉ. श्री. ग. प्र. परांजपे**

एम. ए., बी. एड., पीएच. डी. (संत दासगणू वाङ्मयांत अभ्यास) न्यू इंग्लिश स्कूल येथे उपप्रमुख म्हणून ३२ वर्षे सेवा. विपुल लेखन. मुख्यत: संत व त्यांचे वाङ्मय आणि धार्मिक विषय. श्रीकृष्ण कथामृतातील संस्कृत वंदनांचे मराठी रूपांतर.

माझ्याकडे 'कल्याणी' वार्षिकांकासाठी हा विषय देणाऱ्यांच्या मनात नेमके काय असेल ते सांगणे अवघड असले तरी हा विषय काहीसा व्यापकच वाटला. त्यामुळेच थोडेसे भयही वाटले. मुळात विषयच अघळपघळ असला तर मांडणी तशीच होणं स्वाभाविकच! पण ते होणे मात्र रास्त नाही म्हणून भय! क्षणार्धात ते भय निरस्त झाले. कारण अप्पांच्या कीर्तन प्रवचनांच्या विशेषत: व्याख्यानांच्या माझ्या आठवणी जाग्या झाल्या. ती प्रश्नोत्तरे आठवली. बैठकीतल्या चर्चा-थोरामोठ्यांचे व्यक्त अभिप्राय आठवले आणि त्यावेळी 'महापुरुषसंश्रय:' ही भाग्याची गोष्ट असते या सद्वचनाच्या आठवणीने जणू बळ आले!

अप्पाच एकदा विनोदाने म्हणाले होते, ''मी उभा राहून बोललो की ते व्याख्यान होते, बसून तसेच काही बोललो की ते प्रवचन, अन् उपरणे खांद्यावर घेऊन उघड्या अंगाने पेटी-तबल्याच्या व छगनच्या साथीने काही सांगतो तेव्हा ते असते कीर्तन!

का कोण जाणे, एकाएकी ते गंभीर झाले. म्हणाले, 'दुसरे सांगणार नरी काय, **'धर्माचे पालन । करणे पाखांड खंडण।। वाचा बोलू वेदनीती । करू संती केले ते।।''** बस! एवढेच! अगदी अभावितपणे अप्पांनी आपला जीवनहेतूच जणू सांगून टाकला होता. त्यांची कीर्तने प्रवचने-व्याख्याने सारे काही याचसाठी होते. समाजासाठीच होते. समाजात असलेल्या व्यापक ईश्वराचे दर्शन त्यांना होत असले पाहिजे. तोच त्यांच्या बोलण्याचा केंद्रबिंदू होता.

अप्पांचे पहिले कीर्तन आदरणीय कै. केशवराव देशमुख महाराजांच्या पुढे त्यांच्या १५-१६ व्या वर्षी झाले, तर पहिले व्याख्यान - एक बौद्धिक - संघस्वयंसेवकांपुढे झाले मंगळवेढ्याला. आणि गंमत अशी, त्याच वर्षी दादांच्याच 'चहाचे अष्टक' या विषयावर त्यांचे एका उत्सवात प्रवचनही झाले. त्यामुळेच त्यांच्या उपरोक्त विधानात काहीसे तथ्य आहे असे म्हणता येते!

व्याख्यान-प्रवचन-कीर्तन यांच्या स्वरूपाविषयी थोडे स्पष्टीकरण होणे उचित होईल. या तिन्ही प्रकारात 'भाषण' अनुस्यूत आहे. सलगपणे विषयाला धरून अधिकारी व्यक्तींच्या वचनांचे आधार देत - पुरावे सांगत केलेले भाषण! व्याख्यान-प्रवचन यांचा कोषगत अर्थही स्पष्टीकरण करणे, साधार विवेचन करणे, व्याख्या करणे, अधिकाधिक माहिती देणे, एखादा मुद्दा एकादे उदाहरणे देऊन स्पष्ट करणे असाच आहे. मात्र 'कीर्तयन्ते इति कीर्तनम्' (जिथे परमेश्वराची कीर्ती गायिली जाते) ते कीर्तन!

व्याख्येतच स्पष्ट आहे, कीर्तनात गायन असते. अनुषंगाने पेटी, तबला, झांजा ही साधने व ती वापरणारी व्यक्ती हवीच. गायनच म्हणून रागदारीही अपेक्षित. (मात्र याचा अतिरेक टाळणे गरजेचे. अन्यथा समर्थ म्हणतात कीर्तन सोडून कलावंत झाले! असे होऊ नये!)

कीर्तनाचे प्रमुख प्रकार दोन. एक नारदीय कीर्तन तर दुसरे वारकरी कीर्तन! पूर्वरंग व उत्तररंग असे दोन भाग असतात. निरूपणाच्या अभंगावर भावार्थ सांगणे हा पूर्वरंग (वारकरी कीर्तनात) तर पुढे निरूपण करणे हा उत्तररंग. नारदीय कीर्तनात हे दोन्ही भाग बुवांना हार घालतात मध्यंतरात म्हणून सुस्पष्ट वेगळे जाणवतात. गायनाचे स्थान या कीर्तन प्रकारात प्राचीन आहे. भागवत ग्रंथात असेही वर्णन आहे की प्रल्हाद टाळ वाजवी, उद्धव झांजा वाजवी, नारद वीणा घेऊन कीर्तन करी आणि अर्जुन रागदारीत गाणी म्हणे! याच दोन प्रकारांना अनुक्रमे हरदासी कीर्तन व निरुपणी कीर्तन असेही म्हणतात.

राष्ट्रीय महापुरुषांच्या जीवनावर होणारी कीर्तने, राष्ट्रीय कीर्तने या प्रकारात मोडतात. लो. टिळक, काळकर्ते परांजपे यांनी ही कीर्तन पद्धती पुरस्कारली तर या प्रकारचे कीर्तन करणारे पहिले राष्ट्रीय कीर्तनकार कै. दत्तोपंत पटवर्धन होत. 'जुगलबंदी' म्हणून एक प्रकार रुढ होत आहे तर फॅमिली प्लॅनिंगवर सरकारी कीर्तने पुण्यात होत, हे मी स्वत: पाहिले आहे.

### विषय :

कीर्तन-प्रवचनांसाठी भक्ती, ज्ञान, वैराग्य, षडरिपुदमन, नीतिमत्ता, स्वधर्म, सदाचार, संयम, व्रत-वैकल्ये, अहंकार, चातुर्मास नियम असे अध्यात्मिक विषय परंपरेने चालत आले आहेत. आपल्या धर्माची प्रवृत्तीलक्षण व निवृत्तीलक्षण अशी दोन्ही अंगे ध्यानात घेऊन कीर्तन - प्रवचनात साधन व साधना यालाच महत्त्व आहे. वैदिक संस्कृतीमध्ये संपूर्ण मानवजातीच्या उन्नतीचा विचार अनुस्यूत आहे.

व्याख्यानांसाठी कोणताही विषय वर्ज्य नाही. राजकारण, समाजकारण, शिक्षणविषयक, पर्यावरण, आरोग्य, पर्यटन, ऐतिहासिक, परदेश गमन, असे अनंत विषय! अलीकडे अध्यात्मिक विषयही निवडतात. व्याख्याने कोणत्याही सार्वजनिक ठिकाणी होतात तर कीर्तन,

प्रवचने साधारणपणे मठ-मंदिरातून वा भाविकांच्या मोठ्याशा घरातही! आता आपण या तिन्ही गोष्टींचा विचार अप्पांच्या संदर्भात करणार आहोत. मात्र निबंधाच्या विस्तार - भयास्तव प्रत्येक वैशिष्ट्याचे उदाहरण देणे अशक्य आहे हे विचक्षणांनी ध्यानात घ्यावे अशी विनंतीही आहे.

काशी क्षेत्रातले थोर विद्वान पंडित विनायकबुवा भागवत यांनी आपल्या ग्रंथात कीर्तनाच्या पूर्वरंगाविषयी मर्मज्ञपणे काही विवेचन केलेले आहे. त्यात ते म्हणतात,

**अथ सत्पुरुषोद्गीतं उपदेशात्मकं हि यत्।**
**पद्यं गीतंच सुस्पष्टं तदेव च विवेचयेत्।।**

ती. दादांच्या पदांना व ती. दादांनाही पदांच्या रचनेच्या दृष्टीने हे लागू पडते. पूर्वरंगाचे सर्व विषय दादा-अप्पांनी पारंपारिकतेने अध्यात्माचेच घेतले. त्यावर पद्ये रचली आणि त्यांचा उपयोग समाज जागरणार्थ केला. दादांची मुळातली सहज सुंदर सोपी पदे अप्पांनी अर्थ-सुलभ व रसाळ केली. त्यांचा पूर्वरंग म्हणजे वाग्वैदग्ध्याचा सुंदर नमुना, सोपे सुटसुटीत दृष्टान्त, समाजाचे उत्तम निरीक्षण, सत्पुरुष-संतांची प्रमाण वचने, मर्यादित कोट्या-विनोद यामुळे पूर्वरंग आकर्षक होत. ब्रह्मसूत्रे, गीता, उपनिषदे, शंकराचार्यांची स्तोत्रे व संतांची वचने याने तो भरगच्च होतसे.

मानवी जीवनातली विसंगती ते सूचित करतात. दैनंदिन आचारातला ढिलेपणा ते दाखवून देतात आणि श्रोत्यांना अंतर्मुख करतात. गुंतागुंतीचे प्रश्न चिंतनार्थ ते समोर आणतात. माणसातल्या वैचारिक गोंधळाचेही दिग्दर्शन करतात. सध्या सुधारणेच्या नावाखाली बोकाळलेल्या चंगळवादाकडेही लक्ष वेधतात. त्यावरचा मुख्य उपाय म्हणून संयमाचे महत्त्व पटवितात. धर्म-नीतीचे त्यांचे विवेचन रोचक असते. आपल्या भारतीय संस्कृतीवरील आक्षेपांचे खंडण करतात. पण त्याच वेळी आपल्या परभृत मनोवृत्तीकडेही कटाक्ष टाकतात.

तर्कशुद्ध मांडणीमुळे त्यांचे पूर्वरंग मनाची पकड घेतात. अत्यंत मूलगामी असा एक विचार त्यांनी मनु महर्षींच्या वचनाधारे स्पष्ट केला आहे. तो महत्त्वाचा आहे. ''जगताचे रक्षण खरोखरीच सामान्य माणसेच करतात. ती सदाचारसंपन्न, त्यागी, परस्परानुकूल, वर्तनाची आग्रही असतात. नि:स्वार्थ जीवनाला प्राधान्य देतात. परस्परांच्या अशा साह्यकारी वृत्तीने त्यांचे रक्षण होते. पर्यायाने समाजाचे रक्षण होते. पण जेव्हा यात स्वार्थ शिरतो तेव्हा त्यांच्या निरसनासाठी राजदंड (राज्यकर्ता) जन्माला येतो. पण जेव्हा तोही स्वार्थी होतो तेव्हा मात्र ईश्वरशरणतेवाचून समाजाला गती नसते.'' आज ही स्थिती आपण अनुभवतोच आहोत. प्राचीन काळापासून कीर्तनसंस्था याच समाज मनाच्या उन्नयनार्थ निर्माण झालेली आहे.

एक जुना संदर्भही अप्पांनी दिला आहे. छत्रपती शिवरायांनी स्वराज्य संस्थापना केली, पण तत्पूर्वी अनेक संतांनी समाजमनाची अशी मशागत करून ठेवली होती, हे विसरून चालणार नाही. अप्पांनी केलेल्या पूर्वरंग-पदांची ध्रुपदे पाहिली तरी त्याचे महत्त्व जाणवते. 'अध्यात्माचे खरे स्वरूप ते विसरून गेल्यावरी.....', 'घालमनाच्या गळ्यात माळा', 'संत म्हणा त्याला....', 'माया, ममता, लोभ... परमार्थाचे अरी', 'सद्धर्माचे आचरण हेची........', 'अंतर्मुख वृत्ती करी' अशी बरीच आहेत.

एका पूर्वरंगात त्यांनी एक मार्मिक प्रश्न स्वत:च मांडून त्यावर उत्तरही दिले. प्रश्न असा - आजचा चंगळवाद वैज्ञानिक प्रगती यामुळे आपण खरेच प्रगत झालो का? प्रगतीचे मोजण्याचे खरे माप कोणते? उत्तरादाखल ते म्हणाले -

ज्या सुखाच्या लालसेने - समाधानाच्या अपेक्षेने मानवाने विज्ञानाची कास धरली, काही पिढ्यांनी संपादिलेली - संरक्षिलेली शाश्वत मूल्ये विध्वंसिली, ते सुख समाधान मिळाले तर नाहीच उलट मनुष्य माणुसकीलाच पारखा झाला आहे. विज्ञानप्रगतीच्या अत्युच्च शिखरावर पोहोचलेल्या पाश्चात्य देशातही समाजजीवन अस्वास्थ्य, भयग्रस्तच आहे. वाढता मानसिक तणाव जाणवतो आहे. म्हणून मोक्षाचे अलौकिक उदात्त ध्येय आणि त्यागावर आधारलेला धर्म यांच्या बंधनात (मानवाचे) अर्थ-काम राहतील - कार्यरत होतील - अशी समाजरचना आपल्या संस्कृतीने केलेली आहे. सामाजिक स्वास्थ्य खरोखरीच टिकायचे असेल तर याच सिद्धांताचा आचार करणे योग्य ठरेल! हिंदूंच्या परंपरागत समाजव्यवस्थेवर आधुनिकांनी पुरोगामीपणाच्या वा सेक्युलॅरिझमच्या नावाखाली घेतलेल्या साऱ्या आक्षेपातला फोलपणा अप्पांनी या विविध पूर्वरंगातून स्पष्ट केलेला आहे. त्यामुळेच त्यांचे पूर्वरंग जीवनस्पर्शी असल्याचे जाणवते.

अध्यात्म व विज्ञान परस्पर विरोधी नाहीत. उलट सक्षम होण्यासाठी विज्ञान उपयुक्तच असल्याचे ते सोदाहरण सांगतात. मोटार चालवायची तर ॲक्सिलेटर, क्लच, गिअर, स्टिअरिंग आणि ब्रेक यांचा योग्य वापर करावा लागतो. अचानक आलेले विघ्न टाळायचे तर ब्रेक लावता येणे महत्त्वाचे! तसेच शमदमादि साधनसंपत्ती धैर्याने, उत्साहाने अंगी बाणवावी लागते. म्हणजे संसारातली आसक्ती कमी होते. परमार्थ साधणे त्यामुळे सोपे होते.

त्यांच्या कीर्तनाबद्दल एका विचक्षणाने पाठविलेल्या पत्रात तो म्हणतो - ''महाराष्ट्रातील बुद्धिमंतांचे अध्यात्मिक नेतृत्व लो. टिळकांचे नंतर आपल्याकडे आले आहे - ते सोडू नका.'' दुसऱ्या एका पत्रात ते म्हणतात, ज्यांनी कालचे कीर्तन ऐकले त्यांच्या जीवनाचे सार्थक झाले असे वाटते. एकाच वेळी बौद्धिक, मानसिक, भावनिक आणि अध्यात्मिक आनंद लुटायला मिळाला. १९८५ मध्ये शिवाजी मंदिरात अधिकामध्ये झालेली कीर्तने हजारोंच्या स्मरणात आजही ताजी आहेत!

**आता पूर्वरंग व उत्तर रंगासंबंधी थोडेसे पाहू.**

भारताच्या शासनकर्त्यांचे बेगडी रूप स्पष्ट करताना त्यांनी शासनाच्या सर्वधर्मसमभाव या बोलबाल्याची हजेरी घेतली. अशा वेळी त्यांच्या वाणीला एक विशेष धार आलेली असते. ''शासन नेहमीच सर्वधर्म समभावाचे डोस बहुसंख्याकांनाच देते. आपला पंथ बलात्काराने स्वीकारायला लावणाऱ्यांना हा सर्वधर्मसमभाव कधी सांगत नाही. अत्यंत आदरणीय अशा विनोबांना कुराणातले आयते गाण्यास काश्मीरी

मुस्लिमांनी विरोध केला. पैगंबराच्या संदर्भात मक्केहून मदिनेस त्यांनी पलायन केले – हे ऐतिहासिक सत्यही दडपण्यासाठी तो शब्द पुस्तकातून काढण्यात आला. रामकृष्णांची यथेच्छ निंदा केली गेलेली एका महात्म्याची पुस्तके शासन स्वखर्चाने प्रकाशित करते! बहुसंख्य हिंदूंना दुखवितांना शासनाला खंत नसते. आपला समाज जागा व्हायला हवा ते हेच समजण्यासाठी. म्हणून राष्ट्रहितार्थ राजकारणाची अलिप्तता वा उपेक्षा बुद्धी असता कामा नये!''

'सदाचार हा शरीर खरोखर अध्यात्माचे नरा' या पदावरचा पूर्वरंग या संदर्भात खूप काही सांगणारा आहे. याच विवेचनात ते अहिंसा, दया, सत्य, इ. शब्दांवर मार्मिक वक्तव्य करून त्यातले रहस्य स्पष्ट करतात. 'अनेकांची ती अनेक मते' हे पदही विविध सामाजिक वादविषयांचे विवेचन करणारे आहे.

उत्तररंग म्हणून **आख्यान**. पूर्वरंगात आलेले छोटे मोठे सिद्धांत योग्य कसे आहेत ते आख्यानातील कथा प्रसंगांशी जोडून स्पष्ट करणे. 'जेणे करोनि मूर्ती ठसावी अंतरी श्री हरीची' अशी नाथांनी सांगितलेली कीर्तन मर्यादा अप्पा पूर्णांशाने प्रत्ययाला आणून देत. भक्तीरसात श्रोते न्हाऊन निघत. तीनसाडेतीन तास कधी सरले ते ध्यानात येत नसे.

'ठेंगणी जनीची मूर्ती' या पदावर त्यांच्या शब्द प्रभुत्वाने जनाबाईचे चित्र श्रोत्यांच्या मन:चक्षू समोर साकारत असे. आणि त्याच जनाबाई देवाला 'तू मेल्या कपटी खरा, बळे आलास माझ्या घरा!' म्हणून देवाला शिव्या देऊ लागल्या की तेही चित्र श्रोते अनुभवीत. अप्पांच्यासह श्रोत्यांचे डोळे ओघळत. गोरोबांचे मृत मूल कीर्तनात प्रकट होऊन रांगत येताना माऊलीला दिसले. हे साकारताना अप्पांचा कंठ दाटून येई. माउलीचा अत्यानंद वर्णन करताना चोळीचा बंध तुटून धारा वाहू लागतात – लेकरासाठी! (नसे वर्षाकाली) अप्पांचा वाणीचा ओघ विलक्षण ओजस्वी असे. 'पूजेतून मी आता उठणार नाही' असे बादशहाच्या राजदूतांना ठणकावून सांगणारा सेना – अप्पांनी आपल्या वाक्चातुर्यातून त्याचा अभिमान जणू श्रोत्यांच्या मनात जागवला. सूचक शब्द (दादांचे) ते आदराने सांगत. 'जनाहुन श्रेष्ठ नसे भूपती' अशा वेळी लाचार मंत्र्यांकडे संकेत व्हायचेच. मुलीची भाड खाऊन जगण्याची इच्छा नसलेला आणि मला पोशील जगन्नाथ' असा आत्मविश्वास प्रकट करणारा लाखा – अप्पांनी जणू मूर्त केला आहे. निरपेक्ष कर्मयोगाचे महात्म्य नामदेवाच्या कथाभागात अप्पांनी लीलया उलगडून दाखवले आहे. ''कर्म करे जैं घडते – तयि धी वळते – कर्माचे महात्म्य त्याच्या कर्मठपणात नाही – साधन सामग्रीत नाही – कर्त्याच्या निरपेक्षतेत आहे. भक्तीपूर्वक अहंकाराचा स्पर्श न होता केल्या जाणाऱ्या कर्मातून 'ज्ञान' निष्पन्न होते. ''भक्ती उपजवी ज्ञान फलाते'' हे सर्वोत्तम फल महत्त्वाचे! अप्पांची येथली भाषा जणू स्वानुभवाचे निवेदनच! ईश्वराच्या व्यापकतेसाठी सावतेबुवांच्या निष्काम कर्मयोगाचे स्मरण करावे तर पोटभर हसण्यासाठी 'वत्सलाहरण' ऐकावे. आधुनिक समाजातील अनेक विसंगतींचे दर्शन खुबीने अप्पांनी मुकुंदराज आख्यानात घडविले आहे तर रोहिदासाच्या आख्यानात त्यांनी गंगामातेला प्रकट करून दर्शन घडविले आहे.

दादांची आख्यानेच मुळात अतिशय गोड! रचनाकौशल्य उच्च दर्जाचे आणि ते त्याच तोलामोलाने सांगणारा अप्पांसारखा कीर्तनकार म्हणजे रत्नं समागच्छतु कांचनेन म्हणायचे. वाचेबरवे कवित्व – कवित्वी रसिकत्व – रसिकत्वी परतत्त्व – स्पर्शू जैसा! अप्पांना तर अनेक प्रसंगी पुन: प्रत्ययाचा आनंद मिळत असेल!

पू. अप्पांच्या प्रवचनांमध्येही त्यांचे वाग्वैभव प्रत्ययाला येते. गीता, उपनिषदे, ब्रह्मसूत्रे, आदि तत्त्वज्ञानाचे त्यांचे विवेचन सुलभ असे सामान्य माणसांनाही तत्त्वज्ञानाच्या गाभ्यापर्यंत नेऊन सोडण्याचे कसब त्यांच्या या प्रवचनामध्ये असे. भागवत, शंकराचार्यांच्या स्तोत्रे – अष्टकांवरही त्यांनी रसाळ प्रवचने केली. त्यांच्या प्रवचनांमध्ये आजच्या अभ्यासकाच्या जिज्ञासा पूर्ण करण्याचे कौशल्य होते. कोणताही विषय ते अगदी बारकाईने स्पष्ट करीत तर अत्यल्प वेळांतही तो विषय स्थूलमानाने सांगत. पारमार्थिक चिंतन खूप खोलवर केलेले असल्याने त्यांचे विवरण भाष्यकार या विशेषणाने सार्थ ठरते. त्यांची तुलनात्मक विवरणशैलीही मोलाचीच आहे!

पारमार्थिक विषय सांगतानाही त्याचे काही निर्देश माणसाच्या आचारा–विचारांकडे असल्याने त्यांचे सामाजिक भान जागे असते, असे म्हणता येते. समाजावर घडणाऱ्या राजकीय वातावरणाचे विपरित परिणाम हानिकारक कसे असतात याकडेही ते श्रोत्यांचे लक्ष वेधतात. त्यामुळे प्रवचनांना आकर्षकता प्राप्त होते. कधी कबीरांचे दोहे, कधी तुलसीदासांची – मीराबाईंची पदे, तर कधी समर्थांचा मनोबोध उल्लेखितात. कधी तिरुवल्लुरू सारख्या दक्षिणी संतांची मार्मिक कथाही! त्यांच्या वाणीला प्राप्त झालेला हा गोडवा, हे चैतन्य, ओजस्विता, त्यांना झालेल्या साक्षात्काराचा परिणाम आहे असे वाटते.

उत्तर काशीत अधिक ज्येष्ठात शिबिर होते. प्रारंभी प्रवचनात गंगालहरी त्यांनी सांगितली. नंतर छांदोग्यावर प्रवचने झाली. मृगाच्या नाभीतली कस्तुरी राजस्त्रियांनी अंगाला लावली होती. सकाळी स्नान करताना ती गंगेत मिसळली. गंगा स्पर्शाने कस्तुरी ज्यांनी दिली त्या मृगांचाही उद्धार गंगेने केला असा अतिशयोक्ती अलंकाराचा श्लोक विशद केल्यावर म्हणाले हे महाकवी कुठून कशी झेप घेतील कळत नाही.! गालीबनेही अशीच गंमत केली आहे. तो म्हणतो – ''क्या नजाकत है गालिब – उसके गाल पीले पड गये। हमने तो बोसा लिया था ख्वाबमें तसबीरका। यानंतर श्रोत्यांमध्ये उसळलेली हास्याची लाट विरायला पाच मिनिटे लागली! वाणीवरची हुकूमत दांडगी तर स्मरणशक्तीही! (गालिबच्या शेरचे स्पष्टीकरण एका शब्दानेही केले नाही हेही विशेष!)

त्यांनी सांगितलेल्या कथाही रोचक असत. विषय माणसावर कुरघोडी करतात हे सांगताना त्यांनी एका मार्मिक कथेचा दृष्टांत दिला. ''दुथडी भरून वाहणाऱ्या एका नदीच्या किनाऱ्यावर एक तरुणी व्याकुळ – चिंतातूर उभी! थोड्या अंतरावर दोन तरुण उभे होते. त्यांच्या लक्षात येताच जवळ येऊन त्यांनी तिची चौकशी केली. अडचण कळताच एक प्रामाणिक शिष्य म्हणाला, माझ्या खांद्यावर बसा मी नेतो तुम्हाला पलीकडे! झाले! त्याने तातडीने ते काम करून तो परतला.

दुसऱ्या दिवशी त्याच तीरावर साधनेसाठी ते दोघे गौतम शिष्य आले. दुसऱ्याने विचारले, मित्रा स्त्री स्पर्श आपल्याला वर्ज्य असताना तू हे कृत्य केलेस हे फार वाईट झाले! काय म्हणावे तुला! साधनारत पहिला शिष्य म्हणाला मित्रा माझ्या खांद्यावरची ती स्त्री गेली त्याला बत्तीस तास उलटले, पण तुझ्या खांद्यावरची ती स्त्री अजून तुझ्या खांद्यावरच आहे!'' विषय आपल्या मनावर ताबा मिळवतात ते चूक आहे हा सिद्धांत सहज पटून जातो!

पंढरीत ज्ञानेश्वरांच्या उत्सवातील दिवशी पंचेंद्रियांचा निग्रह हीच खरी तपश्चर्या असे सांगताना एक श्लोक म्हटला,

**''मनोनिवृत्तिः परमोपशान्तिः, गृहेषु पञ्चेंद्रियनिग्रहस्तपः।**
**अकुत्सिते कर्मणि यः प्रवर्तते, निवृत्तरागस्य गृहं तपोवनम्।।''**

तो ऐकताच एक ज्येष्ठ सुहृद म्हणाले, ''अरे बापरे, संस्कृत म्हणजे डोक्यावरून जाणार! अप्पांनी सूचना मान्य केली. त्यांनी अर्थ तर सांगितलाच, पण एका हिंदी कवीचा एक दोहा सांगितला.

**'कहे केशव भीतर जोग जगे अरुबाहर भोगिबे को तन है।**
**मन हाथ सदा जिनके, जिनके बनही घर है घरही बन है।'**

अत्यंत विनयाने त्या गृहस्थांनी हात जोडून म्हटले, वा! वा! क्या बात है? हा प्रसंग मी प्रत्यक्ष ऐकला आहे. पाहिला आहे. प्रवचनातली ही सहजता त्यांनी बौद्धिक परिश्रमांनी कमावलेली किमया आहे!

गीतेच्या आठव्या अध्यायाच्या सुरुवातीला अध्यात्म, अधिभूत व अधिदैवत यांचे अर्थ अर्जुनाने विचारलेत. अप्पांनी सुलभतेने काय सांगितले ते पहा. अध्यात्म म्हणजे माझा 'मी' म्हणून जो भाव असतो तो, (स्वभाव) अधिभूत म्हणजे या जगातले सारेच व्यवहार जे नश्वर आहेत, आणि अधिदैवत म्हणजे आपण जी काही, ज्या कुणा देवतेची करतो ती उपासना. या उपासनेत श्रद्धा अंतर्भूत असून तिच्यावरील दृढविश्वासाने अध्यात्म व अधिभूत जोडले जाते. (त्याचे यथार्थ ज्ञान होते) अप्पा पुढे म्हणाले, बुद्धीला कळते अध्यात्म, इंद्रियांना कळते ते अधिभूत आणि भाव-भावनेला कळतं ते अधिदैवत!

अप्पांची **व्याख्याने**ही कीर्तन-प्रवचनांप्रमाणेच लोकप्रिय झाली. विशेषतः महाभारतावरील व्याख्याने महाराष्ट्रात सर्वदूर झाली. मा. हरिभाऊ पाटसकर, डॉ. वि. ग. भिडे, यांच्यासारखे विद्यापीठांचे कुलगुरू, सनदी अधिकारी यार्दी, द. वा. पोतदार, नागपूरचे साहित्यिक कोलते, येरकुंटवार अशा अनेक विद्वानांनी ती गौरविली आहेत. मुंबईतल्या लोकसत्तेने प्रसिद्धीही दिली. त्या वेळेच्या संपादकांनी (मा. श्री. विद्याधर गोखले) लेखांवर काढलेली जी व्यंगचित्रे होती त्यामुळेही ती प्रसिद्धी अधिक उठावदार झाली. स्त्री स्वातंत्र्याचा अर्थ, गीताजयंती, मनुस्मृती, रामायणावरील आक्षेपांचे निरसन, समाधीचा योग्य मार्ग, जीवनसाथी - गीता, पर्यावरण, तत्त्वज्ञान-समन्वय अशाही विविध विषयांवर ते बोलले आहेत.

त्यांची चिंतनशीलता या व्याख्यानांच्या यशस्वीतेशी निगडीत आहे. काही वेळा त्यांचा आक्रमक पवित्रा सावरकरांच्या व्याख्यानांची आठवण करून देतो. विधाने सुस्पष्ट ठाशीव! खंडण विशेषतः रामायण-महाभारतावरील आक्षेपांचे असले की संबंधित लेखकांच्याच अन्य पुस्तकातलेच पुरावे सादर करून त्यांच्या लेखनातील फोलपणा स्पष्ट करीत. ऐतिहासिक उदाहरणे देत. मात्र एक मोठा कटाक्ष त्यांनी पाळला होता तो म्हणजे पुराव्याशिवाय खंडण नाही आणि व्यक्तिद्वेषाला स्पर्शही नाही. जाता जाता सामाजिक व राजकीय उणीवांना कोपरखळ्या देत!

पुण्यातल्या गायआळी राम मंदिरात रामाचा राज्याभिषेक समारंभ (पाच दिवसांचा) झाला. त्यात तीन व्याख्याने अप्पांची झाली. ती रामायणावरील आक्षेप खंडणाची. दुर्दैवाने ती सारी टेप झाली नाहीत. पण फार मौलिक होती. भिशीकरांनी आपल्या एका भाषणात त्यांचे अपरंपार कौतुक केले. १९७७ च्या वैशाखातली ही गोष्ट आहे.

अप्पांनी रामराज्याचे वर्णन उत्तम प्रकारे केलेच पण आजच्या निधर्मी राजसत्तेतही त्याची गरज कशी ते सांगितले. नंतर वालीवध, शूद्र तपश्चर्या, अहिल्या शापमोचन तसेच सीतात्याग असे आक्षेपांचे विषय स्पष्ट केले. पैकी वाली वध पाहू.

वालीला आडून मारले गेले हा रामाने केलेला अन्याय! अप्पांचे थोडक्यात या आक्षेपाचे निरसन असे - इंद्राने वालीला दिलेली दिव्य माळ - तिचा प्रभाव ध्यानात घेऊन त्याला समोरून मारणे शक्य नव्हते. त्याचे असंख्य अपराध - सर्वात मोठा अपराध स्त्री अपहरण. एकदा शत्रू ठरला की नीति सांभाळणे गरजेचे नसते. शिवाय वाली पशू होता. अशा वेळी नीति सांभाळणे म्हणजे सद्गुण विकृती! विशेष म्हणजे रामायणातच रामा मी तुला उगाच नावे ठेवली - मला क्षमा कर असे वालीच श्रीरामांना विनवितो असे उल्लेखले आहे.

सीतात्यागाचा आक्षेपही असाच! सीता म्हणते आहे - तू राजा म्हणून तुझे हे कर्तव्य तू पार पाडले आहेस. माझा त्याग केलास तरी एक राजा म्हणून तुझ्या कर्तव्यपालनाच्या कर्तृत्वामुळे तुझी कीर्ती दिगंत होईल. मी त्यात संतुष्ट आहे! सीतेचीच जिथे तक्रारीची तयारी नाही त्याबद्दल आक्षेप घेणे अयोग्य! मात्र हे सारे स्पष्ट केले ते साधार!

विषय विचित्र आणि वेगळा म्हणून अफाट गर्दीत केसरीवाड्यात १९७२ मध्ये झालेले भाषण म्हणजे आचार्य रजनीश यांच्या 'संभोगातून समाधीकडे' या ग्रंथाचे खंडण! भोगलालसा - विषयसेवन यात काहीही पाप नाही. तसे मानणे हीच विकृती आहे. गेल्या हजारो वर्षात धर्माने कुणाचे कल्याण केलेले नाही! संभोग काल योग्य प्रकारे वाढविला तर त्यातून समाधी प्राप्त होते अशा स्वरूपाची ही मांडणी होती. समाधी शब्दावर अप्पांनी थेट शास्त्रीय परिभाषेतही स्पष्टीकरण करून या खंडणाचा प्रारंभ केला. विषय गंभीर होता म्हणून अप्पांनाही आपली भाषा फार जपून वापरावी लागली. एक साधेच उदाहरण दिले. ते म्हणाले, एखाद्याचे लक्ष नसले, जवळ बोलले तरी त्याचे लक्ष जात नाही. मग त्याला हात लावून आपण म्हणतो, 'अरे समाधी लागली का रे!' मग तो भानावर येतो. इतक्या सामान्य अर्थाने ही समाधी ही पूर्ण निष्क्रियता दाखवणारी बाब आहे. मग संभोगावस्थेत तर क्रिया हीच महत्त्वाची असते. मग समाधी असे त्याचे समर्थन करणे योग्य कसे ठरेल!

विशेष म्हणजे पुणे विद्यापीठातले काही परिचित प्राध्यापकही तेथे आलेले होते. विद्यापीठातलेच मा. कै. क्षीरसागरांची प्रस्तावना या

ग्रंथाला होती. त्यांचीही थोडी हजेरी अप्पांनी घेतली आणि समाज किती आंधळेपणाने नादी लागतो म्हणून तोही दोष (समाजाचा) दाखवायला ते विसरले नाहीत. एक गाजलेले ग्रंथ खंडण असे याला म्हणता येईल. या व्याख्यानालाही अफाट गर्दी जमली होती. याच व्याख्यानावरचा विस्तृत लेख नंतर प्रकाशित झाला! (अप्रकाशित गद्य खंडात तो समाविष्ट आहे.)

महाभारतावरील त्यांची भाषणे इतकी लोकप्रिय झाली, इतकी आकर्षक व आक्षेपकांना निरुत्तर करणारी ठरली की त्या संबंधी मी फार काही लिहिण्याची गरजच नाही. नांदेडचे न्या. फडकर यांचे एक विधान मांडतो म्हणजे पुरेसे होईल. ते म्हणतात - ''बिनतोड! केम टू स्कॉप + बट रिमेंड टु प्रे'' अशी माझी अवस्था झाली. श्री. साधले यांना लिहिलेल्या उत्तरातील पुढील संदर्भही महत्त्वाचा आहे. अप्पा लिहितात, 'माझे हे पुस्तक मी भोळ्या भाविकतेने लिहिलेले नाही, रोखठोक तर्कवादाचा, साधार चिकित्सेचा अवलंब मी येथे केला आहे.' नू. म. वि. पुणे येथील व्याख्याने आजही हजारोंच्या स्मरणात आहेत.

पुण्याच्या वसंत व्याख्यानमालेतले मनुस्मृतीवरचे व्याख्यान आकर्षक झाले. आमच्या न्यू इंग्लिश स्कूलच्या मोकळ्या मैदानात ही व्याख्याने होत.

मनुस्मृतीकडे बघण्याची विकृत दृष्टीच आपल्या अध:पाताला कारण आहे असे ते म्हणाले. जडवाद व निधर्मी राज्ययंत्रणा यांचेमुळे होणारी हानी स्पष्ट करताना त्यांनी सामान्यांची जीवननिष्ठाच ढासळू लागल्याचे सांगून लॉर्ड ॲक्टन याचे एक विधान ऐकविले ते असे - ईझम करप्ट्स पीपल्स माईंड, पॉवर करप्ट्स् ओन्ली इट्स पझेसर्स! परकी राजसत्ता अन् आपली निधर्मी राजसत्ता दोन्ही जीवननिष्ठा निर्माण करू शकत नाहीत!

या शिवाय वर्णव्यवस्था, राज्ययंत्रणेची कर्तव्ये या विषयांवरही त्यांनी प्रकाश टाकला. आजही मनुस्मृती अभ्यासाचा विषय आहे जाळण्याचा ग्रंथ नव्हे हेही सांगितले.

१९७३ मध्ये त्यांनी स्वातंत्र्याचा पोवाडा लिहिला. त्या आधी नू. म. वि. मध्ये 'स्वातंत्र्याचा अर्थ' या विषयावर एक भाषण केले. त्यात राज्यकर्त्यांची नावे न घेता त्यांनी म्हटले, 'सत्य अहिंसेचे पुजारी सहस्रावधी हिंदूंची हत्या करणाऱ्या मोपल्यांविरुद्ध एक शब्द काढीत नाहीत तर श्रद्धानंदांची हत्या करणाऱ्या मुस्लिमाला सौम्यपणाने वागवा असा आदेश देतात. सत्तालोलुपतेने हिंदुस्तानचे तुकडे पाडून स्वातंत्र्य मिळविले. व्यष्टी समष्टीचा तोल सांभाळण्यासाठी महाभारतातल्या एका श्लोकाचाही उल्लेख त्यांनी केला.'

**''यस्मिन् यथा वर्तते यो मनुष्य: ।**
**तस्मिंस्तथा वर्तिज्ञव्यं स धर्म:।**
**मायाचारो मायया बाधितव्य:।**
**साध्वाचारो साधुना प्रत्युपेय:।।''**

१९९२ मध्ये आळंदीतले संत संमेलनही त्यांनी गाजविले हे सर्वश्रुत आहे.

पूर्ण यशस्वी जीवन जगलेल्या पू. अप्पांची **आचारसंहिता** आता बघणे उचित होईल. नोकरी अल्पकाळ केली. पण पूर्ण प्रामाणिकतेने. यथालाभात संतोष ठेवून! ते स्वत: लिहितात, ''सामान्य सदाचरणी मग्न विचारात सर्वदा राही!'' हे त्यांचे सामान्य सदाचरण असामान्य होते. (शेतजमिनीचा एक व्यवहार रुढ लोक पद्धतीने केला. झालेल्या नफ्याची चौकशी करून ती रक्कम पंतप्रधानांच्या दुष्काळ निधीत टाकली.) ईश्वरी सत्ता तिची व्यापकता याच चिंतनात ते रहात. (नित्यानित्यविवेक जागृत ठेवीत) विष्णुसहस्रनामाचा अखंड ध्यास!

त्यांनी कीर्तने, प्रवचने, व्याख्याने यासाठी कोणतेही मानधन कधीही घेतले नाही. मागितले तर नाहीच नाही. प्रवासखर्चही आपला आपण केला. कुणी गाडीची व्यवस्था करून ने-आण केली तरी त्यांना अवघड वाटे. प्राचार्य असताना कॉलेजच्या कामासाठी गाडीचा वापर केला, पण स्वत:च्या कामासाठी सायकल वापरली. विलक्षण कटाक्षाने वागले.

कठोर आत्मपरीक्षण करीत, आपल्या ग्रंथाची जाहिरात केली नाही, करू दिली नाही. आपल्या ग्रंथावर फोटो छापणे वा लेखक परिचय देणे त्यांना योग्य वाटत नव्हते. मीच विचारलेल्या प्रश्नांच्या एका उत्तरात ते म्हणाले, 'लेखक असा इतका मोठा आहे - तो चुकणारच नाही, अशी वाचकाची भूमिका लेखकाची माहिती देऊन आधीच निर्माण करणे अयोग्य आहे!'

आपल्या गुरूंच्या ग्रंथावर त्यांच्या प्रमाणे ओवीबद्ध रचना केली नाही. (उपनिषद) ग्रंथ गद्यस्वरूपात मांडले. पुण्या-मुंबईत ज्ञानेश्वर अध्यासनासाठी कीर्तने व्हायची होती. योजनेत असणाऱ्या आम्ही कार्यकर्त्यांनी गर्दी होणार म्हणून अप्पांच्या ग्रंथांचा स्टॉल ग्रंथ विक्रीसाठी टाकायचा ठरविला. त्यांना कळताच ते काहीशा कठोर शब्दातच नकार देते झाले. गुरुभक्तीतून 'दासगणू प्रतिष्ठान' निर्मिले! मात्र संस्थेवर आपला भार पडणार नाही याची दक्षता स्वत: घेतली. कार्यकर्त्यांनाही तेच सांगितले. एकाच वाक्यात सांगायचे तर त्यांनीच म्हटलंय,

**''अस्मिन् शरीरे यत्शक्यं सर्वं तत् यत्नत: कृतम्**
**गीताया: नियतं कर्म न कदाचिदुपेक्षितम्।''**

असो. विषय खूप विस्ताराचा. लेखन काहीसे लांबले. विचक्षणांनी क्षमावे अशी विनंती. एक मात्र लाभ झाला. या लेखनाच्या निमित्ताने माझ्याजवळच्या सर्व टिपणांचा उपयोग करता आला ही भाग्याची गोष्ट! त्यांच्याच शब्दात ...

**''अनाथ जनवत्सला गुरुवरा दयेच्या घना।**
**तदीय चरणी असे विनत एकची प्रार्थना।**
**तरंग उठती सदा विकृत संशयाचे जिथे ।**
**असे कुटिल जे करा सरळ सद्गुरो चित्तते ।।''**

**डॉ. श्री. ग. प्र. परांजपे**
ब्लॉक नं. ७, विठ्ठल नगरी,
उपाशी विठोबा मंदिराशेजारी, पुणे ४११ ०३०
फोन - २४४७११०९

•••



# स्वामी वरदानंद भारती यांनी मांडलेले तत्त्वज्ञान तथा समन्वयाद्वैत दर्शन

**डॉ. सौ. कल्याणी माधव नामजोशी**

एम. एस्सी. (इलेक्ट्रॉनिक्स) एम. ए. संस्कृत. पीएच. डी. (संस्कृत वेदांत), गरवारे महाविद्यालयांत २ वर्षे प्राध्यापक. 'साक्षेप समर्थांचा', 'एका जनार्दनी', 'तेजाचं चांदणं' या पुस्तकांचे सहलेखन. वैदिक वाङ्मय, उपनिषदे, भगवद्गीता, ज्ञानेश्वरी, दासबोध व इतर संत वाङ्मयावर ६००० पेक्षा जास्त व्याख्याने व प्रवचने. प. पू. स्वामी वरदानंद यांच्या शिष्या.

श्रीज्ञानेश्वर माऊली श्रीज्ञानेश्वरीच्या सोळाव्या अध्यायाच्या नमनात म्हणतात,

**जया तुझिया उद्देशासाठी । पश्यंती मध्यमा पोटी ।**
**सूनि परेसीही पाठी। वैखरी विरे ।।२०।।**
**तया तूते मी सेवकपणे । लेववी बोलकेया स्तोत्राचे लेणे।**
**हे उपसाहावेही म्हणता उणे। अद्वयानंदा ।।२१।।**
**परी रंके अमृताचा सागरू । देखिलिया पडे उचिताचा विसरू।**
**मग करू धावे पाहुणेरु। शाकांचा तया ।।२२।।**
**तेथे शाकुही कीर बहुत म्हणावा। तयाचा हर्षवेगुचि तो घ्यावा।**
**उजळोनि दिव्यतेजा हातिवा। ते भक्तीचि पहावी।।२३।।**

ज्या तुझी स्तुती करण्याच्या हेतूने, मध्यमा व पश्यंती या वाचा पोटात घालून, नंतर परेसह वैखरी नाहीशी होते असा जो तू, त्या तुला मी सेवकपणाच्या नात्याने शब्दांनी स्तुती करण्याचा अलंकार घालतो, तर माझे हे करणे सहन करावे असे म्हणणेही, अहो अद्वितीयानंदा श्रीगुरो, आपणास कमीपणा आणणारे आहे. दरिद्री पुरुषाला अमृताच्या सागराचे दर्शन व्हावे व त्यामुळे अतिहर्षाने अमृताच्या सागराच्या योग्य आतिथ्याचे भान हरपावे असे होते. आणि मग तो हर्षभराने त्या सागराला भाजीपाल्याचा नैवेद्य दाखविण्याची धावपळ करतो. तेथे भाजीपालाही पंचपक्वान्नांच्या जागी समजावा. भाजीपाल्याकडे न पाहता त्याचा आनंद लक्षात घ्यावा. सूर्याला काडवातीने ओवाळण्यात, काडवातीकडे लक्ष न देता त्या ओवाळणाऱ्याची भक्तीच पहावी. त्यासाठी माऊली फार सुंदर दृष्टान्त देतात. ते म्हणतात की बालकाला जर योग्य काय ते कळले तर मग बालपणच उरत नाही ना, पण बालकाच्या अज्ञानातही मातेला मात्र संतोषच असतो. ओढ्याचे घाण पाणी गंगेला तुडवीत येऊन मिळाले तर त्याला गंगा 'बाजूला हो' असे म्हणत नाही. मग मला सद्गुरुनाथ कसे अव्हेरतील? श्रीसद्गुरूंना वंदन करताना माऊलींच्या शब्दांसारखे भांडवल पामरांना कोठे गवसावे?

श्री सद्गुरु आचार्य स्वामी वरदानंदांच्या वाङ्मयाला नमन म्हणजे स्वामीजींना नमन! कारण पू. स्वामीजींनी त्यांच्या निरोपाच्या काव्यात म्हटले आहे की,

**'मी' म्हणजे ना शरीर। मी मद् – ग्रंथांचा संभार ।।**
**त्याचे वाचन चिंतन। यथाशक्ती आचरण।।**
**हीच गुरुपूजा खरी। नीट धरावे अंतरी।।**

– श्रावण वद्य ११ – शके १९२४

उपनिषदे ब्रह्मसूत्रे व भगवद्गीता या तीन ग्रंथांना वेदान्तांची प्रस्थानत्रयी म्हणतात. पहिले प्रस्थान उपनिषदे त्यांना श्रुतिप्रस्थान म्हणतात. दुसरे प्रस्थान ब्रह्मसूत्रे, यांना तर्क किंवा न्यायप्रस्थान म्हणतात. श्री मद्भगवद्गीता हे तिसरे प्रस्थान! तिला स्मृतिप्रस्थान असे म्हणतात. प्रस्थानत्रयीवर भाष्यरचना करणारा तो आचार्य असे मानले जाते. भारतात पाच आचार्य मान्यता पावलेले आहेत. ते प्रमुख पाच आचार्य पू. शंकराचार्य, पू. रामानुजाचार्य, वल्लभाचार्य, निम्बार्काचार्य होत. स्वामी वरदानंद भारती हे सहावे आचार्य आहेत. ते या साखळीतील महत्त्वाचा दुवा आहेत. या आचार्यांच्या ठिकाणी मतभिन्नता पुष्कळच आहे. हे सर्व मतभेद काही समान भूमिका मान्य करून त्यावर अधिष्ठित आहेत. या विश्वाची प्रतिष्ठा ब्रह्म या चेतन तत्त्वावर आहे, जडांवर नाही. मोक्ष हा परम पुरुषार्थ होय. आत्मस्वरूप साक्षात् जाणल्याने मोक्ष मिळतो, मोक्ष ही नित्य वस्तु आहे व या सर्व सिद्धांतांना वेद हेच प्रमाण होय.

सर्व आचार्यांची वैचारिक भूमिका सुस्पष्ट, समृद्ध, तर्कसंगत तरीही एकमेकांपेक्षा भिन्न आहे. महत्त्वाची गोष्ट अशी की ती भिन्नता वरील समान गृहीतकृत्यावर आधारित आहे. तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रातील हे सहा समर्थ, प्रभावशाली, चिंतनीय विचारप्रवाह आहेत. तत्त्वज्ञानाची

श्रीशंकर
ॐ
श्रीः 卐

या वेदोपनिषत्स्वनादिसमयाद् मूलं बिभर्ति स्वकम् ।
या रामायणभारतादिषु हिता प्राज्ञैः समारम्पिता ॥
या वै व्यष्टिसमष्टिमङ्गलकरी सम्पूर्णताबोधिनी ।
तां वन्दे विनयेन तत्परतया श्रीभारतीसंस्कृतिम् ॥

वरदानंद भारती

**श्रीवरदानंद भारती यांचे हस्ताक्षर**

भिन्न भिन्न मतप्रणाली, विचारप्रवाह घेऊन हे सहाही आचार्य भारतीय समाजजीवनात उतरले आहेत. तत्त्वज्ञानासाठी तत्त्वज्ञान, मांडणीच्या वैविध्यासाठी तत्त्वज्ञान, वैचारिक वैभव बुद्धविलास, पांडित्य प्रदर्शनासाठी तत्त्वज्ञान किंवा आपले वेगळेपण वैशिष्ट्यांसहीत उठून दिसण्यासाठी वेगळा विचार, वेगळे मत मांडावे ही कुणाही आचार्यांची भूमिका दिसत नाही. उलट तत्त्वज्ञान - विचार हा शब्दच्छल नसून तो जीवनाचा अविभाज्य भाग झाला पाहिजे. अशीच या समाजहितैषींची तळमळ आहे. त्यातूनच प्रचार-प्रसारासाठी प्रत्येक आचार्याने अथक परिश्रम घेतले आहेत.

**स्वामी वरदानंद भारती – अल्प परिचय**

स्वामी वरदानंद भारती यांचा जन्म २७ सप्टेंबर १९२० साली पुण्यात झाला. त्यांनी ५ सप्टेंबर २००२ साली स्वेच्छा समाधी घेऊन देह सोडला. वरदानंदांनी ब्रह्मचर्य ते संन्यास या चारही आश्रमांचे यथायोग्य पालन करून भक्तिमार्गाने अद्वैतानुभूती गृहस्थाश्रमात प्राप्त करून घेतली.

बालवयापासून त्यांनी तत्त्वज्ञानाचा आजीवन व्यासंग केला. गृहस्थाश्रमात विहितकर्माचे काटेकोर आचारण करून यथाकाल वानप्रस्थाश्रमाचा स्वीकार केला. वयाच्या सत्तराव्या वर्षी संन्यासाश्रमाचा विधिवत् स्वीकार करून वैदिक धर्माप्रमाणे ते कृतार्थ जीवन जगले.

स्वामी वरदानंदभारती यांची गुरुपरंपरा थोर आहे. शिर्डी निवासी श्रीसाईबाबा, श्री. वामनशास्त्री इस्लामपूरकर - संतकवी श्रीदासगणु महाराजांचे गुरु. श्रीदासगणू, स्वामी वरदानंदभारती पूर्वाश्रमीचे प्राचार्य अनंत दामोदर आठवले यांचे गुरु. संतकवी श्रीदासगणूंचे दोन लाखांच्या घरात पद्यसंख्या असलेले, विविधतेने समृद्ध असलेले अत्यंत प्रासादिक काव्य प्रसिद्ध आहे. दासगणूंच्या वाङ्मयाची प्रमुख वैशिष्ट्ये अशी सांगता येतील- समन्वयाची भूमिका, समाजाभिमुखता, समाज आणि राष्ट्रहिताची अत्यंत तळमळ. स्वामी वरदानंद भारती यांच्या वाङ्मयावर श्री दासगणूंच्या वैचारिक भूमिकेचा पूर्ण ठसा उमटलेला दिसतो वरदानंदांची वाङ्मयसंपदाही श्रीदासगणूंच्या प्रमाणेच विपुल आहे. या वाङ्मयाच्या निर्मितीने महाराष्ट्र सारस्वतात त्यांनी मोलाची भर घातली आहे. या गुरुशिष्यांची वाङ्मयसंपदा व श्रेष्ठ अनुभूती या रूपाने जणू एक ज्ञान-भक्ती-तत्त्वपीठच महाराष्ट्रात गोरटे ग्रामी निर्माण झाले आहे.

स्वामी वरदानंदभारती हे श्रेष्ठ गुरुपरंपरा प्राप्त असलेले विसाव्या शतकातील एक यशस्वी प्राचार्य, कुशल वैद्य आणि प्रशासक, उत्तम वक्ते, रसाळ प्रवचन आणि कीर्तनकार, नि:स्पृह, परखड समाज-प्रबोधनकार, श्रेष्ठ महाकवी, संपादक, विचारवंत या सर्वांपेक्षाही एक तप:पूत थोर अध्यात्मिक जीवन जगणारे प्रसिद्धीपराङ्मुख तत्त्वचिंतक अशा विविध अंगांनी संपन्न असलेले व्यक्तिमत्त्व होते. त्यांनी मांडलेल्या तत्त्वप्रणालीचा थोडक्यात आढावा घेण्याचा येथे प्रयत्न केला आहे.

**श्रीवरदानंद भारती – तत्त्वज्ञान**

विसाव्या शतकात वरदानंदांनी आचार्यभाष्यांचा तसेच भागवत धर्मातील, संत परंपरेतील, तत्त्वज्ञानाचा समन्वय करून साधना प्रधान[1] भाष्याची रचना केली. त्यांची भाष्यरचना अनेक कारणांनी वैशिष्ट्यपूर्ण आहे. वरदानंदांच्या तत्त्वप्रणालीला 'समन्वयाद्वैतदर्शन'[2] या नावाने संबोधिले आहे.

वरदानंदांचे तत्त्वज्ञान शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाला अनुसरणारे आहे. ते स्वत:ला शंकराचार्यांचे भक्त म्हणवितात.[3] शंकराचार्यांचा केवलाद्वैतसिद्धांत त्यांना मान्य आहे. त्यानुसार ते केवल ब्रह्माचे सत्यत्व, जगताचे मिथ्यात्वही मान्य करतात. जीव आणि ब्रह्म यांच्यातील अभेदही त्यांना मान्य आहे.[4] परंतु ज्ञानानेच मोक्षाची, स्वरूप प्राप्ती होते असे मात्र त्यांचे मत नाही.

शंकराचार्य कर्म नाकारतात. वरदानंदांना कर्माचरण मान्य आहे. किंबहुना यज्ञयागांचा पुरस्कार वरदानंदांनी आवर्जून केला आहे. शंकराचार्यांच्या दृष्टीने ज्ञानानेच मोक्षाची प्राप्ती होते. त्यासाठी त्यांना साधन चतुष्ट्याची अपेक्षा आहे. तर वरदानंद ह्या दोहोंच्याही संदर्भात वेगळे मत मांडतात. वरदानंदांच्या मते- 'त्रिविध तापाने पोळलेला, जीवनातील सुखदु:खात्मक अनुभवामुळे प्रपंचाचे असारत्व प्रत्ययाला आलेला, विवेकाने जगाचे क्षणभंगुरत्व जाणणारा असा सामान्य जीव ज्याचा 'वैराग्य' शब्दाशी कदाचित् सुतरामही संबंध नाही असा, परमेश्वराविषयी कुतुहलाने का होईना मोक्ष जिज्ञासा निर्माण झालेला पुरुष मोक्ष मार्गाचा अधिकारी आहे.''[5]

वरदानंदांच्या मते परमार्थप्राप्तीसाठी उद्युक्त झालेला जीव हा प्राथमिक स्तरावर ईश्वरप्राप्तीची, मुमुक्षुत्वाची इच्छा आकांक्षा ठेवणारा असेलच असे नाही. कदाचित् सुरुवातीला त्याची अपेक्षा जीवनातल्या प्रतिकूलतेपासून मुक्तता आणि मनाची शांतता या दोन गोष्टींची पूर्तता हीच असू शकेल. ईश्वरभक्ती, नामस्मरण, संकीर्तन, श्रवण, सदाचार, सन्नीती, सद्वासना, सद्ग्रंथांचे वाचन, श्रवण, मनन आदींचा अंगीकार केला असता अंत:करणामध्ये ईश्वराविषयी परम अनुराग यथावकाश निर्माण होतो. परमार्थाचे मंद, मध्यम व तीव्र अधिकारी असे भेद करता येतात, असे त्यांचे मत आहे.

भक्ताने भक्ताच्या बाजूने शुद्ध भक्ती करावी. भक्तीचे 'उत्कटता' हे गमक आहे. उत्कटतेला देहाचीही मर्यादा पडावी असा उत्कट भाव शिगेला पोहोचावा. हा अधिकार प्राप्त झालेला भक्त परमार्थमार्गाचा उत्तम अधिकारी ठरतो. तर साधनमार्गावर प्रामाणिकपणे साधना करीत परमार्थमार्गाने सातत्याने वाटचाल करणारा परमार्थाचा मध्यम अधिकारी ठरतो. संकटकाळी परमेश्वराला आवाहन करणारा सकाम भक्त संकटमुक्त होताच परमेश्वराविषयी उदासीन राहणारा, सातत्याने साधना - उपासना न करणारा, आळशी व ढोंगी मंद अधिकारी मानावा किंवा उपासनेस अयोग्य समजावा. कारण वरदानंदांना आळस आणि दंभ हे दोन दोष साधकाच्या ठायी मान्य नाहीत.

१) ब्र.सू.द.पृ. (१४) ओवी (१४२-४८) २) उ. कौ. खंड २ पृ. (७) ओवी क्र. ७५ ते ११२, पृ. (२-३) ओवी (१८ ते २४)
३) ब्र. सू. द. पृ. (२७) (ओ. २८२) ४) 'जीवो ब्रह्मैव ना पर:'। हा आचार्य सिद्धांत त्यांना मान्य आहे. ५) ब्र. सू. द. पृ. (२७) ओवी (२८५-३०६)

**ब्रह्म** – ब्रह्म सगुण निर्गुण दोन्ही आहे. वैष्णव आचार्याप्रमाणेच वरदानंदांचे उपास्य दैवतही (वरद) नारायण विष्णूच आहे. सगुण ब्रह्माच्या उपासनेने निर्गुण ब्रह्माची प्राप्ती होते. वरदानंदांची धारणा ज्ञानदेवांप्रमाणे, 'तुज सगुण म्हणो की, निर्गुण रे। सगुण निर्गुण एक गोविंदु रे।' अशी आहे. ब्रह्म सच्चिदानंदन घन स्वरूप, 'रसो वै स:।'[१] असल्याने उपासक भक्तीने ब्रह्मरसाचा आस्वाद घेऊ शकतो. ब्रह्म विभु आहे. सर्वान्तर्यामी आहे, साक्षी आहे. एकमेवाद्वितीय आहे. 'कर्तुम् अकर्तुम् अन्यथा कर्तुम्' समर्थ आहे.

**ब्रह्म** – सगुण-साकार आणि निर्गुण- निराकार अशा व्यक्त आणि अव्यक्त स्वरूपात आहे. यामुळे ब्रह्माच्या मूलभूत स्वरूपाला बाधा येण्याचे कारण नाही. उपासनेसाठी त्याचे सगुणरूपच योग्य आहे.[२] सगुण-उपासना यथाधिकार यथावकाश अद्वैतभावात परिणत होते, त्यामुळे ब्रह्माशी जीवाचे ऐक्यही यथाकाल यथाधिकार शक्य होते, अशी वरदानंदांची समन्वयात्मक धारणा आहे.

**जगत्** – जगाचे मिथ्यात्व वरदानंदांना मान्य आहे, कारण प्रकृतीच्या ठिकाणी काहीच नित्य नाही. जगत् आणि जगदीश्वर यांच्यात अभेद आहे. या जगताचे परब्रह्म हे अभिन्ननिमित्तोपादान कारण आहे. हे आचार्यमत वरदानंदांना मान्य आहे. तसेच ते मायेचा स्वीकारही करतात.

**जीव** – शंकराचार्य म्हणतात त्याप्रमाणे 'जीवो ब्रह्मैव नापर:।' जीव आणि ब्रह्म यात अभेद आहे. जीव अविद्या या उपाधीने ब्रह्मापासून अलग भासतो. परंतु तो ब्रह्मच आहे. भक्तीचा अनुभव घेताना मात्र ब्रह्म आणि जीव यांच्यात कधी भेदभावाने रमण्यात आनंद आहे तर कधी अद्वैतभावाने एकरूप होण्यात गोडी आहे. त्यामुळे ब्रह्म आणि जीवसंबंध परमात्म्याच्या भक्तीचा आनंद लुटताना सातत्याने अद्वैतच असेल असे नाही. भक्ताला कधी द्वैतभाव स्वीकारून भक्तीचा आनंद लुटण्यातही रुची असते.

**मोक्षसाधन** – सगुण उपासना, भक्ती, ध्यान-समाधी, नामस्मरण, प्रवचन- कीर्तनद्वारा परमेश्वर उपासना, सद्ग्रंथांचे वाचन - पारायण, श्रवण, सेवा आदी मार्गांपैकी एक किंवा सोयीने दोन-तीन साधन मार्गांचा समुच्चय किंवा समन्वय.[३] करून जरी व्यक्तिगत साधना केली तरी ती भक्तिनिर्मितीला पोषक व लाभदायी ठरते. त्यांचा विशेष भर कर्तव्यनिष्ठा व आचरण, सत्पुरुषांचा संग (सहवास), गुरुकृपेकरिता परिसीमेची गुरुनिष्ठा, गुरुसेवा यावर आहे. तसेच लौकिक गुरु करण्यासारखी अनुकूलता लाभली नाही तर ग्रंथ हेच गुरु आहेत अशी त्यांची धारणा आहे. आपल्याला आवडणाऱ्या उपनिषदांपासून तुकाराम गाथा - दासबोधापर्यंत वैदिक परंपरेतील कोणताही ग्रंथ प्रमाण मानून, त्यावर निष्ठा ठेवून त्या ग्रंथातील मार्गदर्शनाप्रमाणे जीवन जगले असता भक्तीचा उदय होण्यास सहाय्य होते.

याच्या सोबतीला तीर्थयात्रा, अनुष्ठान, नेमधर्म, व्रतवैकल्य आदी कर्मकांडाचाही लाभ चित्तशुद्धीसाठी होतो. ज्यामुळे भगवंताविषयीची निष्काम भक्ती अंत:करणात उदित होते. यज्ञ-यागादींचे अनुष्ठान, अन्नसंतर्पण आदी मंगलकर्मे घरामध्ये दर सहा महिन्यांनी गृहस्थाश्रमीने करावीत. ही सर्व साधना बहिरंग मानली तर वरदानंद भारतींनी मनोवृत्ती बदलण्यासाठी व तितिक्षा आदि परमार्थाला, आवश्यक असणाऱ्या अनेक गुणांच्या प्राप्ती आणि विकासासाठी साधनेचे स्वरूप काय आणि कसे असावे याची विस्ताराने चर्चा केली आहे. त्यामुळे त्यांच्या साधनापर भाष्यामध्ये अनेक उपासनामार्गांचा मोक्षमार्गाला आवश्यक असणारा भाग चर्चात्मक स्वरूपात विस्ताराने वर्णिलेला आहे. वरदानंदांचे भाष्य मुळातच साधनापर असल्याने अत्यंत अल्प शब्दात येथे साधनेविषयी विवेचन करणे अवघड आहे.

**प्रमाण** – वरदानंदांनी शब्द, अनुमान आणि आगम अशी तीन प्रमाणे मान्य केली आहेत. त्यांनी श्रीमत् भागवत पुराणाबरोबरच संत वाङ्मयाला प्रमाणभूत मानले आहे. विशेषत्वाने ज्ञानेश्वरी, दासबोध, तुकाराम गाथा आणि एकनाथी भागवत हे चारही ग्रंथ त्यांनी श्रुतिवाङ्मयाइतकेच प्रमाणभूत मानले आहे.

**मोक्षविचार** – स्वामी वरदानंदांनी मोक्षाचा विचार त्यांच्या भाष्यामध्ये अनेक ठिकाणी मांडला आहे. महाराष्ट्रातील संत परंपरेप्रमाणेच त्यांची परमार्थविषयक धारणा आहे. उत्कट भक्ती आणि अनन्य शरणागतीतून उत्पन्न झालेले अविरत नामस्मरण, त्या विषयी उत्कटता व अवीट गोडी निर्माण होणे ही भक्तीची परिसीमा गाठणे तर मोक्षापेक्षाही अधिक आहे. मोक्ष चतुर्थ पुरुषार्थ आहे तर मोक्षावरील भक्ती हा पंचम पुरुषार्थ आहे. येथे मोक्षाचे आकर्षणच नाही, जीवन्मुक्त ही आचार्यांनी मानलेली स्थिती वरदानंदांना मान्य आहे. पण त्याचे स्वरूप, छटा थोडी वेगळी आहे. भक्तीत एक स्थिती अशी प्राप्त होते जेथे भक्ताचे सर्व पाश-बंध सुटलेले आहेत. त्याच्या प्रारब्धभोगाप्रमाणे देह भोग भोगेल, भक्ताला त्याचे काही सोयरसुतक नाही. देह देहाच्या ठिकाणी आहे. अंत:करण परमात्मचरणी पूर्ण विसर्जित झालेले आहे. त्यामुळे भक्त जीवन जगतानाही मुक्तच आहे. या अर्थाने ही जीवनमुक्ती आहे.

'ज्ञानात् एव तु कैवल्यम्।' हे वरदानंदांना अभिप्रेत नाही. साधन चतुष्ट्यातील 'नित्यानित्यवस्तुविवेक' उत्पन्न झाल्यानंतर ईश्वरप्राप्तीचा मार्ग स्वीकारावा असे त्यांना वाटत नाही. तसेच 'इहामुत्रार्थफल-भोगविराग' या संदर्भातसुद्धा साधकाच्या अंत:करणात पूर्ण विरक्ती निर्माण व्हावी अशी त्यांची अपेक्षा नाही. सामान्य मनुष्य वैराग्याची ही परिसीमा व्यवहारामध्ये गाठेल असे त्यांना वाटत नाही. जीवनातील द्वंद्वांचा सामना करताना चित्ताचे संतुलन अधिकाधिक राखण्याचा प्रयत्न सामान्य साधकाने करावा अशी त्यांची धारणा आहे. 'शमदमादिसाधन-संपत्' याही बाबतीत, शम, दम, उपरति, तितिक्षा, समाधान व श्रद्धा याविषयी शंकराचार्यांपेक्षा वरदानंदांची मते भिन्न आहेत. शमदम जेवढा अधिकात अधिक साधेल तेवढा साधण्याचा प्रामाणिक प्रयत्न करावा. उपरति म्हणजे विधियुक्त संन्यास, याची त्यांना मोक्षासाठी अजिबात आवश्यकता वाटत नाही. उलट सर्वसामान्य साधकांचा विचार करता त्यांचा आग्रह गृहस्थाश्रम स्वीकारावा असा आहे.

---

१) तै. उ. (२.१.१) २) भ. गी. (१२/२.७)
३) उ. कौ. खंड २ पृ. (७) (ओ. ७७-१०२) ब्र. सू. द. पृ. (७६४-६५) (ओ. ४५१-४५८)

ब्रह्मज्ञानासाठी संन्यास दीक्षा ग्रहणाची आवश्यकता नाही हे आग्रहाने प्रतिपादित करणारे प्राचार्य अनंत दामोदर आठवले स्वत: मात्र विद्वत् संन्यास घेऊन विधिवत् चतुर्थाश्रमाचा स्वीकार करतात. याचे कारण ब्रह्मज्ञान प्राप्तीसाठी संन्यास नसून त्यांचे सद्‌गुरु श्रीदासगणू यांची इच्छापूर्ती हे आहे. श्री. दामोदर वामन आठवले यांचा सांभाळ श्रीदासगणूंनी पुत्रवत् केला. त्यांचे निधन अल्पवयात (पंचविशीत) झाले. त्यांच्या पश्चात त्यांची पत्नी व दोन अपत्यांचा सांभाळ करण्याची जबाबदारी श्री दासगणूंवर आली. श्री दासगणूंची इच्छा संन्यास घेऊन कुठेतरी तीर्थक्षेत्री भिक्षावृत्तीने राहण्याची होती. ती पूर्ण होऊ शकली नाही. श्री. अनंतरावांनी त्यांचे जीवन, श्रीदासगणूंच्या चरणी अर्पण करून, आजीवन गुरुसेवेचे व्रतच घेतले होते. श्री दासगणूंनी त्यांच्याकडे आपली कोणतीही इच्छा बोलून दाखविलेली नव्हती. परंतु श्री.अनंतरावांनी श्री दासगणूंची संन्यास घेण्याची इच्छा अपुरी राहिली म्हणून स्वेच्छा चतुर्थाश्रमाचा स्वीकार केला. या विषयी सविस्तर खुलासा त्यांच्यावरील 'तेजाचं चांदणं' या चरित्रग्रंथात केला आहे.

समाधान म्हणजे संतोष असा अर्थ धरून द्वेष मत्सर दूर करून अंत:करण निर्मल आणि पवित्र ठेवण्यावर ते भर देतात. श्रद्धा म्हणजे वरदानंदांच्या मते केवळ वेदान्तसिद्धान्तांवरील अविचल निष्ठा नव्हे तर सगुणसाकार परमात्म्याच्या नामरूपगुणांवरील अविचल निष्ठा, तसेच त्याच्या चरणी अनन्यभावाने समर्पण. ईश्वर सर्वतंत्र स्वतंत्र आहे, तर मी त्याचे कळसूत्री बाहुले आहे. त्याच्या इच्छेत माझी इच्छा समर्पित आहे.

मुमुक्षुत्वाविषयीही शंकराचार्यांच्यापेक्षा वरदानंदांची मते भिन्न आहेत. मुमुक्षुत्व म्हणजे मोक्ष प्राप्तीविषयी जबदस्त इच्छा. वरदानंदांच्या मते ईश्वरप्रेमासंबंधी जबरदस्त ओढ निर्माण होणे, आपल्या प्रेमास्पदाचा अहोरात्र ध्यास घेणे, हृदयामध्ये प्रेमाचे विलक्षण पाझर फुटून ईश्वरप्रेमाचा रस प्रवाहित होणे हे होय. त्याचा प्रकट आविष्कार म्हणजे ईश्वराचे स्मरण झाले असता, नामोच्चार केला असता नेत्र पाझरू लागतात, शरीरामध्ये कंप, उन्माद आदी लक्षणांचा उद्‌भव होतो. अलौकिक आनंदाचा लाभ होतो. मुमुक्षुत्वामध्ये सद्‌गुरुशरणतेची अपेक्षा आहे, सेवाभावाला तेथे उत्कटता येते, सद्‌गुरु तत्त्वाची व्यापकता, उत्कट प्रेम अनुभवावयास मिळावे अशी ओढ लागते, लौकिक जीवनातील विषयासंबंधी उदासीनता, अलिप्तता निर्माण होते. असा भक्तिभाव उत्कटतेने निर्माण करणाऱ्या अनेक लक्षणांचा वरदानंदांनी त्यांच्या भाष्यामध्ये ऊहापोह केला आहे.

**मोक्षाचे स्वरूप** – सगुण साक्षात्कार, ईश्वराचे सगुण साकार दर्शन लौकिकात घडावे ही भक्ताची उत्कट इच्छा असते. ती भक्तिमार्गात पूर्ण व्हावी अशी वरदानंदांची श्रद्धा आहे. भक्ताने सतत ईश्वरभावात उत्कटतेने असणे ही भक्ताची श्रेष्ठ अवस्था आहे. 'अहं ब्रह्मास्मि।'[१] ही भावानुभूती ईश्वरसाक्षात्काराने प्राप्त होणे शक्य आहे. परंतु 'वासुदेव: सर्वमिति स महात्मा सदुर्लभ:।'[२] ही भगवद्‌गीतेत वर्णन केलेली स्थिति अनुभवाला येणे कठीण आहे. सर्वाभूती परमेश्वराची अनुभूती येणे म्हणजे जीवन्मुक्तावस्था कारण या स्थितीत 'मी नाहीच तोच' या भावाने अहंकाराची अत्यंत निवृत्ती झालेली असते. देहाच्या पातळीवर प्राप्त करून घेण्यासारखी सर्वोच्च अवस्था हीच आहे अशी त्यांची धारणा आहे.

तसेच देहाला कर्माच्या कोणत्याही स्तरावर गुंतावे लागले तरी अंत:करण सर्वकाळ ईश्वराशी जोडलेले राहणे ही भक्ती आहे. त्यामुळे देह देहाच्या स्तरावर विहिताचरण करील तर अंत:करण मात्र ईश्वराशी एकरूप होऊन राहील ही भक्तीची उत्कट स्थिति आहे, असे निरनिराळ्या प्रकारे भक्तीतील अंत:करणातल्या स्थितीविषयी वरदानंदांनी स्पष्टीकरण दिले आहे. त्याचा विस्ताराने परामर्श पुढील प्रकरणांमध्ये घेतला आहे.

**वरदानंदांना मान्य असणाऱ्या अद्वैत मतातील तत्त्वज्ञाना-विषयीच्या संकल्पना**

**१) मायावाद** – ब्रह्म हीच एकमेव सत्य वस्तू आहे. माया परमेश्वरापासून निर्माण झालेली, परमेश्वर-अभिन्न शक्ती आहे. ती परमेश्वराप्रमाणेच अनिर्वचनीय आहे. अध्यास, विवर्त आदी अद्वैत सिद्धांताच्या सिद्धीकरिता स्वीकारलेल्या सर्व प्रक्रिया वरदानंदांना मान्य आहेत.

**२) सत्तात्रयाचा सिद्धांत** – वरदानंदांनी तत्त्वज्ञानविषयक विवेचनात सत्तात्रय सिद्धांताचा अनेकवेळा आधार घेतला आहे. पारमार्थिक, व्यावहारिक आणि प्रातिभासिक सत्ता या विषयी स्वामी वरदानंद म्हणतात की साधकाने व्यावहारिक सत्तेत शरीर, मन, बुद्धीने जगतातील व्यवहार सत्य मानून करावेत. प्रातिभासिक सत्तेचा म्हणजे भ्रमात्मक संकल्पनांचा त्याग करावा आणि पारमार्थिक सत्तेचे म्हणजे ब्रह्मस्वरूपाच्या एकमेव सत्यत्वाचे अंत:करणात अव्याहत भान असावे.

३) जीवाच्या ठिकाणी अविद्या आणि ईश्वराच्या ठिकाणी माया या उपाधी त्यांना जशाच्या तशा मान्य आहेत.

४) आचार्य शंकराचार्यांप्रमाणे सृष्टी उत्पत्तिप्रक्रिया वरदानंदांना मान्य आहे. पंचीकरण, पंचकोश, पिंड-ब्रह्मांड वगैरे सिद्धांत आचार्यांप्रमाणेच मान्य आहेत.

**स्वामी वरदानंदांच्या आचार्य शंकरांच्यापेक्षा वेगळे असणाऱ्या तत्त्वविचारांचे स्वरूप :**

**ब्रह्मसंकल्पना** – सगुण ब्रह्म म्हणजे मायोपाधिक ब्रह्म अशी शंकराचार्यांची धारणा आहे. वरदानंद सगुण ब्रह्माच्या ठिकाणीच निर्गुण ब्रह्माची अभेद भावाने धारणा करतात. त्यांचे उपास्य दैवत नारायण मायोपाधिक सगुण ब्रह्म नाही, तर ते पूर्ण ब्रह्मच आहे. नारायण सगुण, निर्गुण दोन्हीही असून तो त्याच्या अतीतही आहे. येथे सगुणोपासनेची म्हणजेच विष्णु उपासनेची भूमिका इतर चार आचार्यांशी जवळीक साधणारी आहे. परंतु वरदानंदांचे एक वैशिष्ट्य असे की विष्णु उपासनेबरोबरच शिवोपासनाही त्यांना वर्ज्य नाही. उलट तिचा अंतर्भाव दैनंदिन उपासनेत केला आहे. पंढरपूरनिवासी श्रीविठ्ठल आणि बदरिकाश्रमनिवासी बदरीनारायण यांच्यात अभेद आहे अशी त्यांची धारणा आहे. ते हरिहराचा समन्वय मानतात. महाराष्ट्रातील भागवत संतांच्या भूमिकेशी ती अधिक जवळीक साधणारी आहे.

---

१) बृ. उ. (१.४.१०), २) भ. गी. (७.१९)

## वरदानंद तत्त्वज्ञानाची वैशिष्ट्ये

१) स्वामी वरदानंद शंकराचार्यांचे अनुयायी आहेत. अद्वैत वेदान्ताची केवलाद्वैत शाखा त्यांना मान्य आहे. तरीही त्यांनी प्रस्थानत्रयीवर स्वतंत्र भाष्य लिहून, विसाव्या शतकात संस्कृत भाषेला पारख्या झालेल्या सर्व बहुजन समाजाला अंगी तळवटपण धरून वेदान्त अभिमुख करून दिला.

२) वेदान्त न्यायघटित प्रक्रियांच्या बाहेर काढून सुलभ केला.

३) संत ज्ञानेश्वरांनी भगवद्गीतेवर प्राकृतात भाष्य लिहून तत्त्वज्ञान जनसामान्यांना उपलब्ध करून दिले. त्यांना अनुसरून वरदानंदांनी वेदान्ताच्या प्रस्थानत्रयीवर भाष्य लिहून तत्त्वज्ञान जनसामान्यांना खुले केले.

४) तत्त्वज्ञान आणि दैनंदिन व्यवहार यांचा मेळ घालून सामान्य जीवाला अध्यात्म विचार, आचारांचा लाभ प्राप्त करून घेण्यासाठी बोध केला आहे व भाष्य लिहिले आहे.

५) साधनापर भाष्य लिहून ते जनसामान्याभिमुख केले आणि सामान्य जनांना वेदान्ताचा प्रत्यक्ष जीवनामध्ये उपयोग कसा करून घ्यावा हे अत्यंत सोप्या आणि व्यावहारिक पद्धतीने विशद केले.

६) जनसामान्यांना वेदान्ताच्या मूलस्रोतापर्यंत थेट नेऊन पोहोविण्याचे कार्य वरदानंदभाष्याने केले आहे.

७) आचार्य शंकरांप्रमाणे प्रत्यक्ष, अनुमान, आगम या तीन प्रमाणांचा स्वीकार करून वरदानंदांनी श्रीमत् भागवत पुराणासहित संत वाङ्मयालाही प्रमाणभूत मानले आहे.

८) इतर चार आचार्यांप्रमाणे सगुण-सविशेष ब्रह्माचा अत्यंत आग्रहाने पुरस्कार करून नारायण देवतेला उपास्यदैवत म्हणून स्वीकारले आहे. विष्णु-उपासनेतून जनसामान्याला शुद्ध भक्तीमार्गाची वाट चोखाळून दाखविली आहे.

९) भक्ती हा त्यांच्या जीवन आणि तत्त्वज्ञानाचा प्राण आहे. या उत्कट आणि अखंड भक्तीला त्यांनी शुद्ध भक्ती असे नाव दिले आहे. नारायणाची निष्काम भक्ती जीवेप्राणेवित्तेचित्ते करावयाची. परमेश्वराच्या कृपानुग्रहाने भक्तीतून उत्कट, अधिक उत्कट भक्ती प्राप्त करून घ्यावी आणि त्या उत्कटतेचा अनुभव हेच भक्तीचे फल होय.

१०) भक्तीच्या मार्गावर स्थिरपद होण्यासाठी ईश्वर किंवा गुरु यांच्या कृपानुग्रहाची आवश्यकता आहे. त्यासाठी निस्सीम गुरुनिष्ठा व उत्कट भावाने परमेश्वर उपासना अपेक्षित आहे. भक्तिमार्गातील अंतिम स्थितीही गुरुकृपेने, ईश्वरकृपेनेच प्राप्त होते अशी त्यांची धारणा आणि अनुभव आहे.

११) पाचही आचार्यांना स्वमताच्या प्रसारार्थ आग्रही भूमिका धरून कार्य करावे लागले. त्यातही विशेषत्वाने शंकराचार्य, रामानुजाचार्य व मध्वाचार्य यांनी अत्यंत हिरीरीने कार्य केले. ती भूमिका वरदानंदांची नाही. कारण त्यांची भूमिका समन्वयाची असल्यामुळे महर्षि वेदव्यासांपासून ते त्यांचे सद्गुरु श्रीदासगणू यांच्यापर्यंत सर्वश्रेष्ठ विभूती त्यांच्या दृष्टीने समान आहेत. तसेच ते सर्वजण समान पातळीवरही आहेत. (अधिकार आदी सर्व दृष्टीने) सर्वजण लोककल्याणाच्या एकाच समान मार्गाचा पुरस्कार करीत आहेत. त्यामुळे सांप्रदायिक अभिनिवेशाची भूमिका कोणाच्याही ठिकाणी निर्माण होऊ नये अशी त्यांची मनोमन धारणा आहे. त्यांनी देवताविचारही अत्यंत व्यापकतेने मांडला आहे. पतञ्जलींनी म्हटल्याप्रमाणे, 'यथाभिमतध्यानाद्वा।' पतञ्जली यो. सू. (१-३९)

ज्याला जे दैवत रुचेल ते त्याने स्वीकारावे. शिव-शक्ती-गणपति-सूर्य-विष्णु 'रुचीनां वैचित्र्यात्।' पुष्पदंताच्या शिवमहिम्न-स्तोत्रात म्हटल्याप्रमाणे आपल्याला आवडणाऱ्या दैवतांच्या ठिकाणी निस्सीम भाव असावा. तसेच इतर सांप्रदायिकांशी सलोखाच असावा. तेथे कुणालाही परास्त करण्याची ईर्षा नसावी हा त्यांच्या समन्वयात्मक विचारांचा एक पैलू आहे.

१२) वरदानंदांची प्रामाणिक धारणा अशी आहे की शंकराचार्यांपासून मध्वाचार्यांपर्यंत सर्व आचार्य कालाला आणि भिन्न भिन्न प्राकृतिक भूमिकांना अनुसरून, तत्त्वज्ञानाला एका विशिष्ट धारणेने बंदिस्त करून स्वमताचा पुरस्कार समाजाने करावा यासाठी प्रसार-प्रचार अत्यंत अभिनिवेशाने करतात. परंतु सर्व आचार्य कालानुरूप असलेले त्यांचे कार्य करून गेले आहेत. आज जर ते सर्व पृथ्वीतलावर एकत्र येतील तर ते अभिनिवेशाने कोणत्याही खंडन-मंडनाच्या प्रक्रियेत आणि आग्रहात न पडता सर्वजणच एका समन्वयाच्या भूमिकेवरून ब्रह्म, वेद आणि वेदान्ताची चर्चा करतील. त्यामुळे समान अधिकार असलेले हे सर्व आचार्य वरदानंदांना सारखेच वंदनीय आहेत.

१३) सर्व आचार्य तत्त्वज्ञान प्रतिपादनाच्या स्तरावर भिन्न भिन्न भूमिका स्वीकारतात. परंतु लोककल्याणाच्या स्तरावर शंकराचार्यांपासून वल्लभाचार्यांपर्यंत सर्व आचार्य संतच आहेत. आचार्यांचे संतत्व आणि महाराष्ट्रातील भक्तिमार्गी संतांचे संतत्व यात काही भेद आहे असे वरदानंदांना वाटत नाही.

१४) वरदानंदांच्या ठायी आचार्य व सर्व संतांविषयी सारखाच आदर आणि स्वीकार आहे. संत कबीर, पुरंदरदास, तिरुवेल्लूर या सारखे परप्रांतीय संत, तर वासुदेवानंद सरस्वती, दत्तसंप्रदायी, ज्ञानेश्वरांसारखे नाथसंप्रदायी संत, योगी तसेच विनोबाजी, गुरुदेव रानडे, रामकृष्ण परमहंस यासारखे आधुनिक संत या आणि अशा सर्वांच्या विषयी त्यांच्या ठिकाणी आदर आहे. त्याचे प्रतीक म्हणून दैनंदिन उपासनेत या संतांचे स्मरण, त्यांच्या वाङ्मयाचा अंतर्भाव तसेच वरदानंदांची त्यांच्यावर रचलेली स्तोत्रे, काव्य, आरत्या आदी वाङ्मय त्याची साक्ष आहेत.

१५) वरदानंदांना वेदांताची केवळ चर्चा मान्य नाही. तर त्याचा जीवनात अंतर्भाव करावा असा आग्रह आहे. विहित कर्माचरण, स्वधर्मनिष्ठा, आणि कर्तव्यपालन यावर त्यांचा अतिशय भर आहे. प्रत्येकाने प्राप्त परिस्थितीत तत्त्वज्ञान झेपेल तसे जगावे असे त्यांचे मत आहे. कारण विसाव्या आणि येणाऱ्या एकविसाव्या शतकात

विज्ञानयुगाच्या प्रभावाने औद्योगिकीकरण, गतिमानता, सदोष जीवनपद्धती यामुळे मानवी जीवन धोक्यात आलेले आहे. त्याला सावरण्याचा एकमेव शाश्वत उपाय हा वेदप्रणीत जीवनपद्धती आणि तत्त्वज्ञान आहे अशी त्यांची दृढ श्रद्धा आहे. त्यांच्या भाष्याचे स्वरूप साधनपर तर आहेच परंतु प्रापंचिक जीवनातून दैनंदिन व्यवहारातून दूर राहूनच साधना केली पाहिजे असे नाही. तर मनुष्य जिथे ज्या परिस्थितीत आहे तिथे, त्याला झेपेल अशी सुलभ साधना आणि त्याचे स्वरूप वरदानंदांनी वेदांताच्या प्रस्थानत्रयीवर भाष्य करताना तसेच अनेक इतर ग्रंथांमध्ये प्रतिपादित केले आहे.

**शंकराचार्यांच्या सिद्धांतापासून वरदानंदांचे वेगळेपण दर्शविणारे मुद्दे**

१) मोक्षासाठी संन्यासाश्रमाची म्हणजे चतुर्थाश्रमाची आवश्यकता नाही. वर्णाश्रमधर्माप्रमाणे चतुर्थाश्रम स्वीकारावयाचा असल्यास त्याचे पालन यथायोग्य विधिवत् करता येत असेल तरच संन्यासाश्रमाचा स्वीकार करावा, नाही तर ती संन्यासाश्रमाची विटंबना ठरेल.

२) शंकराचार्यांच्याप्रमाणे प्रक्रियेतील वेदांताची चर्चा वरदानंदांनी भाष्यात केलेली नाही. त्यांनी सोप्या, सरल निरुपणशैलीचा अवलंब केला.

३) वरदानंदांनी कर्म, भक्ती, ज्ञान, योग या चारही साधनमार्गातील जे जे उपयुक्त व अवलंबण्यास सहजसोपे ते ते स्वीकारून प्राधान्याने भक्ती करावी असे सांगितले आहे. ज्ञानाने मोक्षाची प्राप्ती या शंकराचार्य मतापासून वरदानंदांचे मत संपूर्णतया भिन्न आहे. ज्या भक्तिमार्गाने मोक्षाची प्राप्ती होते ती भक्ती विशुद्ध असावी, त्याचबरोबर कर्तव्यकर्म अत्यंत कठोरपणे आचरावे असा त्यांचा कटाक्ष आहे. साधन चतुष्टयासारखे प्रखर वैराग्याचे साधन सामान्य साधकास आचरणे हे निश्चितच अवघड असल्याने प्राधान्याने मोक्षाचे साधन भक्ती आहे असे म्हटले तर फारशी अतिशयोक्ती होणार नाही. मोक्षाचा अधिकारी कोण याची चर्चा करताना वैराग्याची अपेक्षाही येथे संपुष्टात येते.

४) त्यांच्या तत्त्वज्ञानावर भागवतधर्माचार्यांचा अधिक प्रभाव दिसतो. तोही त्यातील संतपरंपरेचा.

५) मोक्षाविषयी वरदानंदांची धारणा आचार्यांपेक्षा भिन्न आहे.

६) भागवत संतांप्रमाणे केवलाद्वैताचा स्वीकार करून भक्तिमार्गाचे प्रतिपादन अत्यंत सुलभतेने करण्याचा ज्ञानदेवांचा मार्ग त्यांनी अनुसरला आहे. त्यामुळे वरदानंद आचार्यांचे परमभक्त असूनही तत्त्वज्ञान मांडणीसंदर्भात त्यांची भूमिका मात्र शंकराचार्यांपेक्षा भिन्न आहे.

**उपसंहार** – स्वामी वरदानंद भारती अनेक अंगांनी समृद्ध असणारे व्यक्तिमत्त्व, प्रस्थानत्रयीवर स्वतंत्र विचारसरणी प्रस्थापित करण्याकरिता भाष्य करणारे भाष्यकार, केवळ भाष्याचा प्रपंच न करता समाजप्रबोधनाकरिता आजीवन कार्यरत राहिलेले व संतपरंपरेत शोभणारे, अनुभूतिसंपन्न जीवन जगलेले एक श्रेष्ठ व्यक्तिमत्त्व. श्रीमत् शंकराचार्यांपासून वल्लभाचार्यांपर्यंत आचार्यांची जी थोर परंपरा आहे त्या परंपरेला साजेसे असे स्वामी वरदानंद भारती यांचे जीवन-चरित्र व कार्य आहे. त्यामुळे स्वामी वरदानंदभारती यांना विसाव्या शतकातील आचार्य असे म्हणणे वावगे ठरणार नाही. किंबहुना त्यांनी संत परंपरेतील अद्वैत तत्त्वज्ञानाची भूमिका प्रस्थानत्रयीवर भाष्य लिहून वेदांताच्या क्षेत्रात दृढमूल केली. तसेच संतपरंपरेतील तत्त्वज्ञानावर शिक्कामोर्तब करण्याचे महत्त्वाचे कार्य केले.

श्रीमत् शंकराचार्यांचे केवलाद्वैत तत्त्वज्ञान, मोक्षासाठी ज्ञानमार्गाची साधना आणि त्यासाठी संन्यासाश्रमाची आवश्यकता या तीनही एकापेक्षा एक अवघड असणाऱ्या गोष्टी सामान्यांच्या कक्षेत येणाऱ्या ठरत नाहीत. त्यासाठी संतांनी भक्तीचा सोपा मार्ग नामस्मरणाची सुलभ साधना, सगुणाची उपासना आणि त्यातून अद्वैताची श्रेष्ठ अनुभूती हे समीकरण सामान्य साधकासमोर ठेवले. वरदानंदांनी या दोन्ही तत्त्वज्ञानातील असणारा मिलाप आपल्या प्रस्थानत्रयीवरील भाष्यात स्पष्ट करून दाखविला आहे. वरदानंदांचे हे कार्य सद्य स्थितीत, सुलभतेने शंकराचार्यांचा सिद्धांत समजावा आणि संतांचे बहुमोल कार्य लक्षात यावे या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचे आहे. वरदानंदांच्या भाष्याने प्रामाणिकास साधना कशी करावी, त्यातील टप्पे व अडचणी कोणत्या आणि फल व मोक्ष या संबंधीची नि:संदिग्धता येण्यास निश्चितच मदत होईल. या दृष्टीनेही वरदानंदांचे हे कार्य बहुमोल म्हणावे लागेल. कर्म. भक्ती आणि ज्ञान या तिन्हींचा योग्य समन्वय, वर्णाश्रमधर्माचा योग्य विचार, तत्त्वज्ञान मांडणीतील भेदांमुळे निर्माण होणारे संघर्ष टाळून त्यांचा केलेला समन्वय, तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रातील वरदानंदांची महत्त्वाची कामगिरी ठरते. वैदिक धर्मावरील अविचल निष्ठा आपल्या आचरणाने सिद्ध करून आधुनिक व सनातन जीवनपद्धतीचा समन्वय साधून स्वामी वरदानंद भारतीय कृतार्थ जीवन जगले व स्वेच्छा देहत्यागाने त्यांच्या असामान्यत्वाने कळस गाठला.

**डॉ. सौ. कल्याणी माधव नामजोशी**
१०१२/४, शिवाजीनगर, 'पुष्कराज',
मित्रनगर कॉलनी, पुणे ४११ ०१६.
फोन - २५६५४८६६

●●●

**मना भूतमात्रीं सदा प्रेम ठेवी ।**
**तशी ती मती रामपायीं जडावी ।।**
**मना नित्य विश्वास नामीं धरावा ।**
**कदा रे मनीं गर्व ताठा नसावा ।।**



# वरदानंदभारती : प्रसन्न गंभीर भाष्यकार (उपनिषदर्थ कौमुदी खंड १)

**डॉ. कांचन मांडे**
एम्.ए.पीएच्.डी. (संस्कृत)
संस्कृत विभागप्रमुख, पुणे विद्यापीठ,
आंतरराष्ट्रीय सत्रामध्ये सहभाग, ३ ग्रंथांचे लेखन

एकविसावे शतक हे माहिती व तंत्रज्ञानाचे शतक मानले जाते. त्यातही वरदानंदभारती म्हणजे पूर्वाश्रमीचे प्राचार्य अनंतराव आठवले हे वैद्यकशास्त्राचे पदवीधर. शास्त्रशाखेच्या पदवीधराने अध्यात्मविषयावर श्रद्धापूर्वक विवेचन करावे इतकेच नव्हे तर; अधिकारपदावर आरूढ व्हावे हे सारेच अनाकलनीय व अलौकिक. सामान्यतः व्यक्तीचा कल भौतिकसुखाकडे असतो. त्यातही एखाद्या संस्थेच्या प्राचार्यांने स्वतःला संन्यासी म्हणून पूर्ण विरक्ती स्वीकारणे हे केवळ पूर्वसुकृत. 'वस्त्रसंन्यासापेक्षा आंतरिक संन्यास महत्त्वाचा' ही ठाम श्रद्धा असूनही गुरुऋण फेडण्यासाठी आंतरिकसंन्यासासह वस्त्रसंन्यास स्वीकारायचा हे उपनिषत्कालीन ऋषींच्या जवळ जाणारे आचरण. ज्याची ताकद त्या ऋषींच्या समीप जाण्याची आहे, असा निखळ तत्त्वज्ञच हे करू जाणे. यादृष्टीने वरदानंदभारतींचे सारे चरित्रच विलक्षण वाटते.

बृहदारण्यकोपनिषदाच्या तिसऱ्या अध्यायामध्ये याज्ञवल्क्य ऋषींची कथा आहे. ती यादृष्टीने लक्षणीय ठरते. जनकराजाला मोक्षाची आस होती. एकदा त्याने विद्वत्सभा भरवली व जाहीर केले की जो कोणी मला ब्रह्मज्ञान देईल त्याला मी एक हजार गाई बक्षीस म्हणून देईन. त्या प्रत्येक गाईच्या दोन्ही शिंगांना सोन्याची प्रत्येकी दहा दहा टोपणे असतील. त्या सभेमध्ये इतर अनेक विद्वानांबरोबर याज्ञवल्क्यही होते. राजाची ही अट ऐकताच ब्रह्मज्ञान देण्याविषयी कोणतेही विधान न करता याज्ञवल्क्य म्हणाले 'गोकामाः वयम् – आम्हाला गायींची इच्छा आहे.' ब्रह्मज्ञान देऊ शकू असा पूर्ण आत्मविश्वास असणारी व्यक्तीच इतक्या सहजपणे गोकामाः वयम् असे म्हणू शकते कारण सर्वच जर अद्वैत असेल तर, गाय काय किंवा ब्रह्मज्ञान काय फरक तो कसला? याच सहजतेमुळे वरदानंदभारतींनी प्राचार्यपदाची धुरा उतरवून वस्त्रसंन्यासासह संन्यस्त जीवनाचा स्वीकार केला. या आंतरिक परिपूर्तीचे गमक म्हणजे त्यांच्या साऱ्या रचना आहेत, ज्यामध्ये वैचारिक क्लिष्टता नाही, की गोंधळ नाही.

उपनिषदर्थकौमुदीचे एकूण पाच खंड आहेत. त्यामध्ये ईशादी प्रमुख उपनिषदांच्या तत्त्वज्ञानाचा ऊहापोह वरदानंदभारतींनी केला आहे. लेखकाचा त्या त्या विषयाकडे बघण्याचा दृष्टिकोन त्याने ग्रंथाला दिलेल्या शीर्षकापासून सूचित होतो. उपनिषदांचा अर्थ सांगायचा आहे म्हणून उपनिषद् अर्थ – उपनिषदर्थ हे तर खरेच, पण तो चण्डांशु – दाहक – तापदायक सूर्य ज्ञानाचे प्रखर तेज नसून, ती कौमुदी – उपनिषदांच्या अर्थाचे शीतल, आह्लादक, प्रसन्न चांदणे आहे हे वाचल्यावरच वाचकाचा त्याकडे बघण्याचा कल वाढतो. सामान्यतः असे वाटत असते की हे उपनिषदातील तत्त्वज्ञान आमच्यासारख्यांना कसे समजणार, पण ती 'कौमुदी' आहे चांदणे आहे असे म्हटल्यावर वाचून तरी बघावे असे वाटू लागते. खरे म्हणजे हे सारे तत्त्वज्ञान ज्या ऋषींनी निर्माण केले ते स्वतःच निर्माते असल्याने त्यांच्यासाठी ते तत्त्वज्ञान नसते, वरदानंद भारतींसारख्या त्यातील जाणकारांना त्याचे पूर्ण आकलन होत असल्याने त्यांना तत्त्वज्ञानाची आवश्यकता नसते, त्यामुळे त्या उपनिषदांचा अर्थ, तोही चांदण्यांप्रमाणे आल्हादक हा फक्त मध्यम अधिकाऱ्यांना आनंददायक असतो. मग हे लोक इतके कष्ट का घेतात ह्याचे उत्तर तुकाराम महाराजांनी अगोदरच देऊन ठेवले आहे–

**'बुडते हे जन न देखवे डोळा।**
**येतसे कळवळा म्हणऊनि'** (तुकारामगाथा ३३६९.२)

म्हणून ग्रंथरचना का केली याचे उत्तर उघड आहे. 'उपनिषदर्थकौमुदी'चे एकूण पाच खंड असून त्यामध्ये श्वेताश्वतर व महानारायण उपनिषदासह बारा प्रमुख उपनिषदांचा समावेश केला आहे. त्यापैकी केवळ पहिला खंड गद्यात्मक असून उरलेले सर्व खंड ओवीस्वरूपात आहेत. 'उपनिषदर्थकौमुदी'च्या पहिल्या खंडामध्ये ईशावास्योपनिषद् व माण्डूक्योपनिषद् या दोन उपनिषदांचा विचार केला आहे. या पहिल्या खंडाची एकूण पृष्ठसंख्या आहे चारशेअठरा. उपनिषदांच्या आकाराचा विचार केल्यास माण्डूक्य उपनिषदाचे केवळ बारा मंत्र आहेत. आकाराच्या दृष्टीने ते सगळ्यात लहान उपनिषद आहे. त्यानंतर आकाराच्या दृष्टीने येते ते ईश किंवा ईशावास्योपनिषद त्याचे अठरा मंत्र आहेत. माण्डूक्य उपनिषदावर भाष्य लिहिताना वरदानंदभारतींनी त्यावरील गौडपादाचार्यांच्या कारिकाही विचारात घेतल्या आहेत. कारण गौडपादाचार्यांच्या कारिका हे माण्डूक्य उपनिषदावरील भाष्य असले तरी ते जणू त्या उपनिषदाचाच भाग आहे अशा रीतीने, त्या कारिकांचा अभ्यास करण्याची रीत आहे. त्या परंपरेला अनुसरून वरदानंदभारतींनी कारिकांसह माण्डूक्य उपनिषदाचा विचार केला आहे.

परंपरेनुसार उपनिषदांच्या परिगणनेला ईशावास्यापासून सुरुवात

केली जाते. कदाचित् उपनिषदाची सुरुवातच 'ईश' या शब्दापासून होते हे त्यामागचे कारण असेल. कारण वर म्हटल्याप्रमाणे आकारदृष्ट्या बघितले तर माण्डूक्य सर्वात लहान म्हणून प्रथम विचारात घ्यायला हवे. पण पुन्हा त्यावरील गौडपादांच्या कारिका ह्या उपनिषदांशी जोडल्या गेल्यामुळे कदाचित् आकाराच्या दृष्टीने ते मोठे मानले गेले असेल. साधकाच्या दृष्टिकोनातून या बाह्य गोष्टींना फार कमी महत्त्व असते, मात्र अभ्यासकाला या सर्व गोष्टींचा विचार करावा लागतो. वरदानंद भारतींनीही याच क्रमाने प्रथम ईशावास्यावर भाष्य लिहिले आहे.

ईशावास्योपनिषद् म्हणजे शुक्ल यजुर्वेदसंहितेचा शेवटचा चाळिसावा अध्याय आहे. त्याच्या अठरा मंत्रांपैकी पहिल्या मंत्रामध्ये ईश्वराचा निवास, चराचर जगाच्या दृष्टीने त्याचे स्थान याविषयी विधान केले आहे. दुसऱ्या मंत्रामध्ये कर्मविचार आहे, ज्याच्या आधारे पुढे गतिमध्ये निष्काम कर्माचा विचार येतो. तिसऱ्या मंत्रात आत्मघाती लोकांची गती संगितली आहे. चौथ्या व पाचव्या मंत्रात त्या आत्मतत्त्वाचे वर्णन आहे. सहाव्या व सातव्या मंत्रामध्ये आत्मज्ञ माणसाविषयी सांगितले आहे. आठव्या मंत्रात आत्मतत्त्वाचे वर्णन आहे. नवव्या मंत्रापासून चौदाव्या मंत्रापर्यंत विद्या-अविद्या, संभूति-असंभूति या संकल्पनांचा विचार आहे. पंधरा ते अठरा प्रार्थनेचे मंत्र आहेत. अशाप्रकारे या उपनिषदाची रचना आहे.

वरदानंदभारतींचे त्र्याहत्तर पानांचे भाष्य आहे. एकविसाव्या शतकातील मराठी असल्यामुळे समजण्यास सोपे वाटते. पण विचार गहन - गंभीर असला तरी शैली मात्र सुगम आहे. किंबहुना, भाषा सोपी असल्याने, आपल्याला समजले आहे असे वाटून फसगत होण्याची शक्यता अधिक आहे. त्यासाठी अत्यंत शांतपणे व सावधपणे ते भाष्य वाचण्याची गरज आहे.

भाष्याची सुरुवात वरदानंदभारतींनी शांतिमंत्रापासून केली आहे.

**पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते।**
**पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते।।**

हा ईशावास्य उपनिषदाचा शांतिमंत्र. याचे स्पष्टीकरण करताना वरदानंदभारतींनी ते वस्तुनिर्देशरूप मंगल असल्याचे म्हटले आहे. कोणत्याही कार्याची सुरुवात मंगलाने करावी ही परंपरा आहे. ते मंगल वस्तुनिर्देशरूप किंवा आशीर्वचनरूप असते. पैकी या मंगलामध्ये ब्रह्मवस्तूचा निर्देश असल्याने त्याला वस्तुनिर्देशरूप म्हटले गेले. आचार्यांनी नेमके याकडे लक्ष वेधले आहे. वरदानंद म्हणतात की उपनिषदाच्या पहिल्या मंत्राच्या पहिल्या ओळीमध्ये तत्त्व व त्याचे स्वरूप सांगितले आहे; तर दुसऱ्या ओळीमध्ये तत्त्वाच्या प्राप्तीची जणु साधना सांगितली आहे (पृ.९). शुष्कचर्चेमध्ये भारतीय परंपरेला रस नाही, असे कारणही ते देतात. वास्तविक विचार आहे तो आदितत्त्वाचा, आत्म्याचा. पण, आत्मा, आदितत्त्व असे शब्द न वापरता ईश शब्दाचा केलेला प्रयोग वरदानंदभारतींना साभिप्राय वाटतो. त्यांनी म्हटले आहे की या गतिमान जगाला कोणी नियंत्रक, शासक पाहिजे, नाही तर गती धोक्याची ठरू शकते (पृ.१० ) म्हणून ईश शब्दातून या नियंत्रकाचा निर्देश केला आहे. एखादा गहनविषय कसा समजावून सांगावा याचा वस्तुपाठच वरदानंदभारतींनी इथे दिला आहे. तेन त्यक्तेन भुञ्जीथाः। (ईश.१) हा समजायला तसा अवघड विचार पण त्यांच्या गुरूंच्या एका कथेतून त्यांनी तो फार छान रीतीने सांगितला आहे.

वरदानंदभारतींचे गुरु - दासगणुमहाराज. त्यांनी ईशावास्यावर ओवीबद्ध टीका लिहिली आहे. समग्र दासगणुवाङ्मयाच्या चौथ्या खंडामध्ये ती प्रसिद्ध झाली आहे. दासगणुमहाराजांना 'त्यक्तेन भुञ्जीथाः' याचा समाधानकारक अर्थ लागेना, तेव्हा त्यांनी तो गुरुंना - साईबाबांना विचारला. बाबांनी सांगितले की तू मुंबईला जाणार आहेस ना, तिथे काकांची मोलकरीण तुला याचा अर्थ सांगेल. ते मुंबईला गेले. तेथे ती मोलकरीण एका साडीचे गाणे गात होती, पण गाण्यात मात्र खिन्न भाव होते. ते बघून महाराजांना कळवळा आला व कोणाच्यातरी मार्फत त्यांनी एक साडी आणून त्या मोलकरणीला दिली. साडी नेसून ती ते गाणे गाऊ लागली. दोन-तीन दिवसांनी पुन्हा ती मोलकरीण जुनी, फाटकी साडी नेसून आली व तेच सुंदर साडीचे गाणे गात होती, पण तिच्या गाण्यात खिन्नता नव्हती. साडी अंगावर नव्हती हे 'त्यक्तेन' व साडीचे गाणे आनंदाने गायले जात होते हे भुञ्जीथाः केवळ ती साडी माझी आहे या कल्पनेतच उपभोगाचा आनंद होता.(पृ.१२)

वास्तविक 'तेन त्यक्तेन भुञ्जीथाः' हा चर्चेचा विषय. प्रत्येक आचार्यांनी आपापल्या परीने त्याचा अर्थ उलगडून दाखवण्याचा प्रयत्न केला आहे. पण गोष्टीतून इतका गंभीर अर्थ वरदानंदभारतींनी लीलया समजावून दिला आहे. भाष्यकार म्हणून हे त्यांचे वेगळेपण आहे.

ईशावास्याच्या दुसऱ्या मंत्रात 'न कर्म लिप्यते नरे'- कर्म माणसाला चिकटत नाही - असे विधान आले आहे. तो एक महत्त्वाचा विषय आहे. 'शुद्ध विहिताचरणात्मक कर्म बंधक होत नाही' (पृ.१९) असे-

वरदानंदभारतींनी स्पष्ट म्हटले आहे. पण विहिताचरण म्हणजे काय हाच मुख्य मुद्दा आहे. यावर याठिकाणी कोणतेही अधिक स्पष्टीकरण न देता स्वामींनी असे सांगितले आहे की याचा ऊहापोह माझ्या 'कर्मयोग' या गीतेच्या तिसऱ्या अध्यायावरील प्रवचन ग्रंथात बऱ्याच प्रमाणात केला आहे. त्याची पुनरुक्ती येथे करीत नाही (पृ.१९) हे वाचताना आद्यशंकराचार्यांची आठवण सहजी होते. कारण पुनरुक्ती हा शास्त्रचर्चेमध्ये दोष मानला गेला आहे. त्यामुळे एकदा एखाद्या ठिकाणी अगोदर विवेचन झाले असेल तर आद्यशंकराचार्यही 'इति अवोचाम'- हे पूर्वी सांगितले आहे- अशीच रचना करतात.

एखादा विषय समजावून देताना कथेचा आश्रय घेणे हा कदाचित् वरदानंदभारतींच्या कीर्तनशैलीचा परिणाम असेल. ईशावास्याच्या चौथ्या व पाचव्या मंत्रामध्ये आत्मतत्त्वाचे वर्णन आले आहे. ते आत्मतत्त्व प्रत्येकाच्या इतके जवळ आहे, आणि खरे म्हणजे त्यामुळेच माणसाला त्याची जाणीव रहात नाही. हे सांगताना वरदानंदभारतींनी एका साधूची गोष्ट सांगितली आहे. हाताच्या बोटावर घेतलेले काजळ डोळ्याच्या जितके जवळ नेऊ तेवढे स्पष्ट दिसण्याऐवजी दिसेनासे होते. नेमके हेच त्या ईश्वराबाबत - आत्मतत्त्वाबाबत घडते. अत्यंत जवळ असल्याने त्याचे अस्तित्वच विसरले जाते. पण जो आत्मज्ञ आहे त्याला

मात्र ईश्वराशिवाय काहीच दिसत नाही त्यामुळे ईशावास्याचा सहावा व सातवा मंत्र हे तर स्वामींच्या आत्मानुभवाचे, म्हणून ते सहजपणे म्हणून जातात की भक्तिसुखाच्या आकर्षणाने संतांनी काही वेळा हे ऐक्य नाकारले असले तरी त्यामागील भाव वेगळा आहे (पृ.३०) ईश्वराविषयी नितांत आदर व कमालीची जवळीक असल्यामुळे ज्ञानेश्वरांच्याच शब्दात वरदानंदांनी ईश्वराचे अस्तित्व सिद्ध करणाऱ्या श्रुतीचा माऊली म्हणून गौरव केला आहे(पृ.३९). पुढे नवव्या मंत्रापासून चौदाव्या मंत्रापर्यंत भाष्यकारांमध्ये वेगवेगळी मते असल्याचे वरदानंदभारती सांगतात. विद्या - अविद्या, संभूति- असंभूति या संज्ञांचा वापर या मंत्रामध्ये केला गेला आहे. अगदी थोडक्यात अविद्या म्हणजे कर्म व विद्या म्हणजे ज्ञान (पृ.४१), तर संभूति म्हणजे संकलन व असंभूति म्हणजे पृथक्करण होय (पृ.४६). त्यांनी पुढे असेही म्हटले आहे की पृथक्करणाचा विचार अभिनव आहे. (पृ.५३) म्हणून पूषन् ही देवता निवडली आहे. त्याचेच महत्त्व पुढच्या मंत्रात गायिले आहे.

सतरावा मंत्र सामान्यतः मरणाला टेकलेल्या माणसाकरिता आहे असे मानले जाते, पण वरदानंदभारतींनी असे म्हटले आहे की ही प्रार्थना सर्वांना सर्वकाळी उपयोगी पडणारी असल्याने ज्याचे जीवन अजून उर्वरित आहे, त्याच्या दृष्टीने हा अर्थ घेणे बरे (पृ.६२). भस्मान्तं शरीरम् यातून मरणाची सूचना असली, तरी मरणाचे स्मरण सतत असावे असे संतांनी सांगितले आहे (पृ.६२). शेवटच्या मंत्रातील प्रार्थनेने साधकाला वाटचालीसाठी बळही जणू मिळवून दिले आहे (पृ.७३).

अत्यंत नेमक्या शब्दात ईशावास्यातील तत्त्वज्ञान मांडून स्वामींनी उपनिषदे सामान्य माणसाच्या जवळ आणण्याचा प्रयत्न केला आहे. कारण सामान्य माणसालाच साधनादी मार्गांची आवश्यकता आहे. ईशावास्य या पहिल्या उपनिषदात साधकाची वाटचाल स्वामींनी सुरू करून दिली आहे.

यानंतर अभ्यासायचे उपनिषद् आहे ते माण्डूक्य. केवळ बारा मंत्रांचे. ओम् या एकाच मंत्राचे स्पष्टीकरण करणारे, पण गौडपादाचार्यांनी चार प्रकरणांमध्ये दोनशे पंधरा कारिकांच्या साहाय्याने त्याचे विवेचन केले आहे. त्याचा आता विचार करू. माण्डूक्याच्या पहिल्या प्रकरणाचे नाव आहे 'आगम'. ते प्रत्यक्ष माण्डूक्य उपनिषदावर आधारलेले आहे. याच्या एकोणतीस कारिका आहेत. दुसरे प्रकरण आहे 'वैतथ्य' त्याच्या अडोतीस कारिका आहेत. अठ्ठेचाळीस कारिका असलेले तिसरे प्रकरण 'अद्वैत' या नावाने ओळखले जाते, तर चौथे व शेवटचे शंभर कारिका असलेले प्रकरण आहे 'अलातशांति'. चारही प्रकरणे मिळून या कारिकांची संख्या होते दोनशे पंधरा. या उपनिषदाचा विचार करताना आपण प्रत्येक कारिकेचा विचार न करता, एकेका प्रकरणाचा विचार करणार आहोत.

पहिले प्रकरण 'आगम' या नावाने ओळखले जाते कारण यामध्ये प्रत्यक्ष माण्डूक्य उपनिषदाचा समावेश आहे. त्यामध्ये अकाराच्या तीन मात्रांचा विचार आहे. ओंकाराची पहिली 'अ' मात्रा म्हणजे जीवाची व ईश्वराची जागृतावस्था - विश्व. दुसरी 'उ' मात्रा म्हणजे स्वप्नावस्था - तैजस व तिसरी 'म' मात्रा म्हणजे सुषुप्तावस्था - प्राज्ञ. स्वप्नावस्था म्हणजे निद्रा, झोप, ज्यामध्ये स्वप्ने दिसतात. सुषुप्तावस्था म्हणजे गाढ झोप, ज्यामध्ये प्राधान्याने स्वप्ने दिसत नाहीत. यानंतर ओंकाराच्या चौथ्या मात्रेचा उल्लेख येतो. खरे तर ती 'अमात्र'च आहे म्हणून चौथी या अर्थानेही तिचे वर्णन व्यवहारोपशम, शिव, अद्वैत असे केले आहे. या तुरीयावस्थेच्या वर्णनानेच उपनिषदाची सांगता झाली आहे. मुळामध्ये त्या त्या अवस्थेचे स्पष्टीकरण करणाऱ्या गौडपादांच्या कारिका या मंत्रांसमवेत आहेत. पण वरदानंदभारतींनी वाचकांच्या सोयीसाठी सुरुवातीला उपनिषदाचे बारा मंत्र व नंतर ओळीने कारिका दिल्या आहेत. वरदानंदभारतींनी प्राज्ञाच्या वर्णनामध्ये असे म्हटले आहे की येथपर्यंतचे वर्णन हे बरेचसे समजणारे आहे. पण याला प्राज्ञ ही संज्ञा का दिली हे मात्र समजण्यास कठीण जाते (पृ.९४). स्वामी शब्द किती तोलून मापून वापरतात हे ही बघण्यासारखे आहे, ते म्हणतात हे वर्णन 'बरेचसे समजणारे आहे'. त्यांनी श्रोत्यांच्या/ वाचकांच्या मर्यादांची जाणीव किती अलगदपणे करून दिली आहे, ते लक्षणीय आहे. पण या ठिकाणी वरदानंदांनी 'प्राज्ञ' शब्दाचा बुद्धिमान् एवढाच अर्थ का लक्षात घेतला हे कळत नाही. कारण श्रीमदाद्यशंकराचार्यांनी 'प्रकर्षेण अज्ञः' म्हणजे 'ज्याला कळत नाही असा' असाही अर्थ दिला आहे व गाढ झोपेची अवस्था नेमकी अशीच असते. त्यावेळी इंद्रिये तर शांतच असतात, पण त्यांच्या शक्तीही पुरितत् नावाच्या नाडीमध्ये विसावलेल्या असतात, असे बृहदारण्यक उपनिषद् सांगते, त्यामुळे समजण्याची शक्तीच नाही अशी अवस्था येते. त्याला उपनिषदाने 'प्राज्ञ' असा शब्द वापरला आहे. वरदानंद श्रीमदाद्यशंकराचार्यांना अनुसरणारे आहेत, मग त्यांनी या अर्थाचा विचार का केला नाही? का त्यांना तो मान्य नव्हता, कळायला मार्ग नाही. पण गाढ झोपेतून जागे होणाऱ्या माणसाचा हाच अनुभव असतो की इतकी गाढ झोप लागली की काही कळले नाही.

श्रीमदाद्यशंकराचार्यांविषयी नितांत आदर असून त्यांना अनुसरणारे असूनही, आणखी एका ठिकाणीही वरदानंदभारतींनी आद्यशंकराचार्यांच्या भाष्यातील अर्थापेक्षा निराळा अर्थ केला आहे. आगम प्रकरणातील एकोणतिसाव्या कारिकेमध्ये 'अनन्तमात्र' असा शब्द आला आहे. त्यावर भाष्य करताना स्वामींनी असे म्हटले आहे की अनन्तमात्र म्हणजे सर्व प्रकारच्या भेदांना, प्रकारांना धारण करणारा; तर आद्यशंकराचार्यांनी ज्याला कोणतीही सीमा नाही, प्रमाण नाही तो, असा अर्थ केला आहे. बारकाईने बघितल्यास लक्षात येईल की दोन्ही अर्थांमध्ये मूलभूत फरक नाही, पण वरदानंदभारतींनी त्याने सर्व भेदांना धारण केले आहे असे म्हटले, तर आद्यशंकराचार्यांनी थोडा अधिक व्यापक अर्थ सुचवला की त्याला मात्र कोणतीही सीमा नाही. म्हणजे, तो या सर्व भेदांना धारण करणारा असला तरी तो मात्र त्या भेदांनी बद्ध नाही. असाच आशय भगवद्गीतेतील पुढील श्लोकातही दिसतो -

**ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये।**
**मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि ।।** (भ.गी.७.१२)

अद्वैताच्या दृष्टीने अर्थाची ही छटा महत्त्वाची म्हणून लक्षणीय आहे(पृ.१५७ परि.१). असे वरदानंदांनी या ठिकाणी स्वतःच म्हटले आहे. आचार्यांच्या विषयीच्या आदराचा तो परिपाक आहे.

शेवटच्या कारिकेमध्ये गौडपादांनी वापरलेल्या 'मुनि' शब्दाला वरदानंदभारतींनी अधोरेखित केले आहे, ज्यातून स्वामींच्या वृत्तीचाही बोध होतो. वरदानंदभारतींच्या सूक्ष्मदृष्टीचे आणखी एक उदाहरण म्हणजे सातव्या मंत्रामध्ये 'शान्तं शिवम् अद्वैतं चतुर्थं मन्यन्ते स आत्मा' असे वर्णन आले आहे. यावरील भाष्यामध्ये त्यांनी असे म्हटले आहे की आत्म्याच्या या वर्णनात 'पाद' शब्दाचा उपयोग केलेला नाही (पृ.९८ परि.४). जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ती या तिन्ही अवस्थांचे वर्णन करताना 'प्रथमः पादः', 'द्वितीयः पादः', 'तृतीयः पादः' असे शब्द आहेत. पण आत्म्याच्या वर्णनात मात्र केवळ 'चतुर्थं मन्यन्ते' 'चौथा मानतात' असे सांगितले आहे. वास्तविक ह्या सगळ्या अवस्था म्हणजे आत्माच आहे. फक्त आकलनासाठी त्यांना 'पाद' शब्द लावला आहे. ज्ञानेश्वरीमध्ये ज्ञानेश्वरांनी भक्तीविषयी सांगताना असेच म्हटले आहे-

**एऱ्हवी तिजी ना चौथी। हे पहिली ना सरती।**

**पै माझिये सहजस्थिती। भक्ति नाम।** (ज्ञानेश्वरी १८.११११३)

बाराव्या मंत्राचे वरदानंदभारतींनी केलेले विवेचन तर मुळातूनच वाचावे (पृ.११३ परि.२) असे आहे. आकलन किती स्पष्ट असावे याचा तो अनुभव आहे.

विश्वनिर्मितीबद्दल विचार करताना अद्वैतवेदान्त प्रायः एका चैतन्यापासून हे सर्व विश्व निर्माण झाले असे मानतो. पण याबाबत पाश्चात्य वैज्ञानिक काय विचार करतात हे ही वरदानंदभारतींनी जाता जाता सांगितले आहे (पृ.१२२ परि.४).

दुसरे प्रकरण 'वैतथ्य' नावाने प्रसिद्ध आहे. वरदानंदभारतींनी सुरुवातीला (पृ.१५८ परि.४) वैतथ्य शब्दाचे स्पष्टीकरण दिले आहे. हा संस्कृत शब्द आहे, व्याकरणदृष्ट्या हे काय रूप आहे, अशाप्रकारे, वाचकाच्या मनावर दडपण येईल अशी कोणतीही शब्दरचना न करता अगदी सोप्या रीतीने स्पष्टीकरण केले आहे. त्याचबरोबर हेही स्पष्ट केले आहे की प्रपंचाचे वैतथ्य बौद्धिक पातळीवर समजावून देण्याचा विशेष प्रयत्न केला आहे (पृ.११८ परि.५). मनुष्य हा बुद्धिजीवी प्राणी आहे. त्यामुळे एखादी गोष्ट बुद्धीला पटली की ती करण्याकडे त्याचा कल असतो, हा विचार त्यामागे असेल, म्हणून बौद्धिक पातळीवर समजावून देण्याचा अशी शब्दरचना केली असेल.

स्वप्नातील मिथ्यात्व मान्य करायला अडचण नाही, ते सर्वमान्य आहे, पण जागृतीतील ज्ञानालाही तसेच का म्हटले आहे हे मात्र समजून घेतले पाहिजे (पृ.१६२ परि.२), असे म्हणून वरदानंदांनी हा गहनगंभीर विषय विनोदापासून सुरू केला आहे. रामाच्या राज्याभिषेकाच्या निमित्ताने सीतेला भेटण्यासाठी वानरी आल्या होत्या. कारण तिच्या सौंदर्याची कीर्ती त्यांनी ऐकली होती. सीतेला बघितले व त्या म्हणाल्या -' सौंदर्याचे एक तरी लक्षण हिच्याकडे आहे का? रंग फटक गोरा, डोळे किती तरी मोठे व लांबट, नाक किती तरी सरळ व उंच, कंबर अगदीच बारीक, कसलीतरी विचित्र फडकी अंगाला गुंडाळली आहेत, कातडी सगळी गुळगुळीत, अंगावर एक केस नाही, शेपूट नाही, हिच्या नवऱ्याला खरंच ही आवडत असेल का?' पुढे ते म्हणतात, 'विनोद सोडून द्या, पण आता शास्त्रदृष्ट्या सौंदर्याला मिथ्या म्हणण्यावाचून दुसरा उपाय आहे का?' (पृ.१६२ परि.४- पृ.१६३ परि.२)

या साऱ्या वर्णनातून प्राचार्यांच्या बुद्धीची झेप दिङ्मूढ करते कारण अशा प्रकारे लौकिक सौंदर्याचे मिथ्यात्व स्पष्ट करून ते समेवर येतात, ते आईनस्टाईन्‌च्या सापेक्षतावादाने (पृ.१६३, परि.२,३). विषयाचे पूर्ण आकलन झाल्याशिवाय इतका गंभीर विषय इतक्या सहजतेने मांडणे केवळ अशक्य!

अनेक उदाहरणांनी द्वैत समजावून देता येते; किंबहुना हे सारे विश्व द्वैताचा आविष्कार आहे असे म्हणता येते. पण अद्वैत समजवणार कसे? कारण उदाहरण दिले की द्वैत सुरू झाले. पण काहीच सांगितले नाही, तर समजणारच नाही, म्हणून निरनिराळ्या उदाहरणांनी स्वामींनी अद्वैत समजावून दिले आहे. अर्थात त्यातल्या धोक्याची पूर्ण जाणीव असल्याने त्यांनी असे म्हटले आहे ''पण उदाहरणे पूर्णांशाने घ्यायची नसतात त्यातील एकेका अंशाचा उपयोग होतो हे कृपा करून लक्षात ठेवावे'' (पृ.१७२ परि.२). स्वामींचे वाङ्मय वाचताना समर्थांनी म्हटलेल्या 'अखंड सावधपणा'ची जाणीव होते.

ब्रह्म किंवा आत्मा हीच वस्तुसत्ता आहे, ते एकमेवाद्वितीय आहे, हे स्पष्ट करताना वरदानंदांनी दासबोधात उद्धृत केलेला एक संस्कृत श्लोक दिला आहे.

**भ्रमेणाहं भ्रमेण त्वं भ्रमेणोपासका जनाः।**

**भ्रमेणेश्वरभावत्वं भ्रममूलमिदं जगत्।।** (दासबोध १०।६)

हे वाचल्यावर आद्यशंकराचार्यांच्या ब्रह्मज्ञानावलीमाला या प्रकरण ग्रंथातील 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या' (ब्रह्मज्ञानावलीमाला २०) या श्लोकार्धाची सहजी आठवण होते.

न निरोधो न चोत्पत्तिः...। (गौडपादकारिका २.३२) याचे स्पष्टीकरण करताना गौडपादांचा हा सिद्धांत अनुभवण्यासाठी त्या पातळीवर पोहोचले पाहिजे (पृ.१९५ परि.४) असे वरदानंदांनी म्हटले आहे ते खरेच आहे, नाहीतर; 'शिवो भूत्वा शिवं यजेत्, शिव होऊन शिवाची आराधना करावी' हा विचार रुजलाच नसता. याही ठिकाणी सोप्या उदाहरणांनी त्यांनी हा सगळा विषय समजावून दिला आहे (पृ.१९६ परि.१).

वरदानंदभारती आयुर्वेदाचे अभ्यासक. आयुष्यातील बरीचशी वर्षे वैद्यकीमध्ये गेलेली, त्यामुळे अद्वैताचे श्रेष्ठत्वही त्यांनी आयुर्वेदाच्या परिभाषेत सांगितले आहे(पृ.१९७ परि.४, पृ.१९८ परि.१).

अद्वैततत्त्वज्ञानाच्या प्रवाहामध्ये अवच्छेदवाद, प्रतिबिंबवाद व आभासवाद हे तीन वाद पुढे आले. त्यांचेही स्पष्टीकरण चौतीसाव्या करिकेवरील विवेचनाच्या ओघामध्ये आलेले आहे(पृ.१९८ परि.४, पृ.१९९ परि.१). अवच्छेद म्हणजे मर्यादा. हा अवच्छेदवाद समजावण्यासाठी महाकाश व घटातील आकाशाचे उदाहरण दिले आहे. प्रतिबिंबवादासाठी पाण्यात पडलेले चंद्राचे प्रतिबिंब सांगितले आहे व आभासवादासाठी स्फटिकाजवळ ठेवलेल्या जास्वंदीच्या फुलाचे उदाहरण दिले आहे. एखादा गंभीर विषय समजावून देण्यासाठी व्यवहारातील सोपी उदाहरणे द्यायची, ही अद्वैतवेदान्ताची परंपरा स्वामींनी यथार्थपणे पाळली आहे.

अडोतीसावी कारिका या वैतथ्यप्रकरणातील शेवटची आहे. वरदानंदांनी असे म्हटले आहे की या कारिकेत एक प्रकारचा आदेश आहे. तत्त्ववेत्त्यांनी कसे राहावे, काय करावे ते स्पष्ट केले आहे. मागील सदोतीसाव्या श्लोकाची ही कारिका म्हणजे जणू पुरवणी आहे (पृ.२०८ परि.४). हे वाचताना भगवद्गीतेतील 'स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव।' (भ,गी.२.३४) या चरणाची आठवण होते.

एकंदरीत या प्रकरणामध्ये आत्म्याखेरीज भासणारे सर्व काही मिथ्या आहे, हे सांगितल्यामुळे या प्रकरणालाही 'वैतथ्य' असे नाव मिळाले. या पुढच्या प्रकरणामध्ये या वैतथ्याच्या पार्श्वभूमीवर अद्वैताची मांडणी केली आहे, म्हणून या तिसऱ्या प्रकरणाचे नाव 'अद्वैत' आहे. वरदानंदांनी असे म्हटले आहे की आता तिसऱ्या 'अद्वैत' प्रकरणात वेदवचनाधारे सिद्ध होणारे अद्वैत हे तर्कदृष्ट्याही समजून घेणे कसे शक्य आहे याचे विवेचन केले आहे(पृ.२११ परि.३). अद्वैताची सामान्य माणसाला समजेल अशी सिद्धी करणे हे खरोखरच कसबी काम आहे. म्हणूनच वरदानंदांनी तर्कदृष्ट्या समजून घेणे असे म्हटले आहे. कारण जन्माला आलेल्या प्रत्येक जीवाचा जन्मापासूनच द्वैतात वावर असतो, त्यामुळे द्वैत हेच खरे असे त्याचे अनुभवसिद्ध मत असते. पण मुळात तो अनुभवच मिथ्या आहे हे समजणे म्हणजे अद्वैत. सामान्य माणसाला प्रथम तर्काने हे पटले तर त्यादृष्टीने प्रयत्न सुरू होतील, म्हणून प्रथम तर्काने पटवण्याचा प्रयत्न केला आहे. या प्रकरणामध्ये अद्वैताची सिद्धी करताना गौडपादांनी श्रुतीचा आधार घेतला आहे, कारण शास्त्रदृष्ट्या श्रुती हे सगळ्यात प्रबळ प्रमाण आहे. बृहदारण्यक उपनिषदातील 'नेह नानास्ति किञ्चन' (बृ.४.४.१९, कठ.४.११) ही प्रसिद्ध श्रुती गौडपादांनी वापरली. त्यामध्ये असे म्हटले आहे की इथे अनेक काहीच नाही(३.२४). मग सगळ्या लोकांच्या अनुभवाला द्वैत कसे येते याचे उत्तर गौडपाद देतात की मायेमुळे(३.२८). मग त्याला 'वन्ध्यापुत्रा'चा दृष्टान्त देतात. वांझ स्त्रीला पुत्र होणे शक्य नाही, पण 'वन्ध्यापुत्र' हा शब्द उच्चारल्यावर, समोरच्या माणसाच्या लक्षात येते की हे अशक्य गोष्टीविषयी काही विधान आहे. अगदी, प्रत्यक्ष अस्तित्वात नसलेले हे विश्व मायेमुळे भासते, व त्यानुसार सारे व्यवहार चालतात. पण मायेचे अस्तित्व जितके दिवस स्वीकारू तितकेच त्या व्यवहाराचे अस्तित्व.

जीव व परमात्मा हे वस्तुतः दोन नाहीतच. गौण अर्थाने त्यांच्यातील भेद स्वीकारता येतो हे स्पष्ट करताना वरदानंदभारतींनी पूर्णपणे भौतिकशास्त्राचा आधार घेतला आहे (पृ.२२५ परि.४, पृ.२२६ परि.१) गौडपादकारिकेत एक महत्त्वाची संज्ञा येते, ती म्हणजे 'अस्पर्शयोग' (गौडपादकारिका ३.३९,४.२). अचिन्त्य, अद्वय, अभय अशा परमार्थप्राप्तीचे साधन म्हणून 'अस्पर्शयोग' सांगितला आहे. सर्व प्रकारच्या संबंधापासून, द्वैतापासून पूर्णपणे अलिप्त राहणे म्हणजे अस्पर्शयोग. संपूर्ण सहा पानांमध्ये (पृ.२६५-२७०) अत्यंत बारकाईने वरदानंदांनी त्याचे विवेचन केले आहे.

स्वप्नामध्ये मन जसे मायेने कार्यरत होते, तसेच जागृतावस्थेमध्ये, असे म्हटल्यावर थोडा संभ्रम निर्माण होतो. स्वप्न खरे किती वेळ, तर जितका वेळ दिसत आहे तितक्या वेळ, पण जागृतावस्था आहेच ना असे वाटते, म्हणून स्वामी पुन्हा भौतिकशास्त्राचा आधार घेतात व जगसुद्धा तितकेच मिथ्या आहे हे पटवून देतात (पृ. २४६, परि.४, पृ.२४७ परि.१).

'अद्वैत' प्रकरणामध्ये गौडपादांनी साधनेचा विचार मांडला आहे. त्याचबरोबर लय, विक्षेप, कषाय व रसास्वाद या ध्यानातील विघ्नांचाही विचार तेथे आला आहे (गौडपादकारिका ३.४४-४६). वरदानंदांनीही व्यवहारातील उदाहरणे देऊन तो सगळा विषय सात पानांमध्ये समजावून दिला आहे (पृ.२८२-२८८).

गौडपादांचा मुख्य सिद्धान्त 'अजातिवाद' या नावाने प्रसिद्ध आहे. या सिद्धान्ताद्वारे काहीही जन्माला आलेले नाही किंवा काहीच निर्माण झालेले नाही असे तत्त्वज्ञान त्यांनी मांडले आहे.

**'अगा जे घडलेचि नाही। त्याची वार्ता पुसशी काई।।'**

हा त्याचा अनुवादच जणू. म्हणजे गौडपाद काही वेगळे बोलत होते असे नाही, साऱ्याच आत्मज्ञानी व्यक्तींचा तो अनुभव आहे. पण सामान्य माणसाला तो कळणे केवळ अशक्य. त्या साठी मायेचा आधार घ्यावा लागतो. कारण व्यवहारामध्ये कोणत्याही गोष्टीला काही कारण असावे लागते, तेव्हाच ती वस्तू निर्माण होते, त्याप्रमाणे सामान्य माणसासाठी गौडपादांनी सांगितले की हे जे जग दिसते ते मायेमुळे. अर्थातच ती वस्तुस्थिती मात्र नाही. म्हणूनच 'अद्वैत' प्रकरणाच्या शेवटच्या कारिकेमध्ये गौडपादांनी स्पष्टपणे म्हटले आहे की येथे काहीही थोडेही उत्पन्न होत नाही, हेच श्रेष्ठ सत्य आहे.

माण्डूक्यकारिकांच्या चौथ्या व शेवटच्या प्रकरणाच्या भाष्यांची सुरुवात करतानाच वरदानंदभारतींनी 'आगम', 'वैतथ्य', 'अद्वैत' व 'अलातशांति' या चारही प्रकरणांचा अगदी थोडक्यात केवळ एका परिच्छेदात (पृ.२९० परि.५, पृ.२९१ परि.१) गोषवारा सांगितला आहे. कसलेला भाष्यकार व आत्मज्ञच अशाप्रकारे नेमकेपणाने हे सारे तत्त्वज्ञान सांगू जाणे.

अलात म्हणजे अग्नीची ठिणगी. समजण्यासाठी उदबत्तीच्या काडीचे उदाहरण घेतले जाते. उदबत्तीची काडी पेटलेली म्हणजे वरच्या टोकाशी ठिणगी असलेली असते. ही उदबत्तीची काडी जर वेगाने गोलाकार फिरवली. तर प्रत्येक ठिणगी स्वतंत्र आहे हे न जाणवता ठिणग्यांचे एक वर्तुळच दिसू लागते. अर्थात उदबत्तीच्या काडीचे फिरणे थांबले की ते वर्तुळ नाहीसे होते. कारण मुळात वर्तुळ नव्हतेच, तो आभासमात्र होता. त्या अलाताची शांती होणे म्हणजे जग मिथ्या आहे हे भान येऊन ब्रह्ममात्र सत्य अनुभवाला येणे. या प्रकरणामध्ये त्या ब्रह्माची सिद्धी केली असल्यामुळे गौडपादांनी जाणीवपूर्वक या प्रकरणाला 'अलातशांति' हे नाव दिले आहे.

या चौथ्या प्रकरणामध्ये काही श्लोक तिसऱ्या प्रकरणातीलच आहेत. काही ठिकाणी एखाद्या शब्दाचा फरक आहे इतकेच. या 'अलातशांति' प्रकरणातील सहा, सात व आठ हे तीन श्लोक तिसऱ्या अद्वैत प्रकरणातील वीस, एकवीस व बावीस ह्या क्रमांकांना आले आहेत. चौथ्या प्रकरणातील ६१ व ६२ क्रमांकाचे श्लोक तिसऱ्या प्रकरणामध्ये २९ व ३० क्रमांकाचे आहेत. चौथ्या प्रकरणातील श्लोक

७१ हा तिसऱ्या प्रकरणातील शेवटचा श्लोक आहे व या चौथ्या प्रकरणातील श्लोक ८१ हा काही प्रमाणात तिसऱ्या प्रकरणातील श्लोक ३६ आहे. हे सांख्यिकी रीतीने मांडावयाचे असल्याने प्रकरणाच्या प्रारंभी नोंदवले.

सामान्यतः गौडपादांवर एक आक्षेप घेतला जातो की ते बौद्ध होते. पण त्या आक्षेपाचे साधार खंडन वरदानंदांनी अगदी सुरुवातीलाच केले आहे. किंबहुना याठिकाणच्या मंगलश्लोकामध्ये ज्ञानाने संबुद्ध, प्रबुद्ध, आत्मवेत्ता असलेल्याला नमस्कार आहे.

यानंतर पुन्हा अद्वैताचा विचार सुरू होतो. सामान्य माणसासाठी पुन्हा कार्यकारणभावाचा विचार मांडला जातो. पण वरदानंद अगदी स्पष्ट शब्दात सांगतात की तार्किकरीत्या कार्य-कारणभावाचा निश्चय करता येत नाही हे आजच्या विज्ञानानेही मान्य केले आहे(पृ. ३०६ परि.४, पृ३०७ परि१ ) व दनुय या फ्रेंच विज्ञानशास्त्रज्ञाचे उदाहरण देऊन त्यांनी ते स्पष्ट केले आहे. विज्ञानही विविधता मान्य करत नाही हे सांगताना वरदानंदभारतींनी असे म्हटले आहे की विद्युत्कणांपर्यंत जाऊन पोचलेल्या विज्ञानाने सर्व सृष्ट पदार्थांची वास्तव वाटणारी विविधता तर मोडीतच काढली आहे(पृ ३५६. परि.२). करतलामलकवत् - हातात असलेल्या आवळ्याप्रमाणे अत्यंत स्वच्छ मांडणी हे स्वामींचे वैशिष्ट्य दिसते. पण त्याचबरोबर गौडपादांना आजच्या वैज्ञानिकांच्या पंक्तीत ते बसवत नाहीत, हा साक्षेपी भाव बघण्यासारखा आहे.

भारतीय परंपरेला भोंगळ, विज्ञानवादी नसणारी म्हणणारे तथाकथित बुद्धिवादी आहेत. वस्तुतः आपल्यालाच विज्ञान म्हणजे काय हे माहीत नाही असा अर्थ होतो. भारतीय परंपरेमध्ये धर्म शब्द विज्ञान या अर्थाने बऱ्याच ठिकाणी येतो. कारण धर्म म्हणजे आचरणाचे नियम. विज्ञानही जीवन सुखी होण्यासाठी अशा नियमांचा पाठपुरावा करते. तत्कालीन समाजाला धर्म शब्दाचा हा अर्थ मान्य असेल, म्हणून असे सारे विषय, नियम धर्म, धार्मिकता या नावाने आलेले दिसतात. त्यामुळे वरदानंदांनी अलाताच्या संदर्भात प्राणायामाचे उदाहरण दिले आहे. अलात - उदबत्तीची काडी स्पंदरहित - कोणत्याही हालचालीशिवाय असेल तर ते म्हणजे अज विज्ञानच. त्या अज विज्ञानाला निष्पंद-स्पंदरहित करण्यासाठी साधनेमध्ये प्राणायामाचा उपयोग होतो, म्हणून ते म्हणतात की आपल्या धर्मशास्त्रामध्ये प्रत्येक कर्मापूर्वी जो प्राणायाम सांगितला आहे, त्याचा उपयोग विज्ञानाचे हे वासनात्मक स्पंद नियंत्रित करण्यासाठीच होतो(पृ.३४८ परि.१). अर्थात समाज याविषयी आता काही जाणत नाही, हे त्यांना माहित आहे. म्हणून त्यांनी पुढे असे स्पष्ट म्हटले की आता ते केवळ तंत्र उरले आहे. त्यातला अर्थ पार नष्ट झाला आहे(पृ.३४८ परि.१). विज्ञान हा शब्द गौडपादांनीच शुद्ध, निरुपाधिक जाणीव या अर्थाने वापरला आहे हे वरदानंदांनी नमूद केले आहे (पृ.३५० परि.२).

अद्वैताचा व त्यातही अजातिवादाचा सर्वच विचार अत्यंत गंभीर, खोलवर विचार करायला लावणारा, म्हणून शेवटच्या किंवा त्यापूर्वीच्या एक-दोन श्लोकांमध्ये त्याचा उपसंहार न करता ८७व्या श्लोकापासूनच सिंहावलोकन करून उपसंहार केला जात असल्याचे स्वामींनी नोंदवले आहे (पृ.३९५ परि.२). ज्या मायेच्या आधारावर हे सगळे तत्त्वज्ञान उभे राहिले, ती माया म्हणजे आहे तरी काय याबद्दल अगदी निःसंदिग्ध शब्दांमध्ये वरदानंदांनी असे म्हटले आहे की माया ही शुद्ध तत्त्वज्ञानाच्या शोधासाठी स्वीकारलेली, विविधतेची संगती लावण्यासाठी पत्करलेली एक उपपत्ती मात्र आहे(पृ. परि.).

अत्यंत विद्वान सैद्धान्तिकाचे सर्व प्रतिपादन जाणण्याचा प्रयत्न केलाना तरी 'कवि तो होता कसा आननी' हा प्रश्न सामान्यपणे माणसाच्या मनात येतोच. याचेही उत्तर वरदानंदांनी पृ.४१७,४१८ या ठिकाणी दिले आहे. वैचारिक प्रगल्भतेची ती परिसीमा आहे.

आपल्यापैकी अनेकांना स्वामींचा लौकिक व आत्मिक सहवास लाभला आहे. अशा संपृक्त समाजासमोर या उपनिषदांच्या मिषाने ही सेवा करता आली हेच भाग्य. शेवटी ज्ञानेश्वरमाऊलींच्याच शब्दात एक विनवणी-

**न्यून ते पुरते। अधिक ते सरते।**
**करून घेयावे हे तुमते। विनवितु असे।।** (ज्ञानेश्वरी १.८०)

**- डॉ. कांचन मांडे**
संस्कृत प्राकृत भाषा विभाग, पुणे विद्यापीठ
पुणे ४११००७. फोन : २५६०१३३५
kanchanmande@rediffmail.com

•••



# प.पू. स्वामी वरदानंदभारतीकृत उपनिषदर्थकौमुदी-खंड दुसरा

**सौ. वसुधा परांजपे, पुणे :** बी.ए. (आनर्स) भारत हायस्कूलमध्ये ३० वर्षे शिक्षिका, अध्यात्म विषयावर प्रवचने, राणी लक्ष्मीबाई मंडळ असो. कार्यकारी विश्वस्त.
विपुल लेखन, ग्रंथलेखन, विविध मासिकांतून लेखांचे लिखाण.
**सौ. मीना वाटवे :** एम.ए.बीएड.,
२० वर्षे माध्यमिक शिक्षिका, आध्यात्मिक लेखनाची आवड

कल्याणी मासिकाच्या वार्षिक अंकानिमित्ताने ह्या खंडाचा पुन्हा एकदा अभ्यास करण्याची संधी मिळाली. या खंडात केन, कठ, प्रश्न, मुंडक, ऐतरेय आणि तैत्तिरीय अशा सहा उपनिषदांवर प्राचार्यांचे विस्तृत भाष्य आहे. मी संस्कृत तज्ज्ञ नाही. पण अभ्यासाची आवड असल्याने प्राचार्यांनी लिहिलेल्या साहित्याचा संक्षेप आपल्या समोर मांडण्याचा मी प्रयत्न करीत आहे, तो यासाठी की प्राचार्यांनी काय लिहिले, हे मुळातून वाचण्याची इच्छा प्रत्येकास व्हावी.

आज पाश्चात्त्यांचे अवगुण उचलून भारतीय समाज, भारतीय नीतिमूल्ये जीवनातून काढून टाकताना दिसत आहे. व्यक्तिगत चंगळ अन् मनोरंजन याकडे त्याचा वाढता ओढा, सत्ता, संपत्ती प्राप्त करण्याच्या दिशेने घरंगळत अधोगतीकडे निघाला आहे. अशा अवस्थेतून व्यष्टी समष्टीला उन्नत करण्यासाठी प्राचार्यांनी आयुष्यभर आपली लेखणी व वाणी झिजवली. हिंदू समाजाचे स्वत्व जागृत करण्याचे काम त्यांनी तळमळीने पोटतिडीकेने केले आहे.

आता या उपनिषदातील विचारांकडे वळू या. श्री विद्याधरजी गोखले स्वामींचा उल्लेख आधुनिक महाराष्ट्रातील 'अभिजात भाष्यकार' असा करतात. आधुनिक असल्यानेच त्यांनी तत्त्वज्ञान सर्वसामान्यांना सहज कळेल अशी सोपी भाषा वापरली आहे.

प्रथम येते ते **केनोपनिषद**. यात अहंकार टाकून नम्रतेने साधना करावी असा आदेश, देवांच्या अहंकाराने त्यांना झालेले ब्रह्माचे विस्मरण, त्यामुळे झालेली नाचक्की व नम्रतेने नंतर केलेला व्यवहार व मिळालेला उपदेश असा कथाभाग आहे. त्या संदर्भात 'अहंकाराने मी ब्रह्म जाणले आहे असे जो म्हणतो – **'जो जाणतो मी जाणले। त्यास काही नसे कळाले'** असा अभिप्राय व्यक्त करून **''असा ज्ञाता विनयी भक्त । तोचि जाणे ब्रह्माप्रत। अहंकारी अज्ञानात बुडोनी राही सर्वथा।।''** (४६ ते ५० पृ.२३.) असा विचार मांडतात. या उपनिषदात ''मनाला कोणाची प्रेरणा मिळते, मन विषयाकडे का खेचले जाते? अंत:करणात इच्छा का निर्माण होतात?'' इ. प्रश्नावर भाष्य आहे.

दुसरे आहे ते **कठोपनिषद!** यात नचिकेत व त्याचा पिता यांचा दानासंबंधातला संवाद व नंतर यम नचिकेत यांच्यातील संवाद आहे. त्यात प्राचार्य सांगतात ब्रह्मज्ञानाकडे वाटचाल करताना प्रथम 'हे हवे, ते नको' ह्याची जीवनातून हकालपट्टी करायची. तितिक्षा वाढवावयाची. श्रेयाकडे वाटचाल करायची तर लक्ष सतत ध्येयाकडे. 'सहज मिळणारे सुखोपभोग टाकून नचिकेत ध्येयाला चिकटून बाकी सगळ्याची उपेक्षा करतो. आजच्या विद्यार्थ्यांनी आदर्श म्हणून 'नचिकेत' डोळ्यापुढे ठेवावा! त्या संदर्भात प्राचार्य लिहितात.

**श्रद्धा जिला ऐसे म्हणती। कुमारा ती हीच मती ।**
**खरोखरी तू सत्यव्रती । सहज लाभे तुजला ती।।१३४।।**
**तुझी सत्याची धारणा । जिज्ञासाही विचक्षणा ।**
**नि:स्पृहता बघुनी मना । प्रेम उत्कट वाटे तुझे** ।।१३६।। पृ.१०३

पुढे येते ते **प्रश्नोपनिषद** जीवसृष्टी कशी निर्माण झाली? सृष्ट प्रजेचे आश्रयस्थान कोणते? प्राणाची निर्मिती, व स्थूल शरीरातील त्याचे जाणे, येणे, स्थिरावणे कसे होते? मनुष्याला झोप येते म्हणजे कोणती इंद्रिये बंद होतात? झोपेतही कार्य कोणाकडून होत राहते. गाढ झोपेने सुखावतो कोण? गाढ झोपेत इन्द्रिये कोणाच्या आश्रयाला जातात? स्वप्ने कोणत्या इंद्रियांनी अनुभवली जातात? परब्रह्माच्या उपासनेसाठी आलंबन वा प्रतीक कोणते घ्यावे? ॐच्या उपासकाला कोणता लोक प्राप्त होतो? १६ कलांचा पुरुष व सर्वोत्तम पुरुष हे एकच आहेत की वेगळाले? अशा अनेक महत्त्वाच्या प्रश्नाविषयी यात संवादचर्चा आहे. अनेक प्रतिमा व रूपके यात वापरलेली आहेत.

**मुंडकोपनिषदा**त मनुष्याला शांती समाधान प्राप्त करून देणाऱ्या पराविद्येचे स्पष्टीकरण, जीवात्मा व परमात्मा या विषयी चर्चा आलेली आहे. ब्रह्मज्ञान कोणास होते? तर,

**''वैराग्याने कर्मे सुटली । अंत:करणे शुद्ध झाली।**
**यत्नशीला त्या लाभली । सर्व भावी प्रसन्नता ।।४३।।**
**मय तयाचे येणे जाणे। खुंटते की ब्रह्मज्ञाने ।**
**वास तयाचा अमृतत्वाने । नित्य होतो ब्रह्मलोकी** ।।४४।। पृ.३९१

**ऐतरेयात** 'प्रज्ञानं ब्रह्म' हे महावाक्य आलेले आहे. ज्ञान ही आत्म्याची निशाणी. सृष्टी-निर्मिती, गर्भावस्था, मनुष्याचे तीन जन्म व मानवाच्या १६ वृत्ती इ. विषय आहेत.

**तैत्तिरीयात** शिक्षावल्ली, ब्रह्मानंद वल्ली व भृगुवल्ली असे तीन भाग आहेत. अभ्युदय व नि:श्रेयसाची साधने साधून उच्चारण शास्त्र व त्याचे

महत्त्व येते. ब्रह्मानंद वल्लीमध्ये नास्तिकता अध:पतनास कारणीभूत होते हे सांगून याचे मूळ कारण अहंकारी बुद्धिवाद हेच आहे, असे स्पष्ट केले आहे.

भृगुवल्लीमध्ये ईश्वराचे अस्तित्वावर असलेली श्रद्धा. त्यामुळे निर्माण झालेले भक्तिमय अंत:करण व वैराग्याने, निस्पृहतेने अनन्य शरणतेने चिंतनपूर्वक केलेली उपासना जो ब्रह्मानंद देते त्याचे वर्णन आहे. चराचरात ब्रह्म दिसल्याने, स्वत: आपण सर्वत्र भरून आहोत ही जाणीव व त्यामुळे होणारा आनंद याचे वर्णन आहे.

हे सर्व आपली जिज्ञासा वाढवण्यासाठी आहे. ती वाढून मूळ ग्रंथ वाचण्याची, अभ्यासण्याची इच्छा होवो.

* * *

## केनोपनिषद

'उपनिषद' म्हणजे भारतीय तत्त्वज्ञानाने जगाला दिलेली सर्वात मोठी देणगी आहे. उपनिषद वाङ्मय म्हणजे अक्षरश: ज्ञानाचा समुद्र आहे. ऋग्वेद काळामध्ये कर्मकांडापासून दूर जाऊन ज्ञानसाधना करून ब्रह्म, आत्मा, मन यांचा शोध घेण्याची तीव्र इच्छा व्यक्तीला झाली, ज्ञानाची क्षितीजे विस्तारली आणि यातूनच 'उपनिषदां'चा जन्म झाला.

उपनिषद म्हणजे 'ब्रह्मविद्या' किंवा 'अध्यात्मविद्या.' एकूण मुख्य १० उपनिषदे आहेत. या उपनिषदांवर पूज्य शंकराचार्यांचे भाष्य आहे. त्यापैकी 'केनोपनिषद' या उपनिषदाचा विचार आपण करू.

'केनेषितं' या वाक्याने केनोपनिषद सुरू होते. 'केन' या शब्दाने त्याचा प्रारंभ होतो. या उपनिषदाचे चार अध्याय असून पहिले दोन पद्यमय आणि शेवटचे दोन गद्यमय आहेत.

प्रत्येक उपनिषदाच्या सुरुवातीला एक शांतिपाठ आहे. अध्ययनाला अनुकूल अशा चित्तवृत्ती निर्माण करणे, यासाठी शांतिपाठ प्रारंभी म्हणावयाचा तो श्रद्धेने व शेवटी म्हणायचा तो समाधानाने. केनोपनिषदाचा शांतिपाठ ऐहिकातून पारलौकिकाकडे गती देणारा आहे. ही गती साधण्यासाठी शरीर कार्यक्षम असेल तर साधकाने केलेले प्रयत्न साधकाला ध्येयापर्यंत पोहोचवतात. शरीराबरोबर मनही निग्रही रहावे, किंवा ते राहिले पाहिजे म्हणून परमेश्वराला शरण गेले पाहिजे म्हणून साधक म्हणतो, 'हे ॐकाररूपा ईश्वरा तू माझ्यावर कृपा करावीस, की ज्यामुळे माझी सगळी ज्ञानेंद्रिये व कर्मेंद्रिये योग्य तऱ्हेने कार्यक्षम राहोत. त्रिविध तापांची शांती लाभावी म्हणून प्रार्थना केली आहे.' हे उपनिषद संवादात्मक आहे.

**काही प्रश्न :**

१) मनाला कोणाची प्रेरणा मिळते?

२) प्राण कोणाच्या प्रेरणेने चालतो?

३) वाणी कोणाच्या द्वारा क्रियाशील होते?

४) चक्षु:श्रोत्रांना आपापल्या विषयांत कोण नियुक्त करतो?

परमेश्वराने माणसाच्या मन, बुद्धीची अशी विशिष्ट जडणघडण केल्यानेच माणसाच्या मनात प्रश्न निर्माण होतात. माणसाची बुद्धी कार्यामागचे कारण शोधायचा प्रयत्न करते. कोणतेही कार्य आपोआप घडत नाही. त्यामागे कोणाची तरी इच्छा आणि तशी कृती आवश्यक असते. शरीरापेक्षाही मानवाच्या मनाची शक्ती आश्चर्यकारक आहे. एखादा आजारी माणूस औषध पाण्याच्याहीपेक्षा स्वत:च्या इच्छा-शक्तीच्या बळावर लवकर बरा होतो तो याच मनामुळे! पण हे मन इतके चंचल आहे की ते कधीही एका ठिकाणी स्थिर रहात नाही. अनेकविध विषयांकडे ते ओढ घेते. विचार करण्याच्या प्रक्रियेतून प्रश्न उद्‌भवतात. ''चंचल असणारे हे मन अनेक प्रकारच्या शक्तींनी संपन्न असते. ते शरीराकडून अतिशय आश्चर्यकारक कार्य घडवून आणते, हे सर्व करण्यासाठी मनाला कोणाची प्रेरणा लाभते? आपली सर्व ज्ञानेंद्रिये कान, नाक, डोळे, जीभ, त्वचा कोणाच्या प्रेरणेने काम करतात? आपले शरीरही परमेश्वराने बनवलेले एक यंत्र आहे. आपल्या शरीराचे सर्व व्यापार फक्त अन्नावर चालतात. लहान बाळाला ठराविक काळानंतर दात येतात आणि काही वर्षानंतर ते पडून पुन्हा नवीन दात येतात. पण ही घटना पुढील आयुष्यात पुन्हा घडत नाही. हे कोणामुळे घडते? हा जर निसर्ग म्हणाल तर हा निसर्ग निर्माण करणाऱ्या त्या ईश्वराला ओळखावे असे माणसाला स्वाभाविकच वाटते. असे वाटणे ही सुद्धा परमेश्वराचीच योजना आहे!

माणूस सहजपणे असे म्हणतो की 'मी' आता 'माझे' आयुष्य 'माझ्या' मनाप्रमाणे जगणार आहे. कारण माणसाच्याच मनांत हे भाव निर्माण होतात. कारण परमेश्वराने मानवालाच फक्त मन दिले आहे. माणसाच्या मनात हे भाव, इच्छा कशा उत्पन्न होतात? विज्ञान कितीही प्रगत झाले आणि बुद्धीच्या जोरावर माणसाने कितीही शोध घेण्याचा प्रयत्न केला तरी या इच्छांचा प्रेरक कोण हे शोधणे सोपे नाही. म्हणून स्वामी वरदानंद म्हणतात,

**''तेवी कारणांचा होता शोध । विचार होती हतबुद्ध ।**
**ज्ञानसाधने जी विविध। कुंठित होती ती सारी ।।४९।।** पृ. २०.

म्हणून मग श्रुतिमाऊली म्हणते कानाचे कान, वाणीचे मुख, डोळ्यांचा डोळा, प्राणांचे प्राण आणि मनाचे मन हे सर्व आत्मतत्त्व माणूस लक्षात न घेता मी ऐकले, मी पाहिले, मी बोललो असे अहंकाराने म्हणतो, आणि 'मी-मी' म्हणत अनेक सुख-दु:खांच्या चक्रात सापडतो.

कानांची ऐकण्याची क्षमता कमी झाल्यावर माणूस ऐकू येण्यासाठी यंत्र वापरतो पण ते लावल्यावर त्याला आजूबाजूचे नको असलेले बारीक-बारीक आवाजही ऐकू येतात की जे त्याच्या ग्रहणशक्तीला अडथळा निर्माण करतात आणि मग ते यंत्र त्याला त्रासदायक ठरते. मग असे का होते याचा विचार करता त्याला समजते की ज्या कानांनी आपल्याला ऐकू येत होतं ती श्रवणशक्ती हे परमेश्वराचेच एक रूप आहे. तसेच बोलण्याची इच्छा आहे, तोंड, स्वरयंत्र सर्व आहे. पण बोलता येत नाही. म्हणजे 'मी' ऐकतो, मी बोलतो, मी बघतो असे जे माणूस म्हणतो या सर्व क्रियांचा कर्ता 'मी' नसून दुसराच कोणी आहे. तो कोण आहे हे कळण्यासाठी सगळा अहंकार बाजूला ठेवून त्या प्रेरक शक्तीचा शोध घेतला पाहिजे.

माणसाचे मन हे अत्यंत प्रभावी असून अतिशय हट्टी आहे. नको त्या अनिष्ट विषयांचा विचार मन करते, नको तिकडे धांव घेते. अशा या

मनाला कोणाकडून प्रेरणा मिळते? ती प्रेरणा शिष्याला समजावून सांगणे किंवा दाखवणे शक्य नाही. थोर थोर ऋषीही म्हणतात, ''आम्ही जे तत्त्व जाणू शकलो नाही, त्याची ओळख शिष्यांना कशी करून देणार म्हणून हे विशद करताना 'स्वामी वरदानंद' अतिशय सोप्या भाषेत म्हणतात, ''खूप श्रम केल्यानंतर गाढ झोप लागते आणि सर्वांगाला जशी विश्रांती मिळते तशी स्वस्थता ब्रह्मसाक्षात्काराने तनामनाला प्राप्त होते.

**थोर थोर म्हणती ऋषि। जाणतो ना आम्ही यांसी ।**
**अथवा जाणून घ्यावयासी । शक्ती आम्हाप्रती नसे ।।७०।पृ.२२**

अशा या आत्मतत्त्वाचे, ब्रह्माचे ज्ञान करून द्यावे म्हणून साधकाने नम्रपणे साक्षात्कारी विद्वानाला विचारणा केली,

**''महाराज आपण थोर । अज्ञान माझे करा दूर।**
**कासाविशी वाटते फार । त्राता नाही तुम्हाविणे।।८५।पृ.२४**

तेव्हा मग ऋषी सांगतात, की बाळा असा गोंधळून जाऊ नकोस. विचार करून शोध घे म्हणजे कळेल. ज्याचे वर्णन वाणीला करता येत नाही, पण ज्यामुळे बोलण्याचे सामर्थ्य वाणीला लाभते, कानांना शब्द ऐकण्याचे सामर्थ्य ज्याच्यामुळे प्राप्त होते पण ते कानांना समजत नाही, नेत्र ज्याला पाहू शकत नाहीत, पण नेत्रांना ज्याच्यामुळे रंग, रूप, आकार, प्रकार जाणण्याची शक्ती मिळते, मनाला चिंतनादी शक्तींचे सामर्थ्य ज्याच्यामुळे मिळते, पण मन ज्यांचे चिंतन करू शकत नाही, देहातील सर्व इंद्रिये ज्या प्राणामुळे कार्यक्षम राहतात असा प्राण ही ज्याच्यापुढे दुर्बल ठरतो, जे प्राणाला देह चालवण्याची प्रेरणा देते ते ब्रह्म होय!

हे ब्रह्मतत्त्व अतिशय गूढ असल्याने ते तत्त्व जाणण्याची विलक्षण ओढ साधकाच्या चित्ताला लागते आणि मग साधक ते तत्त्व आत्मसात करण्यासाठी अनेकविध देवदेवतांची पूजा, अनेक प्रकारच्या उपासना करतो. आपली श्रद्धा आपल्या देवतेवर जडावी म्हणून काही तरी प्रतीक योजतो. त्यासाठी विविध भाषातील विविध शब्द, आकार, चिन्हे यांचा वापर करतो. पण इतके करूनही आत्मतत्त्वाचे ज्ञान तर होत नाहीच, पण त्याचा अहंकार इतका बळावतो की वेगवेगळी मठ, मंदिरे, संस्था, संघटना निर्माण करतो आणि त्यामुळे अभिलाषा, लोकेषणा, दांभिकता यांची वाढ होते. चित्तातील षड्विकार तसेच राहतात. त्यामुळे मूळच्या सात्विक वृत्तीलाही ते दडपून टाकतात. म्हणून आचार्य स्वामी वरदानंद म्हणतात,

**''शुद्ध सात्विक उपासना । भावोत्कट ती प्रार्थना ।**
**दृढनिष्ठा नि प्रेम यांना निखंदिले ना शास्त्राने ।।१३३।।पृ.२८**

अशा या आत्मतत्त्वाचे विलक्षण सामर्थ्य पाहूनच त्याला ब्रह्म हे नाव दिले आहे. त्या ब्रह्मानुभूती विषयीची चर्चा केनोपनिषदाच्या दुसऱ्या खंडात आहे.

शिष्याच्या चेहऱ्यावर दिसणारे समाधान आणि आत्मविश्वास बघून गुरूंच्या लक्षात येते आणि ते शिष्याला म्हणतात, ''तुला जर असे वाटत असेल की ब्रह्म म्हणजे काय ते मला कळले तर तू खरोखरीच वेडा आहेस. असे ब्रह्मतत्त्व अतिशय गूढ आहे, ते सहजासहजी अनुभवता येत नाही. इथेच स्वामी वरदानंद भारती आपल्या रोजच्या व्यावहारिक दृष्टांताने ब्रह्माविषयी येणाऱ्या अनुभवाचे वर्णन करताना म्हणतात,

**''गूळ-साखर मधांतली । गोडी पुरती चाखली।**
**तरी चवी जी निराळी । विवराया ती येते ना ।।३२।।पृ.३२**

त्याचबरोबर विलक्षण प्रसन्नता देणाऱ्या अनुभवाचे वर्णन कसे करता येणार -

**''भव्य दिव्य, उदात्त । विशाल अद्भुत उन्नत।**
**पाहता काही हृदयांत । आनंदाचा पूर लोटे।। ३४।।पृ.३२**
**परि तयाचे वर्णन । यथार्थतेने करिता ये न् ।।**
**मग हे तो ब्रह्मज्ञान । रूप त्याचे वर्णू कसे।। ३५।।''पृ.३२**

आपल्या सारख्या सामान्य जनांना ब्रह्मविद्येच्या अभ्यासाची गोडी लागावी, ब्रह्मज्ञानाच्या अभ्यासाचा प्रयत्न आपण करावा म्हणून अत्यंत साध्या, सोप्या भाषेत हा उपनिषदार्थ कौमुदीचा ग्रंथ आपल्या हाती देताना पू. पू. स्वामी म्हणतात,

**''जीवन व्हावे साधनामय । हेच माझ्या पुढती ध्येय।''**

सद्गुरुंना आपल्या शिष्याच्या जीवनाची किती काळजी असते ते यावरून सिद्ध होते.

वरील सर्व संवाद श्रुती माऊली ऐकत होती. त्याचप्रमाणे एका शिष्याने केलेले वर्णन ऐकता ऐकता इतर शिष्यही सहजतेने एकाग्रचित्त झाले आणि ब्रह्मानंद उपभोगू लागले. पण जो म्हणतो मला ब्रह्म कळले त्याला काहीच कळलेले नसते. कारण मला कळले या जाणीवेचा अहंकार त्याच्या अंतःकरणात साठून त्याचे अंतःकरण मलिन झालेले आहे. मग या मलीन झालेल्या अंतःकरणात शुद्ध ब्रह्मज्ञान कसे राहील?

म्हणून सद्गुरूंच्या वाक्यावर विश्वास ठेवून, निष्ठा, श्रद्धा, संयम, विवेक, भक्ती या गुणसमुच्चयाने साधक साधनेत जेव्हा उत्कट होत जातो तेव्हा हळुहळु पापवासना, पापसंचय कमी कमी होऊ लागतो. हृदयाला पवित्रता येते आणि मग साधकाला ब्रह्मसत्तेची प्रचीती येत राहते. त्या ब्रह्मज्ञानाचे वर्णन करण्याचे सामर्थ्य शब्दात नाहीच तर प्रत्येकाच्या आचरणात आहे.

म्हणून आपण सर्वांनी शुद्ध आचरणाने या ब्रह्मसत्तेचा अनुभव घेतला पाहिजे. म्हणून प. पू. श्रीदासगणूमहाराज म्हणतात,

**सद्धर्माचे आचरण हेची कारण अभ्युदया ।**
**करा त्या हरीला येईल दया।**

श्रीदासगणूमहाराज आणि स्वामी वरदानंद भारती यांना वंदन करून मी माझ्या अल्पमतीने केलेल्या वाङ्मयसेवेला विराम देते.

* * *

## कठोपनिषद

### शांतिपाठ -

**ॐ सहनावतु ...... मा विद्विषावहै। ॐ शान्ति:**

मंगलमय ॐकाराने ज्याची उपासना केली जाते त्या विश्वभंराने सर्वतोपरि आमचे रक्षण करावे अशी प्रार्थना केली आहे. अध्ययन व साधना या दोन्हीत अनेक अडचणी उभ्या रहातात. कधी बाह्य परिस्थिती

बिघडते, गोंगाट, फटाक्यांचे प्रदूषण, वादळ, वारे, घनघोर वर्षा वा असह्य उष्णता किंवा थंडी अशा अनेक अडचणी येतात. त्याचप्रमाणे अभ्यासकाची वा सद्गुरुंची प्रकृती बिघडते. त्यांनाही विक्षेप येतो. संवाद चर्चेत कुणाचे शब्द हृदयाला डागण्या देतात. मनाला अस्वस्थता येते. यामुळेही अभ्यासात वा साधनेत खंड येतो. त्यातून ही संकटे अशी असतात की ती नष्ट करण्याचे बळ वा स्वातंत्र्य आपल्या हाती नसते. म्हणून परमेश्वराला प्रार्थना करायची, ''देवा रे, या संकटापासून तू आम्हाला वाचव. आमचा अभ्यास वा साधना अनिर्बंध चालू दे.''

आम्ही मनापासून, आमच्या शक्तीप्रमाणे, प्रामाणिकपणाने जी कर्तव्ये, कर्मे करू ती परमेश्वराची सेवा म्हणून रुजू होवोत. आमच्यातले मतभेद नष्ट होऊन आमचा सारा समाज धैर्यशील व निष्ठावंत, निःस्पृह राहून उन्नती साधो. साधनेत उत्कटता येऊन ब्रह्मानंद आम्हास मिळावा व त्या आनंदातून समाजसेवा घडावी. सृष्टीतील गूढे उकलावीत! त्यासाठी आमचे अध्ययन सतेज असावे. आमच्या व्यवहारात द्वेष, मत्सरांना वाव नसावा. निरंहकारी राहून व्यष्टी, समष्टी, सुखासमाधानाने नांदो.

### कठोपनिषद

कृष्ण यजुर्वेदाच्या कड नावाच्या आचार्यांनी उपदेशिलेले म्हणून कठोपनिषद हे नाव. यात यम व कोवळा तरुण नचिकेता, यांचा संवाद आहे. याचे वैशिष्ट्य म्हणजे जिवंतपणी सशरीर स्वतःच्या इच्छेने यमाकडे जाणारी ही पहिलीच व्यक्ती! दुसरे वैशिष्ट्य म्हणजे स्वतः मृत्यूच अमरत्वाचे ज्ञान देतो आहे! एकशेवीस मंत्र संख्येचे स्पष्टीकरण प्राचार्य अ. दा. आठवले यांनी अठराशे अठरा ओव्यातून केलेले आहे. तत्त्वज्ञानाची परिसीमा यात गाठलेली असल्याने, ब्रह्मसूत्रात कठोप-निषदातील अनेक मंत्रांची मीमांसा केली आहे.

गौतम वाजश्रवस हे नचिकेताचे वडील. ते विश्वजित नावाचा यज्ञ करताहेत. विश्वजित यज्ञात तर सर्वस्वाचे दान करावे लागते! अंतःकरणात पूर्ण त्याग नसेल, लोभ ठिय्या देऊन बसत असेल तर सर्वस्वाचे दान कसे होणार! गौतमाने मरतुकड्या भाकड गायी दान केल्या। वडिलांचे हे असे दान, शास्त्र व धर्म याचा अभ्यास केलेल्या तरुण नचिकेत्याला पटले नाही. गाई निरुपयोगी, तसा मी ही अजून कमवत नाही म्हणून निरुपयोगी, असा विचार करून त्याने वडिलांना 'माझे दान कुणाला करणार?' असे पुन्हा पुन्हा विचारले. तेव्हा ते रागवून म्हणतात, ''तुझे दान यमाला केले आहे. जा तिकडे, मला तोंड दाखवू नकोस.'' नचिकेता यमाकडे जातो, यम परगावी! त्याच्या दाराशी हा अन्न पाणी न घेता थांबतो. अतिथीच्या अनादराचे पाप नको म्हणून यम त्याचे आगत स्वागत करून त्याला तीन वर देतो.

त्यात पहिल्या वराने तो पित्याची प्रसन्नता मी परत गेलो असता मला मिळावी व त्याची दुर्गती टळावी हे मागतो. दुसऱ्या वराने स्वर्गप्राप्तीसाठी आवश्यक असलेल्या अग्निउपासनेचे ज्ञान प्राप्त करतो. व तिसऱ्या वराने मरणोत्तर काय उरते असा प्रश्न विचारून ब्रह्मज्ञानाची प्राप्ती करून घेतो. अशी ही कथा आहे.

प्राचार्यांनी इथे दानासंबंधांत महत्त्वाचे विचार ५६ ते ६५ या ओव्यात मांडले आहेत. ते मुळातून वाचावेत.

**कृपणता आणि वंचकता । अंशेहि नसावी चित्ता।**
**तरीच आहे सफलता । कोणत्याही दानाची ।।६१।।पृ. ६३.**

नचिकेता विचार करतो. माझे काय चुकले म्हणून बाबा मला यमाला देत आहेत? माझे इतर बंधू व इथे रहाणारे सर्व विद्यार्थी यात मी चांगलाच वागतो. इतर माझ्यापेक्षा नम्र, कार्यतत्पर व आज्ञाधारक मानले तर त्यांच्या तुलनेत मी फार फार तर मध्यम ठरेन. पण कनिष्ठ नक्कीच नाही. रागाने जे बोलले गेले ते मी खरे करून दाखवीन व पित्याला उत्तमगती यमाकडून मिळवून देईन.

अतिथी सत्काराच्या प्रसंगाने आशा व प्रतीक्षा यातले अंतर ११३ व ११४ या ओव्यातून स्पष्ट केले आहे. दुसऱ्या वरात स्वर्गाचे सुंदर वर्णन आहे. यम सांगतो, ''साधनेत चित्त रमावे ते स्वर्गात सुखशांती लाभावी म्हणून! पण तसे न होता स्वर्गातल्या वैभवाने आसक्ती, लोभ, मोहाने दुर्गुण अंगी येतात. द्वेष, मत्सर वाढतो. शांती नष्ट होते व संघर्ष निर्माण होऊन अस्वस्थता वाढते. उन्नति, प्रगती व विकास खुंटतो. म्हणून स्वर्गातही विवेक व संयम यांना महत्त्व आहे. यमाने सांगितलेली उपासना एकाग्रतेने ऐकून नचिकेताने सप्रयोग – ती करून दाखवली. असा हुशार विद्यार्थी मिळाला म्हणून यम धर्माला अति आनंद झाला.

प्राचार्यांनी इथे यमाच्या मनात शिरून त्याच्या अंतःकरणातली रुखरुख व्यक्त केली आहे.

**लोक मजसी समजती । क्रूर घातक निर्दय अति।**
**माझी सारी असे कृति। पहा केवळ न्यायाची ।। १९०।।**
**कुमारा! माझा भलेपणा । कोणी लक्षात घेती ना।**
**सद्गुणा आणि सद्वर्तना । महत्त्व भारी देतो मी ।। १९२।।**

प्रसन्न झालेल्या यमाने त्या अग्निउपासनेला 'नचिकेत' अग्नी उपासना असे नाव दिले. देणारा उदार व ज्ञानी आहे व नचिकेताही समंजस आहे. म्हणून यमाकडून परतताना उत्तम आयुष्य मागून घेतले. आता मुख्य विषय!

तिसरा वर माग म्हणताच नचिकेता हात जोडून विचारतो ''माणूस मरतो म्हणजे रहाते काय, जाते काय? या विषयी अनेक मते आहेत. कोणी म्हणतात शरीर नष्ट होते, पण आत्मा राहतो तो दुसऱ्या देहात प्रवेश करतो त्याला कुणी जीव म्हणतात. देहाबरोबर जीवाचेही अस्तित्व संपते असेही काहींचे मत आहे. कुणी म्हणतात कर्मफळाप्रमाणे जीवाचे जाणे येणे घडते. यातले खरं काय ते सहज समजत नाही. कोणतेही प्रमाण, अनुमान किंवा तर्क, याची निश्चिती कोणीही सामान्यपणे करू शकत नाही. आपण प्रत्यक्ष मृत्युदेव आहात म्हणून आपल्याला विनवणी. खरे काय ते आपणच मला सांगू शकता. तिसऱ्या वराने हे ज्ञान माझ्या पदरात टाकावे एवढीच विनवणी करतो.''

नचिकेताच्या या जिज्ञासेने यमधर्म आश्चर्याने थक्क झाला. विद्वानांनाही ज्याची जिज्ञासा नसते, तेथे हा अल्पवयीन केवळ सोळा वर्षाचा मुलगा, हे ज्ञान करून घेऊ इच्छितोय! मात्र याने आपली योग्यता सिद्ध केली पाहिजे!! त्याची परीक्षा घेण्याच्या हेतूने यमधर्म त्याला म्हणाला, ''अरे बाळा! या पूर्वीही अनेक विद्वानांनी ब्रह्मज्ञान प्राप्तीसाठी खूप चर्चा केली, पण हाती काही लागले नाही. इतके ते ज्ञान गूढ आहे.

तुझ्यासारख्या विचक्षणाला सहज समजण्यासारखी अग्निविद्या मी तुला लगेचच दिली ना! ब्रह्मज्ञानाबाबत इतकी सहजता नाही, म्हणून तू तीही मागणी सोड व दुसरे काहीही माग. तुला मी देईन.

नचिकेत्याच्या लक्षात आले; बुद्धिचातुर्याने मनधरणी केल्याशिवाय, यमराज ज्ञान देणारे नाहीत! म्हणून तो म्हणतो, ''महाराज, श्रेष्ठ व पूज्य व्यक्तींनाही या ज्ञानाबाबत संदेहच शिल्लक राहिलाय. याचे कारण आपणासारख्या अनुभवी अधिकारी व्यक्तीकडून सहज अन् सोप्या भाषेत त्यांना मार्गदर्शन मिळाले नाही! सुदैवाने आगम व अनुभव या दोन्हीत पारंगत व प्रेमळ सद्गुरू सन्निध असता, आणि अनुग्रह करण्यास तयार असताही मी या गूढ विद्येचे ज्ञान घेऊन माझी जिज्ञासा तृप्त करू शकलो नाही, तर माझ्या सारखा करंटा मीच! या गूढ ज्ञानाची माझी तृषा शांत करावी!''

या मुलाने आपला हट्ट सोडावा म्हणून यमधर्माने त्याला बरीच प्रलोभने दाखवली. म्हणाले, ''अरे मृत्यूनंतर आत्मा राहिला काय, अन् गेला काय? इहलोकात जगण्याला या ज्ञानाची गरजच काय? त्या ज्ञानाशिवाय करोडो माणसे पृथ्वीवर सुखाने जीवन जगताहेत, तर दुष्प्राप्य अशा या ज्ञानप्राप्तीच्या हट्टाला चिकटून तू राहू नकोस. तुझ्यासारख्या पोरवयीन माणसाने असा आग्रह धरू नये!''

''हे मृत्युदेवा, आपण माझ्यापुढे नश्वर प्रलोभने का ठेवता. विषयोपभोगाने इंद्रियांचे सामर्थ्य, बुद्धीचे तेज, मनाची शांतता, समाधान नाहीसे झाले तर त्या केविलवाण्या दीर्घायुष्याचा काय उपयोग मला. मृत्यूला जिंकून अविनाशी शांती व प्रसन्नता प्राप्त करायची आहे. त्यासाठी ब्रह्मविद्येचे ज्ञान हवे आहे. वासरू भुकेले होऊन झटे देते आहे, गोमातेलाही पान्हा फुटला आहे, मग त्या वासराला आसुसलेला ठेवणार का?''

नचिकेता आदर्श विद्यार्थी आहे. कोणत्याही प्रलोभनाने ध्येयच्युत होणारा नाही. मागणीवर ठाम, मधुर व आर्जवी भाषेत तो पुन्हा म्हणाला, ''ब्रह्मविद्या म्हणजे चैतन्याचे सर्वोच्च शिखर. त्या शिखरावर आरुढ होण्याची माझी इच्छा ही आपल्याकडूनच पूर्ण होणार अशी माझी खात्री आहे! माझी अपेक्षा पूर्ण झाल्याखेरीज मी आपले पाय सोडणार नाही.'' अशी योग्यता नचिकेताने सिद्ध केल्यावर यमधर्माने सांगितले. बुद्धी शुद्ध असल्याखेरीज ग्राह्य काय व अग्राह्य काय हे कळत नाही. मोठमोठ्या तपस्व्यांनाही विषय सुखाचा मोह कधी कधी फशी पाडतो. प्रखर ध्येय-निष्ठेपुढे सुखोपभोग जाळून वैराग्य, नि:स्पृहता टिकवणारा तू 'श्रेयस्काम' आहेस. ब्रह्मज्ञान अतिगूढ आहे. ते प्रणवाच्या योगाने सांगितले जाते. प्रणव, ॐकार म्हणजे चिदात्मा. अज, अमर, मारत नाही व मरत नाही. देहात असलेला जीव ज्ञाता आहे व परमात्मा ज्ञातव्य आहे. आत्मतत्त्वच शरीराला चैतन्य प्राप्त करून देते.

आत्मतत्त्व कळण्यासाठी शरीररूपी रथ मिळाला आहे. इंद्रिये या रथाचे घोडे, मन हा लगाम घेऊन बुद्धी सारथ्य करीत असेल तरच या नाठाळ घोड्यांना आवरून परमार्थाच्या मार्गावरून हा रथ चालतो व ब्रह्मज्ञान प्राप्त करून प्रसन्नतेत स्थिरावतो. प्राचार्यांची भाषा काव्यमय व समजण्यास सहज सुलभ आहे.

**इंद्रियावरती पूर्ण । हवे मनाचे नियंत्रण ।**
**म्हणजे सारे जीवन । सार्थकी लागेल निश्चयाने।। ४६ ।।पृ.१३२**
**चतुर सारथी घोड्यावरी । नियंत्रणे ठेवी पुरी ।**
**तशी विवेकी विचारी । बुद्धि पाहिजे जीवाची ।।४५।।पृ.१३२**

आत्मतत्त्व कळण्याला अवघड, कारण ते अणूहून सूक्ष्म आहे. अन्तर्मुख दृष्टी करून पहावे लागते. तसेच ते इतके व्यापक, विशाल आहे की हजारों आकाशगंगा असलेल्या आकाशाला ते सहज कवेत घेऊन गवसणी घालू शकते. याच्या व्यापकतेमुळे परस्पर विरुद्ध गुणधर्म याच्या अंगी जाणवतात. यासाठी प्राचार्यांनी हिमालयाचे उदाहरण समोर ठेवले आहे. हिमालयातली शिखरे आभाळाला टेकल्यासारखी वाटतात, तर दऱ्या पाताळभेदी असतात.

असे हे गूढ आत्मतत्त्व कळण्यासाठी अंत:करण शुद्ध हवे. त्यासाठी अन्नशुद्धी महत्त्वाची. अन्नाच्या सत्वांशापासून मनाला सामर्थ्य प्राप्त होते. म्हणून श्री सद्गुरु षोडशोपचार पूजेत प्राचार्य म्हणतात,

**''पाळून धर्म शिष्टाचरण। टाळून वंचना परपीडन।।**
**मी जे मिळविले शुद्ध अन्न । वसो माझ्या उदरी ते ।। ।।**

इथे ते म्हणतात शाकाहार हवा. स्थान, पात्रे स्वयंपाकी स्वच्छ व शुद्ध हवेत. शक्य झाले तर स्पर्श दोष टाळावेत. कुणालाही न दुखावता.

**आपुली प्रकृति व ऋतुमान । पाहून करणे अन्नसेवन**
**तेथ सर्वदा प्रमाण । आयुर्वेदास मानावे ।। २५६।।पृ.११५**

शुद्ध अन्नसेवनाने अंत:करणात सद्गुण हळूहळू प्रवेश करतात.

**बुद्धि असावी विवेकाची । संयमी वृत्ती चित्ताची।**
**तेणे अंतरंग सद्गुणांची । क्रमाक्रमाने वाढ होते ।। ७६।।पृ.१३५**

इंद्रियांपेक्षा विषय अधिक सामर्थ्यशाली असतात. विषयांपेक्षा मन सूक्ष्म आहे, श्रेष्ठ दर्जाचे आहे. मन जागेवर नसेल तर आवडत्या विषयाचीही उपेक्षा होते. मनाहून ही निश्चयात्मक बुद्धी अधिक श्रेष्ठ. ती जेव्हा मनाला ईशतत्त्वाकडे खेचते तेव्हा ती अधिक सामर्थ्यशाली असते. पण त्या बुद्धीपेक्षाही मानव मनात असलेली 'मी'पणाची जाणीव म्हणजे अहंकार हा अधिक सूक्ष्म म्हणून अधिक सामर्थ्यशाली आहे.

ब्रह्मांडाचा विचार करताना या अहंकारालाच हिरण्यगर्भ किंवा महत् म्हटले आहे. साऱ्या चराचरात ते भरलेले आहे. या अहंपेक्षा अव्यक्त म्हणजे मूळ प्रकृती सूक्ष्म आहे. ही मूळ माया, मूळ प्रकृती ज्या चैतन्यातून स्फुरण पावली ते ब्रह्मतत्त्व सर्वात श्रेष्ठ, सर्वांचे नियामक, सर्व तंत्र स्वतंत्र असल्याने त्याचा अनुभव घेणे हीच ज्ञानाची अंतिम सीमा. शास्त्राचे अंतिम साध्य व मानवाचे परमश्रेष्ठ जीवन ध्येय आहे.

या ब्रह्मतत्त्वाला, परमात्म्याला शोधायला, त्याचे दर्शन घ्यायला, त्याच्या सामर्थ्याचा अनुभव घ्यायला कोठे दूर जावे लागत नाही. साधनेच्या द्वारा ज्याने आपली निश्चयात्मक बुद्धी सूक्ष्म, निर्मळ व तेजस्वी केली असेल त्याला बसल्या जागीच ती आत्मज्योत स्वत:च्या हृदयात तेवताना दिसते. प्राचार्य म्हणतात,

**साधनेचे संस्कार । बुद्धीप्रति आणिती धार ।**
**जाऊन मग ती आरपार । वेध घेई आत्म्याचा ।।** १३४।।पृ.१४०

हे लक्षात घेऊनच साधकाने इंद्रिये नियंत्रित करून मनाला अंतर्मुख करावे. मन विषयापासून परावृत्त झाले की बुद्धी विवेकाने उजळते व ज्ञान होते. बुद्धी तत्त्वज्ञानाचे चिंतन करू लागली की 'मी'पणा ब्रह्मामध्ये लीन होतो व 'अहं ब्रह्मास्मि' हा अनुभव प्राप्त होतो. थेंबुट्याला सागराने मिठीत घेतलेले असते. बीजाचं दुभंगणं म्हणजे अंकुराचं उगवणं. ध्यानात एकाग्रतेने देहोपाधी व मीपणा बाजूला होताच 'अहं ब्रह्मास्मि'चा अंकुर, ईश्वरी कृपेने उगवतो. समाधान, प्रसन्नता, उत्साह व आनंद एवढेच स्वरूप उरते. अमृतत्व ते हेच. नचिकेता, हेच तुला प्राप्त करायचे आहे साधनेने!

साधना करताना लक्षात असावे की ही देवघेव नाही. केवळ कृपा.

**कुणाचा कसला अधिकार । चालतो ना आत्म्यावर ।**
**स्वतंत्र आहे परमेश्वर । सर्व सत्ता त्याची असे।।३३९।।पृ.१२३**
**इतुके दिले, इतुके केले । इतुके पाहिजे मिळाले ।**
**असे येथ मुळी न चाले । व्यापार धंदा नाही हा ।। ३४०।।पृ.१२३**

तुला हवे असलेले ज्ञान मिळाले आहे !

**म्हणोनिया आता परत । जावोनिया भूलोकात**
**जिज्ञासू सज्जनाप्रत । आदेश हा सांग माझा ।।१५९।।पृ.१४२**
**उठा लोकहो ! व्हावे जागे । सर्व आळसा सारून मागे ।**
**राहून विनयी संतसंगे । ज्ञान मिळवा आत्म्याचे ।।**१६०।।पृ.१४३

नचिकेता हर्षभरित होऊन म्हणतो, ''जाऊन निश्चित सांगेन. हा सोपा मार्ग सोडून तुम्ही विकाराच्या मागे आडरानात का जाता! यम म्हणतो नचिकेता, हा मार्ग सोपा नाही. कारण तो चढणीचा आहे.

**रुंद असता हातभरी । पाऊलवाट जी डोंगरी ।**
**तीही भयद हो भारी । कठिण वाटे यात्रिकांसी ।। १७९।।पृ.१४४**
**मग शस्त्राची तिखट धार । पंथ तसा हा दुस्तर ।**
**कष्ट जीवा होती फार । या मार्गाने चालताना ।। १८०।।पृ.१४४**
**प्रतिकूल स्थिती बाहेर । आत मन अहंकार।**
**या दोन्हीही आघाडीवर । लढणे भाग हो इथे ।।१९१।।पृ.१४५**

आपले शरीर म्हणजे एक समृद्ध शहर आहे. त्यात सप्तधातूंच्या सात पेठा आहेत. त्यातून जी देवघेव चालते त्यामुळे बल, बुद्धी, तेज वाढते. अहंकार हा सेनापती, अवयव हे नोकर. जीवात्म्याच्या राजधानीचे हे शहर. याला अकरा दरवाजे आहेत. त्यापैकी दोन नाभी आणि ब्रह्म रंध्र हे अनुक्रमे गर्भावस्थेत व मृत्यूसमयी उघडतात. बाकीची दारे सदोदित उघडी असतात. त्यातूनच शब्द, स्पर्श, रूप, रस, गंधादि विषयांची येरझार चालते. या शरीराचे सर्व व्यापार जीवरूपाने आत्मसत्ताच चालवते. शरीरातून आत्मसत्ता निघून गेली की शरीराचे सर्व व्यापार बंद पडतात. त्यालाच मरण म्हणतात. मरण म्हणजे प्राणांचे उत्क्रमण!

'मनुष्य मेला म्हणजे काय होते?' नचिकेता ऐक आता. जो आत्मज्ञानाकडे दुर्लक्ष करून विषयोपभोगात मग्न राहतो. त्याच्या आसक्तीने अनेक पापे करतो. मृत्यूनंतर मानवी देह सोडून त्या जीवाला कृमी कीटकांच्या, पशुपक्षांच्या, वनस्पतींच्या किंवा दगडगोट्यांच्या स्वरूपात पुन्हा जन्माला यावे लागते.

**आपल्या कर्माअनुसरून। लक्षावधि योनीतून**
**करावया लागे भ्रमण । भोगावया सुखदुःखे ।।** १०२।।पृ.१८१

अशा तऱ्हेने एकच असलेले आत्मतत्त्व अनेक प्रकारच्या देहांमध्ये जीवरूपाने राहून नानाविध प्रकारचे भासते. सूर्य जसा सर्वांच्या डोळ्यात राहूनही त्या दृश्य जगतापासून अलिप्त असतो. तसाच आत्मा सर्व कर्ताकरविता असूनही कर्मातीत राहतो. परमात्मा म्हणजे ब्रह्मसत्ता हीच या संसारवृक्षाचे मूळ आहे. ते उच्च स्थानी आहे व इहलोकात त्याच्या अनेक शाखा जीवरूपाने बहरलेल्या दिसतात.

**असा आत्मा शाश्वत । असून सर्वांच्या अंतरात।**
**त्यासी न पाहू शकतात।**
**लंपट जे का भोगांना ।।**१९४।।पृ.१९१
**साधनेच्या बळावरी । जो पोंचतो ध्येय शिखरी।**
**सुखावतो तो अंतरी । ते ठायीच्या दिव्यतेने ।।**२१७।। पृ.१९३

ब्रह्मतत्त्वाच्या या दिव्यतेने अलिप्ततेने व शुद्धतेने श्रुतिमाता त्याला 'शुक्र' म्हणजे शुद्ध, पवित्र, निर्मळ या शब्दाने गौरविते. तेथे वासनेचा मळ नाही! विषयांचा मोह नाही!! पिंडात शरीराचे व ब्रह्मांडातही साऱ्या हालचालींचे नियमन आत्मसत्ताच करते. त्याच्याच आदेशाने पंचमहाभूते कार्यरत रहातात. नचिकेत्या, मला, या मृत्यूदेवालाही ब्रह्मसत्तेच्या धाकात रहावे लागते!

**परब्रह्माची अशी सत्ता । भावे पटते ज्याच्या चित्ता।**
**तयासीच हे नचिकेता । ऐक्य येते अनुभवाया ।।**१६२।।पृ.२११

असे सांगता सांगताच यमधर्माचे ध्यान लागले, बोलणे थांबले. अंतरंगात उसळलेल्या दिव्य प्रकाशाने यमधर्माचा मुखचंद्रही प्रफुल्लित झाला. ते पाहून नचिकेताही गुरुमहात्म्य जाणून गहिवरून आला. हात जोडून अति आदराने म्हणाला, ''हे भगवंता, अनेक दिवसांचे हृदयातले जिज्ञासेचे शल्य आपल्या कृपावत्सल शब्दाने निघून गेले. अज्ञान नष्ट झाले! एकच शंका राहिली! सर्वांचा जीवात्मा एकाच वाटेने शरीरातून बाहेर जातो का?

यमधर्म हसून म्हणाले, ''नाही! जे ब्रह्मज्ञानी असतात;

**ते होताचि देहपात। ब्रह्मलोकासी जातात।**
**वाट दाविते तयाप्रत । एक नाडी हृदयाची ।। ३१३।।**पृ.२२४
**ही जी श्रेष्ठ हृदयनाडी । ब्रह्मलोकी नेऊन सोडी ।**
**हो तसे ती केवळ उघडी ।**
**योगी ज्ञानी भक्ताप्रती ।। ३१६।। पृ.२२५**
**निजकर्मा अनुसरोनि । अन्य शंभर नाड्यातुनि।**
**परलोकासी इतर प्राणी । जाती देह सुटताचि ।।**३२१।।पृ.२२५
**या ज्या नाड्या एकशेंएक । तुजसी कथिल्या अलौकिक**
**सूक्ष्म वासनारूप देख । नांदती त्या हृदांमध्ये ।।**३१९।।पृ.२२५

सावधानतेने, सर्वांगाचे कान करून नचिकेता यमधर्माचे बोलणे ऐकत होता. परिणामी त्याच्या चित्तात नवनवीन स्फुरणे निर्माण होत होती. अष्ट सात्विक भाव जागे होत होते. शुद्ध चारित्र्य, सात्विक बुद्धी अन् निष्ठेने केलेली साधना, ही त्रिसूत्री लक्षात ठेवून त्याने कृतज्ञतेने

यमधर्माच्या पायी मस्तक ठेवून त्यांचा निरोप घेतला. नचिकेताला पहाताच सर्वांना विशेषत: त्याच्या वडिलांना खूप खूप आनंद झाला. थरथरत्या हातांनी त्यांनी नचिकेताला हृदयाशी घट्ट धरले. मस्तकाचे अवघ्राण केले. ब्रह्मज्ञानी नचिकेताचा आदर्श समाजापुढे जीवनभर राहिला. तो आदर्श ठेवून जे वागतील ते ब्रह्मज्ञानी होतील असे श्रुति मातेने आश्वासन दिलेले आहे.

* * *

## प्रश्नोपनिषद

सकाळी ६ वा. उठून रेडिओ लावणे ही माझी सवय. हात यंत्रासारखे कार्यरत होते. कान आकाशवाणीकडे होते. शब्द ऐकायला मिळाले, ''सुख दु:खाची ऊन सावली – तुझी जाणिव वेळोवेळी – स्पर्शे तुझिया फूलही फुलते.'' क्षणभरात त्या अर्थाकडे मन धावले नि उपनिषदांच्या अभ्यासाचा लेख देण्याची आठवण झाली. उपनिषदांचाच साररूप विचार येथे ऐकत होते. सृष्टीचा सारा पसारा कोण सांभाळतो? चालवतो? – या निमित्ताने अनेकदा असा प्रभुस्पर्श होत असतो पण त्याचा अनुभव मात्र येत नाही. साऱ्या उपनिषदांचा हेतूच तो आहे की या विश्वपसाऱ्यामागील कार्य–कारण भाव समजून घेणे हेच मानवी जीवनाचे ध्येय आहे.

आपल्या प्रश्नोपनिषदात हा विचार पुरेशा विस्ताराने मांडलेला आहे. अथर्व वेदातले हे उपनिषद. साधकांनी विचारलेले ६ प्रश्न. एकूण ६६ मंत्र यात आहेत. मंत्र संख्या उत्तरोत्तर कमी झालेली आहे. पिप्पलाद हे थोर ऋषी. पिंपळाची फळे खाऊन तपश्चर्येने आत्मज्ञान करून घेतलेले! शांत, समाधानी आणि अयाचित वृत्तीने व्यवहारात वागणारे.

**''प्रसन्नवदन त्यांची गृहिणी । होती सहधर्मचारिणी।**
**जिला निजपती वाचोनी अन्य देव ठावा नसे ।।**
**स्वच्छ अंगण सम्मार्जित । यज्ञ झाला सुसंस्कृत ।**
**साहित्य मोजके दर्शवीत। परिग्रहाची मर्यादा ।।''**

थोरवी कशी मोजावी लागते त्याचा हा उत्तम नमुना!

त्या पिप्पलादांकडे एकदा वेगवेगळ्या भागातले, कुळातले सहा साधक प्रश्न विचारण्यासाठी आले. ते साधक असे – १) कबंधी (कात्यायन कुल), २) भार्गव (विदर्भातला), ३) कौसल (आश्वलायन कुळातला), ४) गार्ग्य (सूर्याचा नातू), ५) सत्यकाम (शिबिराज कुलोत्पन्न), ६) सुकेशा (भारद्वाज कुलातले) या सर्वांनी समिधा हातात घेऊन आदराने वंदन करून आपला हेतू सांगितला. पिप्पलादांनी त्यांच्या जिज्ञासेची प्रामाणिकता अजमावण्यासाठी त्यांना नेम–निष्ठेने वर्षभर रहा म्हणून सांगितले. कारण मनोवृत्ती योग्य असेल तरच ज्ञान द्यावे असे त्यांना वाटले. (इदं ते नातपस्काय – नाभक्ताय कदाचन – गीता)

आजच्या धकाधकीच्या जीवनात रोजचा दिवस कसा संपतो ते कळत नाही. पण अशा स्थितीतही साधना करणारी प्रामाणिक माणसे असतातच. त्यांना ज्यामुळे दिलासा मिळेल असा या उपनिषदाचा शांतिपाठ आहे. शांतिपाठ सांगतो ''आम्ही कानांनी मंगल ऐकावे, डोळ्यांनी मंगल बघावे. शरीराने सक्षमतेने उपासना होईल अशी इंद्रिये व्हावी. देवांनी आमचे मंगल करावे.''

उत्साह आणि सातत्य प्रयत्नांत असले तर स्वीकृत कार्यात मनुष्य यशस्वी होतो. सहाही जणांनी याच तयारीने ब्रह्मजिज्ञासेची पूर्ती व्हावी म्हणून प्रश्न विचारले. त्याची पिप्पलादांनी उत्तरे दिली, तेच हे प्रश्नोपनिषद! या शांतिपाठातली प्रार्थनेची सूचकता महत्त्वाची – त्या प्रार्थनेतून उद्दिष्टपूर्तीचा मार्ग सापडतो अशी सूचना विनोबांनी दिली आहे.

१) पहिला प्रश्न कबंधी विचारतो, ''या सर्व प्रजा कशा निर्माण होतात? यांच्या मुळशी कोणती प्रेरक शक्ती आहे?''

पिप्पलाद म्हणाले, ''परमेश्वराला – खरं तर ब्रह्माला करमले नाही. ते विचार करू लागले. 'एकोऽहम्'! आणि आपल्या शक्तीने प्रजापती निर्माण केला. आणि एक असलेले ब्रह्म बहु झाले. (बहुस्यां प्रजायेय) एक महत्त्वाची कल्पना मानतात की ईश्वराने मानवी शरीर निर्मिले व त्यात प्राणरूपी अंश घातला. प्रजापतीनेच जड/स्थूल व सचेतन यांच्या माध्यमातून सृष्टी निर्माण केली. पारिभाषिक शब्द–'रयी' व प्राण ही जोडी मानली गेली. पुढील काही मंत्रात चंद्र जड तर सूर्य चेतन अशी जोडी मानून संवत्सर मास पक्ष, दिवस, रात्र, अन्न, रेत यांची निर्मिती झाली. धर्मशास्त्रामध्ये पितरांच्या ऋणातून मुक्त होण्याची कल्पना स्पष्ट केली. येथे अप्पांनी म्हटले आहे की,

**''कवींप्रमाणे निरंकुश। तत्त्वज्ञही असती विशेष।**
**ते आपुल्या धारणेस। रूपकाने मांडती ।।** (९७पृ. २४३)

२) भार्गवाने विचारले कोणते देव प्रजेचे धारण करतात, त्यातला श्रेष्ठ देव कोणता? या प्रश्नाचे पिप्पलादांनी पुढीलप्रमाणे उत्तर दिले आहे. पिप्पलाद महर्षी म्हणाले, शरीराला प्रकाशित करणारे देव म्हणजे पंचमहाभूते. आणि सर्व इंद्रिये हे सारे देवस्वरूप. पिप्पलाद गमतीने म्हणाले, एकदा या पंचभूते नि इंद्रिये यांना अहंकार झाला की शरीराचे धारण, कार्यक्षमता, आमच्यामुळेच होते. प्राणांनी त्यांना काहीच न सांगता हळूच प्रस्थान ठेवले मात्र! सारी इंद्रिये जागेवरच असूनही निष्क्रिय झाली. शेवटी शरण आली – म्हणाली – भो प्राण, तुम्हीच श्रेष्ठ देव आहां? रथचक्राच्या आरा केंद्रस्थानी एकवटतात तसे प्राणांचे महत्त्व आहे. **''प्रभो तुम्हीच अमृत। जीवनदायी सर्वाप्रत।''** (२९.पृ.२५३) शरीर धारणेचा मुख्य आधार प्राणच आहे!

३) आश्वलायन कोसलाने प्रश्न विचारला. महर्षे, हा प्राण शरीरात येतो कसा? आणि का? तसेच त्याच्या बाहेर जाण्याचे कारण काय?

पिप्पलाद म्हणतात, **''मन:संकल्प इच्छेतून। कर्म होत जे निष्पन्न त्याच्या सहाय्ये हा प्राण। प्रवेशतो देहामधे ।।** (४/पृ. २९०) खरं तर आत्मा आणि प्राण एकच. (आत्म्याचा अंशही म्हणता येईल) मात्र येथे या शिवाय माणसाला मन नामक एक विचित्र साधन दिले आहे. मन:संकल्पाचा जो विचार वर सांगितला आहे तोच. म्हणजे प्राणच त्या मनालाही चैतन्य देतो. अपान, व्यान, उदान व समान हे त्याचेच अंश. ते प्राणाने नियुक्त केलेल्या जागी शरीरात कार्यकारी होतात. पंचमहाभूतांचे साह्य त्यांना होते. 'संकल्प विकल्पकात्मक मन:' असे आहे – कर्माशी कारण जोडलेले आहे. ही आपोआपी मात्र

निश्चित नव्हे. (२३.पृ.९६१) असे अप्पांनी मांडले आहे. शेवटी प्राण उदानासह वासनेनुसार देहातून जातो. म्हणून प्राणाचे योग्य ज्ञान झाले तर विहित आचरण घडते व अभ्युदय निश्रेयस हे दोन्ही प्राप्त होतात. (३.१०.७० पृ. २६७)

४) गार्ग्य सूर्याचा नातू. त्याने विचारले कोणती इंद्रिये निद्रित होतात, कोणती जागृत? स्वप्न कोण पहातो? कोणता देव सुखी होतो?

म. पिप्पलाद म्हणाले - मनुष्य खाणे, पिणे, चालणे - स्पर्शिणे इ. काही न करता पडलेला असतो तेव्हा तो झोपला असे मानतो. या प्रकरणात देव शब्द इंद्रिय वाचक वा त्यांच्या शक्तिवाचक आहेत. अशा वेळी प्राण जागा असतो - स्वप्ने तोच पहातो. हा प्राण सर्वच म्हणजे सत्-असत्, चांगले-वाईट, योग्य-अयोग्य असे सर्व पहातो. स्वप्नस्थिती संपली वा नसली की ती गाढनिद्रा. अशा वेळी ज्ञानेंद्रिये - कर्मेंद्रिये, मन, बुद्धी, अहंकारही सारे आत्म्यात लीन होतात. ही गाढ झोप. अप्पा म्हणतात, ईश्वरी कृपेने लाभते. (पृ. २७२/६१) अप्पा पुढेही म्हणतात -

**'जीव लीन होतो जेथे। जाणून घ्यावे तयाते ।**
**सर्व यत्ने मानवाते । भूषणास्पद आहे हे ।।** ओ १०पृ. २७५)

५) शिबि कुलातील सत्यकाम प्रश्न विचारतो - महर्षे ॐकाराच्या चिंतन - मननाने कोणता लोक मिळतो? (ॐकार उपासनेचे महत्त्व.)

म. पिप्पलाद म्हणाले, तुझा प्रश्न चांगला आहे. ब्रह्माचे प्रतीक म्हणजेच ॐकार (ॐइत्येकाक्षरं ब्रह्म - गीता) ब्रह्म ॐकार स्वरूप असल्यामुळे त्याची ध्यान-धारणा करून साधक सिद्ध होतो. ॐकाराच्या अक्षरमंत्राने ध्यान करणाऱ्याला तेजोमय अशी सूर्य मंडळातली जागा प्राप्त होते. ॐकाराच्या तिन्ही मात्रांचे वेगवेगळे फलही मिळते. परंतु त्या कष्टप्रद आहेत. संपूर्ण ॐकाराचा जप करणारा मोक्ष प्राप्त करतो. अप्पा म्हणतात, कर्म, भक्ती, ज्ञानाच्या समन्वयाने साधना करावी.

**''देही कर्म हृदयी भक्ती। बुद्धी मध्ये ज्ञानासक्ती ।**
**अशी साधे ज्यासी स्थिती । स्थिरावे तो ब्रह्मवेत्ता ।।**

(पृ. २८४. ओ. ६८)

६) भारद्वाजपुत्र सुकेशाने प्रश्न विचारला - सोळा कलांचा पुरुष कोण? कोठे असतो? या प्रश्नाची पार्श्वभूमी सुकेशाने सांगताना म्हटले, गुरुवर्या, कौसलदेशाच्या हिरण्यनाभ नावाच्या राजकुमाराने हाच प्रश्न मला विचारला होता. पण उत्तर देऊ शकलो नव्हतो याची खंत वाटली. ती या प्रश्नाने आपल्यापुढे मांडली.

सहास्य वदनाने पिप्पलाद उत्तरले - हा पुरुष बाहेरचा कोणी नाही, शरीरातच असतो. पंचज्ञानेंद्रिये, पंचकर्मेंद्रिये, पंचप्राण आणि मन अशा त्याचा सोळा कला. या सोळाही कला त्याच ब्रह्माच्या अंशात्मक रूपात असतात. शरीराचे सारे कार्य त्यांच्याच बळावर होते. मुळात आत्मा सर्वव्यापी - सर्वगत - अगदी जे जे आपण पाहू ना जे जे कल्पू त्या सर्वात ओतप्रोत असा असतो. भावनेचे खरे स्वरूप 'एकमेवाद्वितीय' असेच आहे. विहिताचरणाने हा जीवच जी कृतार्थता संपादितो ते ब्रह्म. मृत्यूसमयी या सोळा कला जीवात लीन होतात.

**''कला झाल्या लीन । देह झाला चैतन्यहीन।**
**कर्मानुसारे प्रयाण। होत असे की जीवाचे ।।''** (ओ. ८१/२९४)

म्हणून,

**सुकेशा हा परमपुरुष - अव्यय निर्मल जगन्निवास।**
**अखंड निष्कळ निराभास। सत्य अमृत अविनाशी ।।**

पृ. २९५/८३)

मृत्यु-भयाच्या त्याच्या शंकेवर पिप्पलाद म्हणाले,

**''अचिन्त्य आहे माया शक्ती । ब्रह्माची जी प्रकृती।**
**विविधभेदा दावी ती । ब्रह्माठायी लीलेने।''**

(ओ.१२७/२९८)

सर्वांनी पिप्पलादांचे चरण वंदन केले. तेही प्रसन्न होते. जणू त्यांच्या रूपाने ब्रह्मतेजच साकारले आहे. सहाही शिष्य गहिवरले. अप्पा म्हणतात,

**'असे बोलता गहिवरले । भक्तिभावे हृदय भरले ।**
**कमंडलू घेऊन डोळे । प्रक्षालिती ऋषिचरणां।'**

(१३८, पृ. ३००)

पू. अप्पांच्या लेखनात एका अपूर्व आनंदाची जाणीव होते.

* * *

## मुंडकोपनिषद

मुंडकोनिषदाची गणना संन्यासोपनिषदांमध्ये केली जाते. मुंडन केलेल्या, सर्वसंग परित्याग केलेल्या संन्यासी व्यक्तीकरता ते असावे असा समज आहे. पण खरे पाहता ज्याला तत्त्वज्ञानाची आवड व आत्मज्ञानाच्या अनुभवाची ओढ आहे त्या तरुणाला या उपनिषदाच्या अभ्यासाचा लाभ मिळणारा आहे.

मुंडन केवळ मस्तकावरील केशसंभाराचे नाही, तर आसक्तीचे मुंडन करणे साधनेच्या सफलतेच्या दृष्टीने महत्त्वाचे हे लक्षात यावे म्हणून मुंडक हे नाव. याचा शांतिपाठ प्रश्नोपनिषदाच्या शांतिपाठाप्रमाणेच आहे.

**ॐ भद्र कर्णेभिः ......... बृहस्पतिर्दधातु**

प्रत्येक दोन खंड असलेली तीन मुंडके यात आहेत.

अध्ययन-अध्यापनात विघ्ने येऊ नयेत म्हणून प्रार्थना आजच्या काळात जास्त उपयोगी. कारण नकोत ती दृश्ये आज डोळ्यासमोर येतात. जे कधी ऐकू नये असे अर्वाच्य शब्दही इच्छा नसताना कानावर पडतात जे आरोग्याला घातक आहे, त्यांच्याच जाहिरातीसारख्या. त्यामुळे तेच पदार्थ खाण्याला जीभ चटावते. रूप, रस, गंध, स्पर्श सर्व बाबतीत असे घडते आहे म्हणून जे हितकर असेल तेच कानी यावे, ध्येयाकडे नेईल तेच दिसावे, बल, बुद्धी ज्याने वाढेल तेच खाण्याची इच्छा व्हावी, किंवा केवळ तेच पदार्थ स्मरणात रहावेत, समोर यावेत.

सर्व देवता इंद्र, श्रीपूषन् व बृहस्पती यांनीही आमचे कल्याण करावे. आमच्या अध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक अशा त्रितापांची शांती होऊन प्रयत्न उत्साहपूर्वक होवोत! अशी प्रार्थना या

शांतिपाठात केली आहे.

**मुंडकोपनिषद् :** मुंडकोपनिषद हे अथर्ववेदाच्या मंत्रभागान्तर्गत आहे. हा वेद अंगिरसांचा म्हणून ओळखला जातो. मूळ चार गोत्रांपैकी अंगिरस हे एक प्रमुख गोत्र आहे.

मुंडकोपनिषदात प्रारंभीच ब्रह्मविद्या ही अथर्व अंगिरसापासून संप्रदाय पद्धतीने, भारद्वाज ऋषींचा पुत्र सत्यवह, अंगिरस ऋषीसमुदाय व शौनक अशी सांगितली गेली आहे. या संदर्भात प्राचार्यांनी माकडापासून माणूस या उत्पत्ती क्रमाचा निषेध केला आहे. ते म्हणतात,

**येथे एक घ्यावे चित्ती । की मर्कटाची संतति।**
**माणूस नाही निश्चिती । पुत्र असे तो अमृताचा।। २४।।**
**सृष्टीतली आपोआपी । मान्य न वैदिका कदापि।**
**ईश्वर नाकारण्या सोपी। युक्ती जी का तार्किकांची।।२५।।**पृ.३०३
**अधिक चांगले व्हावयाते । एका नंतर दुसरे येते।**
**रूप धारण करिते ते । इच्छेप्रमाणे कर्त्याच्या।। २६।।**
**म्हणून वैदिक परंपरा। विकास ना मानी खरा ।**
**निश्चयाने ती ईश्वरा । मानवाचा पिता म्हणे ।।२७।।**पृ.३०३

अंगिरसांच्या आश्रमाचे जे वर्णन प्राचार्यांनी केले आहे त्यावरून त्यांच्या काव्यकौशल्यातील कर्तृत्व समोर येते. या आश्रमात कोण काय शिकवित होते?

**शारदांबा होऊन वाणी । अवधानाच्या पडे कानी।**
**गूढार्थाच्या प्रगटनी । सौलभ्य देई संदर्भा ।।५६।।**
**आत्मज्ञान जेथे नवी । सर्वज्ञतेची घेऊन पदवी।**
**शिष्यगणांना नित्य शिकवी। अंगिरसाच्या रूपाने ।।५७।।**पृ.३०६

अशा या आश्रमात एक प्रौढ वयाचा विद्यार्थी समित्पाणी होऊन आला व सहा महिने आदर्श विद्यार्थी म्हणून वागला. प्रसन्नतेने अंगिरसांनी त्याला विचारलो "कोणती इच्छा पूर्ण करण्यासाठी या प्रौढ वयातही तू इतक्या निष्ठेने, प्रेमाने, सेवाभावनेने या आश्रमात राबतो आहेस?" गुरु चरणांवर प्रगाढ श्रद्धेने माथा टेकवून शौनक उत्तरले, "हे गुरुराया, कोणत्या एका ज्ञानाच्या प्राप्तीने ह्या विश्वाचे गूढ रहस्य उलगडले जाते? ते ज्ञान मला हवे आहे! मला याच जन्मात या ज्ञानाची गुरुकिल्ली हस्तगत करावीशी वाटली म्हणून आपल्या पायाशी आलो आहे."

सद्गुरु म्हणाले, चित्ताला समाधान प्राप्त करून घेण्यासाठी परा व अपरा, दोन्ही विद्या माणसाला अवगत हव्यात. जीवनव्यवहाराला जी उपयोगी असते ती अपरा विद्या व अक्षर अशा ब्रह्म या संकल्पनेची जाणीव अनुभवाला आणून देते ती पराविद्या.

ब्रह्मज्ञान प्राप्तीसाठी वैराग्य, निष्ठा, उपासना व गुरुकृपा यांची आवश्यकता असते. अनादि असलेले परम सत् केवळ सत्तारूपाने, स्वच्छंदतेने सर्वत्र विलसत आहे. ते समजून घेण्यासाठी त्याला 'ब्रह्म' हे नाव दिले आहे. ते स्थळकाळातीत आहे. बहिर्मुख असलेल्या इंद्रियांना ते अगोचर आहे. अनेक उपमा, रूपकांनी ब्रह्मसामर्थ्य वर्णिले जाते. ते केवळ समजण्यासाठी!

'ब्रह्म'पासून विश्व निर्मितीचा क्रमही येथे दिलेला आहे. ब्रह्मशक्तीच्या ज्ञानमय तपामुळे (स्फुरणामुळे) ब्रह्मशक्तीचा तटस्थपणातून काही अंश कार्य करू लागला. निरुपाधिक ब्रह्मतत्त्व म्हणजे कारण ब्रह्म व सोपाधिक ब्रह्मतत्त्व म्हणजे कार्यब्रह्म. कार्य ब्रह्मातून साऱ्या विविधता असलेली सृष्टी निर्माण झाली. अशा त्या जगत्कारण ब्रह्माला जाणून घेतले की सर्व जगाचे ज्ञान एकाद्या मनुष्य जन्मातच प्राप्त होते. समजले का?"

शौनक हे ऐकून सुखावला व त्याने विचारले, ब्रह्मतत्त्वाचा अनुभव घेण्याकरता सामान्य माणसाने काय केले पाहिजे? सद्गुरु म्हणाले, "पेरावे तेच उगवते. धर्म अर्थ काम व मोक्ष हे चारही पुरुषार्थ शुद्ध अंत:करणाने, निष्काम वृत्तीने विहिताचरण करण्यानेच प्राप्त होतात. प्राचार्य लिहितात,

**शुद्ध बुद्धि निश्चल चित्त । देह सदाचारी रत।**
**यांच्या सहाय्ये होतात । लोक सिद्ध, सामान्यही।।२४।।**पृ.३१९
**सर्व दृष्टीनी आपुले । कल्याण व्हावे वाटले।**
**तरी पाहिजे आचरिले। विहित कर्मा निष्ठेने ।।२९।।पृ.३१९**

आपल्या परंपरेत या करता 'यज्ञ' संकल्पनेला विशेष महत्त्व दिले आहे. यज्ञासाठी अग्नी असा प्रदीप्त लागतो की त्याच्या ज्वाळा जणु आनंदाने नाचताहेत. त्यांचा उत्साह, चेतनत्व हे मानव जीवन वृत्तीचे प्रतीक समजावे. यज्ञकर्म कसे तरी काही तरी करून चालत नाही. तेथे ज्ञानाची बुद्धी व उपासनेची भावना लागते. आचार विचारांना योग्य वळण लागावे या साठी नियम काटेकोरपणे पाळले तरच पापवासनेचे निर्मूलन होऊन जीवन सत्कर्माने उजळते.

**कर्ममार्गाठायी । नियमा भारी महत्त्व राही ।**
**भक्तिभावा धरोनी हृदयी। निष्ठेने ते आचरावे।। ४८।।**पृ.३२१
**यज्ञ शिकवी कृतज्ञता । यज्ञ शिकवी उदारता।।**
**दक्षता नि नि:स्वार्थता । बाणे चित्ती यज्ञामुळे।।७४।।**पृ.३२३

वैश्वानर अग्नीची उपासना करणाऱ्याला ध्यान धरण्यासाठी अग्नीच्या मूर्तीचे वर्णन यात आले आहे. अग्नीला चार शिंगे, दोन तोंडे, तीन पाय व सात हात व सात जिभा आहेत. त्या अशा काली, कराली, मनोजवा, सुलोहिता, सुधूम्रवर्णा, स्फुलिंगिनी, विश्वरुची! प्रवृत्ती व निवृत्ती ही दोन तोंडे, सत्व, रज, तम हे पाय, चित्त-चतुष्ट्य म्हणजे ४ शिंगे, सात प्राण म्हणजे सात हात. सात जिभा म्हणजे सात प्रवृत्ती. (धैर्य, महाशक्तिशाली ऊर्जा, वेग, सर्वांविषयी जिव्हाळा, धारणाशक्ती, प्रतिभा) अशा वृत्तीने जो सामाजिक कल्याणासाठी अग्नी उपासना निष्ठेने करतो त्याला त्याच आहुती सूर्यकिरणांद्वारे इंद्राच्या राज्यात नेतात. तेथले सुखोपभोग हे आनुषंगिक फळ आहे. आम्रफलासाठी झाड लावणे हा मुख्य हेतू. त्यापासून सावली मिळते हा अनुषंगिक लाभ आहे. असे उदाहरण देऊन प्राचार्य म्हणतात,

**केवळ छायेच्या लोभानी । वांझ वृक्ष लाविले कुणी।**
**तरी भुकेने तडफडोनी । मरणे भाग त्यालागी।।** ३३।।पृ.३२९

जीवनात मानवाकडून जी धार्मिक वा सामाजिक कार्ये होतात

त्याने अहंकार पुष्ट न होता, विवेक व वैराग्य वाढले पाहिजे. त्याशिवाय चित्तशुद्धी होत नाही. चित्तशुद्धीशिवाय आत्मज्ञान होत नाही. आत्मज्ञान प्राप्तीसाठी सद्‌गुरुंची सेवा व कृपा हवी.

**प्रिय न जयासी लौकिक । असा निर्लोभी सात्विक।**

**ब्रह्मानुभवी कोणी एक। असा सद्‌गुरु शोधावा।। २७८।।पृ.३४२**

सद्‌गुरुचा जसा अधिकार असावा लागतो तशी शिष्याचीही योग्यता असावी लागते. श्रेष्ठ दर्जाचा शिल्पीही मुरुमातून मूर्ती निर्माण करू शकत नाही. शिष्यही त्या पात्रतेचा असल्याशिवाय गुरूचे ज्ञान सफल होत नाही.

**आचार्य ऐशा शिष्यासी । बोधिती प्रसन्न मानसी।**

**ब्रह्मविद्या स्वयंप्रकाशी । ब्रह्मभावा पोचवी जी ।।२९१।।पृ.३४३**

**इंधन काही पेटता क्षणी । ठिणग्या उडती अग्नीतुनी।**

**तसे अक्षर ब्रह्मातुनी । भेद प्रकटे विश्वाचा।।१३।।पृ.३४५**

**असे तत्त्व परात्पर । निरुपाधिक जे निर्विकार।**

**होतसे विश्वासी आधार । भंग न येता स्वरूपासी।।२७।।पृ.३४६**

या निरुपाधिक ब्रह्माची अनुभूती प्राप्त होण्यासाठी मन एकाग्र करावे. ॐकाराचे धनुष्य ताणून अंत:करणाचा बाण त्याच्या प्रत्यंचेवर चढवावा. तत्पूर्वी उपासनेच्या सहाणेवर हा बाण सतत घासून अणकुचीदार करावा. सर्व शक्ती पणाला लावून ती प्रत्यंचा आकर्ण ओढावी म्हणजे सुटलेला तीर इतका खोल लक्ष्यामध्ये घुसेल की तो काढताच येणार नाही.

**चित्त मार्गी लावणे। हे न पोरांचे खेळणे।**

**फार प्रयत्ने कौशल्याने। साधायासी लागते ते।।२।२।५१।।पृ.३६०**

**तदा लाभते जी का स्थिति। शब्दांची ना तेथे गती।**

**स्पर्श जसे ना सोसती। कोमलासी कंटकांचे।। ६१।।पृ.३६१**

अशा तऱ्हेने परमेश्वराचा साक्षात्कार झाल्यावर सर्व संशय नाहीसे होतात. **'भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यन्ते सर्व संशया:।'**

शौनक विचारतो गुरुराया ब्रह्म चराचरात भरलेले आहे. ते कळले पण जीवाचे स्वरूप नीट उमगले नाही. सद्‌गुरूराया त्याला रूपकाच्या आश्रयाने सांगतात, ''मानवी देह म्हणजे एक वृक्ष समज. त्यावर जीवात्मा व परमात्मा असे दोन पक्षी मित्रभावाने नेहमीच एकमेकांसोबत राहतात. पण त्यातला एक म्हणजे जीवात्मा त्या वृक्षाच्या सुखदु:खरूप कर्मफळांचा स्वादरूपाने उपभोग घेतो. दुसरा पक्षी परमात्मा या नावाचा काहीही उपभोग न घेता साक्षीरूपाने केवळ सूक्ष्म निरीक्षण करीत असतो. जो उपभोग घेतो तो जीव, त्यासाठी परतंत्र राहतो व उपभोग न मिळाले तर दु:खी कष्टी होतो. मात्र परमात्मा विरक्त, नि:संग असल्याने स्वतंत्र रहातो व सदोदित आनंदात असतो.

शौनक विचारतो जीव व ईश्वर, दु:ख-आनंद म्हणजे द्वैत आलेच की! मग अद्वैताचे काय झाले? अन् दोघेही शरीरात असले तर त्या विश्वाचे संचलनाची व्यवस्था काय रहाते? सद्‌गुरु म्हणतात, ''अरे शब्दाचा लक्ष्यार्थ घ्यावा. शब्दामागील अर्थाचे भान ठेव. शब्दांची योजना ही समजण्यापुरतीच असते.

पिंडात ज्याला जीवात्मा म्हटले आहे तो ब्रह्मांडाच्या दृष्टीने हिरण्यगर्भ! ब्रह्मदेव! शरीरात ज्याला परमात्मा म्हटले तेच ब्रह्मांडाच्या दृष्टीने निरुपाधिक परब्रह्म!

**एक असुनि दोन झाले । झाले म्हणजे भासले।**

**प्रक्रिया ही अखंड चाले ।**

**हाच आहे सृष्टिक्रम।।३६।।पृ.३७४**

**असो मुळासी तत्त्व एक। त्याचे दोन झाले देख।**

**चैतन्य मुळी नाही पृथक।**

**जीव आणि ईशातही।। ४१।।पृ.३७४**

**अद्वैत हेच सत्य आहे. सत्यमेव जयति नानृतं।३।१।६**

या उपनिषदाचे वैशिष्ट्य म्हणजे सत्याने आत्मज्ञान होते. ह्यावर भर देऊन समाजाने, व्यक्तीने निष्ठेने सत्यव्रत आचरावे असे सुचवले आहे. यातील सत्य प्रसंशेचे श्लोक जागितक तत्त्वज्ञान वाङ्मयात अद्वितीय मानले जातात. प्राचार्य लिहितात

**दुस्तरण मार्गातले। नष्ट होते सत्यामुळे।**

**सोपे होते पहा सगळे। एक आश्रये सत्याच्या ।।१२२।।पृ.३८२**

सत्याश्रयी जीवन जे जगतात त्यांच्या वाट्याला कष्ट, अपमान, दारिद्र्य, दु:ख येताना दिसते व त्यामुळे सत्याकडे पाठ फिरविली जाते. या संदर्भात प्राचार्य म्हणतात असत्यालाही सत्याचा बुरखा पांघरल्याशिवाय प्रसिद्धी मिळत नाही.

**अरे बावळ्यांच्या हाटी । मोल पावे गारगोटी।**

**त्या योगाने काय खोटी । ठरे महत्ता रत्नाची।। १२७।।पृ.३८२**

**एक सत्याच्याचि बळे। नित्य तृप्त साधक झाले।**

**आनंदाचे सोहळे। भोगिती ते ब्रह्मभावे।। १३५।।पृ.३८३**

असे जे ब्रह्म ते अत्यंत दिव्य भव्य विशाल असल्याने त्याचे स्वरूप ध्यान चिंतनाकरता घेता येत नाही. ते निष्कळ म्हणजे अवयवरहीत आहे. लाकडात जसा अग्नी गुप्तपणे रहातो तसे हे सर्व प्राणरूपाने सर्वांच्या हृदयात रहाते. शरीरातले चैतन्य हीच आत्मसत्ता. अज्ञान, अहंकार, आसक्ती, तिरस्कार, क्लेश, दुराग्रह इत्यादी विकार अंत:करणातून निघून गेले की आत्मज्योतीचा प्रकाश अंतर्मुख झाल्याने प्रत्ययाला येतो. मन प्रसन्न होते. असा सिद्ध, सत्यसंकल्प होतो. लोकसंग्रहासाठी तो कामात व्यस्त दिसतो. क्वचित त्या करताच प्राप्त सिद्धींचाही उपयोग तो करतो.

**भूतकल्याणा नि:स्पृह । सुफल जैसा महीरुह।**

**ब्रह्म तसे हे धरून देह। विचरे रूपी संतांच्या।। १५९।।पृ.३८५**

संत म्हणजे चालते बोलते, लोककल्याण करणारे ब्रह्मज्ञान होय. म्हणून संतसेवा करून श्रेयलाभ पदरात पाडून घ्यावा. संतांच्या सेवेनेही जन्ममरणाचे फेरे नष्ट होतात.

शौनकावर गुरुवाणीतून अमृत-वर्षाव होत होता. जीवाचे कान करून तो ऐकत आहे, हे पाहून, सद्‌गुरु म्हणाले,

**तरी केवळ प्रवचनी । राहू नको तू गुंतोनी।**

**केवळ वेष्टणाच्या स्थानी। मानावे रे शब्दांना ।।१४।।पृ.३८८**

जसे साखर शब्द कागदावर लिहून तो चाटण्याने गोड ही चव कळत नाही, तसे प्रवचने देऊन लौकिक प्राप्त केलेल्यांनी जर साधना करून ब्रह्मानुभूती घेतलेली नसेल तर काय उपयोग? केवळ बुद्धिसामर्थ्य, शारीरिक सामर्थ्य, उपवास करून निर्माण झालेल्या दुर्बलतेने, वक्तृत्वशक्तीने, आत्मज्ञान लाभत नाही. हे सर्व असूनही त्याच्या जोडीला विरक्ती, वैराग्य, सत्यप्रियता, लोककल्याणाची वृत्ती व शुद्ध निर्मळ अंत:करणाने अतूट श्रद्धेने, दृढविश्वासाने, सतत साधना धीर धरून केली तरच ब्रह्मज्ञान होते.

असा ब्रह्मज्ञानी म्हणजे शांतिसुखाचा सागरच. या सागरात यथेच्छ डुंबल्याने शौनकाचे हृदय उचंबळून आले. त्याने प्रसन्नतेने आपले मस्तक गुरुचरणांवर ठेवले! त्यांचा आशीर्वाद घेऊन तो स्वगृही परतला!

वाचकाने अंगिरसांच्या उपदेशाप्रमाणे शुद्ध अंत:करणाने साधना करावी व ब्रह्मज्ञान प्राप्त करावे म्हणून पू. स्वामी वरदानंदांनी सोप्या भाषेत हे मुंडकोपनिषद समाजापुढे ठेवले आहे. त्याचा यथामति केलेला हा सारांश

* * *

## ऐतरेय उपनिषद

प्रमुख दशोपनिषदांमधील हे ऋग्वेदातील शाकल शाखेचे एकुलते एक उपनिषद आहे. प्रज्ञानं ब्रह्म' हे महावाक्य ऐतरेय उपनिषदातीलच होय. ऐतरेय आरण्यकात आत्मषट्‌क नावाचे जे सहा अध्याय आहेत. त्यातील शेवटच्या तीन अध्यायांना ऐतरेय उपनिषद म्हणतात.

स्कंद पुराणानुसार हरितऋर्षीच्या वंशातील मांडुर ऋषींची पत्नी 'इतरा'. तिचा मुलगा महिदास. बालपणापासून तो मंत्रजपात मग्न राही. विद्याध्ययन करीत नसे. कुणाशी बोलतही नसे. म्हणून मांडुकी ऋषींनी दुसरे लग्न केले. त्यांना त्या स्त्रीपासून ४ मुलगे झाले. विद्याध्ययन करून त्यांनी नाम कमावले. महिदासाने विद्याध्ययन न केल्याने त्याच्या आईचा सतत अपमान होत असे. तिने महिदासाला म्हटले, 'अपमान असह्य होत असल्याने मी देहत्याग करावयाचे ठरवले आहे.' तेव्हा प्राप्त केलेल्या ज्ञानाने महिदास तिला बोध करून देहत्यागापासून परावृत्त करतो. त्याने भूमातेची सेवा करून ज्ञान मिळवले. त्याला मार्गदर्शन केले ते वेदविद्येत प्रवीण असलेल्या मातेने 'इतरेने'! म्हणून तो स्वत:ला ऐतरेय महिदास असे म्हणवून घेत असे.

कोटितीर्थात हरिमेघ राजाने केलेल्या यज्ञात महिदासाने जे आत्मज्ञानासंबंधी प्रवचन केले, त्याने राजा प्रसन्न झाला. त्याने महिदासाला जावई करून घेतले. ऐतरेय ब्राह्मण, ऐतरेय आरण्यक हे यांचे महत्त्वाचे ग्रंथ. या प्रतिभासंपन्न महिदासाने चित्त हेच विविध मनोवृत्तीचा स्रोत धरून सर्व मनोव्यापारांचे वर्गीकरण केले आहे. सृष्टी निर्मिती, गर्भ निर्मिती, हेही विषय यात आलेले आहेत.

### ऐतरेयाचा शांतिपाठ

अपेक्षेप्रमाणे अध्ययन - अध्यापन होऊन गुरु शिष्यांच्या मनास मिळालेल्या ज्ञानाने समाधान प्राप्त झाले. चित्तवृत्ती उल्हसित झाल्या. या ज्ञानाच्या योगाने व्यष्टी समष्टी हित जोपासण्यासाठी कार्य करण्याची प्रेरणा मिळाली म्हणून कृतज्ञतेने शांतिमंत्रानेच या कार्याची सांगता होत असे. स्वामीजींचे यावरचे चिंतन असे-

येथे परब्रह्माला प्रार्थना केली आहे. मानव व मानवेतरात मन व वाणी दोन्ही आहेत. मानवात या दोन्हीचे अत्यंत विकसित स्वरूप आहे. मन व वाणी परस्पराश्रयी आहेत. माणसाची माणुसकी मन व वाणी या दोन स्तंभावर प्रतिष्ठित आहे. या विशेषतेचे रक्षण व्यष्टि-समष्टीत हितासाठी, ज्ञानप्राप्तीसाठी व्हावे म्हणून प्रार्थना केली आहे. माझ्या मनात वाणी व वाणीत मन हे सुप्रतिष्ठित होवो. मुखाने मी जप करतो तेव्हा मनही त्या जपात रमावे. जप करतेवेळी मनात विषयाचे चिंतन होऊ नये. जप एकाग्रतेने व्हावा. तसेच मनात असलेल्या सत्याची उपेक्षा करून मुखाने कधीही असत्य उच्चारू नये, या बाबत मनही माझे सदा दक्ष राहो. बोलण्यामध्ये जसे लक्ष असावे तसे आपण काय बोलतो किंवा ऐकतो ते सर्व लक्षात रहावे. योग्यवेळी त्याचे स्मरण व्हावे व त्याप्रमाणे सदाचरण घडावे.''

**आचरणी न येणे ज्ञान । तेच त्याचे विस्मरण।।१७।।पृ.३९८**
**केले पाठहि पुष्कळ। परी न वेळी आठवेल।**
**तरी मग ते होते फोल । तसे न होवो ज्ञानाचे ।।१८।।**

''ज्यांनी मला ज्ञान दिले त्या माझ्या गुरुमाऊलींवर कधीही कोणतेही संकट येऊ नये. त्यांचे ज्ञान सुरक्षित रहावे.'' या संदर्भात मोक्षप्राप्तीसाठी संन्यास घ्यावा हे शंकराचार्यांचे विधान कालौघात बदलावे लागत आहे. कारण भगव्या वस्त्रातून दंभच प्रतिष्ठित होताना दिसू लागला. गृहस्थाश्रमाचे गृह निर्धन झाले व संन्याशांचे मठ वैभवात तळपू लागले. संन्यास घेतला तरी भूक लागतेच. त्यासाठी कंदमुळे, फळे देणारी उपवनेही नष्ट झाली. भिक्षा देण्याइतकी संपन्नता व उदार मनोवृत्ती गृहांमध्ये राहिली नाही. शिवाय नि:संगतेने गृहस्थाश्रमातही मोक्षप्राप्ती होते. समष्टीहित साधता येते. हे महर्षि वसिष्ठ, अगस्ती यांसारखे ब्रह्मज्ञानी सिद्ध करतात. एकनाथांसारखे संतही गृहस्थाश्रमात संपन्नतेने राहून स्वत:ही मोक्ष प्राप्त करतात व इतरांनाही हाच मार्ग दाखवतात. असा उल्लेख करून 'शंकराचार्यांनी आपल्या या विचाराकडे वत्सलतेने पहावे' असा बालभाव प्राचार्यांनी चरणारविंदी मस्तक ठेवून व्यक्त केलेला आहे.

**सृष्टी-निर्मिती संबंधीचे विचार :** या उपनिषदात लोक, लोकपाल, त्यांना रहाण्यासाठी विराट पुरुष. लोकपालांची क्षुधा, तृष्णा शमवण्यासाठी मानव देह, अशा तऱ्हेने ते आलेले आहेत.

जेव्हा विश्वाची निर्मितीच नव्हती, सृष्टीचे सृजनही झालेले नव्हते तेव्हा एक सर्वज्ञ, सामर्थ्यशाली, अजरअमर अशी अलौकिक सृजनशक्ती सर्वत्र भरून राहिली होती. त्या शक्तीला विविध नामरूपे घेण्याची इच्छा झाली. तेव्हा त्या पारमार्थिक शक्तीने प्रातिभासिक व व्यावहारिक सत्ताधीश असलेली माया निर्माण केली. त्या मायेनं अम्भ, मरीचि, मर व आप असे चार लोक निर्माण केले.

आकाशगंगेच्या पलीकडे असलेले अज्ञात विश्व म्हणजे अम्भ. मरीचि म्हणजे द्युलोक अथवा स्वर्ग. मर म्हणजे पृथ्वी, जिथे 'उपजे ते नासे' असा व्यवहार आहे व आप म्हणजे पृथ्वीभोवती असलेले जलावरण.

दिव्य जलाचा अंश घेऊन त्याने त्याचा पिंड-गोळा तयार केला. ईश्वराच्या इच्छेनेच त्या पिंडाच्या तडकण्यामुळे ज्ञानेंद्रिये व कर्मेंद्रिये निर्माण झाली. आजचे शास्त्रज्ञ या तडकण्यालाच सुमारे ५०० कोटी वर्षांपूर्वी झालेला महास्फोट मानतात. प्राचार्य लिहितात,

**''शास्त्रज्ञांचे वर्णन । केवळ भौतिका धरून।**

**वेदासी तो प्रयोजन। अध्यात्माचे विशेषत:।।१३८।।पृ.४१०**

प्राचीन विद्वान, आपले ज्ञान लोकांसमोर ठेवतांना, शब्द-शक्तींचा व भाषा अलंकारांचा माध्यम म्हणून उपयोग करीत. ध्वनी, लक्षणा व रूपकादि अलंकारांचा नीट अर्थ उमगला नाही तर समजण्यास अडचण होते. घोटाळे होतात. 'लोका' नंतर अष्ट दिक्पाल निर्माण करून त्यांची स्थापना आठ दिशात केली. या आठ देवता महासागरासारख्या विशाल असलेल्या विराट देहाच्या पुरुषात आल्यावर त्यांना तहान, भूक लागली. खाण्या-पिण्याची वासना निर्माण झाली. प्राचार्य लिहितात,

**ईश्वराने देवगणी । क्षुधा तृष्णेच्या रूपांनी ।**

**आशा वासना या दोन्ही । भावना होत्या ठेविलेल्या ।।७।।पृ.४११**

**जगाचे सारे व्यवहार । चालण्यासी निरंतर ।**

**सूत्र असे जे खरोखर। जगदीशाच्या इच्छेचे।।८।।पृ.४११**

**देह देवाचे मंदिर :** महासागरात अस्थिर असलेल्या ह्या देवतांनी वासनातृप्तीसाठी अधिष्ठान मागितले तेव्हा ब्रह्मदेवाने प्रथम गाय, घोडा असे आकार निर्माण करून ठेवले. देवतांनी ते नाकारले.

**''तू दिलेली आम्हाप्रती। धारणा, प्रज्ञा, विवेक, स्मृति।**

**वापरण्या ती योग्य रीती। अनुकूल ना देह यांचे।।२३।।पृ.४१३**

**आम्हासारिखा आम्हाते। आश्रय द्यावा जगत्पते।**

**स्वातंत्र्याने आम्ही जिथे । लाभ घेऊ देणगीचा।।२४।।पृ.४१३**

परब्रह्माने आपल्याच अंशाने मानवाकृती पुढे ठेवताच आनंदाने ब्रह्मांडातल्या त्या देवता पिंडात म्हणजे मानवदेहात विराजमान झाल्या! म्हणूनच 'पिंडी ते ब्रह्मांडी' अशी म्हण निर्माण झाली. भूक आणि तहान या दोन्ही वृत्तींना या देवतांत स्थान मिळाले. पण अन्नाशिवाय भूक शमणार कशी म्हणून परमेश्वराने पूर्वीच्याच साधनाने चेतन व अचेतन गुणांनी युक्त असे अन्न तयार केले. म्हणजे प्राणी व वनस्पती निर्माण झाले. अन्न समोर दिसतंय, पण त्याचा उपभोग घेता येईना. अन्न शब्द वाणीने उच्चारला, डोळ्याने अन्नावर नजर फेकली, नाकाने त्याचा वास घेतला, कानांनी पदार्थांची नावे ऐकली, त्वचेने अन्नाला स्पर्श केला, मनानेही अन्नाचा स्वाद घेतला. पण देहाची तृप्ती, समाधान अंशानेही झाले नाही. अखेर 'अपान' वायूला यश आले. त्याने मुखावाटे अन्न घेतले. त्यामुळे सर्व इंद्रिय देवता तृप्त झाल्या. त्यांची भूक शमली. कार्य करण्यास त्या समर्थ ठरल्या.

अशा तऱ्हेने मानवी देहाची रचना समाधानकारक झाल्यावर, स्वत: परब्रह्माने या मानवी देहात प्रवेश करण्यासाठी एक स्वतंत्र दार शिर भेदून निर्माण केले. त्या दारालाच ब्रह्मरंध्र किंवा विदृती असे नाव आहे.

मानवी देहात प्रवेश केलेल्या आत्मराजाने आपल्या वास्तव्यासाठी तीन स्थाने निश्चित केली. १) भ्रूमध्य, २) कंठ, ३) हृदय या ठिकाणी ध्यान साधता आले तर सततच्या अभ्यासामुळे तो सिद्ध पुरुष होऊ शकतो. आत्मा देहात शिरला, देहाची उपाधी त्याने स्वीकारल्याने तो जीवात्मा झाला व भौतिकाशी, बाह्य जगतासी तादात्म्य पावल्याने 'मी' अन् 'माझे' यात अडकला. कर्तृत्व व ममत्वाने बांधला गेला. त्यामुळे अनेक आघात झाले.

दु:खमय जीवनातून सुटण्यासाठी जीवाने सत्संग केला. वेदान्ताची महावाक्ये त्याच्या कानी पडली त्यावर त्याने चिंतन मनन करून त्याचा खरेपणा अनुभवला. समाधिसुखात त्याच्या लक्षात आले की सर्वत्र 'मी'च आहे. स्वामी म्हणतात,

**''विश्वात जो भरून राही। अंतर्बाह्य सर्व ठायी।**

**तोच आहे माझ्या हृदयी । दर्शन त्याचे झाले मला।।७८।।पृ.४२४**

जीवाला सगळीकडे ब्रह्म (इदम्) भरलेले दिसले. या साक्षात्कारी व्यक्तीला उपनिषदात 'इदन्द्र' म्हटले आहे. परोक्षप्रिय देवांचा हा इन्द्र!

**'निसर्गातली शक्तिस्थाने। देव म्हटले त्या कारणे।**

**ज्याचे वागणे बोलणे। दिसे मानवी भावाचे।।९२।।पृ.४२५**

**मानव देही त्यांचा वास। ये न कुणाच्या प्रत्ययास।**

**गोष्ट सांगावी बालकास। तसेच सारे वाटे हे।।९३।।पृ.४२५**

प्राचार्य म्हणतात, ''जिज्ञासू व तपस्वी अनुभवी यांच्यातील चर्चेतून पिंड ब्रह्मांडाची निर्मिती व्यक्त झाली आहे. ती स्थल, काल व दोघांच्या प्रकृती, प्रवृत्तीनुसार, निरनिराळे शब्द, रूपके योजून उपमा देऊन!'' सर्वांचा अनुभव एकच असला तरी शब्दयोजना वेगवेगळ्या प्रकारची असते हे ध्यानात असावे.

**जीवन व्हावे सुप्रसन्न। सुटावे जन्म-मरणातून।**

**अनुभवाचे ब्रह्मज्ञान। लाभो, हेतू सर्वांचा।।११७।।पृ.४२७**

दुसऱ्या खंडात मानवाचे तीन जन्म सांगितले आहेत. पुरुषात वीर्य निर्माण होऊन ते स्त्रीच्या गर्भाशयात प्रतिष्ठित होणे हा पहिला जन्म. मग बालक रुपाने व्यक्त होणे हा दुसरा व ते शरीर सोडून देऊन पुन्हा दुसऱ्या देहाचा आश्रय करतो हा तिसरा जन्म होय. इथे वामदेवाचा अनुभव सांगितला आहे. मातेच्या गर्भात असतानाच त्यांना संसाराच्या अनित्यतेचे आणि परब्रह्माचे ज्ञान झाले व लक्षात आले, ''आसक्तीच्या शेकडो लोखंडी पाशात मी वेढलो गेलो आहे. हे कडक बंध तोडण्यास खूप अवघड आहेत. तरीही यातून सुटलेच पाहिजे ही जाण येताच सर्व सामर्थ्यांचा जोर लावून मी ते तोडले व श्येन पक्षाप्रमाणे बाहेर येऊन मुक्त झालो व स्वच्छंद विहार करू लागलो. निरिच्छ राहून अमरत्वाचा लाभ घेतला.'' महंती मनुष्याला कशी मोहात अडकवते त्याचे वास्तववादी वर्णन या संदर्भात प्राचार्यांनी केले आहे.

'प्रज्ञानं ब्रह्म' हे महावाक्य या उपनिषदातील आहे. ज्याचे ज्ञान होते ते ब्रह्म. ज्ञान ही आत्म्याची निशाणी आहे. जगातले सर्व चराचर ब्रह्मरूप आहे; याचा अनुभव जो घेतो तोच अमर होतो. या साठी सुप्रजा निर्मितीसाठी पुरुषाने ज्ञानी होऊन सदाचरणी राहून दक्षतेने आपले वीर्य तेजस्वी, ओजस्वी, निर्दोष व प्रभावी राखले पाहिजे. मातेच्या

अंत:करणातले व शरीरातले सर्व दोष गर्भात उतरतात म्हणून तिनेही सुशीलतेने, सदाचरणाने वागले पाहिजे. तिला सर्व प्रकारचे सुख, समाधान देणे ही पतीची व कुटुंबीयांची जबाबदारी आहे.

**'पुत्ररुपे जन्मे पिता। तत्त्व हे लक्षात घेता।**
**वाढत नाही स्वैरता। अंतराने पिढीतल्या।।६०।।पृ.४३४**

''आत्मा वै पुत्रनामासी'' श्रुतीचा सिद्धान्त हा अनुवंशाच्या दृष्टीने महत्त्वाचा आहे. मानवजन्म हा ब्रह्मानंदाच्या शिखरावर चढण्यासाठी आहे हे लक्षात घेऊन मानवाने आपले जीवन उन्नत करीत हे शिखर गाठावे. ऐतरेय महिदासानी हा सर्व अनुभव घेतला.

प्राचार्यांनी महिदासांच्या आश्रमाचे विलोभनीय वर्णन केले आहे. अशा त्या आश्रमात महिदासांना उपासनेबाबतच्या शंका विचारण्यास ऋषिसमूह आला. त्यांनी, ''आत्म्याची उपासना करा असे का सांगितले जाते? आत्मा व प्राण एकच का? आत्म्याचे यथार्थ रुप सांगावे. जीवात्मा, विश्वात्मा, परमात्मा याचेही स्पष्टीकरण करावे'' अशी विनंती केली. तेव्हा महिदास उत्तरले

**तसे प्राणादींना उद्देशून। ब्रह्म आत्मा हे अभिधान।**
**येते कधी मंत्रातून। जाणावे ते विवेकाने।।२९।।पृ.४४४**

शरीराची उपाधी घेऊन सर्व व्यवहार करणारा तो जीवात्मा. विषय वासना मनात निर्माण होते, प्राण ती पुरविण्याची शक्ती देतो. तेव्हाच इंद्रिये विषयग्रहण करतात. आत्म्याच्या अस्तित्त्वाची सारी लक्षणेही अंत:करणाच्या वृत्तीतून बाहेर प्रगटतात. त्यांना प्रज्ञानरूप आत्मा हाच आधार आहे. या सोळा वृत्ती अशा आहेत.

१) संज्ञान = चैतन्याची जाणीव, २) अज्ञान = स्वामित्व, ३) विज्ञान = भौतिक ज्ञान, ४) प्रज्ञान - प्रातिभ = विशेषज्ञान, ५) मेधा = धारणाशक्ती, आकलन.

**योग्य वेळी योग्य सुचणे । नेमके ते लक्षात येणे।**
**रम्य अभिनव काही स्फुरणे। प्रज्ञानाची रूपे ही।।४२।।पृ.४४५**

६) दृष्टी = पहाण्याची शक्ती, ७) धृति = धैर्य, ८) मति = मनन करण्याची बुद्धी, ९) मनीषा = इच्छा, १०) जूति = वेग, चंचलता, ११) स्मृति = स्मरण, १२) संकल्प = काही करावेसे वाटणे, १३) क्रतु = कर्म, यज्ञ, १४) असु = प्राण, १५) काम = पाहिजे आहे असे वाटणे, १६) वश = आसक्ती.

उन्हाचे कवडसे व नक्षीतून बाहेर पडणारे प्रकाश किरण हे दोन यथार्थ दाखले येथे दिलेले आहेत. या वृत्ती, अंत:करण व प्राण हे जेव्हा एकरूप होतात तेव्हा 'प्रज्ञानघन' ही अवस्था येते. ती अवस्था संपली म्हणजे पुढे परमात्म्याचा अनुभव येतो. परमात्मा हाच उपास्य आहे.

सर्व देव, पंचमहाभूते सारे चराचर म्हणजेच परब्रह्म. **'वस्त्रामध्ये जसा तंतू। ब्रह्म तेवी सर्व ठायी।।'८५।।** ब्रह्म प्रज्ञानेत्र आहे. प्रज्ञान हेच ब्रह्म.

**प्रज्ञान ज्यांना आकळले । देहीच ते विदेही झाले ।**
**अमृतत्त्वा ते पावले। साम्य सारे अनुभवोनि।।१०७।।पृ.४५१**

* * *

## तैत्तिरीय उपनिषद

कृष्णयजुर्वेदाच्या तित्तरि शाखेचे हे उपनिषद म्हणून तैत्तिरीय उपनिषद नाव प्राप्त झाले. हे संपूर्ण गद्यमय आहे. ॐ सहनाववतु....'' हा याचा शांतिमंत्र असून प्रत्येक अध्यायाचा स्वतंत्र शांतिमंत्रही आहे. दुसरी विशेषता म्हणजे आनंदाचे परिगणन करून ''मानुषानंद हा ब्रह्मानंदा'' पर्यंत कसा चढत जातो ते सांगितले आहे. या उपनिषदाचे विषयानुरूप शिक्षावल्ली, ब्रह्मवल्ली व भृगुवल्ली अशी विशेष नावे त्यांना आहेत.

शिक्षावल्लीचा प्रारंभ चराचरात ब्रह्म भरलेले आहे. त्यातील मित्र, वरूण, अर्यमा, इन्द्र, बृहस्पती इत्यादींना प्रार्थना करून त्यांची कृपा मागितली आहे. ''मी नेहमी सत्य बोलेन, त्या सत्याने, मी प्राप्त केलेल्या ज्ञानाने माझे अंत:करणात, राष्ट्रात, व सर्व विश्वात शांति निर्माण व्हावी, स्वत:चे, श्रोता व वक्त्याचे, गुरु-शिष्यांचे कल्याण व्हावे असा आशीर्वाद मागितला आहे.'' प्राचार्यांनी येथे आश्रमाचे अतिशय मनोहारी वर्णन केले आहे; अनेक रूपके योजून! सरोवरातील कमळांच्या कळ्या प्रफुल्लित होण्यासाठी जशी सूर्योदयाची वाट पहातात तसे विद्यार्थीही बुद्धी प्रकाशित होण्यासाठी गुरुदेवांची वाट पहात होते अशी सुंदर उपमाही येथे आल्या आहेत. उपदेश करणारे गुरु म्हणजे दुसरी कामधेनूच!

**सहा गुणांनी अलंकृत। वाणी असावी सुसंस्कृत।**
**अशा वाणीसी मानितात। ज्ञाते कामधेनू दुजी।।३९।।पृ.४५७**

शिक्षणात अकारादि वर्ण, उदात्तादि स्वर, ऱ्हस्वदीर्घादि मात्रा, शब्दांवर बोलताना दिला जाणारा जोर, बोलण्याचा सूर म्हणजे त्यातील आर्जव, लालित्य, गोडवा, तेजस्विता व योग्य शब्द यांचा समावेश होतो. वाक्‌शक्ती व्यष्टी-समष्टीत महत्त्वाची! बोलण्यामुळेच शत्रू अथवा मित्र निर्माण होतात. ज्ञानाचे संवर्धन होते. मिळालेले ज्ञान स्वहितासाठी व समाजहितासाठी वापरावे, हा उपदेश केला आहे.

तिसऱ्या अनुवाकात विद्यार्थी आपले सद्‌गुण वाढावेत, दुर्गुण नष्ट व्हावेत अशी प्रार्थना करून अध्ययन, अध्यापनाने गुरूंचे व शिष्यांचेही ज्ञान-तेज वाढावे असा आशीर्वाद मागतात, ब्रह्मवर्चस् व्हावे म्हणून! समाजाने हिताच्या मार्गानेच जावे म्हणून ज्ञान विस्तार केलेला आहे. यात अधिज्यौतिष म्हणजे अग्नी, सूर्य इत्यादी ज्योतिर्मयांचे ज्ञान, अधिविद्य म्हणजे गुरु शिष्य यांचे संबंध आणि विद्यादानासंबंधी विचार, अधिप्रज म्हणजे, माता-पिता, वंश, कुळपरंपरा इ. विषय, अध्यात्म म्हणजे जीव, जगत् व जगदीश्वरासंबंधी ज्ञान असे विषय आलेले आहेत.

शब्दांचा व वाक्यांचा अर्थ करताना संधी कोणत्या नियमाने तयार झाले हे लक्षात आले की शास्त्राच्या संहितेचा अभ्यास होऊन ज्ञानप्राप्ती होते. अधिलोकात पृथ्वी व अंतरिक्ष यांना जोडणारा संधि म्हणजे आकाश व त्यात खेळणारा वायू या सर्वांचे ज्ञान उपासनेने करून घ्यावे लागते. याप्रमाणे द्यूलोकांत पृथ्वीवरचा अग्नी, आकाशातला सूर्य, आकाशातले बाष्प व त्यातून निर्माण होणारी वीज, चुंबक शक्ती यांचे ज्ञान प्राप्त करावे लागते. प्राचार्य सांगतात, यांच्या ज्ञानानेच विज्ञानाची प्रगती होऊन अनेक सुखसाधने निर्माण झाली. तंत्रज्ञानात प्रगती झाली.

ऐश्वर्य व भोगासक्ती वाढली. प्राचार्य सूचना करतात,

**'निर्लोभी नि सत्वगुणी, माणूस नसता अंत:करणी।**

**विज्ञानाच्या या सांधनी। दैत्य होऊ शकतो तो ।।'१११।।पृ.४६४**

माणसाचे माणूसपण टिकावे यासाठीच तर शिक्षणातून संस्कार करायचे असतात. ज्ञान देणारे गुरु व घेणारे शिष्य यांच्यात ज्ञान हा जोडणारा पूल आहे व व्याख्यान, प्रवचन हे त्याचे साधन आहे. शिष्य व गुरु कसे असावेत कसे नसावेत याचा ऊहापोह प्राचार्यांनी विस्ताराने केला आहे. वक्तृत्व कसे असावे हेही सांगितले आहे.

अधिव्रज म्हणजे कुटुंबसंस्था. यात 'माता' या पदवीचे, कांता व गृहिणीपेक्षा जास्त आदराचे स्थान आहे. संततीपेक्षा प्रजा महत्त्वाची. संतती म्हणजे केवळ वंशसातत्य राखणारी अपत्ये! पण प्रजा म्हणजे आई-वडिलांपेक्षा जास्त उन्नत गुण घेऊन येणारी अपत्ये! अध्यात्मामध्ये दोन्ही हनुवट्या, उच्चारण शक्ती व जीभ यांना महत्त्व आहे. वरची हनुवटी म्हणजे शिरोभाग जो स्थिर असतो, तो महत्त्वाचा.

**भगवंताचे निवासधाम। हेच आहे शिरोब्रह्म।**

**दर्शन ध्याने उत्तम। ज्याचे आज्ञा चक्रामध्ये।।१९३।।पृ.४७२**

**नामजपाची आवर्तने। जो जो वाढती श्रद्धेने।**

**सुलभ तो तो प्राप्त होणे। दर्शन येथे ईशाचे।।२०१।।पृ.४७२**

धारणाशक्ती व ऐश्वर्य वाढावे यासाठी प्रार्थना कशी करावी ते सांगून, संपत्ती लोकहितासाठी खर्चावी. चांगले शिष्य ज्ञानासाठी यावेत, त्यांनी घेतलेल्या ज्ञानामुळे व सदाचरणाने गुरूंची ख्याती व्हावी. कर्तृत्वाचा अहंकार येऊ नये, म्हणूनही रोज ध्यानधारणा करून आत्मसाक्षात्कारी व्हावे असा आदेश दिला आहे. भू:, भुव:, स्व: म्हणजे अनुक्रमे अस्तित्व, ज्ञान व आत्मप्रकाश यांना व्याहृति म्हणतात. महाचमस नावाच्या ऋषींनी मह: अशी चौथी सर्वश्रेष्ठ व्याहृति सांगितली. 'मह:' हेच ब्रह्म आणि तोच आत्मा.

व्याहृतींचे पृथ्वी, अंतरिक्ष व स्वर्ग असेही अर्थ आहेत. सूर्यासाठी मह: म्हटले जाते. तसेच चंद्रासाठीही! सूर्य जसा आवश्यक तसाच मनाची देवता व औषधीकरता चंद्रही महत्त्वाचा आहे. ऋग्वेद, सामवेद व यजुर्वेद असेही अर्थ आहेत. 'मह:' म्हणजे प्रणव- ॐकार. शरीराच्या दृष्टीने यांचे अर्थ प्राण, अपान व व्यान असून मह: म्हणजे अन्न. असे चार प्रकारानेच व्याहृतींचे विभाग किंवा प्रकार असतात. थोडक्यात असे आहे व्याहृतीचे महत्त्व.

**विश्वरूपी प्रकार पहिला। देवता रूप दुसरा झाला।**

**शास्त्रसंग्रह तिसऱ्यात झाला।**

**वर्णी चवथा पिंडासी।।४१०।।** पृ. ४९३

**साध्य साधक साधन । व्याहृतींच्या वर्गांतून।**

**समावलीसे संपूर्ण। पहावे ते विवेकाने।। ४११।।पृ.४९३**

व्याहृतींच्या उपासनेने अग्नी, वायू, सूर्य व ब्रह्मलोकात साधकाला प्रतिष्ठा प्राप्त होते. स्वाराज्य हे फल देणाऱ्या व्याहृतिरूप हिरण्यगर्भाची उपासना केल्यावर साधकाला हृदय, मस्तकातील सहस्रदल, भ्रुकुटिमध्य येथे ब्रह्म साक्षात्कार होऊन साधक ब्रह्मज्ञानी होतो

**ब्रह्म अमर सदोदित। अनादि तेवी अनंत।**

**ब्रह्मवेत्ताहि अमृत। आत्मत्वाने कीर्तीने ।।४९८।।पृ.५०१**

**साधना करावी दीर्घकाळ। मन नसावे उतावीळ।**

**उपासनेसी लाभे बळ। ईश्वराच्या कृपेमुळे।।५१३।।पृ.५०३**

अनुष्टुप, गायत्री, जगती याचप्रमाणे पंक्ति या नावाचा एक छंद आहे. यात पाच या संख्येचा संबंध आहे. पण या सर्व उपासनांच्या अंगभूत ॐकारोपासना आहेत. त्याच्या सतत चिंतनाने ब्रह्मप्राप्ती होते! कर्मानेही चित्तशुद्धी होते. यासाठी तीही महत्त्वाचीच असून स्वाध्याय प्रवचनानेही मनोमालिन्य जाते. त्यासाठी स्वाध्याय ही महत्त्वाचा! चित्त एकाग्र होण्यासाठी उपासना हे विद्येचे अंतरंग साधन फारच महत्त्वाचं आहे. माता, पिता, सद्गुरु आणि अतिथी यांची आदरपूर्वक सेवा करणे हे कृतज्ञतेचे लक्षण आहे. तसेच दानाचे महत्त्व सांगून श्रद्धेने, अश्रद्धेने, भीतीपोटी किंवा लौकिकासाठी, लाजेकाजेने का होईना पण दान द्या. व्यक्तीने दानाचा हात आखडता घेतला तर समाजाची स्थिती दयनीय होते, हे विदारक सत्य आहे.

**'प्रपंच ज्याचा फाटका। परमार्थी तो खातो धोका।**

**हे कधीही विसरू नका। जगामध्ये या वत्सांनो ।।८०२।।पृ.५३२**

कृतज्ञतेने मित्र, वरुण, अर्यमा, इंद्र, बृहस्पती, वरुण आदींची प्रार्थना करून, कृपाप्रसाद मागितला आहे व शिक्षावल्लीची सांगता केली आहे.

### ब्रह्मानंदवल्ली

'ॐ सहनाववतु' या शांतीपाठाने प्रारंभ आहे. ब्रह्मज्ञान महत्त्वाचे का? तर जन्म-मृत्यूच्या येरझारा संपून अक्षय आनंद प्राप्त व्हावा यासाठी! ब्रह्म हे सत्य, ज्ञान, अनंत, म्हणून श्रेष्ठ मानले जाते. हे त्याचे स्वरूप लक्षण आहे. या ब्रह्मापासूनच सर्व विश्व निर्माण झाले. शरीरापेक्षा अन्नमय प्राण महत्त्वाचा. तसेच प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनंदमय कोशांचे महत्त्व, उपासना व फळ सांगितले आहे.

**'सूक्ष्म एक एकाहुनी। जरी हे असती क्रमांनी।**

**तरी स्थूलदेही भरोनी। ओतप्रोत राहती हे ।।१९५।।पृ.५५९**

**जसे एखाद्या खोलीस । आकाश आणि प्रकाश।**

**भरूनी शीतता ध्वनीस। वाव राही सुगंधाहि।।१९६।।पृ.५५९**

वायु, सूर्य, अग्नि, इंद्र व मृत्यू हे मोठे सामर्थ्यशाली देव आहेत. पण त्यांनाही ब्रह्माज्ञेनेच कर्तव्य पालन करावे लागते. त्यावरूनच ब्रह्माची सर्वनियंत्रण शक्ती लक्षात येते. त्यानंतर आनंदाचे मोजमाप करून मानुषानंद, मनुष्य, गंधर्व, देवगंधर्व, पितरांचा आनंद सांगून पितृलोकावर असलेल्या 'आजान' लोकाचा उल्लेख करून तिथे आलेल्या आजानज देवांचा आनंद असे उत्तरोत्तर आनंद सांगून पराकोटीचा आनंद म्हणजे 'ब्रह्मानंद' सांगितला आहे.

ज्याला ब्रह्मानंद प्राप्त झाला तो ज्ञानी! तो कोणत्याही जन्मनिमित्ताला भीत नाही. कारण त्याची बुद्धी आत्मानंदात स्थिर असते. उलट अज्ञानी माणसाला मरणाची सतत भीती रहाते. आत्मानंदात सतत राहून जीवन जगणाऱ्याला जीवनमुक्त म्हणतात. हा

जीवनमुक्तीचा आनंद लाभावा म्हणून भृगु आपल्या वडिलांकडे वरुणांकडे शिष्यभावाने गेला व ब्रह्मज्ञान देण्याची त्याने विनंती केली. इथून भृगुवल्लीला प्रारंभ हातो. वरुण सांगतात,

### भृगुवल्ली

**अन्न प्राण डोळे कान। पाचवे हे अंत:करण।**
**वाणी सहावे यातून। जाता येते ब्रह्माकडे।।१३।।पृ.५७९**
**ज्यातून जन्मती सारी भूते। नांदती ज्याच्या आश्रयाते।**
**आणि शेवटी सर्वाते। जेथे लागे लीन व्हावे।।१५।।पृ.५७९**

भृगूने चिंतन मननास प्रारंभ केला. अन्न हेच ब्रह्म आहे. कारण उत्पत्ती, स्थिती व लय अन्नातून, अन्नामुळे व पर्यायाने अन्नातच होतो. त्याने वडिलांकडे जाऊन तसे सांगितले तेव्हा हसून ते म्हणाले, योग्य दिशेने तुझे चिंतन चालू आहे. असेच पुढे चिंतन सुरू ठेव. एकाग्र होऊन विचार करताना लक्षात आले माणूस अन्नाशिवाय काही दिवस राहू शकेल, पण प्राणाशिवाय? क्षणभरही मनुष्य जिवंत राहू शकत नाही. तेव्हा प्राण हेच ब्रह्म असे तो पित्याला म्हणाला. वरुण म्हणाले ठीक आहे. पुढे चालत रहा. तेव्हा त्याला जाणवले मनावरच सर्व अवलंबून! मनासारखे घडले नाही तर मनुष्य प्राणत्यागही करतो. तो तसे विधान पिताजींसमोर करतो. पिताजी म्हणतात, अजूनही तुला चिंतन करण्याची आवश्यकता आहे. भृगुला आश्चर्य वाटले. तो म्हणाला आताही माझे विधान तुम्हाला का पटत नाही? पुन्हा तपश्चर्या कशासाठी? तेव्हा–

**मन सर्वांसि कारण। योग्य आहे हे विधान।**
**परी मनाचे कारण। काही आहे कां नाही?।।५२।।पृ.५८५**
**ते सर्वांचे कारण। परी ज्यास न लागे कारण।**
**तेच खरे अधिष्ठान। तेंचि ब्रह्म, ते शोधी ।।५३।।पृ.५८५**

पुन्हा तपश्चर्या सुरू केली भृगूने. तेव्हा त्याला विज्ञान हेच ब्रह्म आहे याची जाणीव झाली. त्याने तसे वरुणांना सांगितले. वरुण प्रसन्नतेने म्हणाले, ''अरे मंदिराच्या गाभाऱ्यापर्यंत आला आहेस. हा उंबरा ओलांडून आता परमेश्वराजवळ पोचायला हवे ना! तपश्चर्येला आता बसशील तेव्हा विवेक धारदार कर तेव्हाच सूक्ष्मातील ही सूक्ष्मता ध्यानी येईल.

भृगु पुन्हा तपश्चर्येला बसला. त्याला आता समाधी अवस्था प्राप्त झाली होती. उष:काल झाला, डोंगराआडून सूर्यनारायण वर आला अन् त्याच क्षणी भृगूचे हृदय आनंदाने उचंबळून आले. अन् त्याला आत्मसाक्षात्कार झाला. मुखश्री प्रसन्नतेने बहरली आणि त्याला वडिलांच्या शब्दांची अनुभूती झाली. मूर्तिमंत आनंदानेच त्याला मिठीत घेतले आहे.'' लक्षात आले आनंद हेच विश्वाचे मूळ आहे! इकडे वडिलांना अंतर्ज्ञानाने समजले भृगुला ब्रह्मज्ञानप्राप्ती झाली आहे! ते स्वत: उठून भृगुकडे आले व त्याला घट्ट आलिंगन दिले व म्हणाले, आज तुझा पिता असण्याचा मला अभिमान वाटतो आहे. प्राचार्य वर्णन करतात,

**आनंदाची स्वर्धुनी । प्रगटली भृगूच्या लोचनी।**
**वाहू लागली आदरानी। स्कंधावरून वरुणाच्या।।९५।।पृ.५९०**

भृगुला वरुणाने ही विद्या दिली म्हणून ब्रह्मविद्येला, भार्गवी–वारुणी असेही एक नाव आहे. तप:साधनेने प्राप्त झालेली ब्रह्मविद्या हे अलौकिक फळ आहे. तिचे दृश्य फल म्हणजे ब्रह्मज्ञान ज्याला होते त्याच्या प्रपंचात कशाचीच उणीव रहात नाही. गृहस्थाश्रमात राहूनही ब्रह्मज्ञान प्राप्त करता येते. संसारी लोकांसमोर तो एक आदर्श ठरावा म्हणून श्रुति माऊली सर्वांनाच आदेश देते की,

अन्न हे ब्रह्मप्राप्तीचे पहिले दार आहे म्हणून अन्नाची कधीही निंदा करू नये. प्राण व शरीर हे दोन्ही परस्परांवर अवलंबून आहेत. एक भोज्य व दुसरा भोक्ता. जलाच्या जठराग्नीच्या सहाय्याने अन्नपचन होते. घरात अन्न पुष्कळ शिजवावे त्यासाठी शेतात पुष्कळ धान्य निर्माण करावे. **ब्रह्मज्ञान झाले म्हणजे कर्तव्य संपले** असे समजू नये.

**न्याय नीति अनुसरून। संग्रहावे विपुल धन।।**
**येऊ न द्यावे कधी न्यून। उत्साहासी प्रयत्नासी।।१४७।।पृ.५९६**

अतिथीचा सत्कार करावा, आपल्या शेजारी पाजारी कुणी उपाशी असेल तर त्यालाही अन्नदान करावे. वैभवातही अलिप्त असावे.

**निरुत्साह ना, समाधान। निष्क्रियता ना, विरक्तपण।**
**अद्वैताचे तत्त्वज्ञान। कर्तव्यासी बाधते ना।।१६७।।पृ.५८९**

ब्रह्मांडात, चराचरात हे ब्रह्म भरलेले आहे. त्याची उपासना म्हणजे, मधुर व सत्यवाणी, कौशल्य व सत्यकर्म, सन्मार्गाने, सत्कार्यासाठी चालणे. मनाच्या व शरीराच्या आरोग्यासाठी अन्नपचन व मलमूत्र विसर्जन योग्य प्रकारे होणे, ही शारीरिक ब्रह्माची उपासना होय. ब्रह्मांडात पर्जन्य, म्हणजे दान देणे, विद्युत म्हणजे कर्मातील उत्साह, चैतन्य म्हणजे साक्षेप, गोधनाच्या ऐवजी आज दुचाकी, चार चाकी वाहने हे वैभव असणे म्हणजे यश प्राप्त होणे. ध्यान धारणा करून बुद्धी सूक्ष्म व तेजस्वी करणे. वंश सातत्यापुरतेच उपस्थ इंद्रिय वापरणे या साठी संयम बाळगणे. ही ब्रह्मोपासनाच आहे. त्या संदर्भात शाक्तांची रतिक्रीडेची उपासना अयोग्य आहे. त्याने समाजाला अध:पतित केले आहे असे प्राचार्य आवर्जून उल्लेखितात. अशा तऱ्हेने ब्रह्मोपासना केली तर त्या संयमी व विवेकपूर्ण उपासनेने उत्तम दर्जाचे अपत्य व उत्तम दर्जाचे शिष्य यांच्या रूपाने दाहीदिशांना या ब्रह्मज्ञानाची कीर्ति पसरते. त्याकरता ब्रह्म हाच एक मान्य सर्वाधार आहे. या भावनेने ब्रह्मोपासना करावी. ब्रह्म महान आहे. मननीय आहे, ज्ञानरूप आहे तसेच शत्रू मारण्याची शक्तीही त्यात आहे. हे लक्षात घेऊन ब्रह्मोपासना करावी.

जे पिंडात आहे, तेच ब्रह्मांडात आहे हे लक्षात घेऊन अद्वैत जाणून जो साधना करतो त्यालाच क्रमाक्रमाने पंचकोश ओलांडून आनंद सागरात डुंबता येते, अमृत प्राप्त होते. तो स्वत:च ब्रह्म होतो.

**स्वये असा होऊन ब्रह्म। तृप्तकाम आत्माराम।**
**विचरे लोकी यथाकाम। स्वतंत्रतेने स्वच्छंदी।।२५२।।पृ.६०७**
**वृत्ती तयाची आनंदी। उसळोनि ये पदोपदी।**
**जणू निर्विकल्प समाधी। धुंदीमध्ये साम गाते।।२५३।।पृ.६०८**
**साक्षात्कारा लाभे स्वर। आनंद बोध झाला मुखर।**
**तृप्तीस आले उद्‌गार। ऐक्य नृत्य करी मुखे।। २५४।।**

विलक्षण प्रतिभा प्राचार्यांची अनुभव घेऊनच इथे प्रगटली आहे!

वा!वा! किती छान! किती सुंदर!! किती विलक्षण!!!! निरंजन आत्माही मीच, अन्नही व अन्नादही मीच, त्रैलोक्याचे घरकुल करून त्याच्या अंगणात मी एकटाच आनंदाने नाचतोय. मीच भोज्य, भोक्ता, ध्येय, ध्याता, मीच आसक्ती व वैराग्य, सर्व भेद माझ्यातच सामावलेले आहेत. सर्व विविधतांच्या गटांचा मीच निर्माता आहे. मीच सर्वत्र भरलेला आहे.

**आनंद मी, मी अव्यय। व्यापक मी, मी सर्वाश्रय।**
**अखंड निष्कळ अद्वय। मीच नांदे सर्वभूती।।२६८।।पृ.६०९**

अशा या ब्रह्मानुभवी लेखकांच्या पायावर डोके ठेवून लेखणीला विराम देते! या भांडारात सर्वच संग्राह्य! काय सोडावे? काय घ्यावे? मती गोंधळते!!! त्यातून यथामती केलेली सेवा ब्रह्मार्पण!

**– सौ. वसुधा परांजपे, पुणे**
ब्लॉक नं. ७, विठ्ठलनगरी, उपाशी विठोबा मंदिरा शेजारी,
पुणे ४११०३०. फोन : २४४७११०९

**– सौ. मीना वाटवे**
१७ जयप्रसाद रेसिडेन्सी, जुनी पंडीत कॉलनी,
व्हेपा नर्सरी जवळ, नासिक – ४२२००२
मो. : ९४२३९७१६५३

•••





## कल्याणी विशेषांकास
# हार्दिक शुभेच्छा!

संतचरित्रे ना कादंबरी । वा करमणुकीची गोष्ट खरी ।
ही साक्षात् शिदोरी । कल्याण पेठेस जावया ।।
म्हणून या संतचरित्राचा । उपयोग करा नित्यसाचा ।
जेणे जीवन यात्रेचा । पंथ सुगम होईल की ।।
संतचरित्रे पाहून । आपुले ठेवा वर्तन ।
उगीच अहंकारावश होऊन । भलते सलते करु नका ।।
सांप्रत आपल्या देशाची । दशा निकृष्ट झाली साची ।
जी खाण असून वैभवाची । दारिद्र्य निकेतन झाला असे ।।
स्वधर्माच्या टवाळ्या । सांप्रत तुम्ही आरंभल्या ।
ह्याच समजा कारण झाल्या । दैन्य देशाचे व्हावया ।।
राष्ट्रासी जाती मत्सर । हाच क्षयरोग साचार ।
तो एकदा झाल्यावर । एकीशक्ती कोठून राही ।।
म्हणून वेळ करूं नका । द्वेषी मने बनू नका ।
स्वधर्माते टाकू नका । विवेक जागृत ठेवोनिया ।।
ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र । ऐसे तुमचे वर्णचार ।
ते चारी मिळून साचार । एक व्यक्ति समजावी ।।
देहाच्या अवयवापरी । वर्ण समजा अंतरीं ।
प्रेम ठेवा परस्परी । म्हणजे कल्याण होईल ।।
या सर्व गोष्टींचे शिक्षण । एका संत चरित्रापासून ।
मिळणार आहे तुम्हालागून । म्हणून ते परियेसा ।।

–दासगणु



-: शुभेच्छुक :-
**एकनाथ कोंडावार**
**मोहनराव लिग दे**



# उपनिषदर्थकौमुदी खण्ड ३ छान्दोग्यउपनिषद्

**सौ.भाग्यलता पाटसकर**

व्याकरण विषयांत पीएचडी,
संचालक, वैदिक संशोधन मंडळ (आदर्श संस्कृत शोध संस्था), पुणे
८ पुस्तकांचे संपादन, अनेक लेख प्रकाशित

उपनिषदर्थकौमुदी खण्ड ३ यात छान्दोग्य उपनिषदाचे ओवीबद्ध निरूपण प.पू. वरदानन्द भारतींनी केले आहे. या निरूपणात बोली भाषेची लय आणि प्रवाहिता आहे, दृष्टान्त देत देत पुढे जाण्याची आणि अवघड सिद्धान्त उकलून दाखविण्याची शिक्षकी हातोटी आहे, श्रोत्यांशी/वाचकांशी थेट संवाद साधणारी कीर्तनकारी शैली आहे. तसेच प्रतिपाद्य वस्तूबद्दल अतोनात आदर, निष्ठा आहे आणि श्रोत्यांच्या भल्याची कळकळ आहे. हे या निरूपणाचे सहज दिसणारे विशेष आहेत. प.पू.वरदानन्दांच्या निरूपणावर काही बोलावे असा माझा मुळीच अधिकार नाही (खरे तर हे सांगायची सुद्धा गरज नाही) पण हे वाचत असताना ती.आप्पांना भेटल्याचा पुन:प्रत्यय मला वारंवार येत होता. मी त्या भाग्यवंतांपैकी एक आहे की, ज्यांना पू.आप्पांनी शब्दश: समोर बसवून शिकविले. त्या माझ्या 'उपनिषदां'ची पुन्हा एकदा उजळणी इथे ती.आप्पांनी करून घेतली. या भेटीत ती. पू. आप्पा मला कसे दिसले ते मी आता सांगते आणि माझ्या आनंदात तुम्हाला सहभागी करून घेते.

कौमुदीत पू.आप्पांची दोन रूपे प्रकर्षाने दिसतात. पहिले भाष्यकारचे आणि दुसरे कीर्तनकाराचे!

भाष्यकार म्हणून संस्कृत शब्दांचा किंवा वाक्यांचा अर्थ सांगून पुढे विविध दृष्टान्तांद्वारे तो समजावून पू.आप्पा उपनिषदाचा अर्थ सुगम करतात. मूळ संस्कृत ग्रंथ बाजूला ठेवून ओव्या वाचत गेलो तरी आकलनात कुठे अडचण येत नाही. भाष्यकाराच्या भूमिकेतून पू.आप्पा अध्याय-खण्ड यांची संगती लावून दाखवितात. अनेकदा पुढे येणाऱ्या अध्यायांच्या पूर्वपीठिका ते सविस्तर आणि तरीही मूळ आशयाशी एकरसपणे जुळणाऱ्या सांगतात की, त्या कधीही उद्ग्रन्थ वाटत नाहीत. उदा. छा.२.१४ची अवतरणिका (पृ. १६२,१६३,१६४)

भाष्यकाराच्या भूमिकेतून पू.आप्पांनी अनेक संकल्पना स्पष्ट केल्या आहेत. उदा. एकाच वेळेस नित्यतृप्त आणि अलिप्त असणे कसे शक्य आहे? पू.आप्पा म्हणतात–

**काही घडावे वाटते । चित्त तोवरी व्याकूळ होते ।**
**अशी स्थिति ना संभवते । ईशाठायी केव्हाही ।।**
**परमात्मा हा नित्यतृप्त । म्हणून सर्वथा अलिप्त ।**
**तेणे संभ्रमाची मात । तया ठायी संभवेना ।।**

(छ.३.१४.२. ओ. ३८९,३९७; पृ. २९०)

अमुक हवे आणि अमुक नको यातली आपली मानसिक गुंतवणूक आपल्याठायी वखवख आणि पुढे जगण्याची धावाधाव निर्माण करते. ज्याची अशी गुंतवणूकच नाही त्याच्या ठायी हवे नकोची उलघाल नाही आणि म्हणून तृप्ती! तृप्ती ही उपभोगात नसून अलिप्ततेत आहे, हा जाता जाता दिलेला संदेश!

छा.४.१.१ मध्ये वायूला संवर्ग म्हटले आहे. ही अवघड कल्पना समजावून देताना पू.आप्पा म्हणतात–

**संवर्ग म्हणजे व्यापणे । भक्षिणे वा गोळा करणे ।**
**आपलेसे करून घेणे । प्रस्थापिणे सत्तावा।** (ओ.२१९,पृ.२५६)

श्रोत्राला संपद् म्हणण्यातील श्रुतीचा भाव आप्पा उलगडून सांगतात तो असा की–

'खऱ्या संपदेचे ज्ञान । कान करून देतात । म्हणून तेच संपद...।'

(छा.५.१.४ ओ. ५२-६७, पृ.३३८-३३९)

ज्ञान हीच संपत्ती आहे. तिच्या प्राप्तीचे एक महत्त्वाचे साधन म्हणजे कान. म्हणून लक्षणेने कानालाच संपद् म्हटले आहे.

छा.६.१२.२. मध्ये ऋषी आपल्या मुलाला म्हणतात–'श्रद्धत्स्व सोम्य!' यावर निरूपण करताना पू.आप्पांनी श्रद्धेचे वेगवेगळे पैलू उलगडून दाखविले आहेत आणि त्यायोगे मानवी जीवनातील श्रद्धेचे स्थानही सिद्ध केले आहे. (ओ.४५१-४५९, पृ. ४५५)

छान्दोग्य उपनिषद् विविध सामांच्या रूपात अनेक प्रकारच्या उपासना सांगते– ते वाचताना आपल्यालाही काही चमत्कारिक वाटते. याविषयीचा एक कळीचा मुद्दा पू.आप्पा सांगतात की, उपासना पुष्कळदा काळाच्या चौकटीत किंवा काळाच्या पार्श्वभूमीवर असतात. कारण उपासनेसाठी सांगितलेले प्रतीक पुष्कळदा सार्वजनीन किंवा सार्वकालिक नसते. काळ पुढे सरकला की, त्या प्रतीकातील अर्थवत्ता किंवा उचितता नाहीशी होते. अशा नि:सार प्रतीकाची उपासना मग साहजिकच निष्फल होते. पण म्हणून उपासनेमागचे तत्त्व किंवा उपासनेतील तथ्य फालतू ठरत नाही. हा उपासनेविषयी महत्त्वाचा विचार पू.आप्पांनी पहिल्या दोन अध्यायात विशेष व अन्यत्र प्रसंगाने मांडला आहे. (उदा. ओ. ४५; पृ.९५)

ज्ञान, कर्म, भक्ति आणि योग यांचा एकरस समन्वय हा पू.आप्पांचा आवडता विषय आणि विचार आहे. त्यामुळे वैदिक कर्म

पू.आप्पांनी कधी गौण मानले नाही. (शंकराचार्यांच्या अद्वैताच्या विचाराचे असूनही!) पू.आप्पांच्या म्हणण्याप्रमाणे या कर्माची रचनाच अशी आहे की, त्यातच औदार्य, त्याग व निष्कामता निर्माण किंवा परिपुष्ट होण्याची खुबी आहे. अतिशय परिचित व उचित अशा दृष्टान्ताने आप्पा ही गोष्ट समजून सांगतात. आई बाळाला पांगुळगाडा देते ते बाळ पांगळे व्हावे म्हणून नाही तर त्याच्या पायात शक्ती यावी व पुढे त्याने गरूड भरारी घ्यावी म्हणून! तसेच श्रुती कर्म सांगतात ते त्यात अडकवून ठेवण्यासाठी नाही तर त्याद्वारा आत्मोन्नती व्हावी म्हणून! (छा.२.२४.१ ची अवतरणिका, ओ. ४०६-४१६, पृ.१३९)

भाष्यकाराचा अनेक शास्त्रांचा व्यासंग त्याच्या भाष्याद्वारा प्रकट होत असतो. अशी अनेक स्थळे भाष्याचे हे वैशिष्ट्य मिरवणारी दिसतात.

'कप्यास' (छा. १.६.७.) या शब्दाचे स्पष्टीकरण करताना पू.आप्पा, आद्य शंकराचार्य आणि रामानुज यांनी लावलेल्या अर्थांची- त्यांचे त्यामागचे अभिप्राय जाणून-समीक्षा करतात. कप्यास शब्दाचा अर्थ माकडाचे बूड किंवा पृष्ठभाग घेऊन पुढे आप्पा म्हणतात की, आरक्ततेचा बोध व्हावा एवढेच श्रुतीचे तात्पर्य आहे.

विरोचन असुराच्या निमित्ताने छा.८.८.५ वरील निरूपणात पू.आप्पांनी देहालाच आत्मा समजणाऱ्या आणि म्हणून त्याच्याच विलासात रमणाऱ्यांच्या जीवनशैलीचे मार्मिक वर्णन केले आहे. ही आसुरी जीवनशैली फार पूर्वी खरेच अस्तित्वात होती हे सांगताना पू.आप्पा इजिप्तमधील ममीज्‌ची उदाहरणे देतात.

**'त्यात भूपाळांची प्रेतें। सांभाळुनी ठेवली दिसते ।**
**शृंगारिले जयाते । दागिन्यांनी नानापरी ।।** (ओ. ४८१, पृ.५८४)

याखेरीज आचार्य भाष्याचे परिशीलन, सामगायन, श्रौतकर्म (पहिले दोन अध्याय), आयुर्वेद (हा तर त्यांचाच खास विषय) या विषयाची उपस्थिती ठायी ठायी आढळते. मात्र शैलीच खूप रसाळ, दृष्टान्तप्रचुर, श्रोतृसंवादी असल्यामुळे त्याचा व्यासंग कधीच जाचत किंवा टोचत नाही.

वाममार्गी शाक्तांमध्ये मैथुन हा एक आचार किंवा उपासना प्रकार आहे. हा चमत्कारिक प्रकार कुठून आला असावा? याची उपपत्ती सांगताना वामदेव्यसामाच्या निरूपणाअन्ती पू. आप्पा म्हणतात-

**''या सामाची विकृती । दुर्दैवाने झाली पुढती ।**
**विस्तारा नेली अनीति । वाममार्गी शाक्तांनी ।।''**

(छा.२.१३.२, ओ.२४०)

पतिपत्नींमधील निरामय व आनन्दपर्यवसायी अशा मैथुनसंबंधावर या सामाचे रूपक केले आहे. त्यातील सामाची उपासना हा उपनिषदाला अभिप्रेत अर्थ आहे. त्याऐवजी रूपकालाच उचलून एका संप्रदायाने उपासनेला विकृत वळण दिले, असा यांचा अभिप्राय. अशा कित्येक कल्पना विवेचनाच्या ओघात पू.आप्पा स्पष्ट करतात.

कौमुदी हे 'भाष्य' स्वरूपाचे निरूपण आहे असे मला वाटते. कारण भाष्यकाराला व्याख्येय ग्रंथाच्या माध्यमातून स्वतःचे काही चिन्तन, मन्तव्य प्रतिपादित करावयाचे असते. पू.आप्पांच्या कीर्तने, व्याख्याने, पुस्तके एवढेच काय एरवीच्या सहज बोलण्यातून प्रकट होणारा त्यांचा विचार म्हणजे राष्ट्रभक्ती आणि सशक्त, उत्साहपूर्ण, देशाला आधारभूत आणि धर्माला पायाभूत असणारा आदर्श गृहस्थाश्रम या विचारांचा संपूर्ण कौमुदीत एक स्पष्ट असा अन्तस्थ ध्वनि ऐकू येतो. (Under tone) 'राष्ट्रदेव' असणाऱ्या आप्पांच्या सततच्या चिंतनाचा विषय आपल्या देशाचे कल्याण हाच होता. त्यामुळेच छा.२.२४.१० येथील एका मुद्द्याचे विवरण करताना पू.आप्पा म्हणतात-

**'सुख देऊनि घराप्रत । आचरीन इष्टापूर्त ।**
**समाज राष्ट्राच्या संबंधात । पार पाडीन कर्तव्ये ।।''**

(ओ.४४८, पृ. १४४)

छा. २.२४.१२-१३ मध्ये एक साम आहे. या अक्षरांच्या अनुषंगाने पू.आप्पा सांगतात-

**समष्टीच्या विचारांनी । परकीयांची शासनी ।**
**राहील ना आता कोणी । अशी द्यावी तेजस्विता ।।**
**धर्म आमुचा आमुची नीती । राहण्या बोलण्याची रीति ।**
**देवा स्वतंत्र होवो पुरती । स्वाराज्याच्या लाभाने ।।**

(ओ. ४५८,४५९, पृ. १४९)

पुढे ते म्हणतात-

**परंपरागत आमच्या सीमा । अखंड राहोत उत्तमा ।**
**तदर्थ करण्या परिश्रमा । सामर्थ्य द्यावे आम्हासी ।।**

(तत्रैव ओ.४६२)

वृत्तीने विरागी पण समाजात रहाणारा आणि समाजासाठी जगणारा धर्मात्मा उपनिषदांतून असा अर्थ काढू शकतो!

उपनिषदे ही 'उत्तम जगण्यासाठी' आहेत. आपले जीवन कार्योन्मुख तर असावंच पण त्यायोगे देश व धर्म यांना स्थैर्य व उन्नती कशी लाभेल याचाही विचार उपनिषदांनी आनुषंगिक म्हणून केला आहे, असे पू.आप्पांचे प्रतिपाद्य वाटते. त्यांच्या भोवतालच्या समाजाच्या जगण्याला त्यांना ही दिशा द्यायची आहे. हे त्यांचे भाष्य आहे. (भाषा- बोलणे, भाष्य= जे बोलायचे मनात आहे ते) म्हणून त्यांनी उपनिषदे हातात घेतली असावीत! अन्यथा नुसता अर्थ सांगून भागले असते. उपनिषदे ही निवृत्तिपर आहेत. मोक्षाची इच्छा असणाऱ्या विरागी माणसासाठी आहेत या प्रस्थापित समजुतीला धक्का देणारा हा विचार आहे. म्हणून मला असे प्रामाणिकपणे वाटते की, परंपरेनुसार उपनिषदाचा 'अधिकारी' शम-दम इ.युक्त असा मुमुक्षू असेल पण कौमुदीचा अधिकारी मात्र 'मी' आहे (असे प्रत्येक वाचणाऱ्याला वाटेल). पू.आप्पा म्हणतात की 'मी हे जिज्ञासूंसाठी सांगितलेले आहे' पण इथे नुसता उपनिषदांच्या अर्थाचा जिज्ञासू नाही तर 'प्रपंच' सर्वार्थाने नेटका कसा करावा? या विद्येचा जिज्ञासू आहे. त्यामुळेच सामान्य माणसाला चांगला प्रापंचिक बनविणे आणि चांगल्या प्रापंचिकाला साधक बनविणे हा कौमुदीचा हेतू असावा असे वाटते. छा.३.१६ १-६ या ठिकाणी उपनिषदाने सवन या यज्ञकर्माचे मानवी जीवनावर रूपक केले आहे. पू.आप्पा हे निरूपण 'रंगून जाऊन' आणि म्हणून प्रभावीपणे करतात, इतके की उपनिषदांची प्रवृत्तिपरता आपल्या मनावर ठसावी. या

निमित्ताने त्यांनी त्यांचा आवडता विषय 'स्वधर्माचे पालन करूनच सर्व सामान्य माणसाचे जीवन उदात्त होते' पुन्हा सविस्तरपणे मांडला आहे.

छा.३.१८.६ मधील 'श्रोत्रमेव ब्रह्मणश्चतुर्थ: पाद:' या एका वाक्यावरील पू.आप्पांचे विवरण म्हणजे भक्ती आणि उपासनेचा परिपाठच आहे. फलश्रुती वाचून उपासना करणाऱ्यांची काही कमी नाही. पण हे कसे घातक आहे हे सांगताना पू. आप्पा म्हणतात–

**ऐकोनिया फलश्रुति । उचंबळिती लोक चित्ती ।**
**आणि कराया धावती । नानापरी उपासना ।।**
**मग न येता हाती फळ । कोपून म्हणती हे टवाळ ।**
**म्हणून येथे केवळ । कथिले सावध होण्यासी ।।**

(छा. ३.१४.४. ओ.८५०–८५१,पृ.२३४)

हे धोके टाळण्यासाठी पू. आप्पा बजावून सांगतात की क्रिया, भक्ती व आचरण हे कोणत्याही उपासनेचे तीन आधार आहेत.

छान्दोग्याचा विषयच उपासना असा आहे. पण उपासनेकडे वळू इच्छिणाऱ्या प्रापंचिकाची पू.आप्पा विशेष काळजी घेतात. त्यामुळेच अनेक ठिकाणी ते सावधगिरीच्या सूचना किंवा संशय निरसन करतात. परमार्थाकडे मनाचा कल होऊ लागला की, अनेक उपासना समोर येतात आणि माणूस बुचकळ्यात पडतो. पू.आप्पा सांगतात की, उपासना म्हणजे परमार्थ नाही, ती परमार्थाची साधने आहेत आणि त्यांना आपापल्या मर्यादा आहेत.

**'परमार्थासी जवळीक । साधून देती अधिकाधिक ।**
**ठरती एकाहून एक साधने ती महत्त्वाची ।।**

छा.७.१५ मध्ये सनत्कुमारांनी प्राणविद्या सांगितली आहे. या ठिकाणी श्रुतीने मनुष्यजीवनातील दैनंदिन आचरणाची बाजू परामर्शिली आहे. पू.अप्पांनी या सर्व विवेचनाला अशी काही दिशा दिली आहे की, मानवी जीवनाची धन्यता साधण्याचा मार्ग त्यात आढळावा.

व्याख्येय ग्रंथाच्या अनुषंगाने सामान्य प्रापंचिकाचे 'विचार दुरूस्त' करणे हे कामही अनेक ठिकाणी पू. आप्पांनी कौमुदीत केले आहे. उदा. छा.३.१४.२. फक्त एवढेच म्हणते की, 'आकाशात्मा सर्वकर्मा, सर्वकाम...' मात्र निरूपण करताना या शब्दांचा अभिप्राय पू.आप्पा आपल्या जगण्याजवळ आणून भिडवतात.

**अज्ञान स्वार्थ मोहामुळे । माणूस विचार करी खुळे ।**
**पटते न त्यासी चांगले । ईश्वराचे माहात्म्य हे ।।** (ओ ३७५, पृ. १८९)

आपल्याला प्रतिकूल घडले तर लोक ईश्वरावर ठपका ठेवतात, हे चुकीचे आहे, हे या निमित्ताने पू.आप्पा सांगतात.

**ईश्वराच्या संकल्पात । कधीही ना होते अहित ।**
**सत्यामधे अनुस्यूत । हित हि राहे भूतांचे ।।** (ओ.३८१; तत्रैव)

छा.८.३.५ या ठिकाणी 'सत्य' या शब्दाचे विश्लेषण आहे. यावरील विवेचनात पू.आप्पांनी केलेली विवेकाची मांडणी ही सर्वसामान्य प्रापंचिकाला डोळ्यापुढे ठेवूनच केली असावी असे वाटते. रोजच्या जगण्यात ग्राह्य–त्याज्य, योग्य–अयोग्य, भोग्य–वर्जनीय, विलास–वैराग्य यातल्या कशाची तरी निवड करण्याचा प्रसंग वेळोवेळी येतो. पू.आप्पा या प्रसंगी एक मौलिक मार्गदर्शन करतात–

**'एक सामान्य काही । येथ करिता येत नाही।।**
**कृति करावी लागते पाही । ओळखूनी परिस्थिती ।।**

(ओ. २२०, पृ. ५५७)

कौमुदीचा अधिकारी सफल जीवन कसे जगावे हा प्रश्न किंवा जिज्ञासा घेऊन आला आहे, असे जे मला वाटते याचे आणखी एक कारण, प्रसंगाप्रसंगाने पू.आप्पा कुठे पाणी व्यवस्थापन (छा.७.१०.१ वरील विवरण), कुठे शिकविण्याची उत्तम शैली (छा. ६.१३.१; ओ.४६५–४७२, पृ.४५६–४५७), कुठे पशु, आपल्या भोवतालचे कष्टकरी, आपल्यावर अवलंबून असलेले यांच्या विषयीची काळजी (छा.२.१८.२, ओ.२७६; पृ. १२४), कुठे शब्दांचा सावध आणि साधेपणाने वापर करणे (छा.५.२.१, ओ.१४६; पृ.३४८), चंगळवादाचे घातक रूप (छा.८.८, ओ.४४५–४८२, पृ.५८१–५८४), नेतानिवडीत घेण्याची दक्षता (छा.१.२.६, ओ.२१२;पृ.२१), मन मोठे ठेवणे आणि त्याच वेळी ते सांभाळणे (छा.५.१.५, ओ.७७; पृ.३४०), ब्राह्मणाने पैशाची हाव धरू नये आणि ज्ञान समाज कल्याणार्थ वापरावे (छा.१.११.८, ओ.७६५,७६६;पृ.८०), समाजातील दांभिक प्रवृत्तीचे लोक (छा.२.१.२, ओ.६४;पृ९७), प्रापंचिकाच्या बाबतीत 'कामा'ची अपरिहार्यता, आवश्यकता आणि मर्यादा (छा.२.१३.१, ओ, २१७–२२४, पृ.११७) अशा कितीतरी एरवी बारीक सारीक वाटणाऱ्या गोष्टींवर मोठ्या साक्षेपाने मत मांडतात. ही यादी खरी खूप मोठी आहे, इथे यातले थोडेच मुद्दे वानगीदाखल उल्लेखिले आहेत. भारतीय संस्कृतीची व मूल्यांची श्रेष्ठता हा विषय तर त्यांच्या जिव्हाळ्याचाच आहे, त्याचा तर अनुनादच जाणवतो संपूर्ण कौमुदीत!

उपनिषदाच्या चौकटीला धक्का न लावता, त्यातील शब्दांची वा वाक्यांची वेडीवाकडी मोडतोड न करता पू. आप्पा स्वत:चे निश्चित प्रतिपाद्य दमदारपणे सांगतात, त्यामुळे कौमुदीची मूस भाष्याची आहे पण तिचा थाट कीर्तनाचा आहे हे नक्की! उपनिषद हा संवाद आहेच पण कौमुदी हापण एक संवादच आहे. उपनिषदांचा संवाद गुरु–शिष्य असा आहे. कौमुदी म्हणजे कीर्तनकार आणि श्रोते यांच्यातला थेट संवाद आहे. अनेकदा आप्पा श्रोतेहो, श्रोते असे संबोधून पुढे काही सांगतात. छा.४.१७.१० चे विवरण झाल्यावर पू.आप्पांनी श्रोत्यांशी एक प्रदीर्घ संवाद साधला आहे. (पृ.३३०–३३३).

**'श्रोतेहो हे यथामति । कथिले मी तुम्हांप्रति ।**
**अशी ठेविता आपली वृत्ति । प्रसन्नता ये भोगाया ।।'**

(ओ.९८६, तत्रैव)

हे कीर्तनकाराचे बोलणे आहे! त्यामुळे उपनिषदांवरील इतर भाष्ये वा भाषांतर वाचताना आंतर जाणवते ते इथे अजिबातच जाणवत नाही! आपण त्या संवादाच्या प्रवाहाबरोबर पुढे जात राहतो, त्यामुळे वाचताना पण मोठी मजा वाटते.

पू.आप्पांमधला हा कीर्तनकार हिमालय, आश्रम, नद्या यांची वर्णने आली किंवा आणायची लहानशी जरी संधी सापडली तरी खूप रंगून जातो. एरवी सडेतोड, परखड असणारी त्यांची वाणी अशा ठिकाणी मृदू आणि उत्साही होते. कथा रंगवून सांगण्याची त्यांची कीर्तनकारी

शैली तर अनेक ठिकाणी दिसून येते. उपनिषदातील अशा 'गाळलेल्या जागा' भरताना त्यांनी जाबालेची गोष्ट (छा.४.४.१. ची अवतरणिका, पृ. २६६), रैक्वाची गोष्ट (पृ. २४४-२४५), उद्दालकाची गोष्ट (छा.६.१ची अवतरणिका, पृ.४०६-४०९), छा.३.११च्या अवतरणिकेतील कथानक (पृ.१६२-१६४) हे जे सांगितले आहे, त्यामुळे सर्व कौमुदीला कीर्तनाची रंगत आली आहे. काही ठिकाणी त्यांनी स्वतःच्या कल्पना घातल्यात पण तो कल्पनाविलास नाही तर कल्पनाविवेक आहे. पाचव्या अध्यायाच्या सुरुवातीला पू.आप्पांनी एक हृद्य कल्पना मांडली आहे. परमेश्वराने एवढी सृष्टी निर्माण केली, पण त्यातलं कुणीच त्याला ओळखत नव्हते, पू. आप्पा म्हणतात,

**''म्हणूनी मग तो विश्वपती । करी माणसाची निर्मिती ।**
**आणि दिधली त्यास मती । मूळ कारणा शोधण्याची।।''**

(ओ.५, पृ.२३३)

इथे पू.आप्पांची खुबी अशी की, श्रद्धावन्ताने सगळ्या ओवीच्या आधारे सचोटीने साधना करावी आणि बुद्धिवाद्याने, नास्तिकाने किंवा वैज्ञानिकाने उत्तरार्ध हातात घेऊन चिकाटीने वाटचाल करावी!

**सौ. भाग्यलता पाटसकर**
संचालक वैदिक संशोधन मंडळ (आदर्श संस्कृत शोधसंस्था)
मुकुंदनगर, टिमवि कॉलनी, पुणे ४११०३७
फोन : ०२०-२४२६२६३५ (कार्यालय)
०२०-२४४८४२०१ (घर), ९३७१२३०२८७ (भ्रमण)



# स्वामी वरदानंदांचे बृहदारण्यकोपनिषद्भाष्य (खंड ४)

**प्रा.डॉ.शंकर रामचंद्र तळघट्टी**

एम.ए., पीएच.डी., निवृत्त प्राध्यापक, तत्त्वज्ञान विभाग, पुणे विद्यापीठ
प्राचीन भारतीय तत्त्वज्ञान आणि संतांचे तत्त्वज्ञान हे अभ्यासाचे विषय. चार ग्रंथ व अनेक लेख प्रकाशित. चर्चासत्रांत सहभाग. अनेक व्याख्याने व व्याख्यानमाला.

**ध्यायामि चौपनिषदं परमात्मतत्त्वं ।**
**दृग्रूपमद्वयममूर्तमचिंत्य रूपम् ।**
**यद् दुर्ग्रहं समवबोधायितुं यतन्ते ।**
**श्रीव्यास शंकर सुरेश्वर माधवाद्या :।।**

१) ब्रह्माविषयी उपनिषदात सांगितले आहे की- ज्यापासून हे विश्व निर्माण होते, ज्यामध्ये ते व्यवहार करते आणि अंती ज्यामध्ये ते विलीन होते ते ब्रह्म. भारतीय तत्त्वज्ञान विश्वासंबंधी अगदी अशाच शब्दांत उपनिषदांचे वर्णन केले तर ती अतिशयोक्ती होणार नाही. कारण भारतीय तत्त्वचिंतनाचा प्रारंभ खऱ्या अर्थाने उपनिषदात झाला आहे. तत्त्वज्ञानाचा पुढील विस्तार औपनिषद् तत्त्वज्ञानाच्या आधारे बव्हंशी झाल्याचे दिसते; आणि भारतीय तत्त्वज्ञानाचे अंतिम टोक- शिखरही अद्वैत वेदान्ताच्या रूपात साऱ्या जगाला साद देत उभे आहे. गुरुदेव रानडे यांनी भारतीय तत्त्वज्ञानाचे परिणत स्वरूप म्हणजे वेदान्त असे म्हटले आहे ते सर्वदृष्टीने यथार्थ आहे. 'उपनिषद'चा मूळ अर्थ ब्रह्मविद्या असा असल्याचे शंकराचार्य सांगतात. वेदवाङ्मयाच्या ज्या अंतिम भागात ही विद्या प्रतिपादिली आहे त्यास उपनिषदे म्हणतात; आणि ते वैदिक तत्त्वज्ञानाचे अंतिम स्वरूप असल्याने त्यास वेदान्त म्हणतात. याच औपनिषदिक तत्त्वज्ञानाची तर्कशुद्ध व प्रणालित मांडणी करण्यासाठी बादरायण व्यासांनी ब्रह्मसूत्रांची रचना केली आणि वेदान्तदर्शनाची त्याद्वारा उभारणी केली आणि या ब्रह्मविद्येचा विनियोग प्रत्यक्ष जीवनात करून सकल पुरुषार्थसिद्धी-विशेषत: मोक्षप्राप्ती कशी करून घ्यावी याचे शास्त्र व कला शिकविणारी भगवद्गीता 'ब्रह्मविद्यायां योगशास्त्र' म्हणून मान्यता पावली. अर्थात्, उपनिषदे, ब्रह्मसूत्रे आणि भगवद्गीता हे वेदान्तदर्शनाचे व्यापक अर्थाने परिणत भारतीय तत्त्वज्ञानाचे- आधारभूत ग्रंथ प्रस्थानत्रय म्हणून सादर स्वीकारले गेले आणि त्यावर भाष्य करणाऱ्या अधिकारी विद्वानाला 'आचार्य' ही पदवी दिली गेली. प.पू. स्वामी वरदानंद भारती, पूर्वाश्रमीचे प्राचार्य अ.दा. आठवले, यांनी या तीनही प्रस्थानांवर भाष्य केले आहे. अर्थात आजच्या काळातील ते आचार्य होत. 'आजच्या काळातील' म्हणण्याचे कारण त्यांचे भाष्य हे आजच्या काळातील परिस्थिती, प्रश्न, संदर्भ, उदाहरणे आणि ब्रह्मविद्येची प्रस्तुतता यांना अनुलक्षून केले आहे. माझ्या दृष्टीने त्यातच भाष्याचे सामर्थ्य व उपयुक्तता निहित आहे. मुख्य म्हणजे साधकांना मार्गदर्शन करणारे हे साधन-भाष्य आहे. उपनिषदांचा अर्थ विशद करण्याच्या महान पण कठिण कामात आपणास सद्गुरूकृपेचा व शंकराचार्यांच्या भाष्याचा आधार लाभल्याचे स्वामी सांगतात-

**''गुरूकृपेचा आधार । आचार्यभाष्य देई धीर ।**
**त्या विश्वास बळावर । प्रवृत्त झालो यत्नासी ।।''**

(३-६-५९)

ज्ञानेश्वरांप्रमाणेच स्वामींनीही 'आचार्यांतें वाट पुसतुं', परंतु स्वत:चे चिंतनच भाष्यांमधून मांडले आहे. प्रस्तुत ग्रंथातच ते म्हणतात- ''आपण क्रमाक्रमाने त्या सर्वांचा भगवान भाष्यकार श्रीमत् शंकराचार्यांच्या पूजनीय पदकमलांना वंदन करून आपल्या बुद्धीनुसार विचार करणार आहोत.''* (४-३)

उपलब्ध उपनिषदांची संख्या मोठी आहे. १८८ उपनिषदांचा संग्रह प्रसिद्ध आहे. शंकराचार्यांनी मात्र प्राचीन व प्रमाणभूत अशा दहा उपनिषदांवर भाष्य लिहिले आहे. ब्रह्मसूत्रभाष्यात त्यांनी अन्य काही उपनिषदांचाही उल्लेख केला आहे. स्वामी वरदानंदांनी आपल्या 'श्रीउपनिषदर्थकौमुदी'मध्ये बारा उपनिषदांवर भाष्य केले आहे. प्रसिद्ध दशोपनिषदांसह 'श्वेताश्वतर' आणि 'श्रीमहानारायण' या उपनिषदांचे अंतरंगही त्यांनी उलगडून दाखविले आहे. बहुतेक उपनिषदांवरील त्यांचे भाष्य प्रासादिक पद्यात- ओवीबद्ध स्वरूपाचे आहे. मात्र काही जिव्हाळ्याच्या मंडळींच्या मागणीवरून 'बृहदारण्यक उपनिषदा'चे भाष्य त्यांनी गद्यात सविस्तरपणे केले आहे. ते आपणास 'कौमुदी'च्या चतुर्थ खंडात वाचावयास मिळते. त्याचेच स्वरूप आणि वैशिष्ट्य जाणून घेण्याचा प्रयत्न मी प्रस्तुत लेखात करणार आहे. उपनिषदाचा बृहदाकार आणि विषयाची व्यापकता ध्यानात घेता या प्रयत्नाच्या मर्यादाही मोठ्या आहेत हे सांगायला नको.

सर्वच उपनिषदे महत्त्वाची असली तरी बृहदारण्यकोपनिषदाची- महत्ता काही आगळीच आहे. हे उपनिषद् म्हणे शुक्ल यजुर्वेदाच्या शतपथ ब्राह्मणाचे अंतिम कांड होय. या वेदाच्या काण्व आणि माध्यंदिन

*(एतद्विषयक विस्तृत विवेचन 'स्वामी वरदानंदांची उपनिषद्भाष्य भूमिका' या लेखात मी केले आहे ते पहावे.)

अशा प्रमुख दोन शाखांच्या संहिता या काहीशा भिन्न आहेत. तीच गोष्ट शतपथ या विशालकाय ब्राह्मणग्रंथाची. पैकी शंकराचार्यांचे भाष्य हे बृहदारण्यकाच्या काण्वी संहितेवर आहे. हे भाष्य इतके विस्तृत आणि विवेचक आहे की त्यावरून बृहदारण्यक हे आचार्यांना विशेष महत्त्वाचे वाटत असावे असे म्हणता येते. या संबंधातील एक उल्लेखनीय गोष्ट म्हणजे आचार्यांच्या आज्ञेनुसार त्यांचे प्रिय शिष्य स्वामी श्रीसुरेश्वराचार्य यांनी आचार्य भाष्यावर एक बृहत्तम भाष्य वार्तिकाच्या रूपात लिहिले आहे, ते 'बृहदारण्यकोपनिषद भाष्यवार्तिक' या नावाने प्रसिद्ध आहे. त्यांची श्लोकसंख्या १२००० इतकी आहे. त्यांची अन्य काही वार्तिकेही उपलब्ध आहेत. त्यावरून श्री. सुरेश्वराचार्य हे 'वार्तिककार' म्हणूनच प्रसिद्ध आहेत. 'बृहदारण्यक उपनिषद' या नावाचे स्पष्टीकरण देताना शंकराचार्य सांगतात की, त्यात ब्रह्मविद्या प्रतिपादिली असल्याने ते 'उपनिषद' होय. ते आकाराने सर्वात मोठे म्हणून 'बृहत्' आणि अरण्यामधील एकान्तात त्याचे अध्ययन केले जात असल्याने 'आरण्यक' असे हे 'बृहदारण्यक उपनिषद!' ''**सेयं ब्रह्मविद्या उपनिषच्छब्दवाच्या। अरण्ये अनूच्यमानत्वात् आरण्यकम् । बृहत्वात् परिमाणतो बृहदारण्यकम् ।**'' (सम्बन्धभाष्य). येथे आचार्यांनी केवळ 'आकाराने मोठा' असा उल्लेख केला आहे. परंतु सुरेश्वराचार्यांनी त्यात भर घालून हे उपनिषद 'अर्थत:' -गुणांनीही मोठे असल्याचे म्हटले आहे-

''**बृहत्त्वाद्ग्रंथतोऽर्थाच्च बृहदारण्यकं मतम् ।।**'' (वा.९)

स्वामी वरदानंदांनीही या उपनिषदाचे महत्त्व जाणूनच विस्तृत भाष्य केले आहे.

''महर्षी याज्ञवल्क्यासारखे श्रेष्ठ तत्त्ववेत्ते या उपनिषदाचे द्रष्टे आहेत... यातील तत्त्वज्ञानविषयक विचार भव्योदात्त असून साधकाच्या जीवनाला उज्ज्वल करण्याचे अलौकिक सामर्थ्य येथील मंत्रात आहे.'' (पृ.३)

**२)** उपनिषद म्हणजे ब्रह्मविद्या. तिलाच अध्यात्मविद्या असे म्हणतात. तिचे प्रतिपादन उपनिषद-ग्रंथात मुख्यत: संवादांच्या रूपात केले आहे. तिची तत्त्वे विशद करण्यासाठी दृष्टांत आणि रूपके यांचा उपयोग मोठ्या प्रमाणावर केल्याचे दिसून येते. त्यांचा संदर्भ लक्षात घेऊन प्रतिपाद्य तत्त्वज्ञानाशी सुसंगत असा अन्वयार्थ लावणे हे एक बौद्धिक आव्हानच म्हणावे लागते. स्वामींनी ते समर्थपणे पेलले आहे. उदाहरण म्हणून उपनिषदाच्या प्रारंभीच सर्व जगतावर केलेल्या यज्ञीय अश्वाच्या सर्वांगीण रूपकाचे त्यांचे विवेचन देता येईल. ''जगताचे स्वरूप व्यक्त करणारे अलौकिक प्रतिभेला स्फुरलेले हे एक दिव्य रूपक आहे.'' असे ते सांगतात (पृ.६) आणि छांदोग्य उपनिषदाचा दाखला देऊन हे रूपक मानवी जीवनासाठीही विचारात घेणे योग्य ठरेल असे म्हणतात.

'शरीर हे यज्ञासाठी आहे' हे या सर्वाचे सार आहे. (पृ.१५)

स्वामींची भाष्य पद्धती ही सुगमपणे मंत्रांचा आशय विशद करणारी आहे. मंत्र-मंत्राचा अर्थ- त्यावर स्पष्टीकरणात्मक भाष्य, अशा पद्धतीने केलेली मांडणी वाचकाला सुलभतेने अर्थबोध घडविते. भाष्यातून मंत्रांमध्ये आलेल्या संकल्पना, विचार व तत्त्वांचे स्वरूप ते विशद करतातच, परंतु त्याबरोबरच साधकाने त्यापासून काय शिकायचे तेही आवर्जून सांगतात. त्यांचे विवेचन हे आजच्या सामाजिक, धार्मिक, राजकीय आणि व्यक्तिगत जीवनाच्या संदर्भात केलेले असल्याने ते व्यवहारदृष्ट्या साधकांसह सर्वांनाच मार्गदर्शक होते. विवेचन करताना स्वामी अन्य उपनिषदे, गीता, संतवचने यामधील समान विचारांचा उल्लेख करतात. त्यामुळे विषय समजायला खूप मदत होते आणि मूळ मंत्राच्या आशयाची व्याप्तीही स्पष्ट होते. उदाहरणार्थ पृष्ठ २७ वरील 'साम'या शब्दाचे विवेचन पहा. त्याच्या 'समत्व' या भावाचे तात्त्विक महत्त्व सांगताना तद्वाचक अशी भगवद्गीतेतील अनेक वचने स्वामी उद्धृत करतात. याच मंत्राच्या स्पष्टीकरणात त्यांनी सायुज्यता आणि सलोकता यांच्या अनुषंगाने केलेले चत्वार मुक्तींचे विवेचन महत्त्वाचे आहे. सरूपतेचे लक्षण सांगणारे समर्थ रामदासांचे वचनही त्यांनी दिले आहे. त्याचप्रमाणे पृ.३० वरील 'उद्गीथ' या संकल्पनेचे गोष्टीच्या सहाय्याने केलेले स्पष्टीकरणही मार्मिक आहे. उद्गीथ म्हणजे केवळ उद्गान नव्हे तर भक्तियुक्त अंत:करणाने परमेश्वरप्रीतीस्तव केलेले भजन या अर्थाचे शंकराचार्यांचे वचनही ते उद्धृत करतात- 'उद्गीथो नाम सामावयवो भक्तिविशेष: न उद्गामन् ।''

प्रथम अध्यायाचे चतुर्थ ब्राह्मण तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. विश्वाच्या उत्पत्ति-स्थिती-लयाच्या परमेश्वरी लीलेला आधारभूत असणारी उपनिषदवचने आहेत- 'आत्मैवेदमग्र आसीत् पुरुषविध:।' 'द्वितीयाद्वै भयं भवति।' आणि 'तस्मादेकाकी न रमते।' स्वरूपत: एकमेवाद्वितीय असलेल्या आत्मपुरुषाला एकटे करमत ही नाही आणि दुसऱ्यापासून भयही वाटते. करमत नाही म्हणून आनन्दास्तव समस्त सृष्टीची निर्मिती करून तो क्रीडा करतो; आणि ज्ञानेश्वरांच्या शब्दात, 'जीवपणाचेनि भासें । यावया आपुलिया दशे।' (द्वितीयाच्या भयातून मुक्त होण्यासाठी), या क्रीडेचा उपसंहारही करतो. स्वामींचे या संबंधातील एक विधान अत्यंत मार्मिक आहे. ते म्हणतात- 'दुसऱ्यापासून भय असते आणि एकट्याला करमत नाही या दोन दरडी मधूनच संसाररूपी नदी वहात असते. म्हणून भर्तृहरी सारख्या विचारवंतालाही - 'न जाने संसार: किममृतमय: किं विषमय:।' असे म्हणावे लागते. (पृ. ३९).

**३)** महर्षी याज्ञवल्क्य हे बृहदारण्यकातील तत्त्वज्ञानाचे- ब्रह्मविद्येचे- प्रमुख प्रवक्ते आहेत. या उपनिषदाच्या सहा अध्यायांची मधुकांड, मुनिकांड आणि खिलकांड अशा प्रत्येकी दोन अध्यायांच्या तीन कांडात विभागणी केली जाते. मुनिकांडाला याज्ञवल्कीय कांड असे आचार्य म्हणतात, कारण अध्याय ३ व ४ मध्ये याज्ञवल्क्यांनी संवाद आणि प्रश्नोत्तर रूपात अनेक तात्त्विक विषयांचा, आत्मज्ञानाचा, ऊहापोह केला आहे. ज्ञानी राजा जनकाने आयोजित केलेल्या यज्ञात अनेक तत्त्वज्ञ ऋषी उपस्थित झाले असता सर्वश्रेष्ठ ब्रह्मवेत्ता असलेल्या याज्ञवल्क्यांनी अनेकांच्या प्रश्नांना समाधानकारक उत्तरे दिली. अश्वल, आर्तभाग, भुज्यु, उषस्त, कहोल, गार्गी, आरुणि आणि शाकल्य यांनी त्यांना अध्यात्मशास्त्रांतर्गत महत्त्वाचे प्रश्न विचारले होते. या

अध्यात्मशास्त्र-वेत्त्यांमधील गार्गीचा उल्लेख आणि तिच्याशी झालेला संवाद विशेष महत्त्वाचा आहे. कारण उपनिषद्‌काली स्त्रियाही संसार-विरक्त राहून आत्मज्ञानाची साधना करीत असत आणि विद्वज्जनही त्यांना मान देत असत हे त्यावरून दिसून येते. पुढे स्वत: जनक राजालाही त्याच्या विनंतीवरून याज्ञवल्क्यांनी अध्यात्मज्ञानाचा उपदेश केला. फलत: जनकाला 'अभय' प्राप्त झाले. येथील 'अभय' हे मोक्षाचे उपलक्षण आहे. याज्ञवल्क्य जनकाला सांगतात- 'अभयं वै जनक प्राप्तोऽसि।(४-२-४)

गार्गीप्रमाणेच मैत्रेयी पण ब्रह्मवादिनी होती. याज्ञवल्क्यांना दोन भार्या होत्या- मैत्रेयी व कात्यायनी. मैत्रेयी ही तत्त्वजिज्ञासू होती. तर कात्यायनी सुगृहिणी. संन्यास घ्यावयास निघालेल्या याज्ञवल्क्यांचा मैत्रेयीशी अमृतत्त्वसाधनासंबंधी झालेला संवाद वेदान्तात अमर झाला आहे. या उपनिषदात तो दोन स्थानी आला आहे- मधुकांडात अध्याय २, ब्राह्मण ४ मध्ये आणि मुनिकांडात अध्याय ४, ब्राह्मण ५ मध्ये. उपनिषद्‌प्रणीत अध्यात्मविद्येचे बीज आपणास या संवादात सापडते. हा संवाद किरकोळ फरकाने एकाच उपनिषदात दोन ठिकाणी आला आहे त्याचे कारण समजत नाही. परंतु द्विरुक्तीचा अर्थ, हा संवाद विशेष महत्त्वाचा आहे असा स्वाभाविकपणे होतो. संन्यास आश्रमाच्या संदर्भात स्वामींनी विवेचनात केलेले एक विधान महत्त्वाचे आहे. ते म्हणतात- 'आश्रमसंन्यासाचा आग्रह धरणे हा जर दुराग्रह असेल तर आश्रमसंन्यास अगदीच नाकारणे हा त्याहीपेक्षा वाईट दुराग्रह आहे.'(पृ.३५९). मुख्य संकल्पना आहे ती वैराग्याची आणि त्यागाची. 'यदहरेव विरजेत तदहरेव प्रव्रजेत्' असे त्याचे सूत्र आहे. या संवादातून 'अर्थ' पुरुषार्थाची मर्यादाही स्पष्ट झाली आहे. धन-संपत्ती किंवा वित्त या विषयीचा मैत्रेयीचा प्रश्न आणि त्याचे याज्ञवल्क्य यांनी दिलेले उत्तर आत्मज्ञानाच्या प्रेरणेचे मूळ आहे. संपूर्ण पृथ्वीभरून वित्त जरी मिळाले तरी त्यामुळे धर्मार्थ काम हे पुरुषार्थ सिद्ध होतील पण मोक्ष-अमृतत्त्व- प्राप्त होणार नाही; 'अमृतत्वस्य तु-नाशास्ति वित्तेन।' हा सिद्धांत आहे. यावरील भाष्यात स्वामींनी एक सुंदर सुभाषितवजा विधान केले आहे. ते सांगतात, 'पैशाने साधने मिळतात. समाधान नाही.' (पृ.१४६) असे जर आहे तर मग, मैत्रेयी म्हणते- 'येनाहं नामृता स्यां किमहं तेन कुर्याम्।' मोक्षप्राप्तीसाठी असलेले अध्यात्मविद्येचे महत्त्व जाणवून देण्यासाठी या मैत्रेयीच्या प्रश्नाचे प्रत्ययकारी महत्त्व आहे. अमृततत्त्वाची ओढ सर्वांनाच आहे; पण ते वित्ताने प्राप्त होणार नाही. मग ते कशाने प्राप्त होईल हा प्रश्न अपरिहार्यपणे निर्माण होतो. आणि त्याचे उत्तर आहे 'आत्मज्ञानाने'. ते करून देणारी पराविद्या म्हणजे अध्यात्म विद्या. म्हणून याज्ञवल्क्य सांगतात- ''आत्मा वा अरे द्रष्टव्य: श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यो मैत्रेयी ।'' (२-४-५); कारण आत्माच आनन्द स्वरूप असल्याने प्रियतम आहे. 'आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति ।'- 'इदं सर्वं यदयमात्मा।'. या संदर्भात 'वित्त' म्हणजे केवळ पैसा नव्हे तर, उपलक्षणेने, व्यावहारिक जीवनातील सुखाची सर्व साधने. शंकराचार्यांचे 'अनात्मश्री विगर्हणम्' नामक एक वेदान्त प्रकरण आहे. त्यात अशा महत्त्वाच्या प्राप्तव्यांची मोठी यादी देऊन 'पुढे काय?' असा प्रश्न विचारला आहे व 'आत्मसाक्षात्कार' हेच अंतिम प्राप्तव्य- परम पुरुषार्थ असल्याचे सांगितले आहे. त्यातील एक श्लोक असा-

**'लब्धा विद्या राजमान्या तत: किं ।**
**प्राप्ता संपत् प्राभवाढ्या तत: किं ।**
**तृप्तो मृष्टान्नादिना वा तत: किं ।**
**येन स्वात्मा नैव साक्षात्कृतोऽभूत ।।''**

मैत्रेयीच्या 'किमहं तेन कुर्याम्' या सदरात मोडणाऱ्या सर्व अनात्म-श्रींची यादी आचार्यांनी 'तत: किं'च्या रूपात येथे दिली आहे असे म्हणता येईल.

४) स्वामी वरदानंदांच्या भाष्याचा तात्त्विकदृष्ट्या महत्त्वाचा विशेष म्हणजे त्यांनी शंकराचार्यांच्या केवलाद्वैती तत्त्वज्ञानाचा केलेला पाठपुरावा. अनेक ठिकाणी त्यांनी आचार्यांच्या मतांचा स्वीकारपूर्वक उल्लेख केला आहे. शंकराचार्य आणि ज्ञानेश्वर ही त्यांची परमपूज्य दैवतेच आहेत असे म्हणता येते. पृष्ठ १०,२६,३०,४१,१२०,१२५,१२७, १७८, ३४० वरील आचार्यमतांचे उल्लेख महत्त्वाचे आहेत. अद्वैत हे परमोच्च तत्त्व असल्याचे ते मानतात. त्यामुळे विश्वाच्या स्पष्टीकरणार्थ आचार्यांनी प्रतिपादिलेला मायावाद किंवा विवर्तवाद हाच एकमेव पर्याय असल्याचे ते सांगतात- ''अद्वैत मान्य असेल तर सृष्टीचा प्रत्यय येतो त्याची संगति लावण्यासाठी विवर्तवाद किंवा मायावाद हा एकच उपाय उरतो. म्हणून प्रज्ञाप्रभेचे भास्कर असलेल्या श्रीमत् शंकराचार्यांनी श्रेष्ठ साधकांच्या प्रगतीसाठी मायावादाची उत्कृष्ट मांडणी करून अद्वैत तत्त्वज्ञान- बुद्धीच्या कक्षेत येऊ शकेल असे प्रतिपादन केले आहे. या कार्यासाठी आचार्यांचे उपकार मानून त्यांचे चरणी कृतज्ञच राहिले पाहिजे.'' (पृ.१४१) स्वामींनी आचार्यांचा केवळ उल्लेखच केला आहे असे नव्हे, तर त्यांच्या मायावादाचे समर्थनही केले आहे. 'सर्वकाही आत्म्यातूनच उत्पन्न होते' हे सांगणाऱ्या मंत्र (२-४-१०) वरील भाष्यात त्यांनी जो मायावादवरील आक्षेपांचा समाचार घेतला आहे (पृठ १५७-१५८) तो मुळातच वाचायला हवा. 'मायावादामुळे भारतवर्ष पराभूत झाला' हे काही लोकांचे मत पूर्णत: 'अनैतिहासिक' आणि चुकीचे आहे असे ते सांगतात. 'मायावाद म्हणजे शून्यवाद नव्हे. अहिंसेचा अतिरेक मायावादातून जन्माला आला नाही किंवा- अनधिकार वैराग्याचा वा संन्यासाचा पुरस्कारही मायावादाने केला नाही.'' जनतेमध्ये अहिंसा आणि संन्यास यांच्या विकृत-अनधिकार-स्वरूपाचा प्रसार राजाश्रित बौद्ध धर्माच्या माध्यमातून झाल्याने पुढे भारताला पराभव आणि दास्याला सामोरे जावे लागले. विद्यारण्य स्वामी, रामदास स्वामी हे दोघेही अद्वैती-मायावादी होते. पण हा मायावाद विजयनगरच्या साम्राज्य स्थापनेच्या किंवा शिवरायांच्या स्वराज्यस्थापनेच्या आड आला नाही, उलट त्यासाठी या महान विभूतींचे साहाय्यच झाले. तात्पर्य- ''मायावादावर तोंडसुख घेण्यासाठी काहीतरी तर्कदुष्ट अनैतिहासिक असे आरोप करण्यात काही अर्थ नाही.'' (पृ.१५८). कर्मयोगाचे प्रभावशाली पुरस्कर्ते असलेल्या लोकमान्य टिळकांनाही मायावादासहित अद्वैत मान्य होते. माझ्या दृष्टीने तर शंकराचार्यांसारखा श्रेष्ठ कर्मयोगी शोधूनही सापडणार नाही. सनातन

धर्माच्या अभ्युत्थानासाठी त्यांनी केलेले देशव्यापी कार्य केवळ अद्वितीय आहे.

या संदर्भात स्वामींनी चिद्विलासवाद, स्फूर्तिवाद यांचाही उल्लेख केला आहे. अद्वैत स्वीकारून मायावाद नाकारणाऱ्या काही अभ्यासकांनी या वादांचा अविकृत परिणामवादासह पुरस्कार केला आहे. त्यांना "माया शब्द सोसत नाही. रज्जु-सर्पाचा दृष्टांत त्यांना मानवत नाही." असे ते म्हणतात. त्यांच्या मते या तात्त्विक वादांचे प्रतिपादन निखळ अद्वैताला सोडून, ओढाताण करून, केले गेले आहे. पृष्ठ ४३ वरील त्यांचे या विषयाचे विवेचन महत्त्वाचे आहे. त्यांचे सारभूत विधान आहे- "रज्जु-सर्प आणि सुवर्णालंकार ही मायावादी आणि चिद्विलासवादी उदाहरणे मानणे आणि त्या दोन वेगळ्या विचारधारा आहेत असे म्हणणे योग्य नाही. वस्तुत: हे दोन्ही वाद अद्वैताच्या स्पष्टीकरणासाठी अवस्थाभेदाने स्वीकारले आहेत आणि खोल विचाराने दोन्ही उदाहरणे एकाच अर्थाची आहेत." (पृ.४३) 'अन्वय' आणि 'व्यतिरेक' या एकाच अद्वैताच्या मांडणीच्या दोन बाजू आहेत. छांदोग्य उपनिषदातील 'सर्वं खल्विदं ब्रह्म।' हा अन्वयी सिद्धांत आहे, तर बृहदारण्यकातील 'नेह नानास्ति किंचन।' हा व्यतिरेकी सिद्धान्त आहे. दोन्ही मिळून अद्वैताची मांडणी पूर्ण होते. सुवर्णालंकार हा अन्वयाचा दृष्टान्त आहे तर रज्जु-सर्प हा व्यतिरेकाचा. आपण सर्वजण नानात्वाने व्यापिलेले जगत 'सत्य' मानतो, म्हणून केवळ ब्रह्मच सत्य-'सत्यस्य सत्यं'- आहे या परमार्थसत्याचा बोध करून देण्यासाठी - जग हे परमार्थत: मिथ्या आहे- 'नेह नानास्ति'- हे सांगावे लागते. हा व्यतिरेक. मुख्य भावात्मक सिद्धान्त 'सर्वं खल्विदं ब्रह्म' हाच आहे. हा अन्वय. थोडक्यात 'मायावाद' हा व्यतिरेकी तर 'चिद्विलासवाद' हा अन्वयी सिद्धान्त असून दोन्ही बाजू मिळून पूर्णाद्वैत सिद्ध होते. हा विषय काहीशा विस्ताराने मांडण्याचे कारण चिद्विलासवादाची चर्चा मुख्यत: ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानाच्या संदर्भात होत असते. वरील विवेचन हे ज्ञानेश्वरांच्या तात्त्विक भूमिकेचे यथार्थ आकलन होण्यासाठी उपयोगी पडेल असे मी मानतो. आत्मा (ब्रह्मस्वरूप) हा सच्चिदानंद स्वरूप आणि एकमेवाद्वितीय आहे. या सिद्धान्ताचेच प्रतिपादन उपनिषदात केले असल्याचे स्वामी वरदानन्द हे आपल्या भाष्यातून स्पष्ट करतात. दृश्य विश्व हे जरी विविधतेने नटलेले भासत असले तरी ते अविद्येचाच विस्तार आहे. त्यामुळे जागृती ही सुद्धा स्वप्नवत मिथ्याच आहे. मंत्र (४-३-२०) वरील विवेचनात स्वामी सांगतात की, 'अविद्या शब्द हा वेदप्रतिपादित आहे. आणि भ्रम उत्पन्न करणे हे तिचे कार्य आहे.' (पृ.३०३) स्वत: ज्ञानेश्वरांचीही भूमिका हीच असल्याचे दिसते. अमृतानुभवातील त्यांचे एक वचन असे की, **'म्हणोनि दृश्य तें वावो । देखिलें जरी।।'** (७-२२०). स्वामीही स्वत: अद्वैताचे व भक्तीचे पुरस्कर्ते असल्याने ज्ञानेश्वरांप्रमाणेच अद्वैतीज्ञानभक्तीचे प्रतिपादक आहेत असे दिसून येते.

५) बृहदारण्यक उपनिषदात अनेक तात्त्विक विषयांची चर्चा आहे. जीव, जगत आणि सत्‌तत्त्व हे तर भारतीय तत्त्वज्ञानाचे खास अभ्यास व चर्चा विषय आहेतच. त्या बरोबरच 'परलोक', 'देवयान-पितृयान मार्ग', 'पंचाग्नी साधन', 'पुनर्जन्म', 'मृत्यूत्तर जीवन', 'मोक्षसाधन' इत्यादी विषयांची चर्चाही त्यात आढळते. हे विषय बऱ्याच प्रमाणात वैदिक धर्म जीवनाशीही संबंधित असल्याने महत्त्वाचे आहेत. स्वामींनी त्यांचे स्पष्टीकरण परंपरेचा विज्ञानाशी मेळ घालून केले आहे. अद्वैत-दर्शनातील महत्त्वाच्या संकल्पनाही त्यांनी विशद केल्या आहेत. उदाहरणार्थ 'अद्वैता'चा अंतरंग आशय स्पष्ट करताना ते सांगतात- "अद्वैत जेव्हा एखाद्या वस्तूला मिथ्या म्हणते तेव्हा ती परमार्थत: सत्य नसते एवढेच त्या सिद्धान्ताला सांगायचे असते. एखाद्या गोष्टीचे व्यावहारिक अस्तित्व अद्वैताने नाकारलेले नाही." (पृ.४२५) तसेच त्यांनी घेतलेला निर्द्वंद्ववादी टीकाकारांचा परामर्श (पृ. ३१३) महत्त्वाचा आहे. उपनिषदाने 'अद्वैत' हाच शब्द स्वीकारलेला आहे. 'अद्वैता'प्रमाणेच 'आनन्दा'चे विवेचनही विस्तृत व मर्मग्राही आहे. त्यात स्वामींनी बृहदारण्यकातील आनन्दमीमांसेची तैत्तिरीय उपनिषदाच्या ब्रह्मानंदवल्लीतील प्रसिद्ध आनन्द मीमांसेशी केलेली तुलना विशेष महत्त्वाची आहे. (पृ.३१४ ते ३१७). असे अनेक महत्त्वाचे विषय मूळ उपनिषदातील मंत्रांच्या अर्थ विवरणात- 'कौमुदीत'- स्वामींनी चर्चिले आहेत. मात्र त्यांची भाष्यभूमिका ही मी पूर्वी म्हटल्याप्रमाणे, साधकांना मार्गदर्शन करण्याची असल्याने, उपनिषदातील तत्त्वांचा साधनेसाठी कसा उपयोग करावा, किंवा साधनेसाठी त्यापासून काय बोध घ्यावा हे विशद करण्यावर स्वामींचा भर आहे. हे मोक्ष-मार्ग-दर्शन सर्व ग्रंथभर विखुरले आहे. अध्याय ४, ब्राह्मण ४ मध्ये त्याची चर्चा विशेषत्वे केली असल्याचे दिसते. तसेच अध्याय ५ ब्राह्मण २ मधील प्रजापतीने आपले पुत्र देव, मानव, असुर यांना केलेल्या 'द' च्या उपदेशाची कथा उद्‌बोधक आहे. देवांना दमनाचा, मानवाला दानाचा आणि असुरांना दयेचा हा उपदेश मानवांमध्येच आढळणाऱ्या या तीन वृत्तींच्या लोकांसाठी आहे असे आचार्यच सांगतात. यावरील 'कौमुदी' भाष्य साधकांना मार्गदर्शक आहे, हे सांगण्याची आवश्यकता नाही. तीच गोष्ट (१-४-१६,१७) यावरील विवेचनाची. अशा विवेचनातून स्वामी हे शंकराचार्यांच्या विचारांचा संदर्भ देतात, त्यांचे गर्भित अर्थ विशद करतात आणि पूर्णपणे समर्थनही करतात; हे त्यांच्या भाष्याचे आणखी एक वैशिष्ट्य!

जगाच्या कल्याणाचा, मनुष्याच्या उद्धाराचा मार्ग उपनिषदांनी पूर्वीच सांगून ठेवला आहे, अर्थात तो प्राचीनच आहे. आणि तो 'नान्य: पंथा विद्यते- अयनाय' इतक्या आत्मविश्वासाने सांगितला आहे. स्वामी म्हणतात, (पृ.३३३) त्याप्रमाणे 'मी नव्याने तुमच्या उद्धाराची खरी दिशा दाखवित आहे असे अहंकाराने कोणी सांगू नये. उलट, 'नाही श्रुतिपरौती माउली जगां।' हे ज्ञानेशवचन स्मरून, आणि 'वेदमार्गे मुनि गेले। त्याचि मार्गे चालिलो।' या त्यांच्याच आत्मकथनानुसार आपणही संतश्रेष्ठाला अनुसरून उपनिषत्प्रणीत आत्मकल्याणाचा मार्ग चोखाळावा आणि मानवजन्म सार्थकी लावावा हेच इष्ट आहे. तो मार्ग समजून घेण्यासाठी स्वामींची 'कौमुदी' म्हणजे त्यांचे 'वरदान'च होय! ।इति शम्।

**प्रा. डॉ. शंकर रामचंद्र तळघट्टी**
'चैतन्य', प्लॉट २, गणंजय सोसायटी, कोथरूड,
पुणे ४११०३८. फोन : २५३८०००२

•••



# समन्वित साधनेचे अद्भुत दर्शन (खंड ५)

**श्री. विश्वास घोडस्कर (गुरुजी)**

न्यायशास्त्र व वेदांतशास्त्र अध्ययन, दुर्गा पाठशाळा, नांदेड येथे २५ वर्षे अध्यापन
इंदिरा सेवा समिती, पुणे यांचा अनंतश्री पुरस्कार प्राप्त.

प.पू. स्वामी वरदानंद भारतींचे (पूर्वाश्रमीचे प्रा. अनंतराव आठवले ज्यांचा उल्लेख लेखात यापुढे पू. अप्पा असा केला जाईल) पूर्ण जीवन साधनेतूनच विकसित झालेले दिसून येईल. पू. दासगणू महाराजांची परंपराच साधनेचे अनोखे रूपडे लेऊन आली आहे. पू. अप्पांची स्तोत्रे, प्रार्थना, कीर्तने, लेख, पुस्तके यातून साधनेचा प्रवाह झुळझुळताना दिसतो. साधनामार्गाचे अप्रतिम उदाहरण म्हणून उपनिषदर्थ कौमुदीचा पाचवा खंड आहे असे समजण्यास हरकत नाही. समन्वयातून विकसित झालेली साधना बद्धापासून मुक्तापर्यंत सर्वांना आनंद देणारी ठरते. याच समन्वित-साधनेचा धागा त्यांच्या लिखाणातूनही दृष्टीस पडतो. उपनिषदर्थकौमुदीचा पाचवा खंड त्याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणून गणले जाईल. उप+निष+सद् या धातूपासून तयार झालेला 'उपनिषद्' शब्द 'जवळ बसणे' या अर्थाचा असला तरी गुरूजवळ बसून ग्रहण केलेला 'ज्ञानाचा' पण तो शब्द वाचक झाला. ''सदेरूपनिपूर्वस्य क्विपि चोपनिषद् भवेत् । मन्दीकरणभावाच्च गर्भादेः शातनात् तथा'' (उपदेशसाहस्री) श्रीशंकराचार्य 'गर्भवासाचा नाश करणारा' या अर्थाने सुद्धा या धातूचा प्रयोग करतात. 'अनेकार्था धातवः (धातू अनेक अर्थाचे असतात) या प्राचीन म्हणीनुसार हे पण योग्यच आहे. अभ्यासकांच्या मतानुसार २५६ पर्यंत उपनिषदांची संख्या सांगता येते. ''ईश-केन-कठ-प्रश्न-मुंड-मांडुक्य-तित्तिरिः। ऐतरेयं च छांदोग्यं बृहदारण्यमेवच।।' ही दहा व श्वेताश्वर आणि महानारायणीय ही दोन अशा १२ उपनिषदांची अवतरणे श्रीशंकराचार्यकृत भाष्यात आढळून येतात. उपनिषदे प्रामुख्याने वेदांतील ब्राह्मण ग्रंथाचा भाग म्हणून येत असली तरी ईशउपनिषदे शुक्ल यजुर्वेद संहितेत गणली जातात. वेदांतील अैंशी टक्के कर्मपर, सोळा टक्के भाग उपासनापर, चार टक्के भाग ज्ञानपर आहे. संख्येच्या दृष्टीने ज्ञानपर भाग कमी असला तरी कर्माची समाप्ती ज्ञानातच होत असल्याने ''सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते।।'' (श्रीगीता) एवढेच कशाला ज्ञानप्राप्तीसाठी कर्माचा उपयोग होत असल्याने वैदिक संस्कृतीच्या दृष्टीने ज्ञानपर भागाला श्रेष्ठत्व प्राप्त झाले आहे. प्राचीनत्व, प्रामाण्य, आशयघनता विषय-मांडणी आदी कसोटींना उपरोल्लिखित ईशादिउपनिषदे उतरत असल्याने त्यांच्यावर भाष्यग्रंथ दिसून येतात. उपनिषदांची भाषांतरे जगातील जवळपास प्रमुख अशा सर्व भाषातून झालेली आहेत. मराठीतसुद्धा भिडे शास्त्रीकृत 'उपनिषद्रलाप्रकाशा'पासून श्रीजेरे स्वामीकृत 'दशोपनिषद्भाष्य-चंद्रिके'पर्यंत ग्रंथ प्रसिद्ध आहेत. महानारायणीयोपनिषदावर मात्र पू.अप्पाकृत मराठीतील भाष्य पहिलेच असावे. ईशादि दशोपनिषदे ब्रह्माच्या निर्गुण निराकार स्वरूपाचे प्रतिपादन करतात तर श्वेताश्वतर व महानारायणीय ही दोन उपनिषदे ब्रह्माच्या श्रीशिव आणि श्रीविष्णू या सगुण रूपाचे वर्णन करतात.

**''यातेरुद्र शिवातनूरघोरा पापकाशिनी ।**
**तयानस्तनुवाशंतमया गिरिशं ताभिचाकशीहि''**।। (श्रीश्वेताश्वतर)
**''नारायणाय विद्महे वासुदेवाय धीमहि ।**
**तन्नो विष्णुः प्रचोदयात्**।।'' (श्रीमहानारायणीय)

या श्लोकांवरून श्वेताश्वतर व महानारायणीय उपनिषदांचे प्रतिपाद्य अनुक्रमे श्रीशिव व श्रीविष्णू असल्याचे लक्षात येते. ब्रह्माच्या निर्गुण निराकार व सगुण साकार अशा रूपांचा व श्रीशिव आणि श्रीविष्णू अशा देवतांचा समन्वय करण्यासाठीच पू. अप्पांनी ईशादि दहा व या दोन उपनिषदांची निवड केली असावी. श्वेताश्वतर व महानारायणीय ही दोन उपनिषदे कृष्ण-यजुर्वेदाशी संबंधित आहेत. श्वेताश्वतर शैव सांप्रदायाशी निगडीत आहे तर महानारायण वैष्णव सांप्रदायाशी संलग्न आहे. त्या त्या सांप्रदायाशी निगडीत असूनही या उपनिषदात अन्यही देवतांचा उल्लेख आदरपूर्वक केलेला आढळतो.

**''यन्मे मनस्तावाचा कर्मणा वा दुष्कृतं कृतम् ।**
**तन्न इंद्रोवरुणो बृहस्पतिः सविताच पुनंतु पुनः पुनः ।।''**
(श्रीमहानारायणीय)

**''सहस्रशीर्षापुरुषः सहस्राक्षः सहस्रपात् ।**
**सभूमिं विश्वतो वृत्वात्यतिष्ठद्दशांगुलम्** ।। (श्रीश्वेताश्वतर)

या उदाहरणांवरून या उपनिषदांची दृष्टी समन्वयाचीच दिसते. सन्माननीय अपवाद सोडले तर पाश्चात्य तत्त्वज्ञ व त्यांच्या ज्ञानाच्या प्रकाशाने डोळे दिपलेले पौर्वात्य तत्त्वज्ञांची दृष्टी उपनिषदांसंबंधात कालनिर्णय, पौर्वापर्य, एक कर्तृत्व की अनेक कर्तृत्व अशा विषयांवर चिंतन करताना दिसते. पू. अप्पा मात्र साधनेची कास सोडताना दिसत नाहीत. साधनामार्गाच्या प्रकटीकरणासाठी पू.अप्पा कल्पिताचाही आश्रय घेताना दिसतात. श्वेताश्वतर उपनिषदातील श्वेतऋषींचे चरित्र

म्हणजे पू. अप्पांचा साधना प्रवास असावा असे त्यांचा प्रत्यक्ष किंवा साहित्यिक सहवास लाभल्यांच्या लक्षात येईल.

**''द्विजकुमार एक कोणी । श्वेत नामे सुलक्षणी ।**
**प्रतिपाळिले वात्सल्यानी । ज्यास एका महात्म्याने ।।**
**सावध राहुनी अत्यंत । अवगुणावरी करी मात ।**
**ओलांडिली त्याने त्वरित । सामान्यांची पातळी ती ।**
**ग्रंथ नाना धांडोळावे । सार त्यातील निवडावे ।**
**सत्य शोधवी निवारावे । अडथळे सारे शंकांचे ।।**
**स्थिरावली श्रद्धाभक्ती । उत्कटता ये भावाप्रति ।**
**जनि प्रकाशिली मति । अहंता ती कोमेजली ।।''**

साधना मार्गाचा अवघड प्रवास संपल्यावर श्रीवरदनारायणाचा कृपाप्रसाद कसा प्राप्त झाला व त्यावेळी स्थिती कशी होती हे पू. अप्पांच्याच ''धावली हो पावली हो ही विठाई माऊली'' या पद्यातून आपल्यासारख्या सामान्यांच्या थोडेबहुत लक्षात येईलच. पू. अप्पांनी ही स्थिती उपनिषदर्थकौमुदीच्या पाचव्या खंडात (ज्याचा उल्लेख यापुढे लेखात उ.कौ.५ असा येत जाईल.) सुंदर पद्धतीने मांडिली आहे.

**''एके दिनी अकस्मात् । क्षेत्री पवित्र रम्य शांत ।**
**भाव व्याकुल होता चित्त । प्रसाद लाभे ईशाचा ।।**
**सरत आली होती निशा । उजळल्या ना अजुनी दिशा ।**
**निस्तेज ऐशी आकाशी । उदया येई चंद्रकला ।।**
**खळखळते गंगाजल । त्याच्याविणे नीरव सकल ।**
**प्रसन्न अशी असता वेळ । भाग्य विकसले श्वेताचे ।।**
**परब्रह्म निर्विकार । अलिप्त निर्गुण निराकार ।**
**सर्वव्यापक सर्वाधार । व्यक्त झाले श्वेतापुढे ।।**
**पंदात्याने घातली मिठी । तदा सस्मित धुर्जरी ।**
**वरद करा फिरवी पाठी । भक्ताचिया वात्सल्ये ।।''**

(उ.कौ.५, पा. क्र. ३ व ४)

**''ते ध्यान योगानुगता अपश्यन्''** (श्रीश्वेताश्वतर)

या मंत्रावर भाष्य करताना पू. अप्पांनी साधनामार्ग व त्याने मिळालेला ईशप्रसाद पुढील ओव्यात सुंदररीतीने मांडला आहे.

**''नामस्मरण चिंतन । ग्रंथादींचे अवलोकन ।**
**संयमनिरुदाचरण । आयुष्याचा भाग होतो ।।**
**कर्मकांड अगदी थोडे । व्रतनियमांचे ना वावडे ।**
**इष्टमानिती जे जे घडे । राहोनिया समाधानी ।।**
**सदा प्रपंची मानिती दृष्टी । करिती व्यवसायसमाप्ती ।**
**अयाचिता धरिती वृत्ति । तेणे बुद्धि स्थिरावली ।।**
**हळूहळू ध्यानाभ्यासी । उत्साह वाढतो मानसी ।**
**राहून पवित्र स्थलाधी । कधी ध्याती ईश्वराते ।।**
**अशी थोरांची साधना । सद्‌गुरूकृपे रचिली मना ।**
**दीर्घकाल अनुशासना । पाळिले मी या वृत्तीच्या ।।**
**तेणे उन्नति विकास । चित्ता लाभे सावकाश ।**
**सहजता ये ध्यानादीस । हृदी नांदे प्रसन्नता ।।**
**उत्कट भावे उमलोनि । निमग्न एकदा असता ध्यानी ।**
**भगवत्कृपा वर्षावानी । अंतर्बाह्य भिजलोनी ।**
**अंग अंग शांत झाले । चैतन्याच्या स्फुरणे भले ।**
**प्रेमावेशाने चुंबिले । मृदुसुखदा पद पद्मा ।**
**किती वेळ त्या स्थितीत । लीन होतो आनंदात ।**
**भान आले मजप्रत । वरद कराच्या वात्सल्ये।।**

(उ.कौ.५ पा. क्र. १५ व १६)

**''त्रिरुन्नतं स्थाप्य समं शरीरं ०''१**
**''प्राणान प्रपीदयेह संयुक्तचेष्ट''२**
**''समे शुचौशर्करावन्हिवालुका ०''३**
**''नीहार धूमार्कनिलानिलानां ०''४**
**''पृथिव्यप्तजो निलखेसुसमुत्थिते०''५**
**''लघुत्वगोराग्य मलोलुपत्वम् ०''६**

(श्वेताश्वतर २/८ ते १३)

या सहा श्लोकांत सांगितलेल्या योगसाधनेविषयी लिहिताना पू.अप्पा योगमार्गाविषयी फारशी रुची दाखविताना दिसत नाही.

**''तदा म्हणाले महर्षी । अरे मी ना योगाभ्यासी ।**
**खरे बघता गृहस्थासी । योगमार्गी जाता न ये ।।**
**शरीरस्वास्थ्याकारण । आसने तेवी दीर्घ श्वसन ।**
**फारसे काही याच्याहून । केले नाही योगातले ।।**
**जसे वाघसिंहासवे । मल्लयुद्ध करण्या जावे ।**
**स्वरूपतेवी जाणावे । प्राणायामी कुंभकाचे ।।**
**म्हणून मी त्या वाटेला । कधीच नाही गेलेलो ।**
**मग योगाच्या विस्ताराला । करावे मी कसे वदा ।।**
**माझा होता सगळा भर । श्रद्धा भाव भक्तीवर ।**
**ध्यान चिंतन थोडे फार । कधी केले आवर्जुनी ।।''**

(उ.कौ.पा.क्र. ५५)

योगाच्या नावाखाली चाललेल्या बाजाराला आपल्यातील कोणी फसू नये म्हणून पू. अप्पा योगाच्या साधना प्रवासाविषयी लिहिताना म्हणतात,

**''परी ऐकिलेले थोडे । कथितो मी तुम्हा पुढे ।**
**ज्या योगाने कोणी कोडे । सहज तुम्ही फसाल ना ।**
**योगाच्या नावाखाली । आज माजली बंडाळी ।**
**आत्मसंमोहने बळी । गेले खुळे ते ठायी ।।''**

(उ.कौ.पा. क्र.५५)

मूळ उपनिषदात नसलेल्या षट्चक्राविषयी लिहिताना पू. अप्पांचा अभ्यास प्रकट होतोच पण योग हा फक्त त्यांच्या अभ्यासाचा विषय नसून प्रत्यक्ष साधनेचा सुद्धा स्पर्श पुढील लिखाणावरून स्पष्ट होतो.

**''योगी असो वा असो भक्त। दोघे येथे सुखावतात ।**
**दिव्य रमणीय अत्यंत । दर्शने नाना होती इथे ।।**
**मधु मंजुळ अनाहत । नाद येथे श्रवणी येत ।**
**जेणे लय पावतात । ध्येयाठायी सर्व वृत्ति ।।**

**येणे आनंदे करून । अंग अंग ये मोहरून ।**
**जणू वर्षाव व्हावा वरून । पारिजात पुष्पांचा ।।**
**अमृताच्या सरोवरी । परम सुखाच्या उठती लहरी ।**
**साधक जणू त्यांचेवरी । कौतुकाने आंदोलतो ।।**
**मंदमंद वाहे वात । मृदु शीतल सुगंधित ।**
**गोड शिरि शिरी शरीरात । उठे जयाच्या स्पर्शाने ।।**
**कर्मा नुरे अहंभाव । प्रज्ञान सोडिजे जाणीव ।**
**भक्तिभाव अभिनव । माधुर्याचा स्वादलाभे ।।**
**येथोनिया भक्ताप्रति । जायाचेय नसे पुढती ।**
**परी योगीही ना इच्छिती । त्यजाया या रम्य स्थला ।।''**

(उ० कौ.पा.क्र. ६२/६३)

वस्तुत: योगाविषयी पू.अप्पा पुढील इशारा द्यावयास विसरत नाहीत.

**''यमनियमांच्या पालनी । दक्ष नसे जो निजवर्तनी ।**
**त्याची लाभापेक्षा हानी । अधिक होते योगाने ।।**
**तये व्यथा जी उद्‌भवते । सामान्य उपाये ती न जाते ।**
**श्रेष्ठयोगीच तियेते । निजप्रभावे नाशू शके ।।'** (उ०कौ.पा.क्र. ५७)

शरीर-मन-बुद्धीचे आरोग्य उत्कृष्टरीतीने साधावयास योगमार्गाचे अतिशय साह्य होते हे मात्र पू. अप्पा पुढीलप्रमाणे मान्य करितात.

**''प्राणायाम ऐशारीती । सहजतेची होता प्राप्ति ।**
**पुढे योग्य तैशी प्रगति । योगाभ्यासी होऊ शके ।।**
**प्राणायाम हेचसूत्र योगमार्गात सर्वत्र । देहमनासी पवित्र**
**तेवी स्वस्थ ठेवीत हा ।। तेणे उत्कृष्ट लागती व्हाया ।**
**शरीराच्या सर्व क्रिया । सामर्थ्य येई**
**सर्वेन्द्रिया । आश्चर्य जेणे लोकांसी ।।**
**कामक्रोधादि विकार । तेणे सहज राहती दूर ।**
**मुळे तुटुनि गेल्यावर । यावी केवी पाने फुले ।।''**

(उ०कौ.पा.क्र. ५९)

अशा तऱ्हेने पू. अप्पा योगमार्गाचे ज्ञान, सामर्थ्य, प्रतिबंधक, विस्तार, धोके इत्यादी सर्व बाजू मातृवत्सलतेने या पाचव्या खंडात साधकांना समजावून देतात. उपनिषदर्थकौमुदीच्या ५ व्या खंडात पू. अप्पांनी मायास्वरूपसुद्धा उत्कृष्ट रीतीने समजावून दिले आहे. अद्वैत मान्य केले म्हणजेच ब्रह्माव्यतिरिक्त कोणालाही पारमार्थिक सत्यत्व अमान्य केले की व्यावहारिक जगात अनुभवास येणाऱ्या वस्तूंची उपपत्ति मायावादाचा स्वीकार केल्याशिवाय लागत नाही.

**''आत्ममायामृतेराजन् परस्यानुभवात्मन: ।**
**न घटेतार्थसंबंध: स्वप्नद्रष्टरिवात्मन: ।।''**

(''हे परीक्षिति स्वप्न बघणाऱ्यांच्या अनुभवाची उपपत्ति ज्याप्रमाणे मायेशिवाय लागत नाही त्याप्रमाणे जीवात्म्याच्या संसाराची उपपत्ति मायेशिवाय लागत नाही'' श्रीभागवत २/९/११)

अजातवाद असो, विवर्तवाद असो, परिणामवाद असो (जगातील विविधता, जगाची परिणामिता, जगाची आरंभ विनाशिता मायेशिवाय उपपन्न होत नाही. पू. अप्पा पुढील शब्दात साधकांना समजावतात.

**''एकातुनी सारे झाले । निर्विकार आकारा आले ।**
**तरी अन्यंग राहिलो । एकमेवाद्वितीयते।।**
**लावण्याची संगतिका । कथिली माया प्रकृति ।**
**दृष्टान्त येती नानारीती । अज्ञाताचा बोध व्हाया ।।''**

(उ०कौ० पा.क्र. ११६)

मायेची आवश्यकता, मायेची अनिवार्यता समजाविण्यासाठी शास्त्रज्ञांनी अनेक दृष्टांत दिले आहेत. होते मात्र असे की दृष्टांतभेद नि संप्रदायभेद निर्माण होतात व परिभाषेच्या क्लिष्टतेमुळे सिद्धांताकडे दुर्लक्ष होण्याची शक्यता वाढते, हे भेद पू. अप्पांना मान्य नाहीत. पुढील शब्दात ते आपल्याला समजावून सांगतात.

**''उपमा दृष्टांत रूपके । सत्य न कथिती नेमके ।**
**दिग्दर्शन ते होऊ शके । केवळ त्यांच्या योगाने ।**
**त्याचे करिता विश्लेषण । कोणी न कोणा समान ।**
**संप्रदाय होती भिन्न । मात्र त्यांच्या आग्रहाने ।।''**

(उ०कौ. पा.क्र. ११६)

पू. अप्पा पुढील ओवीत चार वाद चार उदाहरणावरून समजाऊन देतात.

**''ईश हाच जगत् होई । जसे दुधाचे होते दही ।**
**सोने असे दागिन्याठायी । वृक्ष वाढे बीजांतुनी ।।''**

''ईश हाच जगत् होई'' हा विवर्तवाद आहे.

''जसे दुधाचे होते दही'' हा सांख्यांचा परिणामवाद आहे.

''सोने असे दागिन्याठायी'' मायावाद आहे. व ''वृक्ष वाढे बीजातूनी'' हा नैयायिकांचा कारणवाद आहे. या उदाहरणांवरून पू.अप्पांची सूक्ष्मता, सरलता व नेमस्तता लक्षात येते. अचिंत्य व दुर्गम मायेतून तरण्याचा उपायसुद्धा शास्त्रकारांनी सांगितला आहे.

**''येथ लीला एकचि तरले । जे सर्व भावे मज भजिले ।**
**तया ऐलिच थडी सरले । मायाजाळ।।''** (श्रीज्ञानेश्वरी)

हाच भाव श्वेताश्वतर उपनिषदात पुढील मंत्रात ऋषी प्रकट करतात.

**''यस्यदेवे परा भक्ति: यथादेवे तथा गुरौ ।**
**तस्यैते कथिता ह्यर्था: प्रकाशन्ते महात्मन: ।।**

पू. अप्पा ऋषींचा हाच भाव प्रशस्त करून सांगतात,

**''या प्रेमात खरोखरी । देह मन बुद्धी सारी ।**
**राहती फार उंचावरी । परस्परांना साजेशी ।।**
**बुद्धीसारखे वागे मन । हेहि देहमनाचे घेई वळण ।**
**अहंता वासना टाकून । निर्मळ झाली बुद्धी जी ।।**
**श्रद्धे ठायी उत्कटता । भावामध्ये उदात्तता ।**
**नम्र झाला असे पुरता । ईशापायी अहंभाव ।।''**

(उ०कौ० पा.क्र. १७६)

अहंकाराने परमेश्वरापुढे नम्र होणे म्हणजे ''आम्ही दैवाचे दैवाचे । दास पंढरीरायाचे'' या श्रीतुकोबारायांच्या शब्दाचे स्पष्टीकरणच होय.

**''तस्मात् सर्व प्रयतेन श्रीगुरुतोषयेन्नग''** (श्रीदेवीभागवत)

या वचनाला अनुसरून देव व गुरू यात भेद तर करूच नये तर उलट देवापेक्षा श्रीगुरूंचा सन्मान अधिक करावा असे शास्त्र आहे. देव

अमूर्त आहे गुरू मूर्त आहेत. श्रीगुरू शिष्याला प्रत्यक्षबोध करतात असे सांगून पू.अप्पा श्रीगुरूशिष्यसंबंधातील एक गुह्य गोष्ट प्रकट करतात.

**''परी याचि प्रत्यक्षतेनी । ईश्वराच्या भक्तीहूनी ।**
**अवघड बसते होऊनी । भक्ती करणे सद्‌गुरूची ।।**
**श्रद्धा किती धरी जीव । किती सुरल अहंभाव ।**
**किती आहे हृदयी ठाव । साक्षेपा वा प्रयत्नाते ।।**
**याची लागते कसोटी । पदोपदी येथ मोठी ।**
**तेणे होऊन फार कष्टी । येत दुरावा वृत्तीते ।।''**

(उ०कौ० पा.क. १७६)

श्रीसमर्थ व कल्याणस्वामी यांच्यातील गळू म्हणून आंबा बांधल्याच्या गोष्टीवरून याची प्रचिती आपल्याला येईल. इथेही पू. अप्पांची साधनेची दृष्टी सुटत नाही. श्रीगंगेच्या उदाहरणावरूनही भक्ती प्राप्त करणे, टिकवणे, वाढवणे व प्रत्यक्ष उपयोगात आणणे यासाठी साधनेची आवश्यकता किती आहे हे वाचकांनी मूळ ग्रंथातून पाहणे हेच इष्ट. मायेची शक्ती अशाप्रकारे मानल्यावर ईश्वराची आवश्यकता काय? अशी शंका मात्र येता कामा नये. याचे कारण असे की त्या मायेला शास्त्रकारांनी स्वतंत्र अस्तित्व मानले नाही.

**''न तस्य कश्चित् पतिरस्ति लोके न चेशिता नैव च तस्य लिंगं ।**
**सकारणं करणाधिपाधिपोन चास्य कश्चिज्जनितान चाधिव:।।''**

(उ०कौ. पा. क्र. १५७)

या श्लोकावर भाष्य करताना पू.अप्पा हाच विषय चांगल्या पद्धतीने स्पष्ट करतात.

**''अविद्या म्हणती मायेला । स्वतंत्र सत्ता नाही तिला ।**
**चंद्र आणि चंद्रिकेला । वेगळे का करिताये ।।**
**चंदनाठायी सुगंध । गुळाठायी मधुरस्वाद ।**
**भेरीठायी गंभीर नाद । रूप तसे या मायेचे ।।**
**म्हणोनिया ईश्वराप्रति । म्हणावे ना नाही महति ।**
**तोच सर्वांचाही पति । पति त्याचा कुणी नाही ।।''**

(उ०कौ० पा.क्र. १५७)

शास्त्रकारांनी प्रत्येक कार्याची दोन कारणे मानली आहेत.

१) उपादान कारण (न्यायशास्त्रात यालाच समवायिकारण असे म्हणतात)

२) निमित्त कारण. घट हे कार्य मानले तर मृत्तिका हे उपादान कारण व कुंभार निमित्तकारण. याचाच अर्थ असा की, कार्य ज्याच्यापासून बनते ते उपादान कारण व ते कार्य जो बनवितो ते निमित्तकारण. न्यायशास्त्रकार जगत् हे कार्य, परमाणू हे उपादान व ईश्वर हा निमित्त मानतात. वेदांनी मात्र जगद्रूप कार्याचे उपादान व निमित्त असे दोन्ही कारण एक ईश्वरच आहे असे मानले आहे.

**''यस्तंतुनाभ इव तन्तुभि: प्रधानजै: स्वभावत: ।**
**देव एक: स्वमावृणोत सनोऽदधात् ब्रह्माप्ययुम् ।।'**

(उ०कौ० प्रा. क्र. १५७)

या श्लोकावरील भाष्यात पू. अप्पा हाच सिद्धांत त्यांच्या चिरपरिचित सोप्या पण अर्थगंभीर शैलीत प्रकट करतात.

**''एके कोळी नामे किडा । ओळखता तो तुम्ही कुडा ।**
**उद्योग त्याचा केवढा । कसा चाले पाहिले का? ।।**
**आपुल्याच पोटातून । तंतु करूनि निर्माण ।**
**त्यानेच टाकितो विणून । जाळे पहा भोवताली ।।**
**तैशीच सर्व विश्वाची । ईश्वर रचना करी साची ।**
**साधने अवघी तयाची । स्वाधीन असती ईशाच्या ।।**
**म्हणून सर्वांचे कारण । म्हटले ईशालागून ।**
**तोच निमित्त उपादान । सर्वकाही तोच एक ।।''**

(उ०कौ०पा.क्र. १५८)

ईश्वराचे स्वरूप अशाप्रकारे प्रकट केल्यानंतर पू. अप्पा साधकांना ईश्वराप्रत जाण्यासाठी शाश्वत सुखात स्थिरावलेल्या सिद्धांची अवस्था पुढील शब्दात सांगून त्यांना साधनेसाठी उद्युक्त करतात.

**''याचे घेती जे दर्शन । तेचि खरे भाग्यवान ।**
**आचरोनि शुद्ध साधन । पूजन-भजन-ध्यानाचे ।।**
**करीत असता उपासना । चंचलपणा ये ना मना ।**
**किंवा प्रतीक्षा करिताना । कंटाळिती ना केव्हाही ।।**
**सोत्कंठ आणि उल्हसित। सदैव त्यांचे राही चित्त ।**
**उबगतीना कष्टाप्रत । सातत्य सुटेना यत्नाचे ।**
**सदाचार निष्ठा भक्ति । उज्वल तेवी उदारवृत्ति ।**
**इंद्रिये ज्यांची सुखाविती । संयमाच्या संगतीने ।।''**

(उ०कौ० पा.क्र. १६०)

ही साधना करून जे सुख प्राप्त होते त्या सुखाचे वर्णन स्वानुभव सिद्ध अंत:करणाने जेव्हा पू. अप्पा वर्णितात त्यावेळी बद्धाचे मुमुक्षूत, मुमुक्षूचे साधकात व साधकाचे सिद्धात परिवर्तन निश्चितच घडून येईल असा विश्वास वाटतो.

**''येथे सदैव पूर्णिमा । आल्हादासी नसे सीमा ।**
**होत नसे हा रिकामा । कुंभ भरला अमृताचा।।**
**येथे सदाच वसंत । फुले फुलती सुगंधित ।**
**पानझडीचा हेमंत । तोंड येथे दाखवीना ।।**
**परम प्रेमाचे निर्झर । येथे वाहती निरंतर ।**
**पिसारा पसरूनि मोर । उत्साहाचा नाचे इथे ।।**
**येथ शरदाचे ऐश्वर्य । येथ वनश्रीचे सौंदर्य ।**
**अखंड ये स्थळी माधुर्य । सर्व रसांचे सदोदित।।''**

(उ०कै०पा.क्र.१६०)

याच ईशाला काही ठिकाणी ऋत असेपण म्हटले आहे. ऋत व सत्य एकाच परमेश्वराची दोन रूपे आहेत. पू. अप्पा या एकतेतील भेद व भेदातील एकता पुढील शब्दात सांगतात.

**''सत्याची जी अभिन्न शक्ती। कार्योन्मुखी जाहल्याती ।**
**भिन्न भिन्न क्रिया होती । रूप ऋताचे आहे ते ।।**
**ऋत सत्य हे अद्‌भुत । एक परमात्माच होत ।**
**काहीच त्याच्याविरहित । संभवेना लोकत्रयी ।।''**

(उ०कौ० पा. क्र.१८७)

पू. अप्पांनी एके ठिकाणी मानस सत्य म्हणजे ऋत. वाचिक सत्य म्हणजे सत्य अशी व्याख्या विद्वानांनी केल्याचे लिहिले आहे. मी एके ठिकाणी विश्वाचे अपरिवर्तनीय नियम म्हणजे ऋत व अपरिवर्तनीय नियम तसेच राहण्यासाठी जे परिवर्तन त्याला सत्य म्हणतात अशी पण ऋत व सत्याची व्याख्या वाचलेली आहे. श्रीदेवीभागवतातील तृतीय स्कधांत सत्याची व्याख्या पुढीलप्रमाणे दिली आहे.

**''सत्यं न सत्यं खलु यत्र हिंसाऽयान्वितं चानृतमेव सत्यम् ।**
**हितं नराणी भक्ती हयेन तदेव सत्यं न तथान्यथैव।।''**

(श्रीदेवी भागवत ३/११/३६)

मानवी समाजाचे आत्यंतिक हित म्हणजे सत्य ही व्याख्या हिताचे महत्त्व अधोरेखित करते. पू. अप्पांनी सत्याची व ऋताची अजून एक व्याख्या तिथेच दिली आहे.

**''अस्तित्व त्रिकालाबाधित। रूप सत्याचे हे मूर्त ।**
**पालट ज्यात नाही होत । कोठे किंवा कशानेही ।।**
**तेच सर्वांचे आधार । तेथून झालासे विस्तार ।**
**विविधतेचा अपरंपार । विश्व आपण मानितो जे ।।**
**विविधतेची आता या । व्यवस्था लागे ठेवाया ।**
**नियम असती जे ते ठाया । म्हणती त्यासी ऋतज्ञाते ।।''**

(उ०कौ० पा.क्र १८६)

ऋताची व्याप्ती पू. अप्पा पुढील शब्दात व्यक्त करतात.

**''ऋतामुळेच संघर्ष टळती । ऋताने होते उन्नति ।**
**सुखसमाधान शांति । लाभ याचा ऋतास्तवा ।।**
**नाती टिकती ऋतामुळे । विकार संयत ऋतामुळे ।**
**ऋतामुळे उजळले । साधनेचे मार्ग सारे ।।**
**चुंबक-विद्युत् आकर्षण । प्रकाश उष्णता स्पंदन ।**
**गतिध्वनीचे प्रक्षेपण । रूप सारे ऋताचेही ।।''**

(उ०कौ० पा.क्र. १८६-१८७)

ऋताची व्याख्या असो वा ऋताची व्याप्ती असे एक सनातन सत्य व त्या तत्त्वाचे विभिन्न आविष्कार पू. अप्पा आपल्यासमोर विस्तृत पण नेमक्या भाषेत मांडताना दिसतात.

महानारायणोपनिषदात पुढे पण ऋतासंबंधीचा विचार आला आहे. 'तप कशाला म्हणतात हे सांगताना, ''ऋतं तपः सत्यं तपः'' (उ.कौ.पा.क्र. २६०) हा मंत्र आढळतो. ऋताच्या मागील व्याख्या ऋत म्हणजे ब्रह्म हे गृहीत धरून आल्याने या व्याख्या ऋत म्हणजे परमेश्वर कसे हे सांगण्यासाठी आल्या आहेत. या मंत्रावर भाष्य करताना मात्र पू. अप्पांनी ऋताची व्याख्या साधना स्वरूप केल्याचे दिसते. साधनेसंबंधी बोलताना, लिहिताना पू. आप्पा विस्तृत, सारगर्भ व नेमक्या भाषेचा उपयोग करताना दिसतात.

**''आरंभीच ऋता प्रति । तप म्हणुनी सांगे श्रुति ।**
**सदाचार नि सन्नीति । रूप आहे ऋताचे ।।**
**यथायोग्य जे वर्तन । जे हिताचे साधन ।**
**योग्य संकल्प करी मन । वागणे जे नियमाने ।।**
**भान ठेवणे समयाचे । लक्षण हेहि ऋताचे ।**
**जे घडे ते भगवंताचे । इच्छे होते मानावे ।।**
**सृष्टीमध्ये सर्वकाही । नियमाने बद्ध राही ।**
**जाणून हे पुरे हृदयी । वागतो तो ऋताचारी ।।''**

(उ०कौ. पा.क्र. २६१)

या सर्वांचा उपसंहार करताना पू. आप्पा या सर्व साधनेचे ध्येय चित्ताची शुद्धता, भावाची उत्कटता साधून अहंता निरासपूर्वक परब्रह्म साक्षात्कार हेच आहे हे सांगावयास मात्र विसरत नाहीत.

**''या तपांनी उजळते । जीवन चित्त शुद्ध होते ।**
**श्रद्धा भक्ति बळावते । उत्कटता ये भावासी ।।**
**मग साधते सोहं ध्यान । ईश्वरी लीन होते मन ।**
**अहंता सोडी अंतःकरण । साक्षात्कारा ब्रह्म येते ।।''**

(उ०कौ. पा.क्र. २६६)

याच ईशतत्त्वाचे स्वरूप पू. अप्पांनी महानारायणोपनिषदातील सारभाग असलेल्या श्रीनारायणोपनिषदामध्ये प्रकट केले आहे. पू. अप्पा स्वतःच महानारायणोपनिषदाला 'परिपूर्ण उपनिषद्' भक्तिशास्त्राची गंगोत्री, कर्तव्य बोध अशी विशेषणे देतात. सहस्रशीर्षदेवं इथून सुरू झालेले व ब्रह्मभूर्भुवः स्वरोम् इथे समाप्ति असलेले नारायणोपनिषद् महानारायणोपनिषदाच्या हृदयस्थानी आहे असे पू. अप्पा लिहितात. या मंत्रसमूहाला पू.अप्पा भक्तिज्ञानाचे सार असे पण संबोधतात. या मंत्र समूहाविषयी पू. अप्पांना काय वाटते हे आपण त्यांच्याच शब्दात पाहू.

**''नारायणोपनिषदाभीतरी । दिव्यरत्नकौस्तुभापरी ।**
**प्रकरण झळके, खरोखरी । उदात्ततेने आपुल्या हे ।।**
**सुगंधाने कस्तुरीसी । चांदण्याने चंद्रम्यासी ।**
**दागिन्याने सुवर्णासी । वर्णावे हे तसे झाले ।।**
**उदात्त झाली उदात्तता । दिव्यतेस यावी दिव्यता ।**
**प्रवृत्त झाले बोधाकरिता । ब्रह्मज्ञान जणू स्वये ।।**
**उपासनेचे हे सार । असे निष्ठेचा निर्धार ।**
**प्रेम जाहले साकार । पराभक्तीतले इथे ।।**
**मौन येथे मुखर झाले । प्रकाशासी लाभले डोळे ।**
**ध्येय ध्यानामध्ये रमले । उल्हासुनी ये ठायी ।।''**

(उ०कौ. पा. क्र. २९०)

पू. अप्पा प्रथम नारायण शब्दाची व्युत्पत्ती मनुस्मृति, महाभारत आदि ग्रंथांच्या आधारे सांगतात.

**''आपोनाराइति प्रोक्ता आपो वै नरसूनवः ।**
**ता यदस्यायनं प्रोक्तं तेन नारायण स्मृतः।।''** (श्रीमनुस्मृति )
**''आप एव ससर्णादौ तासुबीजम् अवासृजन् ''** (श्रीमनुस्मृति)

श्रीमनुस्मृतितील याच व्याख्येच्या आधारे पू.अप्पा नारायण शब्दाची व्युत्पत्ति सांगून अन्यही व्याख्या पुढीलप्रमाणे देतात.

**''सर्वाआधी आप सृजिले । बीजा त्याच्यात पेरिले ।**
**वैविध्य ज्यातून उगवले । सृष्टीतले नाना परी ।।**
**म्हणून आद्य अपा प्रति । नारा ऐसे शास्त्रे म्हणती ।**
**शयने तेथ हा श्रीपति । करी म्हणून नारायण ।।**

**मानवाचे उपादान म्हणून म्हणती नारायण ।**
**वा नर हृदयात शिरून । आश्रय तेथे घेतसे जो ।।** किंवा
**नदांचे एकमेव ध्येय असेहा पंढरिराव ।**
**हे सारेच असति भाव ।**
**एका नारायणनामी** (उ०कौ. पा.क्र. २९१)

नारायण शब्दाच्या व्याख्या सांगून पू.अप्पा त्या नारायणाचे स्वरूप विस्तृतपणे आपल्या समोर प्रकट करतात.

**''अविनाशी जो शाश्वत । निरंतर असे अस्तित्वात ।**
**कल्याणकारी सर्वाप्रत तेणे शिव बोलती या ।।**
**स्वस्थानातून नाढळे । स्वरूपस्थिति न मावळे ।**
**नारायण हे एक उरले । तत्त्व योग्य जाणावया ।।''**

(उ०कौ० पा.क्र.२९२)

पू. अप्पांनी ईशस्वरूपच केवळ सांगितले नाही तर त्याचे ध्यान कुठे व कसे करावे ते सुद्धा या मंत्रसमूहाच्या आधारे प्रकट केले आहे.

**''या हृदयाच्या अवकाशात। परमेश्वराचा वास सत्य ।**
**सान असुनी आकारात । विश्वात्मासी साठवी हे ।।**
**ईश्वराचे निवासस्थान । म्हणून प्रमाणा उपेक्षून ।**
**थोर देऊन विशेषण । महत् म्हणती हृदयासी ।''**

(उ०कौ० पा.क्र. २९५)

याच मंत्रसमूहात हृदयातील अग्निज्योतीचे वर्णन आले आहे. त्या अग्निज्योतीच्या वर्णनाचे स्पष्टीकरण करताना पू. अप्पांची स्वानुभवसिद्धता प्रकट होते. हे वर्णन मूळातूनच वाचावे. मूळ मंत्रसमूह (२) दिव्य असून पू. अप्पांच्या वर्णनाने त्या दिव्यतेत दृष्टीचे कोंदण प्राप्त झाले आहे. पू. अप्पा (१) अग्नीविषयी काय लिहितात ते मी आपणापुढे मांडण्याचा प्रयत्न करतो. अग्नी जठरात असतो मंत्रात मात्र अग्नी हृदयात आहे असे कसे म्हटले ही शंका घेऊन त्याची उपपत्ती पू.अप्पा त्यांच्या आयुर्वेद अध्ययनाने दूर करण्याचा प्रयत्न करतात.

**''जठराग्नी असे स्थूल । सूक्ष्मपरी हा हृदयातीत ।**
**हाच देत असे बळ । धात्वग्नीसी देहामध्ये ।।**
**यालागी आयुर्वेदात । म्हटले असावे साधकपित्त ।**
**अग्नि आणखी पित्तात । भेद नाही स्वरूपाने ।।''**

(उ०कौ० पा.क्र. २९७)

शेवटी पू. अप्पा सांगतात हे मंत्रसमूह साध्य-साधन-साधक, ज्ञान-भक्ति- वैराग्य यांचे प्रयाग असून ज्यांना ईशाचे स्वरूप सम्यक् जाणावयाचे आहे त्यांनी याचे अध्ययन करावे.

पू. अप्पांनी आत्तापर्यंत वेगवेगळ्या ठिकाणी साधनामार्ग प्रशस्त करून सांगितला. शास्त्रकारांनी साधनेत उतावीळपणा, संशय, खंड इत्यादि दोष सांगितले आहेत. पू. अप्पा वेळोवेळी साधकांना याविषयी सावध करतात.

**''निष्ठा सद्‌भाव जे जे ठायी । देव तेथे प्रगट होई ।**
**संशय नसावा अंशेहि । येथे चित्ती साधकाच्या ।।**
**आपुल्या ठायी उणीवा । म्हणून येना अनुभव ।**
**उपेक्षेचा अंशलव । ईशाठायी असतो ना ।।**
**यास्तव निष्ठा भावाने । सातत्याच्या प्रयत्नाने ।**
**योग्यता आपुली वाढविणे । उत्कटतेने प्रेमाच्या ।।**
**कृपा तेधवा ईश्वराची । अनुभवासी येते साची ।**
**ईश भक्तांच्या धारिष्टाची । परीक्षा घेतो समजावे ।।**
**निजनिष्ठा सोडू नये । प्रयत्नासी उबगू नये ।**
**साधनेसी विसरू नये उतावळी बरी नाही ।।''**

(उ०कौ० पा.क्र. ३१३)

साधनामार्ग सांगताना पू. अप्पा निष्ठा, प्रयत्न, सातत्य, उत्कटता हे शब्द वारंवार वापरतात. साधनेच्या पूर्वरंगात हे शब्द साधकाची परीक्षा घेणारे ठरतात. मात्र हेच शब्द साधकाच्या अंगवळणी पडतात तेव्हा साधकाच्या जीवनात ईशभक्तिरूपी वसंताचे आगमन होते. पू. अप्पा यालाच साधनेची सहजता हा शब्द वापरतात. श्रीमहानारायणोपनिषदात सर्वात शेवटी तस्यैवं विदुषो०इथपासून ब्रह्मणो महिमान मित्युपनिषदत् इथपर्यंत जीवनावर केलेले यज्ञाचे भव्य दिव्य रूपक सांगणारे मंत्र येतात. असे वाटते की, या मंत्रसमूहाने ऋषींनी उपनिषदूरूपी यज्ञाची पूर्णाहुतीच केली आहे. पू. अप्पा या मंत्रसमूहावरच्या भाष्यात समन्वित साधनेची सहजता हीच खरी साधना आहे हे अतिशय वत्सलतेने साधकांना सांगतात. या मंत्रसमूहावरच्या भाष्याचा प्रारंभ पू. अप्पा मोठ्या गोड पद्धतीने करतात.

**''नारायण तेव्हा म्हणती । नरा ऐके सावचित्ती ।**
**तुझी पाहोनिया वृत्ति । कौतुकाने भरे मन ।।**
**आता माझ्या दर्शनाचे । सार तुजसी कथावयाचे ।**
**रूप तुझिया उत्कंठेचे । जैसे आहे तैसे ना ?''**

(उ०कौ.पा.क्र.४३१)

उत्कंठितनराला श्रीनारायणांनी सांगण्यास सुरुवात केली. प्रारंभी साधना साक्षेपाने करण्याचा विषय असला तरी साधनेची परिपूर्णता साधनेच्या सहजतेत आहे. प्रारंभी साधना जीवनाच्या विशिष्ट अंगाशी निगडित असली तरी पुढे पुढे पूर्ण जीवनच साधनामय बनणे आवश्यक असते. पू.अप्पा लिहितात,

**''परी साधनेचे वेगळेपण । सरणे पूर्णतेचे लक्षण ।**
**उपासनामय जीवन । व्हावे लागे साधकाचे ।**
**करणे किंवा न करणे । भरून जावे साधनेने ।**
**घडते जी सहजतेने । तीच खरी उपासना ।।''**

(उ०कौ०पा.क्र. ४३३)

साधनामय बनलेल्या जीवनाला श्रुतिमाऊलीने यज्ञाची उपमा दिली आहे. त्यासाधकाचे मन, बुद्धि, शरीर एवढेच कशाला त्याच्याभोवतीचा परिसर सुद्धा यज्ञाची अंगोपांगे बनतात. तो यज्ञ कसा असतो तो ते श्रुति माऊली सांगते. या साधकाचा जीवात्मा हाच यजमान, श्रद्धा पत्नी, शरीर इंधन, वक्षस्थलभेदी क्रोध, पशू, तप अग्नि, इंद्रियसंयमशमयिता (पशुत्व मारणारा) वाली होत, पूर्ण आयुष्य हीच दीक्षा. हा सर्व विषय व या विषयावरचे भाष्य मुळातूनच वाचण्यासारखे आहे. हा संवाद नर व श्रीनारायण यांचा आहे.

याचे वैशिष्ट्य सांगताना पू. अप्पा लिहितात,

''ज्यांनी पाहिले हे उपनिषद् । आणि नरासी केला बोध।
नारायण ते प्रसिद्ध । प्रत्यक्ष श्रीमहाविष्णू ।।
बंधू धाकटा नर ऋषी । तपस्या प्रिय दोघांसी ।
तरी न उदासी वा संन्यासी । तत्पर होते कर्तव्य ।।
अमृत–मंथना कारणे । प्रेरणा दिली नारायणे ।
रक्षिले चतुर राजकारणे । राक्षसापासूनी देवाते ।।
नराने धनुष्य उचलिले । पराक्रमे रण गाजविले ।
पराभूत दैत्या केले । विजय मिळाला देवांना ।।
असे दोघे कर्तव्यदक्ष । ईश्वरमूर्ती प्रत्यक्ष ।
तरी केन्द्रित होते लक्ष । साधनेवरी दोघांचे ।''

(उ०कौ०पा. क्र. ४४१)

मला असे वाटते की, पू. अप्पांनी देश, काल, परिस्थिति,शरीर, इंद्रिय, मन, बुद्धि यांना अविरोधी अशा व व्यष्टि, समष्टि यांना सारखेच कल्याणकारी ठरणाऱ्या समन्वित साधनेचे दर्शन साधकांना घडविले. ही साधना आपल्या जीवनात उतरविणे हेच या ग्रंथांच्या परिशीलनाचे फल.


**श्री. विश्वास घोडस्कर (गुरुजी)**
६७, दासगणू नगर, गजानन महाराज मंदिराजवळ,
हारोडा खुर्द, नांदेड ४३१६०५
मो. ९४२२८३७७८९


• • •

## मागणे

आज पुनव ही आषाढीची करिते पद वंदना ।
मागते शुभआशिष, द्यावा ।।

श्री गुरुराया ज्ञानमूर्ती तू ।
शिष्याप्रती वत्सल माता तू ।
पितृतुल्य आधार भूत तू ।
शरणागत चरणां । मागते शुभआशिष, द्यावा ।।।

नाही साधना, नाही ध्यान ते ।
नच सेवा हातूनही घडले ।
विविध विचारी, मन गोंधळते ।
दिशा तया द्याया । मागते शुभआशिष, द्यावा ।।

मिळो मला तंव आशिर्वचन ।
निग्रह राहो, व्यापुन तन मन ।
क्षणैक तरि 'ते' व्हावे दर्शन ।
अन्य नसे याचना । मागते शुभआशिष, द्यावा ।।

ॐ श्री ॐ



# प्रा. अ. दा. आठवले लिखित श्रीब्रह्मसूत्रार्थदर्शिनी

**विद्यावाचस्पती सौ. सुषमा राम सातपुते**
M.A., Ph.D., गृहिणी
प्राचार्य अ. दा. आठवले तथा स्वामी वरदानंद भारती यांच्या 'श्रीब्रह्मसूत्रार्थदर्शिनी' या ग्रंथावर 'श्रीब्रह्मसूत्रार्थदर्शिनी'चा वाङ्मयीन अभ्यास हा संशोधन-प्रबंध पुणे विद्यापीठात सादर. पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागातून या प्रबंधाला मान्यता

महाराष्ट्राला संतकवींची फार समृद्ध अशी परंपरा लाभलेली आहे. संतकवी श्रीदासगणूमहाराज हेही याच परंपरेला भूषणभूत झालेले विसाव्या शतकातील थोर सत्पुरुष होत. 'आधुनिक महिपती' म्हणून ज्यांना गौरविले जाते अशा श्रीदासगणूमहाराजांनी अभ्यासविषय असलेल्या ग्रंथांची भाष्ये, स्तोत्रे, अष्टके, आरत्या इ. स्फुटरचना, कीर्तनोपयोगी आख्याने, खण्डकाव्ये, संतचरित्रे इ. विविध प्रकारची सुमारे एक लाख काव्यरचना केली आहे. त्यांच्यापूर्वीचे कीर्तनकार मोरोपंत, वामनपण्डित, रघुनाथ पण्डित इत्यादिकांच्या साहित्याचा वापर करीत. श्रीदासगणूमहाराज मात्र स्वत: रचलेली आख्याने सांगत. त्यामुळे त्यांच्या कीर्तनाख्यानातून भक्तिरसाचा स्वाभाविक उद्रेक होत असे. भक्ती हेच त्यांच्या सर्व आख्यानांचे किंबहुना सर्वच साहित्याचे अधिष्ठान आहे यात शंका नाही.

अशाप्रकारे श्रीदासगणुमहाराजांनी कीर्तनाद्वारे भक्तिमार्गाचा प्रचार-प्रसार अवघ्या महाराष्ट्रात केला. श्रीसाईबाबांपासून चालत आलेली ही भक्तिमार्गाची परंपरा श्रीदासगणू महाराजांच्यानंतर लौकिक अर्थाने त्यांचे नातू, त्यांचे शिष्य व परंपरेतील त्यांचे उत्तराधिकारी असलेल्या प्रा. अनंत दामोदर आठवले- स्वामी वरदानंद तथा प.पू. अप्पांनी जोपासली, वाढविली आणि सर्वत्र प्रसारित केली. त्याचबरोबर त्यांनी स्वत: मराठी साहित्यात बहुमोल भर पडेल असे विपुल साहित्य निर्माण केले. त्यांचे साहित्य हे गुणग्राही, अतिशय संवेदनाशील मनाच्या अवस्थेतून, सामान्य जनांच्या उद्धाराच्या तळमळीतून, राष्ट्राच्या व संस्कृतीच्या उन्नयनाच्या ध्यासातून, तसेच एका मुमुक्षूच्याहि भूमिकेतून निर्माण झाले आहे. साहित्याच्या सर्वच अंगांना स्पर्श करणारे श्रेष्ठ, विपुल लिखाण प.पू. अप्पांनी केले आहे. त्यापैकी एक तत्त्वज्ञ म्हणून त्यांची भूमिका महत्त्वाची आहे. या भूमिकेतून त्यांनी रचलेल्या 'श्रीब्रह्मसूत्रार्थदर्शिनी' या ग्रंथाचा विचार आपण प्रस्तुत लेखामध्ये करणार आहोत.

भारतीय तत्त्वज्ञानाचा मूलस्रोत म्हणजे उपनिषदे होत. उपनिषदातील काहीसे विस्कळीत स्वरूपाचे तत्त्वज्ञान भगवान व्यासांनी सूत्रबद्ध करून नवीन स्वरूपात मांडले ते म्हणजे 'ब्रह्मसूत्रे' हा ग्रंथ होय. उपनिषदातीलच तत्त्वज्ञान अर्जुनाला निमित्त करून स्वत: भगवंताने सर्व मनुष्यजातीला सांगितले तो ग्रंथ म्हणजे भगवत्गीता होय. अशा रीतीने उपनिषदे, ब्रह्मसूत्रे व भगवत्गीता ही प्रस्थानत्रयी म्हणजे अध्यात्म मार्गावरचे टप्पे आहेत, मार्गदीप आहेत. या प्रस्थानत्रयीमुळे अध्यात्माचा मार्ग उजळला जातो. अध्यात्म मार्गावर राहण्यासाठी ब्रह्मसूत्रांचा अभ्यास अतिशय महत्त्वाचा ठरतो. कारण त्यात प्रत्यक्ष ब्रह्म म्हणजे काय, ब्रह्मज्ञान म्हणजे परमपुरुषार्थ जो मोक्ष त्याप्रत जाण्याची साधने कोणती, त्याचे फल काय या सर्वांचा उहोपाह केला आहे. असे हे महान तत्त्वज्ञान असलेला वेदव्यासरचित 'ब्रह्मसूत्रे' हा ग्रंथ मूळ संस्कृतमध्ये असल्यामुळे सामान्य जनता या तत्त्वज्ञानापासून वंचितच राहिली होती. सामान्य जनांचा कळवळा येऊन प.पू. अप्पांनी 'श्रीब्रह्मसूत्रादिदर्शिनी' हा ग्रंथप्रपंच केला.

आपण वर पाहिल्याप्रमाणे ब्रह्मसूत्र हा ब्रह्मविषयीचा, त्याच्या स्वरूपाविषयीचा, त्याच्या ज्ञानासंबंधीचा, ते ज्ञान प्राप्त करून घेण्यासाठी करावी लागणारी साधना आणि त्याचे मिळणारे फल याविषयीचा प्रस्तुत ग्रंथ आहे. त्यादृष्टीने या ग्रंथाचे १) समन्वयाध्याय, २) अविरोधाध्याय, ३)साधनाध्याय, ४) फलाध्याय चार विभाग आहेत.

श्रीब्रह्मसूत्रार्थदर्शिनीच्या अंतरंगाचे दर्शन घेताना आपल्याला असे दिसते की, पहिल्या अध्यायात उपनिषदांमधून ब्रह्माविषयी आलेल्या विविध वाक्यांचा समन्वय व प.पू. अप्पांचे त्यावरील सुबोध भाष्य, दुसऱ्या अध्यायात वेगवेगळ्या दार्शनिकांचे तत्त्वज्ञान, प.पू. अप्पांनी केलेले या मतांचे खण्डन, अद्वैत तत्त्वज्ञानाचे महत्त्व सांगून त्यांचे मण्डन, तिसऱ्या अध्यायात आत्मज्ञानासाठी विविध साधनांचे महत्त्व व त्या कशा कराव्यात याबद्दल मार्गदर्शन आणि चौथ्या अध्यायात या साधनांची फलश्रुती व त्यावरील विवेचन केले गेले आहे.

### चतु:सूत्री

ब्रह्मसूत्राच्या प्रारंभी चार सूत्रे आली आहेत. त्यांना चतु:सूत्री असे म्हटले जाते. ही चतु:सूत्री म्हणजे 'ब्रह्मसूत्र' या ग्रंथाची प्रस्तावना आहे. या चारही सूत्रांमध्ये सांगितलेले विषयच पुढील ग्रंथात सविस्तरपणे वर्णिले आहेत. ती सूत्रे याप्रमाणे-

१) अथाऽ तो ब्रह्मजिज्ञासा । २) जन्माद्यस्य यत: ।
३) शास्त्रयोनित्वात् । ४) ततु समन्वयात्

### तत्त्वज्ञान मायबोलीत

यादृष्टीने अंतरंगाची मांडणी करताना, विवेचन करताना प.पू. अप्पांच्या लेखनाची काही वैशिष्ट्ये प्रकट होतात. उपनिषदे, ब्रह्मसूत्रे आणि भगवत्‌गीता या वेदान्तदर्शनात न्यायप्रस्थान असलेली ब्रह्मसूत्रे हे प्रस्थान तर विशेषच महत्त्वाचे आहे. परंतु दार्शनिक परिभाषा आणि तर्ककर्कश मांडणी यामुळे हा सर्वच ग्रंथ समजायला कठीण आहे. तज्ज्ञांकडून तो समजून घ्यावा लागतो. ब्रह्मसूत्रे ही सूत्रमय आहेत.

**अल्पाक्षरमसंदिग्धं सारवद्विश्वतोमुखम् ।**
**अस्तोभ्यं अनवद्यं च सूत्रं सूत्रविदो विदुः ।।'**

या सूत्राच्या लक्षणांप्रमाणे अल्पाक्षर, म्हणून दुर्ज्ञेय झालेली व मतभेदाला विशेष वाव असलेली ही सूत्रे संस्कृत भाषेमुळेही समजून घेण्यास अतिशय कठीण असल्यामुळे सामान्य माणूस त्यातील वेदान्त-तत्त्वज्ञानापासून दुरावलेला होता. सामान्य माणसांबद्दल अतीव कळवळा वाटून ब्रह्मसूत्रे व त्यावरील भाष्य हे मराठीत, आपल्या मायबोलीतून पू.आप्पांनी सांगितले.

**'ज्ञानदेवे रचिला पाया । तुका झालासे कळस'** अशा भागवत धर्माचे अनुयायी असलेल्या प.पू. अप्पांनी श्रीब्रह्मसूत्रावर मराठीत भाष्य लिहून भागवत धर्माच्या इतिहासात सोनेरी पान निर्माण केले आहे. भगवत् गीता, उपनिषदे, ब्रह्मसूत्रे या प्रस्थानत्रयीवर भाष्य लिहून ते मराठीतील पहिलेच 'आचार्य' झाले आहेत असे म्हटल्यास अतिशयोक्ती ठरू नये. आपल्या या मराठी भाष्याबद्दल प.पू. अप्पा म्हणतात,

**'महर्षी वेदव्यास म्हणून । रूपा आणण्या तत्त्वज्ञान ।**
**ब्रह्मसूत्रासी निर्माण । करिते झाले लोकांस्तव ।।२५०।।**
**त्या श्रीब्रह्मसूत्राप्रत । साध्या सरळ मराठीत ।**
**विवरण्याचा धरून हेत । उद्युक्त झालो लेखनासी ।।२५१।।**
**मी न पण्डित विद्वान । कवि वा प्रतिभासंपन्न ।।**
**तर्क मीमांसा व्याकरण । माझ्या नसती ओळखीची ।।२५२।।**

प.पू. अप्पांचे संस्कृत भाषेवर प्रभुत्व होते. त्यांनी अनेक स्तोत्रे, पदे संस्कृतमध्ये लिहिली आहेत. त्यांनी एकनाथमहाराजांवर एक कीर्तनाख्यानही संस्कृतमध्ये लिहिले आहे. 'श्रीब्रह्मसूत्रार्थदर्शिनी' या ग्रंथाच्या प्रारंभीच श्रीवरदनारायण स्तोत्र आणि श्रीशंकराचार्याष्टकम् ही प.पू. अप्पांनी संस्कृतमध्ये रचलेली स्तोत्रे छापली आहेत. त्यांनी मनात आणले असते तर श्रीब्रह्मसूत्रावरील भाष्यही संस्कृतमध्ये लिहिले असते. त्यामुळे पाण्डित्य प्रदर्शनही झाले असते. परंतु प.पू.अप्पांनी तसे केले नाही. संस्कृत भाषेवरील प्रभुत्वाचा उपयोग त्यांनी दर्शनांचा अभ्यास करण्यासाठी केला आणि त्यातील दर्शन सामान्यांना कळावे म्हणून 'सेवितो हा रस वाटितो आणिका' या भूमिकेतून त्यांनी मराठी भाषेतून, ज्ञानोबा-तुकोबांच्या मराठीतून-मायबोलीतून ब्रह्मसूत्रांचे विवरण केले. ते म्हणतात,

**''... कारण विद्वत्‌जनांसाठी । माझी नसे ही खटपटी ।**
**मी या करितो गुजगोष्टी । परिचय होण्या सामान्या ।।२६०।।**
**ब्रह्मसूत्र हे प्रकरण । काय आहे पुसती जन ।**
**त्यांचे थोडे समाधान । करावया हा यत्न असे ।।२६१।।**

पुढे ते म्हणतात-

**''पण्डितांनी विद्वानांना । सुखे द्यावे समाधान ।**
**मी आपुला इतरेजना । घडवितो की ओळखी ही ।।५१८।।**
**तोच हेतु ठेवून । श्रीब्रह्मसूत्रार्थ दर्शिनी ।**
**रचिली मराठी ओव्यांनी । कण्हेरीच्या माळेपरी ।।५१९।।**

### 'दर्शिनी' ओवीबद्ध

प.पू. अप्पांच्या 'श्रीब्रह्मसूत्रार्थदर्शिनी' या भाष्याचे-भाष्याच्या मांडणीच्या स्वरूपाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे ओवी हे माध्यम. प.पू. अप्पांनी भाष्याकरिता 'मराठी' भाषा वापरली आणि 'ओवी' हे अतिशय सहजसुलभ, सोपे पण तरीही नीटनेटके असे माध्यम निवडले. मुख्य म्हणजे श्रीज्ञानेश्वरांच्या ज्ञानेश्वरीचेही माध्यम ओवी हेच आहे. श्रीज्ञानेश्वरांबद्दल त्यांना अतिशय प्रेम आणि ते त्यांच्या सर्वच साहित्यातून ठिकठिकाणी प्रकट झाले आहे.

पद्यामध्ये थोड्या शब्दांमध्ये फार मोठा आशय सांगता येतो. हा हेतू 'दर्शिनी' मध्ये साध्य झालेला दिसतो. 'अथाऽतो ब्रह्मजिज्ञासा' या पहिल्या सूत्रातील अथ (आता) आणि अतः (म्हणून) या शब्दांसाठी, त्यांच्या अर्थासाठी व त्यावरील विवेचनासाठी विद्वानांनी बरीच पाने खर्ची घातली आहेत.

प.पू. अप्पा मात्र या सूत्रावर २२ ओव्यांमध्ये भाष्य करतात. अथ आणि अतः यावर ते लिहितात,

**'ब्रह्म काय कळो वेगी । म्हणून (अतः) आता (अथ)**
**मजलागी जेणे माझ्या अंतरंगी । समाधान लाभेल ।।३०६।।**

ओवी या माध्यमाचा उपयोग प.पू. अप्पांनी केल्यामुळे त्यांच्या भाष्याला गेयता आली आहे. सामान्य वाचक या गेयतेमुळेही ब्रह्मसूत्रासारखा केवळ तत्त्वज्ञानपर असलेला ग्रंथही पारायणाच्या निमित्ताने पुनःपुन्हा वाचण्यास प्रवृत्त होईल व आपले अंतिम कल्याण साधून घेईल.

### दर्शिनीतील नमने

श्रीब्रह्मसूत्रार्थदर्शिनीचे चार अध्याय आहेत. या प्रत्येक अध्यायाच्या प्रारंभी 'नमने' आली आहेत. ही नमने हेही प.पू. अप्पांच्या भाष्याचे वैशिष्ट्यच मानावे लागेल. श्रीब्रह्मसूत्रार्थदर्शिनी या पूर्णपणे तात्त्विक विचारांच्या ग्रंथातील नमने मात्र अतिशय भक्तिरसपूर्ण अशी आहेत. नमनाच्या सुरुवातील प.पू. अप्पांनी आपले आराध्य दैवत 'नारायण' याला वंदन केले आहे.

**''ॐ आद्या अनंता अव्यया । अखंडानंदा अक्षया ।**
**अखिलमूला अव्यया । आनंदघना नारायणा ।।**
**पूर्णब्रह्मा परात्परा । सर्वाधारा करुणाकरा ।**
**सर्वशक्ते अपारा । करुणाधरा नमो तुशी ।।**
**या सर्वही विश्वाठायी । जे जे असे भासे पाही ।**
**त्यात सर्व अंतर्बही । ओतप्रोत अससी तू ।।''**

या भक्तिरसाने ओथंबलेल्या ओव्यांमध्येही आपल्याला प.पू. अप्पांची अद्वैताची तात्त्विक बैठकच असलेली जाणवते आणि त्याबाबतीत श्रीशंकराचार्य व विशेषत: श्रीज्ञानेश्वरांचा प्रभाव प.पू. अप्पांच्या या भाष्यावर आहे असे जाणवते. या नमनामध्ये आराध्यदैवत नारायणाबद्दल त्यांच्याप्रति असलेली उत्कटताही जाणवते, आर्तता जाणवते–

**''औदार्य तुझे वत्सल । फार आहे मेघनीळ ।**
**येता कुणी पायाजवळ । त्याच्या उपेक्षा करिसी ना ।।**
**या विश्वासे तुझ्या पायी । ठेविली मी असे डोई ।**
**नारायणा माझे आई । दूर मजसी धरू नको ।।**
**भाव भक्ति योग ज्ञान । याचे न माझ्याजवळी धन ।**
**म्हणून पदर पसरून । उभा राहिलो दारी तुझ्या ।।''**

या नमनामध्ये आपल्या उपास्यदेवतेबरोबरच त्यांनी आपले सद्‌गुरू संतकवि श्रीदासगणूमहाराज, त्याचप्रमाणे परात्परगुरू श्रीशंकराचार्य, श्रीज्ञानेश्वरमहाराज यांच्यासह सर्वच थोर माहात्म्यांना वंदन केले आहे.

**''माझे श्रीमत् सद्‌गुरू । भवनदीत होती तारू ।**
**ज्यांनी लाविला कल्पतरू । संतकथेचा मराठीत ।।**
**सद्‌गुरूंचा कृपाकर । मस्तकी आहे निरंतर ।**
**मी लडिवाळ भावे शिर । मांडीवरी ठेविलेसे ।।''**

**श्रीज्ञानेश्वरमहाराजांना वंदन करताना ते म्हणतात,**

**''मार्तंड व्हावा तापहीन । प्रभा तैशीच राहून ।**
**तैसे अद्वैताचे ज्ञान । कोमल केले भक्तिभावे।।''**

### साधकासाठी भाष्य

हा ग्रंथ लिहिण्यामागील प्रेरणेविषयी ते सांगतात,

**''कारण विद्वज्जनांसाठी । माझी नसे ही खटपटी ।**
**मी या करितो गुजगोष्टी । परिचय होण्या सामान्या ।।''**

यावरून प.पू. अप्पांनी सामान्य साधकाला डोळ्यांसमोर ठेवूनच भाष्य लिहिले आहे हे 'पदोपदी' जाणवते. त्यांनी श्रीशंकराचार्यांच्या शारीरभाष्याचा आधार घेतला असला तरी आपल्या भाष्यामध्ये थोडी स्वतंत्रता घेतली आहे. यज्ञयागांऐवजी पूजेची उदाहरणे त्यांनी घेतल्यामुळे भाष्यातील दुर्बोधता जाऊन विवेचन सुलभपणे कळण्यास मदत होते.

### योद्धा संन्यासी

प.पू. अप्पांनी आपल्या सद्‌गुरूंची इच्छा पूर्ण करण्यासाठी संन्यास ग्रहण केला होता. परंतु स्वामी विवेकानंदांप्रमाणेच ते व्यवहारी संन्यासी होते. स्वामी विवेकानंदांप्रमाणे त्यांना 'योद्धा संन्यासी' म्हणून गौरवण्यात आले आहे. स्वत:ला एखाद्या मठात कोंडून घेण्याकरिता त्यांनी संन्यास घेतला नव्हता, तर आपल्या संन्यास आश्रमातून त्यांना समाजाचा उद्धारच साधायचा होता. स्वत:बरोबरच इतर जनांनाही मोक्षाप्रत न्यावयाचे होते. या दृष्टिकोनातून प.पू. अप्पांच्या सर्वच वाङ्‌मयाची निर्मिती झाली आहे. त्यांचा अखेरचा 'मनुस्मृती' हा ग्रंथही सामाजिक स्वास्थ्यासाठीच लिहिला गेला आहे. हा ग्रंथ सामान्यांसाठी लिहिला गेल्यामुळे दर्शिनीची भाषा अगदी सोपी आहे. त्यात व्यावहारिक आणि वैज्ञानिकही दृष्टांत दिले आहेत.

### 'दर्शिनीची सोपी भाषा'

तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात मूळ तत्त्व, सत्य, ब्रह्म एकच असूनही मतामतांचा पसारा किंवा तत्त्वज्ञानाचे एवढे विविध प्रवाह का दिसतात याबद्दल विवेचन करताना प.पू. अप्पा म्हणतात,

**''साधकांच्या भिन्नतेमुळे । हे सर्वहि इष्ट झाले ।**
**कारण तूच धारण केले । विविधतेसी साऱ्या या ।।**
**अन्नाचे ते प्रकार नाना । स्वाद आकृति भिन्न भिन्ना ।**
**परी देहाच्या पोषणा– । कारणे होती एकरूप ।।**
**मुळात केवळ अद्वैत । व्यवहार सारे द्वैतात ।**
**या दोन्ही अवस्थात । अंतर राही फार मोठे ।।''**

प.पू. अप्पा हे एक निष्णात वैद्य असल्यामुळे आरोग्यविषयक दृष्टांतही ठिकठिकाणी त्यांनी दिले आहेत. त्यामुळे विषय आकलनसुलभ झाला आहे. गहन असा दार्शनिक पद्धतीने मांडलेला विषय सामान्य माणसाच्या आवाक्यात आणून सोडणे हे त्यांच्या 'श्रीब्रह्मसूत्रार्थदर्शिनी' या भाष्याचे वैशिष्ट्य आहे. ब्रह्म जाणून घेण्याची इच्छा मनुष्याला का होते हे त्यांनी आपल्या विवेचनात सोप्या पद्धतीने सांगितले आहे. ते म्हणतात,

**''मनुष्य जो जो सुसंस्कृत । विचारी नी प्रज्ञावंत ।**
**जो वाढला संगतीत । सात्त्विक, धार्मिक लोकांच्या ।।**
**त्याच्या चित्ती वारंवार । ऐसी उठताती विचार ।**
**मग तो होतसे अधीर । उत्तर त्यांचे शोधावया ।।''**

### समन्वयाचा दृष्टिकोन

श्रीब्रह्मसूत्रार्थदर्शिनीमधून दिसून येणारी सर्व पूर्वाचार्यांविषयी पूज्य बुद्धी ही प.पू. अप्पांच्या भाष्याचे वैशिष्ट्य म्हणावे लागेल. वास्तविक प.पू. अप्पा हे श्रीशंकराचार्यांचे अनुयायी आणि केवलाद्वैती तत्त्वज्ञानाचे पुरस्कर्ते आहेत. परंतु तरीही भिन्न भिन्न मतांचे आणि परस्परांमध्ये तीव्र मतभेद असलेले विशिष्टाद्वैती समानुजाचार्य, द्वैती मध्वाचार्य, शुद्धाशुद्धद्वैती वल्लभाचार्य, द्वैताद्वैती निंबार्काचार्य आणि शिवविष्टाद्वैती श्रीकंठाचार्य – या सर्वच आचार्यांना ग्रंथाच्या प्रारंभी त्यांनी वंदन केले आहे. यावरून सर्व आचार्यांच्या या मतभिन्नतेकडे पाहण्याचा निकोप आणि समन्वयाचा दृष्टिकोन व गुणग्राहकताच प.पू. अप्पांच्या ठिकाणी दिसून येते. साधकांमधील रुचिभेद व अवस्थाभेद यांना अनुसरूनच या भाष्यकारांनी (सर्वच आचार्यांनी) आपली मते मांडली आहेत असे ते म्हणतात. वादविवाद होतो तो तात्त्विक सिद्धान्ताच्या बाबतीत; सदाचाराच्या व नीतीच्या बाबत होत नाही. त्यामुळे प.पू. अप्पा म्हणतात,

**''सिद्धान्त असे असावे । त्याने सत्य जवळ यावे ।।'**

## समन्वयाची भूमिका

समन्वयाची भूमिका ही प.पू. अप्पांना त्यांचे सद्गुरू श्रीदासगणू-महाराज यांच्याकडून मिळालेले बाळकडूच आहे. श्रीदासगणूमहाराज म्हणत असत,

**''शैवा जो शिव वैष्णवा हरि गमे, वेदान्तिया ब्रह्म जो ।**
**बौद्धा बुद्धहि जो खुदा हि यवना अर्हंत जैनास जो ।**
**कर्ता जो गमतो प्रमाणपटुना, जे कर्म मीमांसका ।**
**ख्रिस्त्या येशुहि तोच हा, गणु म्हणे ध्या रुक्मिणी नायका ।।''**

प.पू. अप्पा समन्वयाच्या बाबतीत म्हणतात,

**''योग्यतेसम पातळी । जाते अनुभवाची गाठली ।**
**त्याच्यामुळे जन्मा आली । विविधता तत्त्वज्ञानाची ।।''**
**त्रिविधासत्ताभेदाने । ती सारीच तत्त्वज्ञाने ।**
**केवलाद्वैत सिद्धान्ताने । समन्वयाने स्वीकारिली ।।**
**वाहणे संपते सागरी । चढाई थांबे शिखरावरी ।**
**तसे केवलाद्वैता भीतरी । होते सर्व विचारांचे ।।''**

## व्यापक दृष्टिकोन

श्रीब्रह्मसूत्रार्थदर्शिनीमध्ये विवेचनाच्या संदर्भात प.पू. अप्पांचा व्यापक, उदार दृष्टिकोन व्यक्त झाला आहे. ब्रह्मज्ञानाचा अधिकार सर्वांनाच असावा असा सर्वसमावेशक विचार त्यांनी या ग्रंथात मांडला आहे.

**''आचार्य पूज्यपादशंकर । ब्रह्मज्ञ म्हणून स्वीकार ।**
**धर्मव्याध आणि विदुर । यांचा करिती आवर्जुनी ।।**
**यास्तव वेदाचा अधिकारी । मनुष्य कुणी असला जरी ।**
**ब्रह्मज्ञान अत्यादरी । प्रयत्ने त्या लाभू शके ।।**
**येथे न...जाति प्रमाण । सद्गुणासी आहे मान ।।''**

प.पू. अप्पांनी शूद्राची केलेली व्याख्या लक्षणीय आहे-

**''शूद्र म्हणती त्या कारण । मत्सरी जो वृत्तीने ।**
**माझ्यापेक्षा चांगला । आहे म्हणता कुणाला ।**
**हा माझा अपमान झाला । ऐसे वाटे शूद्र तो ।।**
**कुल, जाति, परिस्थिती । यांच्यापेक्षा महत्त्व अति ।**
**संस्कारासि, होण्या प्राप्ति । सद्गुणांची मानवाने ।।''**

श्रीतुकोबराय, चोखोबा, गोरोबा, सावतेबुवा, महात्मा रोहिदास असे थोर थोर भक्ताग्रणी महापुरुष हिंदुस्थानात झाले. रामेश्वर भटासारख्या विद्वान ब्राह्मणाने त्यांची ब्रह्माबरोबर तुलना करून त्यांच्या चरणावर मस्तक ठेवले आहे.

**''तुकिता तुलनेसी । ब्रह्म तुकासी आले ।**
**म्हणोनि रामेश्वर । चरणी मस्तक ठेविले । आरती तुकारामा''**

या इतिहासाच्या आधारे श्रीब्रह्मसूत्रार्थदर्शिनीमध्ये स्वीकारलेली भूमिका उचित आहे असे म्हणता येईल.

दर्शिनीतील प.पू. अप्पांची निरूपणशैली अप्रतिम व ओघवती आहे. पण तरीही तत्त्वज्ञानाच्या गाभ्याला कुठेही धक्का लागलेला नाही. तसेच ब्रह्मज्ञानाचा आग्रह धरताना व त्यासाठी साधनेचे मार्गदर्शन करताना त्यांचा दृष्टिकोन वास्तववादी आहे.

प.पू. अप्पांनी आपल्या संपूर्ण जीवनात देव, देश आणि धर्म यासाठी व्याख्यानरूपाने, कीर्तन-प्रवचनद्वारा आणि ग्रंथरूपानेही खूप मोठे कार्य केले. आदर्श समाजाबरोबरच त्यांच्या भाष्यात राष्ट्रभक्ति व आपल्या संस्कृतीचा अभिमानही व्यक्त झाला आहे. निर्गुण निराकार अशा उपास्य ब्रह्माचे वर्णन करता करता सगुण साकार अशा ईश्वराच्या वर्णनामध्ये प.पू.अप्पा रंगून गेलेले दिसतात. अशावेळी ते एक डोळस तत्त्वज्ञानी असूनही कोमल अंत:करणाचे भक्तच असल्याचे जाणवते.

दर्शिनीची भाषा रूपक, उपमा, दृष्टान्त यांनी युक्त अशी अलंकारिक आहे. तसेच काव्यमय निसर्गवर्णनही येथे आले आहे.

## आत्मचरित्र

दर्शिनीतील काही विवेचन हे आत्मचरित्रपर असावे असे दाखले या ग्रंथात आढळतात. नियत आयुष्य संपल्यावर मनुष्यापुढे मृत्यू विविध स्वरूपात येऊन उभा राहतो याचे वर्णन प.पू. अप्पा करतात-

**''कुणी जाणीव ठेवून । करी देहाचे विर्सजन ।**
**कोणी कृतकृत्य होऊन । स्वागत करी मृत्यूचे ।।''**

श्रीज्ञानेश्वर महाराजांप्रमाणेच प.पू. अप्पांनी श्रावण वद्य एकादशी शके १९३४ (३ सप्टेंबर २००२) या दिवशी उत्तरकाशी येथे संजीवन समाधी घेतली. या संजीवन समाधीबद्दल उल्लेख 'दर्शिनी' मध्ये काही ठिकाणी आढळतात. त्यावरून त्यांचे आत्मचरित्रच प्रकट झाले आहे असे वाटते.

**अतश्चायनेऽपि दक्षिणे** । या सूत्रावरील भाष्यात प.पू. अप्पा म्हणतात, ज्ञानी पुरुषाला दक्षिणायन-उत्तरायण असे काळाचे बंधन नाही.

**''इच्छामरणी कोणी असे । तो वेळ बुद्ध्या साधीतसे ।''**

(प.पू. अप्पांनी श्रावण वद्य एकादशी हा दिवस स्वत: ठरवून त्यादिवशी समाधी घेऊन देह ठेवला, त्यामुळे तेही इच्छामरणी ठरले.)

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी ज्ञानेश्वरीच्या आठव्या अध्यायाच्या,

**''प्रयाणकाले मनसाऽचलेन । भक्त्या युक्तो योगबलेन चैव ।**
**भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक् । स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ।।''**

या दहाव्या श्लोकावरील भाष्यात भक्ताच्या या सहज समाधीचे वर्णन केले आहे.

**''तया अव्यंगवाणेया ब्रह्माते । प्रयाणकाले प्राप्ते ।**
**जो स्थिरावलेनि चित्ते । जाणोनि स्मरे ।।''**

प.पू. अप्पांनीही या समाधिस्थितीचे वर्णन चौथ्या अध्यायाच्या दुसऱ्या किरणाच्या प्रारंभी केले आहे. अंतकाळ जवळ आला की, वाणीची शक्ती मनात लीन होते. वाणीप्रमाणे इतर अवयवांचे व्यापारही मनामध्येच लीन होतात; आणि-

**''याच्यानंतर ते मन । प्राणामध्ये होते लीन ।**
**प्राणाचे कार्य अजून । चालू राहे थोडेतरी ।**
**परी मंद श्वासोच्छ्वास । चाले कधी सावकाश ।**
**हृदयाचे स्पंदन विशेष । त्रुटितपणे होत राही ।।''**

प.पू. अप्पांनी संजीवन समाधी घेण्यापूर्वी आपला उत्कट भाव अक्षरबद्ध केला तो असा;

**आम्ही जातो आमुच्या गावा । अमुचा रामराम घ्यावा ।**
**संत तुकोबा बोलती । त्याची येणार प्रचीती ।।**
**साक्षी ठेवून तुम्हा संता । देह सोडितो हा आता ।।**
**देह झाला व्याधि क्षीणी । गळून पडे पिकले पान ।।**
**त्याचे दु:ख ना करावे । हा तो निसर्ग जाणावे ।।**
**मी म्हणजे ना शरीर । मी मद्ग्रंथाचा संभार ।।**
**त्याचे वाचन चिंतन । यथाशक्ति आचरण ।।**
**हीच गुरूपूजा खरी । नीट धरावे अंतरी ।।**
**दिवस आजचा भाग्याचा । जीवनाच्या सार्थकेता ।।**
**भागीरथी करी कृपा । माझ्या पोचवी निरोपा ।।**
**वरदहस्त उभारून । पालवितो नारायण ।।**
**प्रसन्न मुद्रा ही गोमटी । खिळून राहे तेथे दिठी ।।**
**उत्कंठतेचा दाटे भाव । ओढ घेई तेथे जीव ।।**
**नारायणी पायी मिठी । वरदानंद दे शेवटी ।।**
**बोला जय जय नारायण । हरीतो तो सारा शीण ।।**

अशाप्रकारे प.पू. अप्पांच्या श्रीब्रह्मसूत्रार्थदर्शिनी या भाष्याचा यथामती व यथाशक्ति आढावा घेतला. प.पू. अप्पांच्या या देशिकार लेण्यामुळे उपनिषदे, ज्ञानेश्वरी, ब्रह्मसूत्रे यासारखे ग्रंथ म्हातारपणी वाचायचे ग्रंथ न राहता त्यांना आयुष्याच्या वाटचालीत खरोखरीच मार्गदर्शक ठरतील व तरुणांना कार्यक्षम बनतील असे ग्रंथ झाले आहेत. 'दर्शिनी'मध्ये आपल्याला कधी शंकराचार्य भेटतात, कधी ज्ञानेश्वरांचे दर्शन होते तर कधी परखड विचार मांडणारे तुकाराममहाराजही भेटतात. समाजप्रबोधन करणारे समर्थ रामदास तर ठायी ठायी भेटतात. साहित्याच्या सर्व अंगांना स्पर्श करणारा 'दर्शिनी' हा भाष्यग्रंथ आहे.

दर्शिनीमध्ये सामान्य लोकांबद्दल आत्मीयता, कळकळ आहे, आधुनिक परिस्थितीप्रमाणे नवा अर्थ सांगण्याची लवचिकता आहे, सर्व जातीयांबद्दल जिव्हाळा आहे, नवे दृष्टांत देण्याची क्षमता व तेवढा व्यापक अनुभव आहे. भाषेत रसाळपणा, ओघ व प्रसाद आहे. या सर्व गुणांमुळे 'दर्शिनी' या भाष्यग्रंथ प्रकृतीने, स्वरूपाने पूर्णपणे स्वतंत्र झाला आहे आणि 'दर्शिनी' सारख्या ग्रंथाची निर्मिती ही काळाची गरज होती व ती. प.पू. अप्पांनी पूर्ण केली आहे.

अशा या थोर समाजहितेषी व समाजशिक्षक असलेल्या प.पू. अप्पांना विनम्र अभिवादन!

इति शम् ।

**विद्यावाचस्पती सौ. सुषमा राम सातपुते**
अमरीश-ब-५, सर्व्हे नं. ११५, शिवतीर्थनगर,
कोथरूड, पुणे ३८.
फोन : ९८५०८९०८४७

•••



# प.पू. स्वामी वरदानंद भारती यांच्या
## श्रीमद् भगवद्गीता अध्याय १ ते ३ वरील भाष्यावर विवेचन

**डॉ. परिमल मधुकर जोशी**

प.पू. स्वामी वरदानंद भारती यांचे अनुग्रहीत शिष्य.
श्रीदासगणू महाराज व वरदानंद भारती परिवारातील सदस्य. वैद्यकीय सेवा, प्राध्यापक व विभागप्रमुख धोंडूमामा साठे होमिओपॅथिक वैद्यकी महाविद्यालय पुणे.

**।।श्री शंकर।।**

प. पू. स्वामी श्री. वरदानंदभारती (आमचे अप्पा) यांच्या श्रीमद् भगवद्गीता अध्याय १ (गीताप्रवेश), अध्याय २ (स्थितप्रज्ञ योग) व अध्याय ३ (कर्मयोग) या भाष्य ग्रंथांवर काही लिहिण्याचे भाग्य मला लाभते आहे. या ग्रंथांचे प्रतिदिनी बदलणाऱ्या सामाजिक परिस्थितीच्या संदर्भात परिशीलन करण्याचा विचार जेव्हा मी करू लागतो तेव्हा, आज व यापुढील काळातही या विवरणाची केवढी नितांत गरज आहे, हाच विचार प्रामुख्याने मनात येत राहतो आहे. हे काम करण्यास कोणीतरी माझ्यापेक्षा अधिकारी मनुष्यच हवा होता. ही कामगिरी माझ्या योग्यतेच्या बाहेरची असली तरी,

**''संतांची उच्छिष्टे बोलतो उत्तरे।**
**काय म्या पामरे जाणावे हे ।।''**

ही भूमिका असल्यामुळे यातील न्यूनतेची पूर्णता व अधिकतेची (वावगेपणाची) उपेक्षा व क्षमा करून माझे अप्पा व वाचक मला आशीर्वादच देतील हा विश्वास वाटतो!

### 'श्रीमद्‌भगवद्‌गीता'

भगवद्‌गीतेची महती काय सांगावी? हजारो वर्षांपासून भारतीयांची हृदये एकत्र जोडून ठेवणारा हा ग्रंथ! मनाला मोह पडून काय करावे हे न उमजल्यामुळे अंत:करण अस्वस्थ झाले असता योग्य बुद्धी जागृत करून कर्तव्याची योग्य दिशा दाखविणारा जगाच्या पाठीवर दुसरा ग्रंथ नाही, असेच म्हणावे लागेल. भारतीय युद्ध समाप्त होऊन एकदा श्रीकृष्ण व अर्जुन प्रेमळ वार्तालाप करीत बसले असता, भगवंतांच्या मुखाने गीता पुन्हा ऐकण्याची इच्छा अर्जुनाने व्यक्त केली असता, ''ते उपदेश त्या वेळी मी अत्यंत योगयुक्त अंत:करणाने (योगारुढ होऊन) केला असल्यामुळे तो पुन्हा तसाच सांगणे मलाही अशक्य आहे.'' असे भगवंतांनी त्यास उत्तर दिले. वास्तविक भगवंतांना काहीच अशक्य असण्याची थोडीसुद्धा शक्यता नाही. पण त्यांनी सुद्धा गीता पुन्हा सांगणे अशक्य आहे असे म्हणावे या एका गोष्टीने सुद्धा गीतेची अपूर्वता व थोरवी केवढी मोठी आहे हे चांगले व्यक्त होते! आपले कर्तव्य कोणते, कोणत्या मार्गाने जाणे योग्य, काय करावे, काय करू नये हा व्यामोह आजही घडोघडी प्रत्येक मनुष्याला पडतो. योग्यायोग्य ह्या कार्याकार्य विचारणेचे निर्णायक मार्गदर्शन नीतिशास्त्रात सापडते. पाश्चात्य राष्ट्रात नीतितत्त्वे धर्मापासून वेगळी मांडलेली आढळतात व त्यातूनच आधुनिक व्यवहारशास्त्राचा उदोउदो केला जातो. परंतु त्यांच्या नीतिशास्त्राचा पाया 'भरपूर जणांचे भरपूर सुख' या ऐहिक व अपरिपक्व विचारसरणीने नुसत्या संख्येवर मांडला जातो हे मुळातच चूक आहे. भारतीय तत्त्वज्ञानात नीती ही वेगळी मांडलेली नाही. ती धर्माशी एकरूप झालेली आहे. गीतेत धर्मशास्त्रास धरून सांगितलेले नीतितत्त्वाचे सिद्धांतच आहेत. त्यामुळे गीता हे अत्यंत उच्चप्रतीचे परिपूर्ण असे 'नीतिशास्त्रच' आहे. या नीतिशास्त्राचा आधार घेऊन वागणाऱ्यास तो कुठेही असला तरी तेथून सर्वोच्च प्रगती करता येणे शक्य आहे. आधीच गीतेसारखा मनुष्यमात्राचे जीवन सर्वार्थाने उंचाविणारी मूल्ये कोणती व ती कशी प्राप्त करावीत हे सांगणारा ग्रंथ आणि त्यातच या सर्व आदर्शांचे, मूल्यांचे प्रत्यक्ष व्यक्तरूप 'अप्पा' व त्यांचे अनुभवसिद्ध भाष्य असा हा अपूर्व 'कृपामृतयोग' आहे! अप्पांचे गीतेतील या अध्यायत्रयीवरील भाष्य वाचताना (व एरवीही) एक विशिष्ट मनोभूमिका असणे अत्यंत आवश्यक आहे असे मला वाटते. यासाठी दोन गोष्टींची पुरेपूर जाणीव असणे इष्ट आहे.

(१) ती. प. पू. स्वामी वरदानंद भारती (अप्पा) यांचे सर्वच ग्रंथ भगवान श्रीवरदनारायणाच्या प्रत्यक्ष दर्शनाशीर्वादानंतर व श्रीनारायणाच्याच आदेशानुसार पृथ्वीवर प्रकट झाले आहेत व

(२) मला माझ्या स्वत:च्या उन्नतीसाठी, प्रगतीसाठी या ग्रंथ वाचनाचा उपयोग होणार आहे.

अशा प्रकारची मनोधारणा असेल तर ती या भाष्यांचा अधिकाधिक फायदा साधक वाचकांना मिळेल. प्रामाणिक बुद्धिवाद्यांना प्रज्ञातृप्ती मिळेल, प्रज्ञापेंग आलेल्याची खडखडून जागृती होईल, श्रद्धावान साधकांना अतीव समाधानाचा लाभ होऊन प्रेरणा मिळेल. त्याचबरोबर 'पंडितवाणी' आणि 'संतवाणी' यातील जमीन-अस्मानाचा फरकही लक्षात येईल! या धारणेनुसार ग्रंथभाष्य पठण केल्यास खऱ्या अर्थाने 'गीता प्रवेश' झाला असे म्हणता येईल.

### 'गीता प्रवेश' (अध्याय १)

कुठल्याही ग्रंथाचा आशय समजण्यास दोन प्रकारचे परीक्षण महत्त्वाचे आहे असे भारतीय मीमांसाशास्त्र सांगते. एक 'अंतरंग परीक्षण'

व दुसरे 'बहिरंग परीक्षण.' अंतरंग परिक्षणात ग्रंथातील विचार, महत्ता, तत्त्वे व तात्पर्य इत्यादींचा विचार केला जातो तर बहिरंग परिक्षणात ग्रंथ कोणी, केव्हा, कोठे केला व तत्सम इतर बाह्यांगांचा विचार केला जातो. या भाष्याची सुरुवात गीतेच्या महतीने होऊन पुढचे भाष्य गीतेच्या बहिरंग परिक्षणाचे आहे. ग्रंथातील विचार, तत्त्वे, उपदेश महत्त्वाचा असताना बहिरंग परिक्षणाची गरज काय? असे कुणाला वाटणे शक्य आहे. त्यामागची भूमिका स्पष्ट करताना अप्पा सांगतात, ''माझ्या डोळ्यासमोर गीतेसंबंधी घेतल्या जाणाऱ्या सर्व आक्षेपांचे ठामपणे प्रतिनिधित्व करणारे काही लोक आहेत. बहुतेक सर्व प्रचारमाध्यमे अशाच विचाराच्या लोकांच्या स्वाधीन असल्याने गीतेसंबंधी घेतले जाणारे पोकळ आक्षेपच सिद्धांतभूत होऊन राहिले आहेत आणि त्याचा परिणाम म्हणून गीतेविषयी तरुण पिढीत जेवढा आदर असावयास हवा तेवढा दिसत नाही. म्हणून गीतेसंबंधी घेतल्या जाणाऱ्या सर्व शंकाकुशंकांना, आक्षेपांना, मन-बुद्धी भरकटविणाऱ्या विचारांना उत्तर देणे मला आवश्यक वाटते.'' या ग्रंथातील पहिला भाग म्हणून शास्त्रशुद्ध, तर्कयुक्त बहिरंग परीक्षणाचा आहे. या कुतर्क परीक्षणात, गीता प्रक्षिप्त आहे. गीतेचे कर्ते काळ वेगवेगळे आहेत. ऐन युद्धाच्या वेळी अर्जुनाशी आत्म्याचे स्वरूप, कर्म, भक्ती, ज्ञान, योग, दैवी-आसुरी संपत्ती इ. युद्धाशी संबंध नसलेल्या गोष्टींची भगवान चर्चा कशाला करतील? त्यांना इतका वेळ कसा मिळाला? तसेच विभूतियोगाची चेष्टा, गीतेने प्रापंचिक कर्तव्याचा ईर्षायुक्त ठसा उमटविलेला नाही. विश्वरूपदर्शनाची कुचेष्टा, युद्धसमयी व्यास, भीष्म, अर्जुन, दुर्योधन इत्यादींची वये अशा अनेक तर्कटी आक्षेपांचे अप्पांनी शास्त्रशुद्ध विच्छेदन केले आहे. ते मुळातूनच वाचून प्रचार-प्रसार योग्य आहे. पूर्ण शास्त्रीय दृष्टीकोन ठेवून परंपरा कशा अभ्यासाव्या, आदर्श बुद्धिवाद कसा असावा, तर्क कसे करावेत या संबंधी अप्पांनी केलेले मार्गदर्शन इतिहासकार, विचारवंत, समीक्षक, ललित-लेखक यांनी अभ्यासावे असे आहे. अप्पांनी जणू आपल्या या भाष्यास्नानाने वाचकांच्या मनबुद्धीवरील दाटलेल्या आशंकांचा मळ साफ करून मगच त्यांना गीतेच्या पवित्र मंदिरात प्रवेश करू दिला आहे! काही महिन्यांपूर्वी हिमालयात भागीरथीने रुद्रावतार धारण करून आपल्या आसपासची अनधिकृत इमारतींची आक्रमणे जशी भुईसपाट केली, त्याचप्रमाणे अप्पांच्या या पवित्र वाक्‌गंगेच्या रौद्ररूप तडाख्याने गीतेवरील आक्षेपांचे उद्दाम इमले जमीनदोस्त केले आहेत! अशी शिक्षा करणारी त्यांची वाक्‌गंगा अर्जुनाच्या भावनेचे, सरळपणाचे, हृदयाच्या कोवळिकीचे वर्णन करताना पुन्हा एकदा प्रसन्न, पावन व वत्सल होते. अर्जुनाच्या सात्विक वृत्तीला ममत्वाचे ग्रहण लागले. अत्यंत पराक्रमी, शूर असा अर्जुन स्वजनांच्या वधाच्या कल्पनेने कासावीस झाला व त्या वृत्तीच्या समर्थनार्थ त्याने वरवर योग्य वाटणारे पण मुळात चूक असलेले प्रश्न भगवंतांसमोर मांडले. त्या समर्थनाचा 'प्रज्ञावाद' म्हणून भगवंतांनी उपहास केला व संपूर्ण तत्त्वज्ञानाचा उपदेश अर्जुनाला केला. अर्जुनाच्या सर्व प्रश्नांची उत्तरे भगवंतांनी दिली. हे सर्वोच्च तत्त्वज्ञान सहज आकलन व्हावे अशा उदाहरणांनी, व सूत्ररूपाने अप्पांनी व्यक्त केले आहे. अति उच्च, समजावयास अवघड असा सिद्धांतही सोपा करून सांगताना त्यातील अगदी सूक्ष्म बारकावासुद्धा सुटणार नाही यात अप्पांचा निसर्गसिद्ध हातखंडा आहे. कुठल्याही कर्तव्याच्या आड येतात ते 'अहं-मम.' हे ठसविताना कुशल शस्त्रवैद्याचे बिनचूक उदाहरण अप्पा देतात. कुटुंब संस्थेचे प्राचीनत्व सांगून सध्याच्या काळी होत असलेली कुटुंबसंस्थेची परवड पुढील पिढीला, समाजाला कशी घातक होत आहे हे सांगताना अप्पांचे द्रष्टेपण सिद्ध होते.

भारतीय नीतिशास्त्र साधुत्वाच्या बळावर दुर्जनत्वाच्या निवारणाचा उपदेश करते. (महाभारत : शांतिपर्व : ९५:१६) आणि ते शक्य नसल्यास 'जशास तसे' तत्त्वाचाही पुरस्कार करते. (गीता ४:११). अहिंसेची अतिरेकी कल्पना अप्पांनी स्पष्टपणे सांगितली आहे. यासाठी सावरकरांनी सांगितलेली 'सद्‌गुण-विकृती' ही संकल्पना व योगी अरविंदांनी व्यक्त केली उदाहरणे चपखलपणे सांगितली आहेत. व्यष्टी सोडून द्या, पण समष्टीच्या पातळीवर अहिंसेचा अतिरेक कसा घात करू शकतो याची कल्पना या अप्पांच्या विवरणामुळे येते. परिवर्तनवाद कसा भोंगळ आहे हे अप्पांच्याच शब्दात वाचण्यात खरी मौज आहे! सध्याच्या काळी मातादिवस, पितादिवस, बंधू-भगिनी दिवस, शिक्षक दिवस (गुरुपौर्णिमा नव्हे), वाढदिवस, आजी/आजोबा दिवस इ. दिन एकत्र जमून साजरे करण्याची एक लाटच आली आहे, भले मग त्यात खरे प्रेम, आदर नसला तरी चालेल! असे 'गेट टुगेदर' सेलिब्रेट करणाऱ्यांना कुळधर्म-कुळाचार, सणवार यांचे मानसशास्त्रीय व सामाजिक महत्त्व सांगून त्यात व्यक्तीचे, कुटुंबाचे, समाजाचे व राष्ट्राचे कसे हित आहे हे अप्पांनी ठासून सांगितले आहे. वर्णसंकर, ईश्वर संकल्पना यांचे सत्यत्व सांगताना सध्याच्या विज्ञानातील अचूक उदाहरणे देऊन ते सिद्ध केले आहे. अप्पा म्हणतात, ''अनुमानाधिष्ठित तर्क विज्ञानातही प्रत्यक्षाइतकाच बलवान मानला जातो.'' आणि याला अनुसरूनच श्राद्धकर्माचे शास्त्रीय दृष्टिकोनातून केलेले त्यांचे विवेचन भल्या भल्या विचारवंतांना, आक्षेपकांना निरुत्तर करणारे आहे. आदर्श बुद्धिवादाची परिसीमा गाठणारे आहे. अत्यंत सूक्ष्म दृष्टी असलेले अप्पा पुढे सांगतात, ''आपण लोकसत्ता मानतो. लोकराज्यात प्रत्येक वयस्क व्यक्ती तत्त्वत: राजकर्ती आहे व त्यामुळे प्रत्येक मतदाराने तत्त्वज्ञ असलेच पाहिजे.'' यामुळे गीतेचे महत्त्व अधिक ठळक होते. सध्याचे देशातील नेते, राज्यकर्ते व मतदार या सर्वांनी आचरणात आणण्यासारखा हा विचार आहे. वंशवादावर भाळणाऱ्या, पोकळ आश्वासनांवर विश्वास ठेवणाऱ्या, प्रचार माध्यमांच्या दिशाभुलीला बळी पडणाऱ्या प्रत्येक मतदारासाठी गीतातत्त्वे आदर्श असलीच पाहिजेत. तरच देशाचे कल्याण होईल. देशात सुराज्य येईल. सुमारे पासष्ट प्रतिशत असणाऱ्या तरुण मतदारांनी अगदी हृदयावर कोरून ठेवण्यासारखा हा विचार आहे. प्रामाणिक, चारित्र्यवान, सदाचारी, देशप्रेमी, कर्तव्यदक्ष व अथक प्रयत्नवादी अशा नेत्यांच्या पाठीमागे आजही भगवंत तितक्याच त्वरेने व प्रेमाने उभे रहातात. याकरिता तरुणाईने ऐहिकाकरिता, अभ्युदया-करिताही गीतेचा अभ्यास अनिवार्य मानला पाहिजे, असे अप्पा सांगतात.

आपल्याकडे व्यक्तिपूजेला फार महत्त्व दिले जाते. योग्य व्यक्तींसाठी तसे असावेही. कारण त्यामुळे समाजापुढे आदर्श रहातो व प्रेरणाही मिळते. पण हे सांगून झाल्यावर लगेचच त्यापुढे धोक्याचा इशारा देताना अप्पा सांगतात, ''महापुरुषांचे जीवन आदर्श असते यात शंका नाही. पण त्यांचे अनुकरण जे करावयाचे असते ते त्यांच्या भावाचे, भूमिकेचे, वृत्तीचे करावयाचे असते. कृतीचे करावयाचे नसते. कृती आचरणात आणताना फार सावधपणा आणि विवेक बाळगावा लागतो.'' समाजहितासाठी हा अत्यंत महत्त्वाचा सिद्धांत आहे. हा सिद्धांत पाळला नाही तर काय होते याचे एक उदाहरण नुकतेच समस्त भारतीयांना माहीत आहे. स्वत:ला भगवान म्हणविणारे, उघड रासलीला रचणारे व रंगपंचमी खेळणारे एक महंत आपल्या चिरंजीवांसकट तुरुंगाची हवा खात आहेत! भोळेपणाने, त्यांच्यावर विश्वास ठेवून, गुरु मानणाऱ्यांनी गीतेचा अभ्यास केला असता तर त्यांना या 'फसव्या गुरूची उत्तम चर्या' केव्हाच ओळखता आली असती! परमार्थाला दोष दिला जातो यामागे प्रत्येक वेळी ह्या अशा वृत्तीच घातक ठरतात, पण तो दोष परमार्थाचा नव्हे तर त्या त्या व्यक्तीचा आहे हे टीकाकार लक्षात घेतील तर बरे!

भाष्याचा समारोप अप्पा एका अत्यंत अर्थगर्भ विधानाने करतात. अप्पा म्हणतात, ''अत्यंत सज्जनपणामुळे अर्जुन उणा पडला तो 'ईश्वरभाव' बाळगण्यात!'' सज्जन राज्यकर्त्यांच्या ठिकाणी ईश्वरभाव असावा लागतो तो, रामराज्य, चाणक्याच्या मार्गदर्शनाने चालणारे चंद्रगुप्ताचे राज्य वा शिवाजी महाराजांनी स्थापिल्यासारिखे समाजहितैषी राज्य स्थापन करण्यासाठी! नव्हे, त्याचे ते कर्तव्यच आहे. अर्जुनाचा विषादयोग समस्त मानवजातीसाठी उपकारक ठरला. प्रत्येकाने या भाष्यातील तत्त्वे आत्मसात करून त्याचा सर्वशक्तीनिशी आचरणयुक्त प्रसार केला पाहिजे. यातच व्यष्टी व समष्टी, दोहोंचेही हित आहे. हाच गीतेचा संदेश आहे. अप्पांची हीच उत्कट इच्छा आहे!

### स्थितप्रज्ञ योग (अध्याय २)

गीतेचा हा दुसरा अध्याय शोकाकुल अर्जुनाने जी विशेष रूपाची शंका व्यक्त केली आहे तिच्या निरसनार्थ आरंभतो आहे. अर्जुनाच्या शंकेचे जे मूलभूत कारण 'ममत्व', ते नाहीसे करण्यासाठी भगवान श्रीकृष्ण येथे सामान्य व्यावहारिक नीतिनियमासवेच परमोच्च प्रतीचे तत्त्वज्ञान सांगत आहेत. अप्पांनी या भगवद्गीतारूपी ज्ञानभांडाराच्या दुसऱ्या अध्यायाला 'प्रदर्शन कक्ष' असे म्हटले आहे. इहलोकीच्या कर्तव्यकर्मापासून ते परमसाध्य अशा मोक्षापर्यंत साधकाला जे जे आवश्यक असते ते सर्व प्रतीकरूपाने या प्रदर्शनकक्षात जणू आकर्षकरीत्या मांडून ठेवलेले आहे. ते पाहून जिज्ञासू साधक ओढ वाटून गीतारूपी ज्ञानभांडारात प्रवेश केल्याशिवाय राहणार नाही, असे वर्णन त्यांनी केले आहे. पटकन मर्म लक्षात येईल अशी व्यवहारातील उदाहरणे देणे ही अप्पांची विलक्षण खुबी आहे. ''मोक्ष म्हणजे दुसरे तिसरे काही नसून प्रसन्न, शांत, आनंदी, स्थिर विवेकयुक्त मन:स्थिती'' अशी अप्पांनी केलेली व्याख्या आहे. आणि खरेच, मनुष्य प्रत्येक गोष्ट करतो ते सुखप्राप्तीसाठीच. पण खरे सुख कशात आहे, काय केल्याने ते लाभेल हे मात्र त्याला ठाऊक नसते. अध्यात्म ही खरे तर मनाशी संबंधितच प्रक्रिया आहे. हा एक प्रयोग आहे. तो अंत:करण-मन-बुद्धी यांच्या सहाय्याने करावा लागतो. यासाठी प्रयत्नपूर्वक मनाला हळूहळू घडवावे लागते. संस्करण करावे लागते. यालाच साधना, उपासना म्हणतात. गीतेमुळे मन तयार होते. असे तयार झालेले मन कोणत्याही विषयाकडे वळले तरी सूक्ष्मदृष्टीने युक्तायुक्त ठरवून निर्णय घेऊ शकते. आजच्या समजेल अशा भाषेत सांगायचे झाले तर गीता हे सर्वकाळी, सर्वांसाठी, अत्यंत आदर्शभूत असे 'मानसशास्त्र' आहे. अप्पांनी आयुष्यभर त्यांच्या वाणीने, लेखणीने मने घडविण्याचेच काम केले. अप्पांचे या अध्यायावरील भाष्य म्हणजे मानवाला केलेले सर्वोच्च असे 'समुपदेशन' (COUNSELLING) आहे!

सध्या समाजमनाची अवस्था अत्यंत बिकट आहे. महिन्याला लाखालाखांचे पॅकेज घेणाऱ्या उपभोक्तावाद व चंगळवादाच्या साथीच्या रोगाला बळी पडणाऱ्यांची संख्या वाढतेच आहे. सुप्रिम कोर्टाने नकार दिल्यानंतरही समलिंगी-संबंधांचे उघड समर्थन करणाऱ्यालाच पुढारलेला समजणारे समतावादी (?) बुद्धीचे तारे तोडताना दिसत आहेत. संताप, नैराश्य, लोभ, मद, मत्सर या मनोविकारांच्या भरात आत्महत्या, खून, बलात्कार यांचे प्रमाण चढते वाढतेच आहे. राजधानीतील हमरस्त्यावर 'मेरी स्कर्टसे उँची मेरी आवाज है।' असे फलक मिरविणाऱ्या तरुणी दिसत आहेत. सर्वत्र भ्रष्टाचार बोकाळला आहे. तरुणवर्ग भ्रमणभाषपीडित होऊन स्वैर वर्तन करण्यात भूषण मानतो आहे. उथळ विचारसरणीमुळे शरीराचे उपभोग हाच परमानंद असे वाटत आहे. थोडे काही विचारी तरुण दिसतात, पण त्यांच्यातही प्रगल्भतेचा अभावच दिसतो. पैसे मिळवून देणाऱ्या विद्येव्यतिरिक्त काही वेगळे, चांगले वाचावे, अभ्यासावे असे त्यांना वाटत नाही. गीतेने 'स्वधर्म' म्हटले तर त्यांना समजत नाही. पण मानसशास्त्र व व्यवस्थापन शास्त्रातील "CORE COMPETENCE' म्हटले की कळते! 'नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सत:।' समजणारच नाही. पण "MATTER CANNOT BE DESTROYED' असे सांगितले की समजते! "FACTORS BEYOND CONTROL' (नियंत्रणाबाहेरील घटक) म्हटले की समजते. पण त्यालाच आम्ही 'दैव' म्हटले की मात्र आम्ही मागासलेले! "FACTOR WITHIN CONTROL' (नियंत्रणातील घटक) म्हटले की पुढारलेला आणि त्यालाच 'प्रयत्नवाद' म्हटले तर तो बुरसटलेला! अशी स्थिती आहे खरी. ऐहिक तृप्ती मिळून सुद्धा माणूस मन:स्वास्थ्य गमावून बसला आहे. या सर्वाचे मूळ कारण म्हणजे बिघडलेली मने! श्रीदासगणूमहाराजांनी याचे नेमके वर्णन केले आहे. ते म्हणतात,

**''जिकडे तिकडे पाप अनन्वित वाण जाहली पुण्याची।**
**म्हणून संकटे घरात घुसली फोडून कवाडे निष्ठेची।।''**

याचा परिणाम म्हणून मानसिक आजार, विकृती, मनाकडून शरीराकडे येणारे आजार यांचे प्रमाण दिवसेंदिवस वाढतच आहे. मानसोपचार तज्ज्ञांची चलती आहे. निरनिराळ्या समुपदेशन तज्ज्ञांनी

गल्लोगली दुकाने थाटली आहेत. प्रगत मानसशास्त्र तरी काय म्हणते? सिगमंड फ्रॉईडचे निष्कर्ष त्याच्या शिष्यानेच खोडून काढले. सध्या मेंदूतील पेशींमधील होणाऱ्या रासायनिक द्रव्यांच्या बदलामुळे मानसिक आजार होतात असे मानले जाते व त्यानुसार औषधे व त्या बरोबर समुपदेशन दिले जाते. अतिसूक्ष्म अशा मनाला स्थूल स्वरूपात असणाऱ्या मेंदूचा विकास समजून उपचार करणे किती घातक आहे? यापेक्षा थोडी बरी व लोकप्रिय होत असलेली 'विवेकनिष्ठ मानसोपचार पद्धती' (REBT; RATIONAL EMOTIVE BEHAVIOUR THERAPY) डॉ. अल्बर्ट एलिम यांनी शोधून काढली. पण तीही परिपूर्ण, सखोल नाहीच. आज डॉ. आनंद नाडकर्णीसारखे मानसोपचारतज्ज्ञ आता या पद्धतीमधील तत्त्वांचा गीता, ज्ञानेश्वरी, तुकाराम गाथा व दासबोध यांच्यातील तत्त्वांशी मेळ दाखवून देणारी पुस्तके लिहित आहेत. निदान तिथून तरी गीतेचे महत्त्व पटू लागले तर उत्तमच म्हणावयाचे! गीतेत सांगितलेली तत्त्वे पालन करणाऱ्याला कुठलाही मानसिक विकार होण्याची थोडीसुद्धा शक्यता नाही! 'अशोच्यानन्वशोचस्त्वं' या अकराव्या श्लोकापासून गीतेतील तत्त्वज्ञानाची सुरुवात होते. एखाद्या उच्च ध्येयासाठी मुळापासून सर्व गोष्टी सांगून हळूहळू मन व बुद्धी तयार करण्याचे काम भगवंतांनी सुरू केलेले आहे. येथूनच अर्जुनाला निमित्त करून समस्त मानवजातीसाठी समुपदेशन सुरू होते. शरीराचे स्वरूप, आत्मा, इंद्रिये, मन-बुद्धी यांचा परस्पर संबंध, त्यांचे स्वरूप या एकापेक्षा एक उच्च अशा तत्त्वज्ञानावरील अप्पांचे भाष्य म्हणजे एक विधिनिषेधशास्त्रच आहे! सत्य ही निसर्गाची देणगी आहे. तो ईश्वरी सत्तेचा भाग आहे. ते सर्वांच्या वर असते, रहाते हे सांगताना सध्या आपण ऐकत असलेला संसद मोठी की न्यायालय मोठे ह्या वादाचा नेमका स्पष्ट उल्लेख केला आहे. गीतेतील तत्त्व न पाळल्यामुळे दुष्टांना सोयी सवलती मिळतील असे स्वरूप न्यायाला आल्याचे ते सांगतात. संसदेतील सदस्यांची जबाबदारी केवढी मोठी आहे हे लक्षात येते. मते देताना विवेक करणे महत्त्वाचे असल्याची जाणीव होते.

देह हा क्षणभंगुर आहे. आत्मा हाच नित्य आहे. त्याला भ्रांति नाही हा मुद्दा ठसविताना त्यांनी दिलेले वैद्यकशास्त्रातील उदाहरण कुणालाही मान्य व्हावे असेच आहे. अप्पा म्हणतात, ''आपले जे 'हवे-नको' आहे ते देहाशी निगडित आहे, फसवे आहे. इंद्रिये, मन, बुद्धी ही एकापेक्षा एक सूक्ष्म आहेत. इंद्रिये स्थूल आहेत पण इंद्रियांनी केलेल्या गोष्टींचे परिणाम मनावर, मनाने केलेल्या गोष्टींचे परिणाम बुद्धीवर होतात. बुद्धीला प्राप्त झालेल्या स्वरूपावर पुढे आत्मदर्शन! हे सगळे एकमेकांशी निगडीत आहे. म्हणून परिणामाचा आरंभ माणसाच्या लक्षात जेथून येण्यासारखा असतो तेथून प्रगतीचा मार्ग सांगितला पाहिजे. म्हणून इंद्रियांना होणारी विषयांची जाणीव जगातील सगळ्या सुखदु:खाला कारणीभूत आहे!'' केवढे अत्युच्च तत्त्वज्ञान अत्यंत सोप्या शब्दात अप्पांनी मांडले आहे. या कारण परंपरेत मनुष्यमात्राच्या सर्व जीवनाचा सिद्धांतच मांडला आहे. इंद्रियसुखाशीच निगडीत असणाऱ्या लोकांच्या मनाच्या अस्वस्थतेचे कारण ते हेच! ही अस्वस्थता झोपेच्या गोळ्यांनी कमी होणारी नाही, तर गीतातत्त्व आत्मसात करण्यानेच शक्य आहे.

आत्मा हा चैतन्यरूपी आहे व तो शरीरापासून भिन्न आहे. याची प्रमाणे देताना वेदान्ताने म्हटले आहे की, पहिले प्रमाण 'युष्मदस्मत्प्रत्ययीभूत' हे आहे. आत्म्याचे देहाव्यतिरिक्त अस्तित्व आपल्या प्रत्ययाला येते. आपण जेव्हा 'मी' शब्द उच्चारतो तेव्हा शरीराच्या कुठल्याही एका वा अनेक अवयवांना असा त्याचा अर्थ नसतो. तर तो शरीराव्यतिरिक्त असणारा शरीराचा स्वामी असा त्याचा अर्थ असतो. देहापासून आत्मा भिन्न दाखविण्याचे दुसरे प्रमाण 'निद्रा' हे होय. मनुष्य जेव्हा झोपतो तेव्हा शरीर व्यापार थंडावतात, पण शरीरावर अंमल गाजविणारे आत्मतत्व जागरूक असते. तिसरे प्रमाण 'महानिद्रा' म्हणजे मृत्यू होय. सर्व अवयव जागच्या जागीच असूनसुद्धा ते आत्मतत्व निघून गेल्याने मृत्यू झाला असे म्हणतो. आत्मा अमर आहे, त्याला जन्म-मृत्यू नाही याबरोबर "MERCIFUL DEATH' या सध्याच्या संकल्पनेबरोबर अप्पांनी अत्यंत काटेकोर तुलना केली आहे. ''प्रकृतिमध्ये काही कळत नाही, तर विकृतीमध्ये जाणीव होते. आत्म्याच्या ठिकाणी कोणताच विकार नाही त्यामुळे तो समजायला कठीण होतो, अचिन्त्य होतो'' हे अप्पांचे प्रतिपादन व पुढे दिलेली आरोग्यशास्त्रातील PERISTALSIS व हृदयातील स्पंदनांची उदाहरणे म्हणजे अप्पांचा "MASTER-STROKE' आहे. जसजसे विज्ञान प्रगत होते आहे तसे तसे ते अध्यात्माच्या जवळ चाललेले आहे. प्रगत भौतिकशास्त्रातील उदाहरणे देऊन अध्यात्म व आरोग्य यांचा परस्पर संबंध व या संबंधात अतिदक्षता विभागातील उदाहरणे आपल्याला स्तिमित करून सोडतात. कुणीही, कितीही मोठा पंडित, बुद्धीवादी असो एकदा का अप्पांच्या विचारसरणीत शिरला की त्यातून बाहेर पडणे कठीण जाते. मोठे मोठे तर्कवीर, बुद्धिप्रामाण्यवादीसुद्धा त्यांच्या प्रज्ञेपुढे, तीक्ष्ण कोटिक्रमापुढे गुंग होतात, निरुत्तर होतात. तरीही प्रतिवाद करण्याचा प्रयत्न करतात. हे आंधळ्याने सूर्य दिसत नाही असे म्हणण्यासारखेच आहे! माणूस म्हणून जन्माला आल्यानंतर कर्म हे चुकण्यासारखे नाही. पण प्रत्येकाचा अधिकार फक्त कर्म करण्याचा आहे, कर्मफलाचा नाही. संपूर्ण मानवजातीसाठी फार महत्त्वाचा सिद्धांत भगवंत इथे सांगत आहेत. शास्त्र सांगते की तुला जेवढे मिळवणे शक्य असेल तेवढे मिळव. पण ते उपभोगण्याचा अधिकार फक्त तुझाच आहे हा विचार सोडून दे. जगामध्ये जर समृद्धी रहावी ही अपेक्षा असेल तर जो हक्क आहे त्यापेक्षा अधिक मिळविण्याऐवजी, त्यापेक्षा जर कमी उपभोगले तरच ते साध्य होईल. सर्वत्र समतोल साधण्याचा किती नैसर्गिक उपाय आहे हा! असा कर्मे करताना मनाचा समतोलपणा साधणे याचसाठी गीता उपदेश करते आहे. हा असा मनाचा समतोपणा साधणे म्हणजे 'योग' असे गीता म्हणते.

संप्रदाय अनुयायी कसा वाद घालतो याचे सध्या सतत दिसणारे उदाहरण देताना अप्पा म्हणतात, ''कर्मावाचून कोणालाही रहाता येत नाही. संन्यासधर्माचा पुरस्कार करणारे श्री शंकराचार्यही रेल्वे, मोटार इ. वहाने नसलेल्या काळामध्ये आसेतुहिमाचल तीन वेळा हिंडले, हे कर्म नाही का? बौद्धांनी नारायणाची मूर्ती बदरीनाथ येथील अलकनंदेच्या

डोहात टाकून दिलेली शंकराचार्यांनी तेथे जाऊन बाहेर काढली, हे कर्मच आहे ना? लोकमान्य टिळकांना जे अपेक्षित आहे, ते सर्व शंकराचार्यांनी केले, पण तरी त्यांचे अनुयायी मात्र टिळक-शंकराचार्यांचे मतभेद चव्हाट्यावर आणतात, याचे कारण एकच की आम्ही मोठ्या लोकांची भूमिकाच समजू शकत नाही! श्री शंकराचार्यांनी त्यांच्या काळातला समोरचा पेशंट बघून ट्रिटमेंट सांगितली आहे. त्यावेळी लोकांची भोगैश्वर्यप्रसक्ती इतकी वाढली होती की तुम्हाला गाढ झोप हवी असली तरी थोडे कमी खा, म्हणून सांगावयाची वेळ होती.'' टिळकांनी त्यांच्या वेळेला 'मी-माझे बरे' अशा असलेल्या समाजमनाला कर्मयोगाचे महत्त्व प्रतिपादित करून राष्ट्राला दास्यातून मुक्त करण्यासाठी प्रेरित करण्यासाठी गीतेचा कर्मयोगपर अर्थ लावला. गीतारहस्याचे नीट अध्ययन केल्यास टिळक स्वत: गीतातत्त्व जगणारेच होते हे समजून येते. श्री शंकराचार्यांबद्दलची त्यांची किती पूज्य बुद्धी होती हे त्यांनी लिहूनच ठेवले आहे. मोठ्या आदरणीय, पूज्य विभूतींना आपल्या बुद्धीने मोजताना किती सावधपणा दाखविला पाहिजे हे अप्पांनी दिलेल्या वरील उदाहरणावरून नीट लक्षात येते.

ज्याचे मन अतिशय सावध आहे, तो अत्यंत दक्ष आहे, असा 'मनीषी' कर्मफलाचा त्याग करून सर्व कर्मे अत्यंत काळजीपूर्वक करीत राहतो त्याचेच मन स्थिर होते. म्हणजे काय होते ते भगवंत पुढे अर्जुनाने विचारल्यावरून स्थितप्रज्ञाच्या लक्षणांमधून सांगतात. अप्पा सांगतात, ''हा भगवंतांनी सांगितलेला स्थितप्रज्ञ कुठून आकाशातून पडत नाही, की जमिनीतून उगवत नाही. हा सर्वसामान्य माणसातूनच बनत जातो.'' असा मन-वाणी-इंद्रियांवर नियंत्रण प्रस्थापित झालेला, कुठलीही आसक्ती वा द्वेष नसलेला, सर्वांभूती समबुद्धी ठेवणारा, शांतचित्त म्हणजे 'स्थितप्रज्ञ!' अशी स्थिती प्राप्त करून घेणे हाच मोक्ष! सामान्य माणसापासून स्थितप्रज्ञापर्यंत असा उन्नतीचा क्रम सांगून झाल्यावर भगवान अध:पाताचाही क्रम सांगतात. विषयाचे सतत चिंतन करीत राहिल्याने आसक्ती निर्माण होते. त्यातून काम उत्पन्न होतो. कामातून क्रोध, क्रोधातून संमोह, संमोहातून स्मृतिभ्रंश, स्मृतिभ्रंशातून बुद्धिनाश आणि बुद्धिनाशातून शेवटी संपूर्ण विनाश असा हा अध:पाताचा प्रवास आहे. खरोखरच सर्वसामान्य माणसांमध्ये या पातळ्या दिसतातच. कुणी विषयाच्या चिंतनाच्या स्तरावर तर कुणी विनाशाच्या अगदी शेवटच्या पायरीवर! या अध्यायावरील अप्पांचे भाष्य महाविद्यालयातील (सर्व शाखांच्या) अभ्यासक्रमात समाविष्ट केले पाहिजे इतकी त्याची आजच्या समाजमनाला गरज आहे. अगदी जिथे आहे तिथून सर्वोच्च प्रगती शक्य आहे. ती प्रयत्नाने कशी साध्य करता येणे शक्य आहे हे या भाष्यामुळे नीट लक्षात येते. एकदा चर्चेत मी अप्पांना विचारले की प्रत्यक्षात प्रयत्न करीत असताना आपली प्रगती होते आहे हे ओळखण्याचे साधन काय? खूण कोणती? अप्पांनी दिलेले उत्तर प्रत्येकाने अंत:करणावर कोरून ठेवण्यासारखे आहे. अप्पा म्हणाले, ''स्वत:कडे थोडे दुरून पाहता आले पाहिजे. असे केले म्हणजे योग्य काय अयोग्य काय हे विचाराने ठरविता येते. शेवटी हे मनाला हळूहळू नियंत्रित करणेच आहे. परवापेक्षा काल, कालच्यापेक्षा आज सुधारणा होत आहे का हे पहावे लागते. आपले 'हवे-नको' किती कमी झाले आहे, होत आहे हे पहावे लागते. हाच प्रगती होते आहे हे जाणण्याचा एकमेव मापदंड आहे!'' इथे कुठेही अमूक प्रकारचा अनुभव येतो, अमूक प्रकारची दर्शने होतात वगैरे कशाचाही उल्लेख अप्पांनी केला नाही. या प्रगतीच्या मापदंडात कुठेही चमत्काराचा उल्लेख नाही हे विशेष! अर्थातच संपूर्ण गीतेतही कुठेही चमत्काराचा उल्लेख नाही. चमत्कारांवर भारुडकथा म्हणून टीका करणाऱ्यांनी व चमत्कार म्हणजेच अध्यात्म असे समजणाऱ्या भोळ्या भाविकांनी ही गोष्ट नीट लक्षात ठेवली पाहिजे. मन तयार होते आहे, हळूहळू प्रगती होते आहे हे ओळखण्याची खुबी अप्पा सांगत होते. मनाला हळूहळू कसे घडवावे लागते याचे अगदी प्रत्यक्ष व्यवहारी कृतिशास्त्र आम्ही स्तिमित होऊन ऐकत होतो. तिथे उपस्थित असलेल्या माझ्या एका मराठी 'कच्चे' असलेल्या मित्राच्या चेहऱ्यावरील प्रश्नचिन्ह पाहून अप्पा उद्‌गारले, ''अरे लक्षात ठेव. सोपे आहे. NO SUPPRESSION, NO CONDITIONING, BUT CONTROLLD TRAINING!" स्थितप्रज्ञ अवस्था प्राप्त करून घेण्याची व त्यासाठी कराव्या लागणाऱ्या प्रयत्नाचे सूत्र अत्यंत सोप्या शब्दात विलक्षण खुबीने अप्पांनी सांगितले. हे एकवाक्यी मानसशास्त्र आहे. एका वाक्यात सांगितलेले गीतातत्त्वाचे सार आहे!

### कर्मयोग (अध्याय ३)

दुसऱ्या अध्यायात फळाची अपेक्षा न ठेवता निष्काम कर्म आचरण्याचा, उपदेश भगवंतांनी केला. स्थितप्रज्ञ अवस्था व लक्षणे भगवंतांनी वर्णिली. आदर्श स्थिती एकदा सांगून झाल्यावर त्या आदर्शापर्यंत कसे पोहचावे हे या तिसऱ्या अध्यायात भगवंत सांगतात. मानवी जीवन हे सुखोपभोगार्थ नसून धैर्याने, उत्साहाने व निष्काम बुद्धीने कार्य आचरण्यासाठी आहे असे गीता सांगते. मानव म्हणून जन्माला आला म्हणजे कर्म हे करावेच लागते. जिवंत असणे म्हणजेच कर्म करणे. दोन्ही जणू समानार्थी शब्द आहेत. व्यक्तिधर्म व समाजधर्म हे एकरूप असून 'शांती व पुष्टी', 'प्रेय व श्रेय' या दोहोंचा समन्वय हेच गीतेतील कर्मयोगाचे वैशिष्ट्य आहे. त्यामुळे ज्याला पारमार्थिक ओढ फार नाही वा अगदी नाहीच, पण संसार, व्यवहार व्यवस्थित करावयाचा आहे त्यालाही या अध्यायातून मार्गदर्शन मिळेल. फक्त भौतिक सुखाच्या पायावर रचलेल्या आधुनिक संसारशास्त्राचे पालन करून सुखी झालेला कुणीही आढळत नाही. श्री ज्ञानेश्वरीच्या आधाराने केलेल्या या तिसऱ्या अध्यायावरील भाष्यात अप्पांनी अगदी आधुनिक अशा संसार शास्त्राचा अध्यात्मशास्त्राशी अत्यंत सुसंगत असा मेळ साधलेला आहे. या भाष्यात जर काही अपूर्वता असेल तर ती हीच असे म्हणता येईल! अप्पांच्या प्रत्येक शब्दाशब्दात त्यांची समाजनिष्ठा अगदी भरून राहिलेली आढळते. समाजाचे अध:पतन रोखण्यासाठी समाजाचे संघटन व समाजाची पुनर्घटना या अंगांचा शास्त्रशुद्ध विचार हा या भाष्याचा मूळ गाभा आहे. समाजाच्या, देशाच्या आत्यंतिक कनवळ्यामुळे धर्म, नीतितत्त्वे, ऐहिक-आध्यात्मिक जीवनाचा उत्कर्ष, आचार-विचार, रक्षण इत्यादी मनुष्याच्या आत्यंतिक हितांच्या गोष्टींवर अप्पांचे परखड विवेचन त्यांची समाजचिंतनातील सूक्ष्मता आणि द्रष्टेपणाच सिद्ध करते.

व्यक्तिजीवनातून समाजाची उन्नती आणि समाजजीवनातून व्यक्तिजीवनाला प्रेरणा यांचा इतका अप्रतिम समन्वय अप्पांच्या या भाष्याव्यतिरिक्त इतरत्र क्वचितच आढळेल! आणि या सर्वाच्या मुळाशी ईश्वराचे सततचे अधिष्ठान आहे. समाजातील उघड व छुपे दुर्गुण उघडकीस आणून समाजाला त्यांची नीट ओळख करून देऊन ते नष्ट करण्याची अंत:प्रेरणा समाजाला देणे व त्यासाठीचा योग्य मार्ग दाखविणे हेच तर संतांचे प्रमुख कार्य आहे.

**''मग ते शहाणे नीट करिती। स्वये साहोन साहविती।**
**स्वये करून करविती। लोकांकरवी।।''** (दासबोध १८:१०:४२)

अप्पांचेही हेच जीवन कार्य आहे! जगण्यासाठी कर्मे तर करावीच लागतात. ती टाळता येत नाहीत, कर्मे मग ती प्रिय असो वा अप्रिय करावी लागतातच. मग ती उत्तम रीतीने कशी करावीत म्हणजे समाधान व शांती लाभेल याची युक्ती म्हणजेच अप्पांचे हे भाष्य! अप्पांच्या बाबतीत त्यांचा शब्द आधी, मग अर्थ असतो! ''ऋषींनां पुनराध्यानां वाचमर्थोऽनुधावति।'' अशी त्यांची स्थिती आहे. अनुभवावर पारखून घेतलेले त्यांचे चिंतन किती सखोल आहे, याचे प्रत्यंतर या तिसऱ्या अध्यायावरील भाष्यातही येते. ग्रंथ वाचताना अनेक वाक्यांपाशी थबकायला होते. अशी सहजवाक्ये विचार करावयास प्रवृत्त करतात आणि आत्यंतिक आनंदही देऊन जातात. या ग्रंथातही अप्पांची अनेक वाक्ये 'सुभाषित' या अभिधानास पात्र आहेत. नुसती ही वचने जरी आत्मसात केली तरी संपूर्ण ग्रंथाचा अंतरंगप्रवास घडून जातो. काही उदाहरणेच देतो.

१) निस्वार्थ आचरण हाच स्वधर्म.
२) हितावर दृष्टी ठेवून केलेले स्वार्थनिरपेक्ष कर्म म्हणजे – यज्ञ.
३) खरोखरीच कृपा काय, भाग्य काय किंवा सुदैव काय ही देणगी नसून श्रद्धेच्या वा पुण्याच्या पतीवर वटली जाणारी हुंडी आहे.
४) निष्ठा म्हणजे मत नव्हे. जीवनाच्या उन्नतीसाठी श्रद्धापूर्वक आग्रहाने स्वीकारलेले आचरणयुक्त तत्त्वज्ञान म्हणजे निष्ठा.
५) ज्ञानावाचून कर्माला निष्कामता येत नाही. आणि निष्काम झाल्यावाचून कर्माला योग्यता प्राप्त होत नाही.
६) अधिकारपरत्वे आपल्या वाट्याला कर्माचा जो जो भाग येईल तो स्वधर्म समजून यथासांगपणे प्रयत्नपूर्वक करीत रहाणे हेच आपले कर्तव्य आहे. अशा कर्तव्याच्या गोष्टी बुद्धिपूर्वक टाळल्या म्हणजे जी निष्क्रियता येते यालाच जर कोणी निष्कर्मता समजेल तर तसे मानणे वेडेपणाचे ठरेल.
७) परमार्थामध्ये प्रमाणापेक्षा प्रकाराला महत्त्व आहे.
८) शास्त्रकारांना दमन अपेक्षित नाही पण स्वैराचार मात्र निश्चितपणे नको आहे.
९) स्थितप्रज्ञ आणि समाधानी हे समानार्थी शब्द आहेत.
१०) व्यापक क्षेत्रातील दीर्घकालीन अनुभवावर आधारलेले शास्त्र कोणाही एकाच्या बुद्धीपेक्षा जास्त प्रामाणिक असते.
११) शास्त्राधार हे गच्चीच्या कठड्यासारखे आहेत. त्यांचे नुसते अस्तित्वही माणसाच्या अंत:करणात विश्वास उत्पन्न करते.
१२) आज दिसणारा अध:पात निवृत्तिवादामुळे झालेला नसून वैराग्याच्या दंभाने झाला आहे. खरी विरक्ती कोणाचाही घात करीत नाही.
१३) माणसाची वृत्ती अशी बनली पाहिजे की विषयसेवन आवश्यक नसेल तेव्हा त्याच्या आठवणीने अस्वस्थता येता कामा नये.
१४) जीवनात कर्म जे करावयाचे आहे ते क्रिया आणि प्रतिक्रियेच्या भावनेतून करता कामा नये. तर हितकर-अहितकर, विहित-अविहित यांचा विचार करून केले पाहिजे.
१५) खरे म्हटले तर माणसाला बंधने त्रासदायक होत नाहीत. बंधनाची होणारी जाणीव त्रासदायक वाटत असते.
१६) फळावर दृष्टी ठेवून कर्म करावयास लागले की कर्माचे कौशल्य उणावते.
१७) कर्माचे फळ सहजासहजी मिळाले तर ते भोगू नये, असा शास्त्राचा आग्रह नाही. फलाच्या भोगाची आसक्ती ठेवून कर्म करू नये अशी शास्त्राची इच्छा आहे.
१८) माणूस कर्मामध्ये स्वतंत्र आहे. तो परतंत्र असतो केवळ भोगात.
१९) निसर्गाच्या राज्यात चुकीला क्षमा नाही. तेथे आहेत ते फक्त नियम.
२०) कृत्य ईश्वरार्पण होण्यासाठी त्यात स्वार्थाचा वा अहंकाराचा अभाव असला पाहिजे.
२१) स्वत:मध्ये वैगुण्य निर्माण झाल्यावाचून बाह्य गोष्टी बाधक होत नाहीत.

अशी कितीतरी सुभाषिते मनबुद्धीत सद्विचारांची स्पंदने निर्माण करतात.

समाजासाठी एक अत्यंत महत्त्वाचा विचार अप्पा मांडतात. कुठलेच कर्म कधीही फुकट जात नाही. ते या ना त्या रूपाने भोगावेच लागते. जिवंत असतानाच नव्हे तर मेल्यानंतरही कर्मफल पाठ सोडीत नाही. व्यक्तिस्वातंत्र्याच्या खुळ्या कल्पनेमुळे माझे जे आहे, असेल त्याचा समाजाशी काय संबंध? माझे जीवन हा माझा हक्क आहे. मी मला पाहिजे तसा वागेन असे मानणाऱ्यांचा एक मोठा गट समाजात निर्माण झालेला आहे. त्यांना अप्पा बजावतात, ''माणसालाच कर्म भोवते असे नाही तर ते समाजाला, राष्ट्रालाही भोवते. इतिहासात एका पिढीच्या चुकीचे परिणाम पुढील पिढीला भोगावे लागतात. याची उपपत्ती कर्मफलाच्या कल्पनेमुळेच लागते. म्हणून सतत चांगले कर्म केले पाहिजे. व्यक्ती म्हणून स्वतंत्रता असली तरी ती समाजाशी बांधली गेलेली असते. म्हणून व्यक्तीच्या बऱ्या वाईट कर्माचे परिणाम कुटुंब, समाज, देशाला प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष रीतीने भोगावेच लागतात.''

स्वधर्म म्हणजे आपल्याला विहित, उचित, योग्य, हितकर, परिणामी सुखकर ते ते कर्तव्यबुद्धीने करीत रहाणे. दु:ख, आपत्ती, संकटे अस्वास्थ्य, पीडा या सर्वांचे मूळ कारण म्हणजे स्वधर्मत्याग. म्हणजेच अधर्माचरण हे आहे. आणि सुख, संपत्ती, ऐश्वर्य, आनंद, समाधान, प्रसन्नता याचे मूळ कारण स्वधर्माचरण, सदाचार हे आहे. कारण (कॉज) आहे, पण कार्य (इफेक्ट) दिसत नाही, असे क्वचित संभवते. पण कार्य

आहे आणि कारण नाही असे मात्र कधीच घडत नाही. खरोखरच आपण कर्मे करताना चांगले किंवा वाईट याचा विचार करतो का ? मग आपली स्थिती वाईट याचा दोष परमेश्वरावर आपण टाकला तरी तो परमेश्वराकडे कसा जाईल? कारण 'आत्मैव ह्यात्मनो बंधु: आत्मैव रिपुरात्मन:' असे गीतेने स्पष्ट म्हटले आहे. म्हणून गीतेत जो कर्मयोग सांगितला आहे तो लाभालाभ, जयापजय वगैरेबद्दल समदृष्टी ठेवून कर्मे करण्याचा योग आहे. हा योग पातंजल योगी होण्याचा नव्हे तर कर्मयोगी होण्याचा आहे. असा कर्मयोगी समाजात असण्याचा फायदा हाच की त्यामुळे समाजाला त्याच्या वर्तनापासून खूप काही मार्गदर्शन लाभते. हे एकविसाव्या श्लोकांवरील भाष्यात अप्पांनी प्रतिपादले आहे.

अध्यात्माने लोकांना कर्तव्यविन्मुख केले. निवृत्तमार्गावर आणून सोडले व त्यामुळेच देशाचे अतोनात नुकसान झाले, अशी टीका काही नास्तिक अविचारवंत सतत करीत असतात. त्याला सडेतोड उत्तर देताना अप्पा गर्जतात, ''निवृत्तिमार्गातच प्रवृत्ती मार्ग येतो. निवृत्ती सांगितली आहे पण ती कशापासून तर काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर यापासून. स्वार्थी, संकुचित विचारांपासून, जगापासून निवृत्ती नव्हे.'' म्हणूनच येथील कर्मयोग हा संपूर्ण प्रयत्नवादाचा पुरस्कार करून उत्साह वाढविणारा आहे. विन्मुख करणारा नाही, तर उद्युक्त करणारा आहे, हे नीट लक्षात घेतले तर अध्यात्माने निवृत्तिवादाचा प्रसार केला, लोकांना प्रयत्नांपासून विन्मुख केले हा प्रचार किती खोडसाळ आहे हे लक्षात येते.

निसर्गक्रमाचे चक्र-कर्म-यज्ञ-पर्जन्य-अन्न-जीवसृष्टी समजावून सांगताना प्रत्यक्ष विज्ञानाची साक्ष व उदाहरणे देऊन हा मुद्दा अत्यंत समर्पकरीत्या स्पष्ट केला आहे. यापुढे अधिक वरची पायरी भगवंत सांगत आहेत. सर्व कर्मे स्वधर्म समजून निष्काम भावनेने करावीत व अहंकाराचा संपूर्ण त्याग करावा. अप्पा लिहितात, मी माझे सुटल्यावर कर्माला अधिष्ठान कोणते? हे सर्व जे काही घडते ते ईश्वराच्या प्रेरणेने घडत असते. म्हणून जे जे कर्म करावे ते अहंकार सोडून. परमेश्वराला अर्पण करावे म्हणजे कर्तृत्वाचा अहंकार जो असतो तो रहात नाही. असे जे ईश्वराला अर्पण केलेले, फलाची अभिलाषा नसलेले, अहंकाररहीत कर्म म्हणजे कर्मयोगाचा आदर्श आहे. परमेश्वराला अशी स्वकर्माची फुले वाहून केलेली पूजा अत्यंत प्रिय आहे.

सर्वकाळी सर्वांना पडणारा प्रश्न पुढे अर्जुन भगवंतांना विचारत आहे. ''देवा, कोणाच्या प्रेरणेने मनुष्य पाप करतो. त्याची इच्छा नसली तरी बळाने लादल्याप्रमाणे त्याच्याकडून पाप घडते हे कोणामुळे घडते?'' यावर, ''मनुष्याच्या अंत:करणातील काम, क्रोध, माणसाकरवी पाप घडवितात'' असे भगवंत उत्तर देतात. अप्पांचे यावरील भाष्य अत्यंत परखड, सध्याच्या परिस्थितीचे अचूक मूल्यमापन करणारे आहे. या विवेचनाद्वारे प्रत्येकाने आपल्या स्वत:ला तपासून घेतले पाहिजे. अप्पा सांगतात, ''काम, क्रोध हे रजोगुणामुळे उत्पन्न होतात. ते इंद्रिय, मन, बुद्धी यांच्या आश्रयाने लपून राहतात. याचीच परिणती पुढे आसक्ती व द्वेषामध्ये होते.'' विवेक आणि संयम बाळगून सुरुवात इंद्रिये आवरण्यापासूनच करावी लागते.

**''मन गया तो जाने दे, मत जाने दे शरीर**
**नहीं खिंची कमान तो कहा से छूटेगा तीर''**

या कबीर वचनाची साक्ष अप्पा देतात. याच्यापुढची पायरी म्हणजे मनातही पाप येऊ न देणे. शरीराच्या मानाने (अवयवांचा विचार करता) इंद्रिये ही सूक्ष्म आहेत. मन हे इंद्रियांच्या पलीकडे आहे. बुद्धी मनाच्या पलीकडे आणि आत्मा बुद्धीच्याही पलीकडे आहे. म्हणून बुद्धीच्याही पलीकडे असलेल्या आत्म्याची नीट ओळख करून घ्यावी. मग त्या बळावरच स्वत:च्या मनाचे, बुद्धीचे नियंत्रण करून घ्यावे. काम क्रोधांना जिंकण्याचा हाच एकमेव उपाय आहे, असे भगवंत बेचाळीस व त्रेचाळीस या शेवटच्या श्लोकात सांगतात. अप्पा सांगतात, ''शरीरापासून बुद्धीपर्यंत कामक्रोधांचा नको तो भाग काढीत गेले की आत्मदर्शन होते. काय काढून टाकावे आणि कसे काढून टाकावे याची कल्पना यावी लागते, ती मात्र उपदेशाने, संस्काराने येते!'' ही कल्पना यावी यासाठीच संत अहोरात्र मार्गदर्शन करीत असतात. या गीतेच्या अध्यायत्रयीवरील भाष्याचे अवतरण मनुष्यमात्राच्या उन्नतीसाठीच झाले आहे. जितक्या श्रद्धेने आपण या तत्त्वांचे अनुसरण करू तितके ते आपल्याच फायद्याचे आहे. कुठल्याही गोष्टीचा प्रथम वाचनाने मन बुद्धीवर जो संस्कार होतो तो दूरगामी असतो. तो पुसणे कठीण जाते असे सध्याचे समाजसंस्कार शास्त्र सांगते. नंतर त्यापेक्षा वेगळ्या मताचे वा विचारांचे काही वाचले तर ते एवढे ठसत नाही. यासाठीच लहान वयापासूनच पहिले संस्कार चांगले होण्यासाठी गीता तत्त्वांचे धडे मुलांसमोर, तरुणांसमोर आले पाहिजेत. या तीनही अध्यायांवरील अप्पांचे हे भाष्य ग्रंथ कुठल्याही शाखेच्या पदवीपूर्व व पदव्युत्तर अशा अभ्यासक्रमात सक्तीचे म्हणून ठेवले पाहिजेत. त्यावर चर्चा झाली पाहिजे. आजच्या तरुणांसमोर चांगले काय आहे ते येतच नाही. मग त्यांना याचे महत्त्व पटणार तरी कसे? नवीन, कधीही कल्पनाही न केलेल्या अशा गोष्टी त्यांच्या समोर मांडल्या, तर त्या त्यांना पटतात सुद्धा! अत्यंत नास्तिक बुद्धिवादी, एकांगी विचारांचे संस्कार झालेले तरुण सुद्धा अप्पांशी चर्चा झाल्यानंतर भारावून नतमस्तक झालेले मी पाहिलेले आहेत. या दृष्टीने या ग्रंथाचा अधिकाधिक प्रसार व त्यानुरूप आचरण होणे समाजाच्या दृष्टीने आत्यंतिक हिताचे आहे. ती. प. पू. स्वामी वरदानंद भारती (अप्पा) यांनी साचा तयार करून ठेवला आहे. आपण आपली अंत:करणे त्यात घालून घेऊया. यातच आपले सर्वांचे कल्याण आहे!

श्री सद्गुरुंच्या चरणी माझी ही वेडीवाकडी सेवा समर्पित करून हा लेखनकर्म प्रपंच आवरता घेतो.

**।। श्री नारायणार्पणमस्तु ।।**

**डॉ. परिमल मधुकर जोशी**
फ्लॅट नं. ११ + २२ शलाका अपार्टमेंटस
नीलकमल सोसायटी, कर्वेनगर, पुणे ४११ ०५२
मधुर भ्रमणभाष - ९८२२०५४०५८

●●●



# जे करणे असेल ते खरे करा तत्त्वत:

## (गीता अध्याय ४ ते ६)

**डॉ. सौ. स्वाती सुधीर शिरडकर**

एम्.बी.बी.एस्.एम्.डी. (स्त्री रोग)
विभागप्रमुख, एम्.जी.एम्.,
वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, औरंगाबाद

गीता हा केवळ सातशे श्लोकांचा ग्रंथ पण भारतीय तत्त्वज्ञानाचे सर्व वैशिष्ट्य त्यात समाविष्ट आहे. प्रत्येक मतसंस्थापक आचार्यांना आपले तत्त्वज्ञान मांडण्यासाठी त्यात आधार मिळाला. पण वरवर विरोधी भासणाऱ्या या मतांमुळे जनसामान्यांची मात्र पंचाईत होते. कुठले खरे मानायचे? त्यात पुन्हा 'संन्यास' शब्दामुळे गोंधळ उडतो. रूढ अर्थाप्रमाणे 'संन्यास' म्हणजे सर्वसंगपरित्याग. मग गीतेत सांगितल्याप्रमाणे आचरण हे संन्यास घेतल्यावरच शक्य आहे असा गैरसमज होतो. त्यामुळे तरुणपणी गीता आणि त्यावर आधारित ग्रंथ याकडे ढुंकूनही न बघण्याची वृत्ती समाजात दिसते. मग त्याप्रमाणे आचरण तर दूरच. या समजाला छेद देणारा 'गीतारहस्य' हा ग्रंथ उत्कृष्ट तर खराच, पण सहज पचनी पडणारा नव्हे.

अशा परिस्थितीत लोकमान्यांनी गीतारहस्यात मांडलेले मत व आद्यशंकराचार्यांनी मांडलेले मत यात विरोधाभास नसून सुसंगतीच आहे. आपण ती समजण्यात कमी पडतो हे जाणून प.पू. स्वामी वरदानंदभारती (पू.अप्पा) यांनी आपल्याला समजेल आणि इच्छा असेल तर त्यातल्या काही गोष्टी तरी आचरणात आणता येतील अशा पद्धतीने गीतेचे तत्त्वज्ञान मांडले. ते म्हणतात, गीता हा तरुणांचा विषय आहे. ज्यांना लढायचे आहे, पराक्रम करायचा आहे, चारी पुरुषार्थ साधून जीवनात यशस्वी व्हायचे त्यांच्यासाठी आहे.

देवावर श्रद्धा ठेवणारा माणूस दैववादी, निष्क्रिय बनतो, त्यामुळेच आपली अधोगती झाली असा जो आरोप होतो, त्यात निष्क्रियतेमुळे अधोगती झाली हा भाग खराच पण ही निष्क्रियता देवावरच्या श्रद्धेमुळे नव्हे तर तत्त्वज्ञान समजून न घेतल्याने अंगी आली आहे आणि ती दूर करायची तर तत्त्वज्ञान समजून आचरणात आणणे हाच उपाय, असे पू. स्वामींचे ठाम मत. गीतेच्या चौथ्या, पाचव्या व सहाव्या अध्यायावरील त्यांचे विवेचन प्रत्येकाच्या आयुष्याला दिशा देणारे आहे.

कर्मयोग सांगून झाल्यावर अर्जुन विचारतो, 'माणसाला पाप करण्याची इच्छा का होते?' अगदी आमच्या मनातलाच प्रश्न. कारण जर प्रत्येकाच्या हृदयात ईश्वर आहे तर तो त्या व्यक्तीकडून वाईट काम कसे घडू देतो? त्यात सहभागी कसा होतो? मग व्यक्तीइतकाच ईश्वरालाही दोष लागतो का?

भगवंत म्हणात, जगातल्या सर्व घटना ईश्वरी सत्तेने घडतात. इच्छेने नव्हे. जगातले चैतन्य म्हणजे ईश्वर बाकी सगळी मशिनरी आहे. एकच वीज निरनिराळ्या यंत्रात निरनिराळी कामे करवते. पाणी थंड करणे किंवा गरम करणे अशी टोकाची कामे एकाच विजेने होतात. त्या विविधतेला मशिनरी जबाबदार असते, वीज नाही. पण विजेशिवाय मशिनरी व्यर्थ आहे. तसेच ईश्वरी सत्तेने कामे होतात पण कामाच्या स्वरूपासाठी आपणच जबाबदार असतो. म्हणून चांगले / वाईट काम कुठले याचा निर्णय आपल्यालाच घेता आला पाहिजे.

हा निर्णय कसा घ्यावा हे भगवंताने अर्जुनालाच का सांगितले? कारण तो सखा अर्थात सारख्या हृदयाचा, समान विचाराने चालण्याची क्षमता असणारा आहे. ही क्षमता त्याच्यात का आली? तर तो श्रद्धावान, प्रामाणिक व जिज्ञासू आहे. अधिकारी व्यक्तीकडून जे ऐकले ते आचरणात आणले पाहिजे तरच ऐकणे या शब्दाला अर्थ येतो याची त्याला जाणीव असल्याने तो सातत्याने तसे प्रयत्न करतो; म्हणून ही क्षमता आली. शिवाय तो नेता असल्याने लोक आपोआपच त्याचे अनुकरण करतील व धर्माने वागतील हाही दृष्टिकोन.

अर्जुनाला देत असलेले ज्ञान किती प्राचीन आहे हे सांगताना भगवंत स्वत:च्या अनेक जन्मांचा उल्लेख करतात. अनादि अनंत भगवंताचे अनेक जन्म कसे काय हा प्रश्न पडतो. पू. स्वामी म्हणतात, जसे सूर्याचे उगवणे वा मावळणे अथवा डोळे मिटल्यावर अंधार, उघडल्यावर उजेड होणे हे विज्ञानाच्या दृष्टीने खरे नाही, तो व्यक्तिसापेक्ष अनुभव आहे तसेच. ईश्वर असतोच. त्याच्या संबंधात एखाद्याला त्याचे ज्ञान होणे हे ईश्वराचे प्रकटीकरण किंवा जन्म. म्हणून ईश्वर ही माणसाची निर्मिती नाही, शोध आहे. जसे कोलंबसाने अमेरिकेची निर्मिती केली नाही, शोध लावला तसेच.

असे ज्ञान मिळाल्याने काय होते तर हा ज्ञानी माणूस जिवंतपणीच मोक्ष प्राप्त करतो. हा मोक्ष म्हणजेच संपूर्ण स्वातंत्र्य. सतत टिकणारी तृप्तावस्था. हेच आपल्या संस्कृतीत जीवनाचे परमोच्च ध्येय मानले आहे. तेथे पोचण्याचे मार्ग भगवंत गीतेत सांगत आहेत.

ज्याला हे ज्ञान मिळवायचे त्याला अर्जुनासारखी पात्रता अंगी आणावी लागते. त्यासाठी राग (आसक्ति) भय व क्रोध सोडावे लागतात. आसक्तीचे अगदी समजण्यासारखे उदाहरण पू.स्वामी देतात– भूक लागणे नैसर्गिक आहे. पण ती भूक भागवण्यासाठी चिवडा, लाडू

किंवा चकलीच हवी ही आसक्ति, त्यात पुन्हा किती पाहिजे हे भुकेवरून न ठरता त्याच्या पानात आहे त्यापेक्षा जास्त. या तुलनेमुळे आसक्तीला काही मर्यादाच रहात नाही. त्यातून गरजेपेक्षा जास्त साठवून ठेवण्याची वृत्ती येते, मग जवळ आहे ते जाणार तर नाही, असे भय निर्माण होते. क्रोध हाही भयाचाच परिणाम असतो, कारण भयाच्या प्रतिकाराचे जे दोन मार्ग, पलायन आणि आक्रमण, त्यातल्या आक्रमणासाठी क्रोध उपयोगी पडतो. हे राग, भय, क्रोध, प्रयत्नपूर्वक कमी करावे लागतात, मग अंत:करणात ईश्वर आहे याचे भान येते, अन्यथा त्यातच गुरफटून जायला होते.

एकदा ईश्वराच्या अस्तित्वाचे भान निर्माण झाले की ईश्वरमय होण्यासाठी तप करावे लागते. कष्ट होत असताना सुद्धा ध्येयप्राप्तीसाठी सातत्याने प्रयत्न करणे म्हणजे तप. पू. स्वामी इथे बाळंतपणाच्या कळा सोसणारी माता किंवा हिमालयातला प्रवासी यांचे उदाहरण देतात. ज्यांनी या गोष्टी अनुभवल्या त्यांना तप म्हणजे काय हे लगेच उमजेल. ध्येयप्राप्तीचे हे प्रयत्न साक्षेपाने ज्याचे त्यालाच करावे लागतात. जसे आरोग्य चांगले असणे, काही व्याधी नसणे ही जीवाची नैसर्गिक अवस्था. ध्येय असले तरी त्यासाठी आहार-विहार यांचे पथ्य सांभाळावे लागते, आरोग्यशास्त्राची मदत घ्यावी लागते. मी कसाही वागलो तरी आरोग्य चांगलेच रहावे असे होत नाही. आपण जसे वागू त्याची फळे भोगावीच लागतात.

प्रयत्न म्हणजे कर्म. काहीच न करणे म्हणजे अकर्म. योग्य पद्धतीने न करणे, जसे करायला नको, ज्याने करायला नको, जिथे करायला नको, जितके करायला नको तितके करणे म्हणजे विकर्म. आरोग्याचा विचार केला की या कल्पना स्पष्ट होतात. इथे अकर्म, काहीच न करणे संभवत नाही. कारण जिवंत आहे तोपर्यंत कोणाचीच कर्मापासून सुटका नाही. श्वास, हृदयाचे स्पंदन, अन्नाचे पचन आदि क्रिया चालूच असतात. आपल्याकडून विकर्म घडू नये हे माणसाला माणूसपण टिकवण्यासाठी आवश्यकच आहे; अपेक्षित आहे. त्यापुढे जाऊन परमार्थात प्रगती करायची तर भगवान कर्मही सोडायला सांगतात. अन्यथा कर्मफलाची बंधने मोक्षापासून दूर ठेवतात.

कर्म कसे सोडायचे हे सहजी समजत नाही. मार्गदर्शकाची आवश्यकता लागते. जसे रोग नीट करायला डॉक्टर लागतो, हिशेबासाठी अकौंटंटची मदत लागते, घर बांधायला इंजिनियर, आर्किटेक्टचा सल्ला लागतो, तसेच गुरू, संत यासारख्या परमार्थातील तज्ज्ञांची या कामी मदत लागते. पण हे दिव्याने दिवा लागण्यासारखे. एका दिव्याने दुसरा दिवा तेव्हाच लागतो जेव्हा तो तेल, वात यांनी सुसज्ज असतो, तिथले स्थलही निवांत असावे लागते. तसेच संतसहवास, गुरुउपदेश यांचा उपयोग होण्यासाठी पात्रता मिळवावी लागते. बाह्य प्रलोभनांचे वारे थोपवावे लागतात. हे प्रयत्न आपले आपल्यालाच करावे लागतात. जसे आरोग्य नीट रहाण्यासाठी पथ्य आपल्यालाच पाळावे लागते, वैद्याने औषधे दिली तरी आपल्यालाच घ्यावी लागतात. रस्त्याने प्रवास करताना ठिकठिकाणी मार्गदर्शक पाट्या असतात तशी या प्रवासात गुरूची आवश्यकता असते. पण प्रवास आपल्यालाच सर्व नियम पाळून करावा लागतो. तर सुरक्षितपणे मुक्कामी पोचता येते. हे स्वत:चे स्वत:ला आवरणे कधीतरी साधलेच पाहिजे. सतत शिशुवर्गात जात राहिल्याने शिक्षण पूर्ण होत नाही. तिथेही पुढच्या वर्गात जाणे अपेक्षित असते. म्हणून भगवंत कर्मही सोडायला सांगतात.

कर्माचा आरंभ योग्य रीतीने झाला तर सोडणे सोपे जाते. स्वार्थी हेतूने आरंभ केलेले कर्म सोडणे शक्य नाही. शिवाय काम करीत असताना फळ मिळेल की नाही, काय मिळेल याचे भय बाळगले की कार्यक्षमताही कमी होते. म्हणून फळाच्या, आशेने हेतूने कर्म करणे योग्य नाही. थोडक्यात विजयच मिळाला पाहिजे या हट्टाने न खेळता आनंदासाठी खेळायचे, शर्थीचे प्रयत्न करायचे, कुशलता वाढवत न्यायची ही खेळाडूवृत्ती अंगी बाणवायची. यालाच म्हणायचे ज्ञानाग्निदग्धता. ज्ञानामध्ये जळून गेलेल्या कर्माचे बंधन होत नाही. 'मी करतो' ही जाणीव सुद्धा फलाशाच आहे. ती सुद्धा न ठेवता कर्मे केली तर ती यज्ञस्वरूपच असतात. पू. स्वामी म्हणतात, स्वत:च्या स्वार्थासाठी न करता, अगदी 'इतके करतो आम्ही' असेही न मानता, तरीही मनापासून. यथाशक्ति कुशलतेने केलेले काम म्हणजे यज्ञ. अन्यथा चांगल्या कामातूनही पुण्याचे ओझे वाढत रहाते. जसे एखाद्या हडकुळ्या माणसाने वजन वाढावे म्हणून पौष्टिक आहार घेतला तर त्याने मांस वृद्धी न होता मेदवृद्धी होऊ शकते आणि धाप लागणे इ. तक्रारी मागे लागतात. तसे पुण्याचे ओझे परमार्थात अडथळा आणते. म्हणून ज्ञानाग्निदग्धता महत्त्वाची. कर्म यज्ञस्वरूप असावे.

अशा यज्ञाचे विविध प्रकार भगवंतांनी सांगितले. प्रत्येकाला आपल्या क्षमतेप्रमाणे, परिस्थितीप्रमाणे आपले कल्याण साधता यावे, विविधतेमुळे कोणावर अन्याय होऊन त्याची विरोधात परिणती होऊ नये म्हणून शास्त्रात काळजी घेतलेली आहे. सर्वांची क्षमता सारखीच का नाही या शंकेचे निरसन करताना भगवान म्हणतात त्यांच्या अनेक जन्माच्या गुण व कर्मामुळे त्यांची चार वर्णात वाटणी झाली म्हणून क्षमता वेगळाली. इथे 'चातुवर्ण्य' या व्यवस्थेबद्दल पू. स्वामी म्हणतात, या व्यवस्थेत एक महत्त्वाचा गुण आहे; इथे संघर्षाचे बीजच नष्ट होते. प्रत्येक गोष्ट विकेंद्रित असते. जिथे विद्या तिथे सत्ता नाही, सत्ता तिथे संपत्ती नाही, संपत्ती तिथे कौशल्य नाही. जन्मजात वर्णच आयुष्यभर मानायचा का, हा वादाचा मुद्दा होऊ शकेल. बाकी वर्णव्यवस्था आणि त्यातून येणारी विषमता जगभर आहेच.

ब्रह्मयज्ञ किंवा ब्रह्मकर्मसमाधी म्हणजे साधनब्रह्म, कर्ताब्रह्म, हवन करायचे तेही ब्रह्म या अनुभूतीने कर्म करणे. दैवयज्ञ म्हणजे द्वैत मान्य करून सर्व कर्मे परमेश्वरार्पण भावनेने करणे. जीवयज्ञ म्हणजे सर्वस्व परमेश्वराला अर्पण करून त्याच्या इच्छेने कर्मे करणे. हे सर्व साधनेच्या उच्च पातळीवर साधणारे भरगर्दीतून तोल सावरत सहज सायकल चालवणे सुरुवातीपासून जमत नाही. त्याला वारंवार प्रयत्न लागतात. मग सुरुवात कशी करायची?

सर्व प्रथम संयमाने इंद्रिये आवरावीत. संयम म्हणजे दडपण नाही. भारतीय विचारपद्धतीत धर्माने नियंत्रित केलेल्या अर्थ आणि कामाला पुरुषार्थ मानले आहे. संयम म्हणजे इंद्रियांचे भोग आवश्यक आहेत का?

प्रामाणिक आहेत का? चैन किंवा अत्याचार नाही ना? याबद्दल सतत जागृत राहून त्या भोगांचा स्वीकार करणे. आवड-नावड मधे न आणता हितकारक निवड करणे आणि हळूहळू प्रयत्नपूर्वक भोगांचे प्रमाण कमी करणे. आर.टी.ओ. नेहमी गाडीचे ब्रेक आणि स्टिअरींग तपासतो. ॲक्सीलेटर नाही. यम नियम पाळणे म्हणजे ब्रेक आणि स्टिअरींग वापरणे. अहिंसा, सत्य, अस्तेय (जे माझे नाही ते मला नको), ब्रह्मचर्य (प्रत्येक भोग शास्त्राच्या मर्यादेत ठेवणे) आणि अपरिग्रह (स्वतःच्या गरजा कमीत कमी ठेवून जास्तीचा संग्रह न करणे, देहधारणेपुरता संग्रह ही किमान तर गृहस्थाने लोकसंग्रहासाठी कर्तव्यभावनेने केलेला आवश्यक संग्रह ही कमाल मर्यादा) ही सार्वत्रिक महाव्रते आहेत. ती पाळण्यासाठी जात, कुळ, वय, पात्रता कशाचीच अट नाही आणि ज्या धर्मशास्त्रात ती सांगितली ते पैसे न खाणाऱ्या आर.टी.ओ.सारखे आहे.

देहधारणेसंबंधी संयमाबरोबरच आपण इतर जी कर्मे करतो ती यज्ञस्वरूप कशी करता येतील याचा प्रयत्न करावा. द्रव्ययज्ञ, योगयज्ञ, तपोयज्ञ, स्वाध्याययज्ञ असे अनेक यज्ञ आहेत. पू.स्वामींच्या मते स्वाध्याययज्ञ सांप्रतच्या काळात सर्वात महत्त्वाचा. इथे धर्माने वागणे, सदाचरण म्हणजे काय याबद्दल वाचन, चिंतन, मनन करून यथाशक्ति आचरण अपेक्षित आहे. वाचनासाठी गीता, ज्ञानेश्वरी, गाथा, दासबोध आदी सद्ग्रंथ आहेत. यात मांडलेले विचार सध्याच्या काळात योग्य आहेत का, असा अविश्वास दाखवू नये. सध्याच्या काळात अनेकांचे आरोग्य चांगले नाही, म्हणून आरोग्याची व्याख्या बदलत नाही. कुणी आरोग्य मिळविण्यासाठी प्रयत्न करेल तर ते योग्यच ठरते. त्यामुळे विश्वासाने या ग्रंथांचा सखोल अभ्यास करणे, काही शंका असल्यास ज्ञानी, अधिकारी व्यक्तींना नम्रपणे विचारणे, त्यांची सेवा करून त्यांच्याकडून अधिक ज्ञान मिळवणे हे स्वाध्याययज्ञात अपेक्षित आहे. पुढील सर्व यज्ञकर्मावर आधारित असल्याने ते कर्म कसे असावे हे उमजणे अभ्यासाशिवाय अशक्य आहे.

या साधनेसाठी प्रत्येकाकडे देह, बुद्धी आणि मन यांच्या स्वरूपात सामग्री आहे. साधनेचा आरंभ देहाकडूनच व्हायचा असतो. आहार विहार नियंत्रणाबरोबरच दररोज काहीवेळ स्थिर बसून मन एकाग्र करण्याचा प्रयत्न करावा. यासाठी सगुण साकार प्रतीकाचा आलंबन म्हणून स्वीकार करावा. मन लयामध्ये जाऊ न देण्यासाठी असे प्रतीक उपयुक्त ठरते. पण कोणतेही प्रतीक सर्वशक्तिमान परमेश्वराचे आहे हा भाव मनात स्थिर ठेवावा. साधनेत सातत्य असावे, तिच्याकरता दिला जाणारा वेळ वाढत्या क्रमाने द्यावा, इतरवेळीही, सद्ग्रंथाचे वाचन, नामस्मरण, निस्वार्थ जनसेवा यात स्वतःला गुंतवावे. एक क्षणही आळसात घालवू नये, आणि या कामात असतानाही चित्त परमात्म्याशी जोडलेले रहावे याचा प्रयत्न करावा, जशी लेकुरवाळी वत्सल आई तिच्या लेकराचे, कृपण-धनाचे, व्यसनी माणूस व्यसनाचे चिंतन करत रहातो तसे व्हावे. तसे होण्यासाठी अभ्यास (पुन्हा- पुन्हा करणे) आणि वैराग्य (हवे-नको कमी होणे) याची आवश्यकता असते. इथे भगवान मनाचे गुण साधनेसाठी कसे ठरतील याचे गुपित सांगतात. मन चंचल आहे हे खरे पण त्यामुळेच आपल्याला अनेक गोष्टींकडे एकावेळेस लक्ष देता येते, विषयांची विविधता जाणता येते आणि चांगल्या वाईटाची निवड करता येते. मन प्रमाथी आहे पण त्यामुळेच इंद्रियांना त्याच्या इच्छेप्रमाणे वागणे भाग पडते. मन बलवान असल्याने एखाद्या गोष्टीवर निष्ठा टिकून राहू शकते.

साधनेतील प्रगती आपली आपल्यालाच मोजायची असते. द्वंद्व नाहीसे होणे, रागद्वेष उणावणे हे प्रगती मोजण्याचे खरे साधन आहे. शीत/उष्ण शरीराच्या पातळीवर, सुख/दुःख इंद्रियाच्या पातळीवर आणि मान/अपमान मनबुद्धीच्या पातळीवर, काहीही वाट्याला आले तरी स्थिर रहाता येणे म्हणजे द्वंद्व नाहीसे होणे. संकटे न येणे अपेक्षित नाही, तसे होतही नाही. पण संकटकाळी दृढ रहाणे, हताश न होणे, हाय हाय न करणे, दुसऱ्याला जबाबदार न धरणे हे रागद्वेष उणावल्याचे लक्षण. हे साधण्यासाठी अधीर होऊन चालत नाही. प्रगती दिसत नाही म्हणून साधना अर्धवट सोडून चालत नाही. मग भले आयुष्य संपले तरी चालेल. पुढील जन्म साधनेला अनुकूल मिळेल या निष्ठेने सातत्य ठेवावे लागते. काही झाले तरी वजन वाढत नाही म्हणून जेवण सोडणे किंवा काही झाले तरी वजन कमी होत नाही म्हणून डाएटींग सोडणे जसे शहाणपणाचे नाही, तसेच साधनेचे. आपण कुठून सुरुवात केली, चालायचा वेग, सातत्य काय यावर शिखर गाठण्याला लागणारा वेळ अवलंबून असतो.

प्रत्येक कर्म करीत असताना शरीर, मन आणि बुद्धी यांचा संयोग असावा लागतो, मनात योग्य संकल्प, बुद्धीत विवेक आणि शरीरात कौशल्य असावे लागते आणि हे तिन्ही परमात्म्याच्या चरणी लीन असावे लागते. हा गीतेमध्ये सांगितलेला संन्यास आहे. तो आश्रमसंन्यास नसून वृत्तिसंन्यास आहे. तिथे हवे नको पूर्ण संपलेले असते. असे कोणत्या चमत्काराने होत नाही तर साधनेने होते. एकदा वृत्तिसंन्यास साधला की मोक्ष फार दूर रहात नाही. पण तो साधला की नाही यासाठी अवघड अट आहे ती म्हणजे साधकाच्या मनात कोणताही अहंकार निर्माण होता कामा नये. आता अहंकार ही वस्तू अशी विलक्षण आहे की, आपण ज्या जगात रहातो तिथे त्याच्याशिवाय कोणतीच हालचाल होणार नाही आणि थोडा जरी जास्त झाला तरी दुसऱ्याला बोचल्याशिवाय रहात नाही. जोपर्यंत देह आहे तोपर्यंत 'मी' तर नष्ट होणार नाही. पण तो बोचणार नाही हे बघायला हवे. उद्या प्रवचन कोणाचे? माझे! इतपर्यंत ठीक आहे. पण माझ्यासारखे प्रवचन कोणालाच करता येत नाही, हे 'मी'चे स्वरूप प्रगतीतला अडथळा ठरते. हा अडथळा काढण्याचा मार्ग पुन्हा परमेश्वरार्पण भावनेने कर्म करणे हाच आहे. पण फुले जशी देवाच्या डोक्यावर वहाता येतात तशी कर्मे वहाता येत नाहीत. मग ती परमेश्वरार्पण व्हायची कशी? 'मी करतो' ही भावना सोडल्याने हा अहंकार सुटला का याची एक कसोटी आहे. लोक एखाद्या कामाला नावे ठेवतात तेव्हा ही वापरावी. सौजन्य, देखावा, विनय यांच्या बळावर स्तुती पचवता येते पण निंदा जिव्हारी लागते. राग येतो, निराशा येते, काम करावेसे वाटत नाही. मग अहंकार कुठे सुटला? त्यासाठी निंदकाला पॅथॉलाजीस्ट समजावे. (तो आपला दोष दाखवतो आहे, की अहंकार आहे) त्याला नमस्काराची फी द्यावी आणि सावध व्हावे.

हे सर्व बुद्धीच्या पातळीवर जाणले, पटले तरी मनात शंका येते, मला जमेल? पू. स्वामी म्हणतात, जमणे न जमणे करणाऱ्यावर अवलंबून आहे. पाऊस पडल्याशिवाय शेत पिकत नाही हे खरे पण पेरल्याशिवाय उगवत नाही आणि पेरल्यापेक्षा जास्त उगवते हेही खरे. म्हणून पेरले पाहिजेच, काय पेरतो आहोत या विषयी दक्षही राहिले पाहिजे. ज्ञान आणि चैतन्य प्रत्येक माणसात आहे. ज्ञानेश्वरासारख्यात ते प्रकट असते त्यामुळे नि:स्वार्थ कर्म ही त्यांची सहज अवस्था असते, तर आपल्यात अज्ञानाचे झाकोळ असते त्यामुळे दक्ष रहावे लागते.

साधना करता करताच अज्ञान नाहीसे होत जाते. प्रकट होणारे ज्ञान हे शिल्पासारखे असते. जसे दगडामधून नको तो भाग काढत गेले की, शिल्प प्रकट होते तसेच. नवीन काही निर्माण करायचे नसते. सगळे आपल्यात आहेच. फक्त वर जमलेली काजळी काढून टाकली की, ज्ञान प्रकाशते. त्या प्रकाशात द्वंद्व नाहीसे होऊन समदृष्टी लाभते. समदृष्टी लाभणे म्हणजे कसे तर डॉक्टर जसा प्रत्येक रोग्याला सारख्याच आत्मीयतेने काळजीपूर्वक तपासतो पण औषध मात्र आवश्यकतेप्रमाणे वेगवेगळे देतो, तशी कर्मे होतात. काय कसे किती करायचे याचा गोंधळ संपतो. असा साधक जिवंतपणीच मुक्त होतो, शाश्वत प्रसन्नता, शांती अनुभवतो. सांख्य योग किंवा कर्मयोग दोन्हीने हे साधते कारण यातला योग, सतत जोडलेले रहाणे महत्त्वाचे. कर्म करणाऱ्याला ज्ञान नसेल किंवा ज्ञानी कर्म करणारा नसेल तर दोन्ही आपल्या ठिकाणी व्यर्थ होतात. त्यामुळे आधी ज्ञानी होऊन मग निष्काम कर्म करणे किंवा निष्काम कर्म करता करता ज्ञानप्राप्ती करणे हे एकाच ध्येयाकडे जाणारे रस्ते आहेत. ध्येय गाठल्यावर आपण कोणत्या रस्त्याने आलो याने फरक पडत नाही. जसे मुंबईला जायचे अनेक रस्ते आहेत, अंतर, वळणे, चढउतार, रस्त्याची गुणवत्ता वेगवेगळी आहे. पण मुंबईला पोचल्यावर याने फरक पडत नाही. पदार्थाची पोषण क्षमता वेगळी असते पण मिळालेले पोषण एकरूपच असते. हे भाजीने, हे भाताने, हे पोळीने मिळाले असे म्हणता येत नाही. उपचार पद्धती वेगळ्या असल्या तरी योग्य व्यक्तीकडून योग्य उपचार घेतले तर मिळणारे आरोग्य तेच असते. तसे अंतिम ध्येय कोणत्याही मार्गाने गाठता येते, सांख्य (ज्ञान) योग किंवा कर्मयोग त्यातही पुन्हा कर्मयोगी असो वा ज्ञानयोगी, जो अंत:करणापासून श्रद्धेने माझी भक्ती करतो तो सर्वश्रेष्ठ असे भगवान म्हणतात. कारण भक्तीमुळे तो स्वार्थ निरपेक्ष देहभावावर रहातो, सहानभुतीने युक्त होतो, त्याच्या कर्तव्यभावनेत रूक्षता न येता गोडवा येतो आणि त्याच्या हातून समाजहिताची कामे घडतात. जसे पक्वान्नाला केशर, औदार्याला सौजन्य, विद्येला विनय भूषण ठरते तसेच भक्ती या योग्याची भूषण ठरते. श्रेष्ठ तज्ञ जर मातेच्या वात्सल्याने शिकवेल तर विद्यार्थ्याला गोडी लागते तसे लोक याचे अनुकरण करतात म्हणून तो सर्वश्रेष्ठ. तसे होण्याचे ध्येय समोर ठेवून वाटचाल सुरू करणे हिताचे ठरेल.


**– डॉ. सौ. स्वाती सुधीर शिरडकर**

'मानस' १३/१, विनायकनगर, हेडगेवार रुग्णालयाजवळ,

त्रिमूर्ती चौक, औरंगाबाद ४३१००५

मो. ९८९०८९८०७८



# स्वामी वरदानंद भारतींचे गीतेच्या सात, आठ, नऊ अध्यायांवरील भाष्य

**सौ. सुनंदा शाळिग्राम**
एम. ए. (मराठी)
स्वामी सत्यदेवानंद यांच्या शिष्या.
श्री गीता, ज्ञानेश्वरी व भागवत यांची निरूपण सेवा, प्रवचनकार.

श्रीमद् भगवद्गीता हा अखिल मानवजातीचे कल्याण करणारा विश्वमान्य ग्रंथ! सातशेहून अधिक टीका या ग्रंथावर झाल्या आहेत. परमपूज्य स्वामी वरदानंद भारती यांची गीतेवरील अध्यायवार प्रवचने ग्रंथरूपाने प्रसिद्ध झाली आहेत. त्यातील अध्याय सात, आठ, नऊ अशी तीन अध्यायावरील **'ज्ञानविज्ञानयोग'**, **'अक्षरब्रह्मयोग'** व **'राजयोग'** या तीन ग्रंथांचे सेवन आज आपण त्यांच्याच कृपेने करणार आहोत. उत्तम भाष्यकाराच्या भाष्यग्रंथाला त्या भाष्यकाराच्या आत्म्याचा परिसस्पर्श लाभलेला असतो. जणू त्याचे व्यक्तित्वच ग्रंथातून डोकावत असते. पूज्य स्वामी वरदानंद भारतींचे हे गीता-भाष्य ग्रंथ याचं उत्तम उदाहरण आहे. स्वामीजी विद्वान होते, गीतेतील गहन तत्त्वज्ञान त्यांनी या ग्रंथांत उलगडून सांगितले असले तरी हे ग्रंथ विद्वज्जड झालेले नाहीत. जीवाचं शाश्वत कल्याण व्हावं ही त्यांची कळकळ त्यांच्या शब्दाशब्दातून व्यक्त होते. समाजमन घडविणारे ते आचार्य होते. याचाही प्रत्यय त्यांचे ग्रंथ वाचताना सतत येतो. समाजमनातील अनिष्ट गोष्टींबद्दलचा निषेध त्यांनी वेळीच नोंदविला आहे. ढोंगी राजकारण्यांना त्यांनी हळूच घेतलेले चिमटे पाहून वाचक गालातल्या गालात हसल्याशिवाय राहात नाही. साधना विषयक त्यांच्या लिखाणाला अनुभूतीचा भक्कम आधार असल्यामुळे वाचाकाला ते विश्वासार्ह वाटते, म्हणून ते स्वीकारार्ह ठरते. भगवंताशी पूर्ण एकरूप होऊन त्यांनी हे भाष्य केलेले असल्यामुळे सत्याचा सुगंध त्याला प्राप्त झाला आहे. भगवंताचं मनोगत उलगडण्यात ते पुष्कळ यशस्वी झाले आहेत. विषय समजून देण्याचं त्यांचं प्रभावी कौशल्य दिसून येतं. आता, या प्रत्येक ग्रंथातून स्वामीजी आपल्याला काय बोधामृत देतात, ते पाहू.

सातव्या अध्यायाच्या भाष्यात सुरुवातीलाच ते म्हणतात, ''हे ममत्व नाहीसे करणे, हा अहंकार नष्ट करणे, **हा भगवंतांचा गीता सांगण्याचा उद्देश आहे.**''

पुढे ते म्हणतात, ''अहंकार आणि ममत्व ही कर्तव्याच्या आड आल्याशिवाय राहात नाहीत, म्हणून भगवान त्याला (अर्जुनाला) अहं आणि मम नाहीसे करण्याकरिता उपदेश करतात.''

''मी 'मारणारा' हा जो अहंकार आहे, भीष्म माझे आहेत, हे जे ममत्व आहे, ते उदात्त असल्यामुळे आणखी आकर्षक आहे आणि पकडून ठेवायला आणखी योग्य आहे. वाईट ममत्व सोडून टाकू शकतो मनुष्य''

''भीष्मांशी लढताना त्याला शंका होती, तर ती गोग्रहणाच्या वेळीच का आली नाही?.... हे लढणे त्या उत्तर गोग्रहणासारखे, सोपे लढणे नाही की, गाई सोडवल्या की मोकळे झाले. आताच्या युद्धात मारीन किंवा मरेन असा अटीतटीचा सामना आहे. तेव्हा (गोग्रहणाचेवेळी) ठार मारणे हा प्रश्न नव्हता. फक्त पराभूत करणे एवढाच प्रश्न होता.''

हे स्वामीजींनी केलेले, विश्लेषण त्यांच्या सूक्ष्म आंतरदृष्टीचे द्योतक आहे.

पहिल्या श्लोकावरील भाष्यात स्वामीजी म्हणतात, 'मय्यासक्तमना: - त्याचे मन माझ्यावर आसक्त आहे तरीसुद्धा 'मदाश्रय' आहे. माझ्या आश्रयाने राहतो. प्रेमही माझ्यावर, आश्रयही माझाच. असा मनुष्य जेव्हा योगाचा अवलंब करतो, तेव्हा त्याला जिज्ञासा उत्पन्न होते. मी कसा आहे हे संपूर्णपणे, आणखी काही उरले नाही अशा प्रकारे ज्या पद्धतीने तू जाणशील ते ऐक.' स्वामीजी इथे 'समग्र' म्हणजे काय हे इतके सुंदर समजावून देतात! व्यवहारातील तांदुळाचा दृष्टांत देतात आणि म्हणतात, ''म्हणून 'समग्र' म्हणजे काय ते सांगतो. ज्या एकामुळे बाकी सगळे घडते ते समजले की समग्र समजले. ज्या सोन्यामुळे सगळे दागिने घडतात, ते (सोने) समजले की सगळे समजले.... समग्रही कळते. पाहिजे आणि 'असंशयं' त्याचे कॅरेट काय आहे तेही कळले पाहिजे.''

दुसऱ्या श्लोकावरील भाष्यात त्यांनी श्री ज्ञानेश्वर महाराजांच्या 'ज्ञान' आणि 'विज्ञाना'च्या व्याख्या ग्राह्य मानल्या आहेत. ''ज्ञान म्हणजे ब्रह्मविषयीचे ज्ञान आणि विज्ञान म्हणजे प्रपंचाविषयीचे ज्ञान.'' यासंदर्भात ते ज्ञानदेवांची ओवी सांगतात-

**'अर्जुना, तया नाव ज्ञान। येर प्रपंचु हे विज्ञान।**
**तेथ सत्यबुद्धी हे अज्ञान। हेही जाण।।'**

स्वामीजी म्हणतात, ''वैज्ञानिक प्रगती, विज्ञानयुग असे जे काही शब्द वापरतो हे प्रपंचाविषयीच्या ज्ञानाने वापरतो, फक्त त्याची वस्तुस्थिती समजून घेण्यापुरते ते असते तेव्हा ते प्रगतीचे लक्षण असते. त्याच्या मध्ये जेव्हा मनुष्य आसक्त होतो, तेव्हा ते अप्रगतीचे लक्षण

असते. **'तेच सत्यबुद्धी हे अज्ञान'** किंवा विज्ञानच आपल्याला तारणार आहे असे वाटायला लागले, तिथे ती सत्यबुद्धी झाली, की ते अज्ञान झाले. विज्ञानाने प्रगती झाली. आपण असे ज्या अर्थाने म्हणतो, त्या प्रत्येक प्रगतीने समाजामध्ये फक्त प्रदूषण वाढवले आहे... ध्वनिप्रदूषण, हवेचे प्रदूषण, जल प्रदूषण इ.'' आरोग्याच्या दृष्टीने कमी योग्यता असलेले गिरणीतील पीठ, रासायनिक खताने वाढलेली पिके, टेरिलिन-टेरिकॉटचे कपडे याची उदाहरणे देऊन ते पुढे म्हणतात, ''मी आपल्याला विनंती करतो की, तुमची काय प्रगती व्हायची असेल ती होवो. पण त्या लहान पोराला तरी सुरक्षित राहू द्या. त्याच्या अंगावर तरी ते घालू नका. .... 'तेथ सत्यबुद्धी, हे अज्ञान' हे लक्षात यावे म्हणून मी हे सांगतो.''

तिसऱ्या श्लोकावरील स्वामीजींचे भाष्य तर अप्रतिम आहे! 'सहस्रेषु'चा अर्थ त्यांनी 'हजार' नव्हे तर 'हजारो' असा सांगितला आहे. तो मार्मिक आहे. 'मनुष्याणां सहस्रेषु कश्चित्' म्हणण्याचे कारण काय? ते म्हणतात, माणसाची मनोवृत्ती। ''धक्यातून सावरण्याकरिता मनुष्य परमार्थ करतो आणि परमार्थाला लागल्यानंतर मन जरा स्थिर व्हायला लागले की पुन्हा संसार बळकट होतो. त्यातून तो बाहेर पडतच नाही.'' आणखी ते म्हणतात, ''एखाद्याला विचारले की, आज कीर्तनाला कसे आलात? तर म्हणतात, 'काय करणार, आज आमचा टी. व्ही. बिघडला. चला, कीर्तन ऐकू म्हणून आलो. शुद्ध परमार्थी नाहीत, म्हणून भगवान म्हणतात, 'कश्चित्।' शिवाय ''सिद्धये करीत नाहीत. परमेश्वरप्राप्तीसाठी करीत नाही. आता याच्यापेक्षा काही ज्ञान शिल्लक राहता कामा नये, मी तृप्त झाले पाहिजे, याकरता करीत नाहीत. उलट प्रपंच वाढायला एक आनुषंगिक साधन म्हणून करतात.''

स्वामीजी पुढे म्हणतात, ''आम्ही अक्षरश: परमेश्वराच्या योग्यतेचे मूल्यमापन करतो. ज्याचे मूल्य असामान्य आहे, जो अनंत आहे जो मूल्यात येणार नाही, त्याला आम्ही म्हणतो देवा, मुलगा दे, तर तू खरा. देवा, नोकरी लावून दे, तर तू खरा... म्हणजे देव हा काय रुपयांचा झाला? अनंत कोटी ब्रह्मांडनायक। पण याच्या मनाप्रमाणे घडले नाही की तो त्याला कस्पटासमान लेखतो.

''यतति - प्रयत्न करतो पण हा प्रयत्नही प्रामाणिकपणे करीत नाही. आम्ही जे करतो, त्याला तुम्ही प्रयत्न म्हणा. एवढाच त्याचा अर्थ असतो.

'जे चलते' होते, ते 'सिद्धये' होत नाही. का? स्वामीजी म्हणतात, 'कुठे हुडकावे ते कळले नाही तर कसे सापडावे बरे!' त्यासाठी मार्मिक दृष्टान्त देतात. ''एकाची किल्ली हरवली आणि हा रस्त्यावर दिव्याखाली हुडकत होता. मित्राने विचारले, 'हरवली कुठे?' 'घरात.' 'मग इथे का हुडकतो?', 'इथे प्रकाश आहे. आमची वीज गेली आहे. फ्यूज उडाला, किल्ली जर घरात हरवली तर प्रकाश घरात नेला पाहिजे.'' यानंतरचं स्वामीजींचं भाष्य अमोलिक आहे. ''परमात्मा जर आत आहे, तर तुमची जाणीव तिथे नेली पाहिजे ना! का जिथे जाणीव आहे, तिथे तुम्ही परमात्मा हुडकणार आहात?'' स्वामीजींचा प्रश्न आपल्याला अंतर्मुख करतो.

भगवंतांनी इंद्रिये बहिर्मुख केली आहेत. त्यांना बाहेरचे दिसते आणि तुला पाहायचा आहे ईश्वर. तो आत शोधला पाहिजे. तुझी उत्कटता झाली तर बाहेर येईल तो. शेवटी त्याचेच रूप आहे सगळे.''

पशुवत् वागणारी माणसे पाहून स्वामीजींच्या शब्दांना धार येते. ते म्हणतात, ''पोट भरले की सगळी जनावरे शांत असतात, स्वस्थ असतात. माणसाचे सगळे उद्योग पोट भरल्यावर सुरू होतात.... परमेश्वराने बुद्धी दिली एका कामाकरिता, माणसाने वापरली अन्य ठिकाणी.'' पुढे ते म्हणतात, ''मी ईश्वराचे स्वरूपच मानतो ते असे की, मी ऑर्डर काढायची आणि त्याने पुरवठा करायचा. सप्लाईंग ऑफिसर मानतो आपण ईश्वराला आणि हे जर ईश्वराने केले नाही तर ह्या देवात काय अर्थ आहे असे म्हणतो.... आम्ही ईश्वराला सर्वज्ञ मानीत नाही. आमच्या सोयीसाठी सर्वशक्तिमान मानतो.

....त्याच्याकरिता जी योग्यता प्राप्त करून घेण्याची आवश्यकता आहे, यासाठी प्रयत्न होत नाही. अभ्यास म्हणजे सातत्य. ते दीर्घकाळ केले पाहिजे. निरंतर केले पाहिजे आणि जे करायचे ते आस्थेने केले पाहिजे.'' स्वामीजींचे हे बोल साधकाने हृदयी कोरून ठेवले पाहिजेत.

पुढे चौथ्या, पाचव्या श्लोकात अष्टधा प्रकृतीचं वर्णन येतं. पंचमहाभूतांचं स्वामीजींनी केलेलं स्पष्टीकरण विशेष लक्षणीय आहे. पुढे ते म्हणतात, 'हे सगळे जगत् प्रकृतीने धारण केले आहे. हे एकदा तुला कळले ना म्हणजे सगळे कळल्यासारखे होईल अणि सगळे कळल्यानंतर मनुष्याला तृप्ती येते, समाधान येते, त्याची हाव संपते, अपेक्षा उरत नाही, तडफड राहात नाही.... ' आनंदाने उचंबळत नाही किंवा मनाविरुद्ध घडले तर खचून जात नाही. ... स्थिर बुद्धी राहतो. असे ज्याचे होते त्याला सर्व कळले म्हटल्यास अडचण नाही.''

'अहं कृत्स्नस्य जगत: प्रभव: प्रलयस्तथा' याच्या स्पष्टीकरणासाठी स्वामीजींनी दिलेलं उदाहरण इतकं समर्पक आणि थक्क करून सोडणारं आहे. ''शेतकरी पेरताना आनंदात असतो, डवरलेले शेत पाहिले की त्याला राखताना आनंद असतो आणि कापताना तो रडतो असे कधी आपण बघितले आहे? त्याला पेरतानाही आनंद आहे, राखतानाही आनंद आहे आणि कापतानाही आनंद आहे.''

'मत्त: परतरं नान्यत् किंचिदस्ति' या श्लोकाचा अर्थ करताना स्वामीजी 'भाष्यकाराते वाट पुसत' सांगतात, ''शंकराचार्य म्हणतात, माझ्याशिवाय दुसरे काही नाही याचा अर्थ मी केले नाही तर दुसरे काहीही नाही. म्हणजे मीच सगळीकडे आहे. 'सूत्रे मणिगणा इव.' ज्याप्रमाणे मणी हे दोऱ्याच्या आश्रयाने राहतात, दोरा आतमध्ये नसला तर ओघळून जातात.... हा 'मयि' म्हणजे न तुटणारा दोरा आहे. त्यामुळे मणी ओघळत नाही कधी.. हे असेच्या असेच असते.'' हे स्वामीजींचे भाष्य त्यांनी भगवंतांचं अविनाशी स्वरूप ओळखल्याची खूण आहे.

''मी या सगळ्याला व्यापून आहे हे सांगण्याच्या पाठीमागे एकच उद्देश आहे की विविधतेच्या आकर्षणामुळे माणसाची जी शक्ती ती विविधता प्राप्त करण्यामध्ये वेचली जाते. ती शक्ती इकडे वापरावी म्हणून गीतेत हे सांगितले आहे.'' या त्यांच्या म्हणण्याशी कोणीही सहमत होईल. ही समज विचारानं आलेली आहे.

'रसोऽहमप्सु' यातील 'रस' शब्दावरील त्यांचे भाष्य वाचताना,

त्यांच्यातील 'वैद्य' डोकावत असताना, त्यांच्यातील 'भक्ता'नं त्यावर मात केली आहे. ते म्हणतात, ''ओलेपणाच्या माध्यमाशिवाय आस्वाद येत नाही. हा ओलावा म्हणजे स्नेह, म्हणजेच भक्ती, म्हणजेच प्रेम.''

'पौरुषं नृषु' यावरील भाष्यात ते म्हणतात, ''मनुष्याच्या ठिकाणी कर्तृत्व आहे ते भगवंताचे देणे आहे, हे आपण लक्षात घेत नाही.'' 'जीवनं सर्वभूतेषु' सांगताना ते म्हणतात, ''कर्तृत्वशक्ती तर माझी नाहीच, पण जिवंतपणासुद्धा माझा नाही. 'उपरवाले की देन' आहे. ''डोळ्यांनी बघतो, ध्वनी परिसतो कानी, पदी चालतो, जिव्हेने रस चाखतो, मधुरही वाचे आम्ही बोलतो।। हाताने बहुसाल काम करतो, विश्रांती ही घ्यावया - घेतो झोप सुखे, फिरून उठतो, ही ईश्वराची दया!''

'सर्वभूतांचं मी सनातन बीज आहे' याचे स्पष्टीकरण देताना स्वामीजी म्हणतात, ''जेव्हा बीज असते तेव्हा वृक्ष नसतो, जेव्हा वृक्ष असतो, तेव्हा बी नसते. भगवान म्हणतात, माझे तसे नाही. मी असतो तेव्हा सृष्टी असो-नसो. पण सृष्टी नसते तेव्हा मी असतोच.... सनातन म्हणजे कधी नष्ट न होणारे, जे नेहमी टिकून राहते, जसेच्या तसे राहते, 'ज्याच्यात काही पालट' होत नाही असे.'' इथे शब्दामधील अर्थाचे पदर उलगडण्यात स्वामीजींचे कौशल्य दिसून येते.

या ग्रंथात अशी कित्येक स्थळं दाखविता येतील की, स्वामीजींची ती वचनं सुभाषित ठरतील. स्वामीजी म्हणतात, ''त्याला शोधायचा झाले तर संतात शोध, तिथे सापडेल, सत्त्वात शोध.... पुण्यात शोध..... भक्तीत शोध...., ज्ञानात शोध. अज्ञानात, मोहात, प्रमादात सापडायचा नाही.'' ''संत स्वत:ला कधी मोठे म्हणत नाहीत. ते भगवंतांचे लेकरू म्हणवून घेतात. भगवंतालाही त्याची आई होणे भाग पडते.''

''शेवटी मी ईश्वराला व्यापारी ठरवला आणि तोही स्वस्तात चांगला माल देणारा व्यापारी! या व्यापारात मी देणार म्हणजे फक्त नमस्कार!

''कुबेराच्या घरी जायचे आणि झोळी फाटली आहे, भिक्षेला एक झोळी द्या म्हणायचे असेच झाले. ईश्वराजवळ काय मागावे?''

**''मागावे प्रेम देवाचे म्हणावे हृदयी धरा।**

**स्फुरावे सदा देवा सद्‌विचार मदंतरी।।''**

''भगवंताकडे तोंड करून तुम्ही चाललात की चढ आहे आणि उपभोगाकडे तोंड करून चाललात की उतार.''

''धारणेपुरते स्वीकारले म्हणजे शरीर बाधत नाही.''

''अज्ञान आहे, याचेही अज्ञान असणे फार वाईट अज्ञान आहे, असे कळले, तर ज्ञानाची आसक्ती तरी निर्माण होते. पण अज्ञान आहे हेच जर कळले नाही तर? आणि अज्ञानालाच ज्ञान म्हणू लागला तर प्रकरण गंभीर आहे, गूढ आहे अज्ञानामुळे. दुष्कृती आहे अज्ञानाला, अज्ञान न म्हणण्यामुळे आणि नराधम झाला अज्ञानालाच ज्ञान म्हटल्यामुळे!'' (श्लोक १५ वरील भाष्य)

''आपल्याला न पटण्याची कारणे दोन आहेत. आपल्या ठिकाणचे अज्ञान आणि आपल्या ठिकाणाचा अहंकार!''

''भगवंताला वासना कधी लागलीच नाही. त्यामुळे कोणत्याही वासनेचा स्वाद (वास) त्याला बरोबर कळतो. म्हणून त्याला फसवणे शक्य नाही.''

''हा जर 'मी' संपला नाही तर 'तो मिळतच नाही.''

''अल्पबुद्धी म्हणजे अल्पाकरिता जो बुद्धी वापरतो तो अल्पबुद्धी.''

''पाणी उताराकडे वाहते. किती काळ वाहते? तुम्ही समतलावर आलात की त्याचे पुढे जाणे थांबते. सम म्हणजे ब्रह्म, ब्रह्मावर आलात की पुढची हाव संपते. पाणी समुद्राला मिळेपर्यंत वाहते. समुद्राला मिळाले की थांबते. मनुष्याची वासना ही ईश्वरापर्यंत पोहोचली की थांबली. त्याच्या आधी ती कधी थांबतच नाही. आवश्यकतेपुरते घ्या आणि उरलेले सगळे भगवंताकरिता वापरा.''

किती म्हणून वचनं सांगावीत! रत्नासारखा त्यांचा प्रकाश ग्रंथात फाकला आहे. मला खटकलेली एकच गोष्ट म्हणजे 'अर्थार्थी'चा त्यांनी केलेला अर्थ. १६ व्या श्लोकावरील भाष्यात चार भक्तांचे वर्णन क्रम आले आहेत. माझ्या चिंतनाप्रमाणे स्वामीजींचे यावरील भाष्य मला पटलेले नाही. हे मी अज्ञानाने वा अहंकाराने सांगत नसून नम्रपणे श्री ज्ञानेश्वरी व श्री एकनाथी भागवत या ग्रंथांच्या आधारे सांगत आहे.

'अक्षरब्रह्म योग' या आठव्या अध्यायाच्या सुरुवातीच्या भाष्यात स्वामीजी व्याख्या फार सुरेख देतात. 'आत्मानं' अधिकृत्य तिष्ठति इति अध्यात्म:। किंवा कर्म सुरू झाले म्हणजे 'अस्ति'चे 'भवति' व्हायला लागते. हे नेमक्या शब्दात त्यांनी केलेले कर्माचे वर्णन.

स्वामीजी म्हणतात, ''मरणाचे स्मरण असले तर मनुष्य नम्र होण्याची शक्यता आहे.... अंतकाळी जर स्मरण ठेवायचे असेल तर ते जन्मभर ठेवले पाहिजे.''

आठव्या श्लोकावरील (अ-८) भाष्यात स्वामीजी 'अभ्यासयोगा'बद्दल म्हणतात, ''अभ्यासही योगस्वरूप झाला पाहिजे. अभ्यास हा जणु तुमच्या शरीचाचा एक भाग बनला आहे. अवयव बनला आहे, असे झाले पाहिजे... अंत:करण, मन, बुद्धी एकदा मला अर्पण केल्यावर याच्यापेक्षा दुसऱ्या कशाचे आकर्षणच वाटणार नाही. 'चेतसा नान्यगामिना।' त्याला अन्य कुठेही फाटा फुटता कामा नये.... सुटणे, भरकटणे ही मनाची सवय आहे. पण ते तसे झाल्याबरोबर जाणीव झाली पाहिजे आणि त्याचा खेद निर्माण झाला पाहिजे.... अभ्यासाच्या बळावर अनन्यगामी असे मन झाले की मग त्याचे सारखे चिंतन घडायला लागते. 'अनुचिन्तयत्' म्हणजे योग्य रीतीने, शास्त्रीय दृष्टीने अभ्यास करीत आपण त्या दिव्य शक्तीचे अनुकरण करतो.

'कविं', 'पुराणं', 'अनुशासितारं' याचे त्यांनी दिलेले अर्थ लक्षणीय आहेत. ''ज्याला भावी काळाचा वेध घेता येतो, वर्तमानकाळाचे स्वरूप जाणून भावी काळ कसा होईल हे ज्याला सांगता येते, भूतकाळाचा मागोवा घेऊन वर्तमानकाळाचे ज्याला मूल्यमापन करता येते, त्याला 'कवि' म्हणतात. त्याला आरपार दिसले पाहिजे. कोणत्याही अडथळ्याचा विरोध न जुमानता पलीकडे कसे जावे, हे ज्याला समजते, त्यातून वाट जो दाखवू शकतो, तो कवि. 'पुराण'

म्हणजे जुने झालेले नव्हे तर नित्यनूतन. ज्याचा नवीनपणा, ताजेपणा कधी जात नाही. जसे सोने असते. पुराण इतक्या दीर्घ परंपरेत अक्षुण्ण राहिले पाहिजे. आणि शिस्त लावण्याचे सामर्थ्य ज्याच्याजवळ आहे, जो आवरू शकतो, वळण लावू शकतो, 'अनुशासितारम्.''

दहाव्या श्लोकावरील भाष्यात ते म्हणतात, ''भक्तीच्या साहाय्याने तरी भगवंताबद्दल अचलता निर्माण करा किंवा योगाच्या साहाय्याने तरी मनाची अचलता साध्य करा. ते ज्ञानाच्या साहाय्याने होणार नाही. भक्तियुक्त योगाने किंवा योगयुक्त भक्तीने होईल.''

'व्यक्तराग' आणि 'वीतराग' यातील फरक स्वामीजी सांगतात. व्यक्तरागामध्ये हा आसक्ती सोडतो आणि वीतरागामध्ये आसक्ती त्याला सोडते.''

अकराव्या श्लोकातील (अ.८) 'ब्रह्मचर्यं चरन्ति' वरील भाष्यात स्वामीजी ब्रह्मचारी कोण ते सांगतात. ''सतत ब्रह्मात राहावे अशी ज्याची इच्छा आहे आणि त्या इच्छेने जो राहतो तो ब्रह्मचारी.''

चौदाव्या श्लोकातील 'अनन्यचेता:' झाले पाहिजे, हे सांगताना स्वामीजी म्हणतात, ''अहंकाराने तुम्ही जड होऊन जाता. त्यामुळे तोही तुमच्याकडे खेचला जात नाही. आणि तुम्हीही त्याच्याकडे खेचले जात नाही.''

स्वामीजींनी भगवद्गीता किती सूक्ष्मपणे अभ्यासली होती, याचे एक उदाहरण म्हणजे ते म्हणतात, ''कुणालाही महात्मा म्हणण्याची आपली पद्धत नाही. भगवंतांनी गीतेमध्ये तीन ठिकाणी 'महात्मा' शब्द वापरला आहे. अनन्यचेता: सततं यो मां स्मरति नित्यश:' असा जो वागतो त्याला महात्मा म्हणतात. सर्व भूतांच्या ठिकाणी तो वासुदेव भरला आहे, अशी ज्याची धारणा आहे, तो महात्मा. 'वासुदेव ------ स महात्मा सुदुर्लभ:' आणि सगळे मिळवायचे ते मिळाले, आणखी काही मिळवायचे राहिले नाही, अशी स्थिती ज्याची झाली तो महात्मा. 'नाप्नुवन्ति महात्मन: संसिद्धिं: परमां गता:।' आणि पुन्हा जन्माला येत नाही तो महात्मा!''

चोविसाव्या श्लोकातील ज्योतिर्मार्गाचे वर्णन करताना ते त्याचा गुह्यार्थ सांगतात, ''ज्योत हे भक्तीचे प्रतीक आहे. अग्नी हे ज्ञानाचे प्रतीक आहे. दिवस सावधतेचे प्रतीक आहे. शुक्ल पक्ष सदाचरणाचे प्रतीक आहे आणि उत्तरायण सज्जन असल्याचे प्रतीक आहे.''

नवव्या अध्यायाच्या प्रारंभीच स्वामी वरदानंद भारती 'राजविद्या – राजगुह्य' या संज्ञांचे गुह्यच जणू प्रकट करतात. ''राजविद्या याचा अर्थ अत्यंत श्रेष्ठ पुरुषाला सांगण्यासारखी विद्या. राजविद्या म्हणजे सर्व विद्येत श्रेष्ठ म्हणूनच ते गुह्यतम आहे. किमती हिरा जसा जपूनच ठेवावा लागतो, तसे हे ज्ञान गुप्त ठेवावे. सर्वांना सांगत फिरू नये. सांगण्यायोग्य गुह्य व्यक्तीलाच हे गुह्य ज्ञान सांगावे. 'राजगुह्य' म्हणजे राजानेही जे गुप्त ठेवावे इतक्या योग्यतेचे आहे ते. ते खरंच तसं पवित्र आहे.''

माणसाची तृप्ती का होत नाही, याचे कारण सांगताना ते म्हणतात, ''जोपर्यंत माणसाची ईश्वराने निर्माण केलेली प्रवृत्ती ईश्वरापर्यंत जाऊन मिळत नाही, तोपर्यंत त्याला तृप्ती नाही.''

नवव्या श्लोकावरील (अ.९) भाष्यात ते म्हणतात, भगवान सांगतात, ''ही जी माझी कर्मे आहेत, या ज्या प्रत्यक्ष क्रिया आहेत, त्या मला बाधक होत नाहीत. का? तर या दोन्ही वेळेस माझ्या मनात आसक्ती नसते.''

'निर्योगक्षेम हो' म्हणजे काय, याचे स्पष्टीकरण करताना ते सांगतात, ''निर्योगक्षेम म्हणजे येईल ते कसे येईल? आले तर कसे टिकेल? हा विचार डोक्यात ठेवू नको... आल्याचा आनंद नाही, गेल्याचे दु:ख नाही.'' अत्यंत साध्या, सोप्या शब्दात पण महान तत्त्व नेमकेपणाने सांगण्याची त्यांची खुबी आगळीच आहे!

दहाव्या श्लोकावरील भाष्यात ते म्हणतात, ''प्रकृती काम करते, पण माझ्या अध्यक्षतेखाली. मी 'लाईफ लाँग' अध्यक्ष आहे.''

'सगळा परमार्थ भावावर अवलंबून आहे.' असं अर्थगर्भ वाक्य ते सहज सांगून जातात. फक्त फलश्रुतीवर भाव ठेवून जे पारायण करतात त्यांना 'मोघाशा' म्हणावे. याच बाराव्या श्लोकातील 'राक्षसीमासुरीं' प्रकृतीच्या विवेचनात ते म्हणतात, ''दोघे गळा तर कापणारच. पण जे वेदना जाणवू देत नाहीत ते आसुर व वेदना देण्यासाठीच जे प्रहार करतात ते राक्षस.''

अभ्यासाची पद्धत सांगताना ते मौलिक म्हणजे, मूलभूत, पायाभूत मार्गदर्शन करतात. श्रवणाच्या मागे मनन, मननाच्या मागे चिंतन, चिंतनाच्या मागे निदिध्यासन आलेच पाहिजे. नाही तर श्रवणाला काही अर्थ राहात नाही.''

''श्रवणाने ज्ञान पूर्ण झाले पाहिजे. ज्ञानाला संपूर्णता आली पाहिजे. ज्ञानाची खोली वाढली पाहिजे. ज्ञानाचे यथार्थत्व प्रत्ययाला आले पाहिजे. ज्ञान हे साक्षात्काराला आले पाहिजे. नुसत्या थेअरीला आपणही व्यवहारात महत्त्व देत नाही ना?.... तर परमार्थात का नाही लक्षात ठेवत? म्हणूनच ज्ञात्वा आणि हे ज्ञान होण्यासाठी व झाल्यानंतरही तो कसा असतो तर 'भजन्त्यनन्यमनसा' अनन्य भावाने भगवंताची प्रार्थना करत असतो. सगळेच्या सगळे पंचकोश समर्पण केलेले असतात. आपले म्हणून काही शिल्लक ठेवलेले नसते.''

''परमात्मा अव्यय आहे, हेच जाणून घे. हे कशाकरिता जाणायचे? कारण त्याशिवाय व्यापकता येत नाही, चित्ताला, विचाराला. नाही तर चटकन जरा मनाविरुद्ध झाले की माणसे दिवसभर चरफडत असतात. का? तर संकुचित विचारामुळे. म्हणून मी अनेकवेळा सांगतो की, दुसऱ्याचे वकील व्हा आणि स्वत:चे न्यायाधीश व्हा.'' मनुष्याच्या मनाचं त्यांनी केलेलं विश्लेषण मार्मिक आहे आणि त्यावरील त्यांचं मार्गदर्शनही तितकंच मार्मिक!

एका ठिकाणी ते म्हणतात, 'बाहेर निसटायचं दार एक मनुष्य जन्मच. त्या मनुष्य शरीरात याचा (=जीवाचा) विचार (=वाटणं) की, काय घाई आहे?'

'सततं कीर्तयन्तो मां' या श्लोकावरील भाष्यात ते म्हणतात, 'एक माळ जप दोन मिनिटे नामस्मरण, तीन मिनिटे ध्यान आणि मग दिवसभर मोकळा!'.....'अनन्यभाव, एक दिवसात प्राप्त होणारी गोष्ट नाही.' 'यतन्तश्च दृढव्रता:' काही तरी निष्ठा बाळगून प्रयत्न करावे लागतात आणि हा प्रयत्न सातत्याने करत राहावा लागतो. म्हणजे अनन्यता येते.

इथे प्रत्येक पावलावर आपण ढिले असतो. एकतर दृढव्रत नसतो. त्या दृढव्रताने यतन्त नसतो. यतन्त असले तर सातत्य नसते. थोडे दिवस प्रयत्न करून कसे होणार?... गवत पटकन उगवते आक्रोडाच्या झाडांला फळे यायला साठ वर्षे लागतात.''

गीताश्लोकाचा अर्थ सांगताना स्वामी वरदानंद भारती सामान्य साधकाला गीतेतील तत्त्वे कशी आचरणात आणता येतील, ते समजावून देतात. आचरताना येणाऱ्या अडचणी लक्षात घेऊन मार्गदर्शन करतात. म्हणूनच त्यांचे सांगणे जिव्हाळ्याचे वाटते, आपुलकीचे वाटते.

'यतन्तश्च दृढव्रता:' सांगताना ते म्हणतात, 'जे दृढव्रत राहून प्रयत्न करतात, ते माझी उपासना चालवितात.' ''अंत:करणापासून आपल्या मीपणाला बदलून टाकले की, आपण भगवंताचे आहोत व भगवंत आपले आहेत असा दृढ निश्चय होतो व संसारातील इतर भोगापासून माणूस दूर होतो'' '' मनावर नियंत्रण प्रस्थापित झाले की, मनुष्य परमार्थ मार्गाचा पदवीधर होतो''

पंधराव्या श्लोकातील (अ.९) त्यांनी सांगितलेला ज्ञानयज्ञ (एकत्वेन) पाहा. ''त्या साम्याची 'एकत्व साधनाची' यज्ञ ही वेदी आहे. शांती हे यज्ञपात्र, जीव हा यज्ञकर्ता आहे. आत्मानात्मविचारांचे मनन हे मंत्र होत. यज्ञ करणारा जीव स्वरूपानुभवरूप पात्राने, ब्रह्मविचाररूप महामंत्राने व ज्ञानरूप अग्निहोत्र कर्माने जीव- ईश्वर ऐक्याने भेद नष्ट करून आहुती देतो. येथे अज्ञान संपते व यज्ञ करणारा व यज्ञ करणे दोन्हीही थांबते. आत्म्याच्या ऐक्य जलाने अवभृथस्नान होते. तेव्हा आत्मबुद्धीने 'हे सर्व एकच आहे' असे जाणतो.''

नवव्या अध्यायातील बाविसाव्या श्लोकातील 'योगक्षेम'बद्दल स्वामीजी काय सांगतात, या जिज्ञासेने मी यावरील भाष्य पाहिले आणि समाधान पावले. 'अनन्याश्चिन्तनायन्तो' म्हणजे काय, 'नित्याभियुत्मानाम्' म्हणजे काय आणि 'योगक्षेमं वहाम्यहम्' म्हणजे काय, हे आपण मुळातीलच स्वामीजींचे भाष्य वाचावे. स्वामीजी म्हणतात, ''हा श्लोक आध्यात्मिक व ऐहिक जीवनातील संतुलन राखण्यासाठी आहे.'' ''योग म्हणजे भगवंताचा संबंध. आणि क्षेम म्हणजे जीवाचे कल्याण. भगवान भक्ताच्या संबंधाला आपल्याशी दृढ करतात, तो भक्ताचा योग आणि भक्ताच्या कल्याणाच्या दृष्टीने प्रयत्न करतात ते क्षेम होय.''

''भगवान नेहमी भक्ताचे हितच पाहतात. जर भक्ताची भक्ती वाढत असेल, त्याचे कल्याण होत असेल तर भगवान प्राप्ताचे रक्षण करतील. कारण त्यातच त्याचे क्षेम असते. जर प्राप्ताचे रक्षण करण्यामुळे त्याची भक्ती वाढत नसेल तर भगवान त्या वस्तूला नष्ट करतील. कारण त्यातच भक्ताचे क्षेम आहे आणि म्हणूनच भक्त अनुकूल व प्रतिकूल परिस्थितीत शांत असतात.'' उच्च विचारांती आलेली केवढी मोठी ही समज आहे!

स्वामीजी सांगतात, ''तुम्हाला जेवढे शक्य आहे तेवढे प्रामाणिकपणाने करा. 'मीरा घाली मोतीचूर। जनी कांदा भाकर। दोघीसी शारंगधर। वश झाला सारखाचि।।' लोक म्हणतात, भगवान खात नाही. त्याला कारण त्याला प्रेमाने देणारा भेटत नाही. त्याला भूक असते ती फक्त भावाची. देव भावाचा भुकेला. श्लोक २६ व २७ या प्रसिद्ध दोन श्लोकांवरील भाष्यात ते म्हणतात, मागील श्लोकात काही वस्तू भगवंताला भक्तीपूर्वक अर्पण कराव्या म्हटले आहे. परंतु इथे भगवान स्वत:लाच अर्पण होण्यास सांगत आहेत. 'माझा हो' या छोट्या दिसणाऱ्या कार्यातून फार गहन असे तत्त्वज्ञान 'अहं ब्रह्मास्मि' हे सांगितले आहे. सगळे मला अर्पण कर, माझा हो म्हणजे तुला पूर्णत्व प्राप्त होईल.''

स्वामीजी भगवंतांचं मनोगत इथे उलगडतात की, 'तू केव्हाही कोणत्याही परिस्थितीत कोणत्याही कर्माचा कर्तेपणा घेऊ नको.' या अठ्ठाविसाव्या श्लोकावरील भाष्यातच नव्हे, तर पुढे 'समोऽहं सर्व भूतेषु' आणि 'स्त्रियो वैश्यास्तथाशूद्रा:' या श्लोकांवरील भाष्यातही स्वामीजी देवाचे मनोगत उलगडताहेत. ''भगवान हे जे थोडेसे परस्वाधीनपण आहे, ते लक्षात घेऊन म्हणतात की, जर हे माझ्या आश्रयाला येतील तर त्यांचाही उद्धार होऊ शकतो'' पुढे ते एक महत्त्वाची सूचना देतात की ''नाव पाण्यात राहावी, पण पाणी जसे नावेत राहू नये तसे मनुष्य संसारात राहावा. पण संसार माणसात राहू नये.'' 'अनित्यमसुखं लोकमिमं' हे सांगताना स्वामीजी सहज सांगून जातात. ''ही धर्मशाळा आहे. आहोत तोपर्यंत झाडून पुसून स्वच्छ ठेवावी. काम संपले की, चंबू गबाळे उचलून मुकाट्याने चालायला लागावे. मागाहून त्या धर्मशाळेचे काय झाले याचा विचार करायचे काही कारण नाही.''

नवव्या अध्यायाच्या शेवटच्या प्रसिद्ध श्लोकातील भाष्यात स्वामीजी म्हणतात, ''शरीर काम करते, मन काही काम करत नाही. म्हणून भगवान म्हणतात, 'मन्मना भव' - मन माझ्या ठिकाणी ठेव. हे केव्हा साधेल? 'मद् भक्तो' भक्ताची सगळ्यात उत्कट व्याख्या समर्थांनी केलेली आहे. जो विभक्त नाही तो भक्त. आपला देवासी जो संबंध आहे, हा जर घट्ट असेल, पक्का असेल तर बाकीच्या गोष्टी सहजासहजी जमतात, सहज साधतात. तो ढिला होतो. तो कशामुळे? तर कामक्रोधामुळे. तेव्हा ते कामक्रोध सोड. पुढचे जे 'मद्याजि मां नमस्कुरु' आहे हे कामक्रोधातून दूर होण्यासाठी आहे. भजन, याग, पूजा, पाठ जे काही असेल ते माझ्या उद्देशाने कर. मला उद्देशून कर. कारण त्या फलश्रुतीवर लक्ष ठेवून लोक पूजापाठ करतात. ... शरीर वाकते, पण 'दिल तो झुकता नही.' अंत:करणातला अहंकार जेव्हा संपतो, अंत:करणातला आग्रह जेव्हा संपतो तेव्हाच 'मां नमस्कुरु' साध्य होते.''

स्वामीजींच्या या तीनही भाष्य ग्रंथांचं सेवन आपण केलं, असं तेव्हाच होईल, जेव्हा त्यांनी यात सांगितल्याप्रमाणं आपण आचरण करू. त्यांच्या पवित्र स्मृतीला वंदन करून ते आचरण करण्याची शपथ घेऊ या.

**'दिव्यत्वाची जेथे प्रचीती । तेथे कर माझे जुळती ।।'**

**सौ. सुनंदा शाळिग्राम**
विश्वनाथ स्मृती, फ्लॅट नं. ३,
दत्तवाडी पोलिस चौकीसमोरील लेन, पुणे ४११ ०३०.
फोन - २४३२४७५०. मो. ९१७५५२२९९०,

•••



# विभूतियोग। (अ.१० व ११) विश्वरूपदर्शनयोग। भक्तियोग।। (अ.१२)

**सौ. ममता गद्रे**
बी.ए., गृहिणी
प्रवचन व कीर्तन सेवाभावनेने करतात. भिन्न मासिके व वर्तमानपत्रात लेखन

**विभूति योग**। (अ. १० व ११)
**विश्वरूपदर्शन योग। भक्तियोग** ।। अ.१२

मी प्राचार्य अ. दा. आठवले यांचे 'मनोबोध विवरण' हे पुस्तक वाचनालयांतून आणले आणि झपाटल्यागत वाचून काढले. महत्त्वाचे मुद्दे, टिपणे स्वरूपात घ्यावी तर, लहान मुलाला खेळण्याच्या दुकानात नेले तर हे घेऊ का ते घेऊ! दुकान उचलून नेऊ का। असे माझे झाले. प्रत्येक वाक्यच छान. मनाच्या श्लोकातील धन्य सर्वोत्तम दास, दासबोधातील महन्त, उत्तम पुरुष ज्ञानी ही सर्व लक्षणे आचरणात आणून मग स्वानुभव सांगणारी कुणी साक्षात्कारी व्यक्ती आहे हे वाचून जाणवले. भगवंताचा नाव गाव पत्ता, फोन नं. सगळे बघून आलेल्या विभूतीचे श्रीसमर्थांसोबतच दर्शन घडले. त्यांच्या दर्शनाची ओढ लागली कुठे व केव्हा कसे हे सत्पुरुष आपल्याला भेटतील? शोध घेता घेता दीड वर्षे तळमळत काढली व त्यांच्याच कृपेने गोरठ्यात पोचले. गोपाळ रमला त्या टेकडीवर मी पण रमले, चिकटले. 'मी' म्हणजे ना शरीर। मी मद्ग्रंथांचा संभार।' हे त्यांचे अंतिम शब्द मी अनुभवले. कारण 'मनोबोध' उपनिषदे, गीता, ज्ञानेश्वरी इ. ग्रंथाच्या वाचनातून सारी वर्णने, त्यांची विषयाची मांडणी गाव बघून नंतर त्याचे वर्णन केल्याप्रमाणे जाणवतात.

ओंकार ट्रस्टच्या 'कल्याणी' विशेषांकाच्या मालिकेत प. पू. स्वामी वरदानंद भारती हा अंक निघणार याचा अतिशय आनंद झाला. या अंकाच्या निमित्ताने श्रीमद् भगवदगीता अध्याय दहा, अकरा, बारा यावरील प. पू. स्वामी वरदानंद भारतींचे ग्रंथ वाचताना त्यांच्या विभूतिमत्त्वाचा पुन: प्रत्यय आला. बाराव्या अध्यायांतील भक्ताचे

**''अद्वेष्टा सर्व भूतानाम् मैत्र: करुण एव च।**
**निर्ममो निरहंकार: समदु:खसुख: क्षमी।।''** हे प्रत्यक्ष त्याचेच दर्शन घडवणारा श्लोक आहे.

'विभूति योग'च्या प्रस्तावनेत प. पू. किशोरजी व्यास सांगतात की, पू. स्वामीजींनी गीता सांगितली नाही तर संपूर्ण जीवनात उतरवली. व्यवहारात राहूनही व सर्व कर्तव्ये पार पाडून ते ''पद्मपत्र-मिवाम्भसा''नुसार अलिप्त राहिले. विश्वरूपदर्शनयोगात (११अ) प. पू. माधवानंद म्हणतात की 'विश्वरूपाचे' वर्णन जेव्हा स्वामी वरदानंद भारती करतात तेव्हा तो प्रसंग ते पाहात आहेत ते जाणवते.

**धावली हो पावली हो ही विठाई माऊली।**
**चंदनाने मोगऱ्याची माळ कंठी घातली।।**
**विश्वरूपे अर्जुनाचे भाव जे ओसंडले।**
**नाचली जी शैलजेच्या सन्मुखी शिव पाऊले।**
**वेदवाणी–माधुरी वा मूर्तरूपे वर्षते**
**एकदाची स्पर्श सारे अंग नेती धन्यते।**
**ही सुखे सारी अनंते पूर्ण चित्ती भोगिली।।**

यावरून गीतेच्या अध्यायावरील भाष्य शाब्दिक प्रवचन नसून हा अनुभव आहे.

अशा सिद्ध वाणीतून आपण अध्याय दहा, अकरा, बारा या विभूतियोग, विश्वरूपदर्शनयोग, भक्तियोग, या अध्यायांचे चिंतन त्याचेच बोट धरून करू या.

**''जगावेगळा याचक आणिक जगावेगळा धनी।**
**मुठभर पोह्यासाठि दिली का सुवर्ण नगरी कुणी।''**

असे भगवंताचे वर्णन तसेच पू. स्वामीजींचे आपल्या बाबतीत आहे. त्यांनी सर्वांना आचार विचार, तपश्चर्येतून फार मोठे विचारधन दिले. ते म्हणतात की सगळे अध्याय थेअरी सांगतात. (आधी विभूती व नंतर विश्वरूप) या अध्यायात थेअरीवर आधारलेले 'प्रत्यक्ष' प्रगट होते. प्रत्यक्ष शब्द फार मार्मिकतेने वापरून त्यांनी भगवान श्रीकृष्ण प्रात्यक्षिक दाखवणारी कुणी व्यक्ती नसून भगवंताला स्वत:लाच दाखवायचे आहे. स्वामींचे हे आपल्यावर असलेले ऋण फेडण्याची आपली क्षमता नसली तरी हे ऋण मी अभिमानाने मिरवावे असे आहे.

नवव्या अध्यायाच्या शेवटी ....

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि युक्त्वैव – मात्मानं मत्परायण:।।**

एवढे सांगून भगवंतांचं समाधान झाले नाही त्यामुळे आपले रहस्य प्रगट करण्यासाठी अध्याय दहा व अकरा सांगितले. जीवाने सतत भगवद् सन्मुख राहावे हा या अध्यायांचा उद्देश आहे. बारावा अध्याय म्हणजे भक्तियोग व ज्ञानयोगाचा संगम आहे. पू. स्वामीजींना हेच सांगायचे की साधकाने आपली चिंतनशक्ती व दर्शनशक्ती वाढवण्यासाठी भगवंताशिवाय दुसऱ्या विचारात खर्च करू नये. या (१०, ११, १२) अध्यायांचे मर्म फक्त श्रीगुरुकृपेनेच कळेल.

प. पू. पांडुरंग शास्त्रींनी गीतेच्या अध्यायांची तीन विभागात वाटणी केली. प्रथम ६ अध्यायांत 'त्वम्' पदाचा विचार केला. जीव वस्तुत: परब्रह्मच आहे. जीवाने 'स्व' स्वरूप जाणून घेण्यासाठी कर्म ज्ञान, संन्यास इ. समजून आचरणाद्वारे विकास करून घ्यावा. व स्वत:चे परब्रह्मरूप 'त्वम्' पदार्थलक्ष्यी जाणून घ्यावे हे आहे. 'त्वम्' पदार्थ उत्तरोत्तर शुद्ध होऊन 'तत्'शी एकरूप होण्यासाठी 'तत्' पदाचा विचार स्पष्ट करणारे अ. ७ ते १२ अध्याय आहेत. उत्तरार्धाचा प्रारंभ!

विभूति योगाचा आरंभ श्रीभगवान् उवाचने आहे.

**भूय एव महाबाहो श्रुणु मे परमं वच:।**

**यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ।।१।।**

या आधी ७ व ९ अध्यायात स्वत:चे स्वरूप विभूतीरूप सांगितले तरी आता पुन्हा सांगतो. कारण सांगितलेले आचरणात आणणारा आदर्श शिष्य अर्जुनाच्या हितासाठी माऊलीच्या उत्कटतेतून भगवान पुन्हा सांगायला प्रवृत्त झाले. ते म्हणतात माझे सामर्थ्य, उत्पत्ती, महिमा हे ऋषी, ज्ञानी, तपस्वी देवांनाही कळत नाही. (२) प्रत्यक्ष प्रमाण, अनुमान प्रमाण, शब्द प्रमाण ह्या साधनाद्वारे जाणायचे तर प्रत्यक्ष ज्ञान महत्त्वाचे असले तरी प्रत्येकाला प्रत्यक्ष ज्ञान होत नाही. म्हणूनच .... आप्त वाक्यावर विश्वास ठेवूनच श्रद्धेने गीता कळू शकते. श्रीज्ञानदेवांनी उदा. दिले की आई-वडिलांच्या वयाचे प्रत्यक्ष ज्ञान होण्यासाठी कुणाच्या सांगण्यावर विश्वासच ठेवावा लागतो. इथे तर भगवंताचे स्वरूप अनंत असीम आहे. मनुष्याने मूर्ख राहू नये म्हणून बुद्धी, ज्ञान, असंमोह, क्षमा (४) इ. गोष्टी दिल्या. ज्ञान, बुद्धीबद्दल पू. स्वामीजींचे भाष्य मार्मिक आहे. दोरी- सर्प या परिचित उदाहरणात ते म्हणतात अज्ञान पूर्ण असले तरी साप दिसत नाही. पूर्ण ज्ञान असले तरी साप दिसत नाही. सगळे भाव भगवंताने माणसाला दिले. ''जसे आहे तसे कळणे'' व आपल्याला जे कळले ते जसेच्या तसे सांगणे ह्यातून सत्याचे भाव स्पष्ट होतात. भगवद् भावाचा आपल्याला प्रगतीसाठी विवेक विचाराने उपयोग करावा असा केला तर 'सत्य तू सत्य तू सत्य तू विठ्ठला' हा तुकोबांचा अनुभव येईल.

भगवंताने गीता सांगितली ती 'हितकाम्यया' या भावाने. हितकारक व सुखकारक दोहोतील बारकावा मार्मिक आहे. सुखकारक असेल ते हितकारक असेल असे नाही. तसेच हितकर असेल ते सुखाचे असेल असे नाही. म्हणून जीवाने सुखापेक्षा हिताचा विचार करावा. मग हितकारक काय? भगवंत म्हणतात या विभूतींचा व योगाचा जो तत्त्वत: विचार करतो तो स्थिर व निश्चल राहतो. प. पू. स्वामींनी आश्वासन दिले आहे. ते म्हणतात, गीता, ज्ञानेश्वर, गाथा, दासबोध वाचा. ज्यामुळे भरकटायची गरज नाही. परिस्थितीची काळजी करीत बसू नका. परिस्थिती कितीही वाईट झाली तरी ज्ञानेश्वर तुकाराम होणे कोणालाही शक्य आहे.

या विभूतीचे दहा बारा प्रकारात वर्गीकरण करता येते. ब्राह्मण विभूतीमत्त्वात - पुरोधसां च मुख्यं, महर्षीणां भृगुरहम्, देवर्षीणाम् च नारद:, कवीनामुशना कवि:, मुनीनामप्यहं व्यास:। क्षत्रिय विभूतीत- राम:शस्त्रभृतामहम्, वृष्णीनां वासुदेवोस्मि, पांडवानां धनंजय, सर्पाणामास्मि वासुकी: अनन्तश्चास्मि नागानं, प्रल्हादश्चास्मि दैत्यानां. देवांच्यात - देवानामस्मि वासव:, धाताहं विश्वतोमुख:, आदित्यानां अहं विष्णु:, ज्योतिषां रविरंशुमान्, रुद्राणां शंकरश्चास्मि, पवन: पवतामस्मि, पितरात-पितृणामर्यमा:, गंधर्वात चित्ररथ, वित्तेशो यक्षरक्षसां, गुणरुपात ज्ञानं ज्ञानवतामहम्, वाद: प्रमदतामहम्, मौनं चैवास्मि गुह्यानाम्, दण्डो दमयतामस्मि; तेजस्तेजस्विनामहम्, जयोस्मि व्यवसायोऽस्मि, सत्यं सत्यवतामहम्। विद्येमध्ये - अध्यात्मविद्या विद्यानाम्। अक्षराणाम् अकारोस्मि गिरामस्म्येकमक्षरम्। वेदांमध्ये - वेदानाम् - सामवेदोऽस्मि, बृहत्साम तथा सम्नां, गायत्री छंदसामहम्। द्वंद्व: सामासिकस्या च; यज्ञानाम् जपयज्ञोस्मि। पशुपक्ष्यात - धेनूनामस्मि कामधुक्, उच्चै: श्रवसमश्वानां, ऐरावतं गजेंद्राणाम्, मृगाणांच मृगेन्द्रोऽहं, वैनतेयश्च पक्षिणाम्। झषाणां मकरश्चास्मि। जड वस्तूत - स्थावरणां हिमालय:, मेरु: शिखरिणामहम्, अश्वत्थ: सर्व वृक्षाणाम्, सरसामस्मि सागर: स्रोतसामस्मि जान्हवी। इंद्रियाणां मनश्चास्मि। आयुधानामहं वज्रम्। जन्म मृत्युत-उद्‌भवश्च भविष्यताम्, मृत्यु : सर्वहरश्चाहम्, यम: संयमतामहम्।

त्या विभूति वाचल्या की सर्व जगाच्या संस्कृतीमध्ये भारतीय संस्कृती वैभवशाली आहे. यात साधेपणा, विविधता तरी एकता आहे. या विभूतींमध्ये एक वैशिष्ट्य प. पू. स्वामींनी सांगितले की, विभूती सांगताना व्यक्तिमत्त्वाचा प्रत्यक्ष उल्लेख आहे. पण कीर्ति: श्रीर्वाक् च नारीणां (३४) यात स्त्रियांतले व्यक्तिमत्त्व सांगितले नाही. भावनाविशेष सांगितले. ही नावे दक्षाच्या मुलीची असल्याने म्हटले तर व्यक्तिमत्त्व भाव आहे.

या विभूतींचे अध्यायाचे सार श्लोक ४१, ४२ मध्ये स्पष्ट केले.

**यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा।**

**तत्तदेवावगच्छ त्वं मम् तेजोंऽशसंभवम्। ४१**

**एकांशेन स्थितो जगत् ।।४।।**

मुंगीपासून ब्रह्मापर्यंत जे जे दिसते ते भगवद् व्याप्त - त्याच्यावाचून विश्वात दुसरे काही नाही. सृष्टीतला ईश्वर समजला की भक्तीची पातळी उंचावेल. **''जेथ जेथ संपत्ती आणि दया। दोन्ही वसति आलिया एके ठाया। ते जाण धनंजया। अंश माझे। जे जे भेटे भूत । ते मानिजे भगवंत ।''** अशा विश्वव्याप्त भगवंताचा अनुभव घेऊनही संतांचे भावहृदय आकर्षक होते. 'माझ्या बंधू भगिनींनो' एवढ्या शब्दांनी सभा जिंकणारे स्वामी विवेकानंद विभूतीच होते. भक्तिभावाने हा अधिकार प्राप्त करणाऱ्याला, त्याच्या शब्दांना ईश्वरी आज्ञेचे सामर्थ्य प्राप्त होते. सर्वत्र विभूतिमत्त्वाचा अनुभव असणाऱ्या या थोर विभूतींना नम्र अभिवादन करून आपणही सद्‌गुरु कृपेने अर्जुनाने प्रत्यक्ष बघितलेले विश्वरूप दर्शन घेऊ.

भगवंताचे खास विश्रांतीचे स्थान असलेला विश्वरूप दर्शनाचा अकरावा अध्याय. सोमवंशी तुम्हा पांडवा । माजी अर्जुना तो मी जाणावा।। असा भाग्यवान अर्जुन ।। श्रीकृष्णाकडे दुर्योधन आधी पोचला तरी अर्जुन आधी दिसला. तेव्हाच परब्रह्म स्वरूप श्रीकृष्णाला त्याने हस्तगत केले. रणभूमीवर साक्षात् ब्रह्मानुभव घेतला. प्रत्यक्ष पूज्य स्वामी

वरदानंद भारती म्हणतात, 'हा अध्याय समजून घेणे कठीण! गोपाळ कृष्णाचे विश्वरूप अर्जुनालासुद्धा सहन झाले नाही. मग सामान्य जीवाची काय कथा? त्यामुळे अर्जुनाला आवडणारे चतुर्भुज वा गोपींचा बन्सीधर वा स्वामींना प्रिय असणाऱ्या भ. वरदनारायण ह्यातले कोणतेही रूप, हृद्य दर्शन घेऊन चिंतनाला, विचाराला प्रारंभ केला तर लक्षात येईल की विचाराच्या पलीकडे गेल्याशिवाय या अद्‌भूत भगवद् स्वरूपाला समजून घेता येणार नाही. ब्रॅडलेच्या एका ग्रंथात तो म्हणतो, ''सत्य कळायचे असेल तर बुद्धीने स्वत: विसर्जित व्हावे.''

नवरसात शांत व अद्‌भुत रसांचे बेमालूम मिश्रण असलेल्या विश्वरूप दर्शनाच्या अध्यायाचे महात्म्य स्वामीजी सांगतात की हा ११ वा अध्याय रोज ११ वेळा निदान ७ वेळा, पाच वेळा, तीन वेळा जपला तर सर्व बाधांचा नाश होतो (भूतपिशाच्च निकट नहि आवै) मनाच्या प्रसन्नतेसाठी १२ वा अध्याय व बाह्य पीडांसाठी ११ वा अध्याय वाचावा. अध्यायाच्या शेवटी ११ श्लोकांत अर्जुनाने जी प्रार्थना केली आहे तिने त्याचा उपसंहार करून अर्जुनाच्या स्तुतीने केलेल्या उपसंहाराने मनुष्य निर्भय होतो. त्यामुळे शरीर व मनाचा शतजन्माचा मळ धुतला जाईल. नामरूपाने सजलेल्या संसाराची आसक्ती उरणार नाही. व्यासांच्या दिव्य प्रतिभेचा अनोखा आविष्कार असलेला हा अध्याय!

**सुवर्णाचे मणीं केले। ते सोनियाचे सुती गुंतले।**
**तैसे जग म्या व्यापिले। सबाह्य अभ्यंतरी।।**

ह्या ऐश्वर्ययोग विभूतींच्या माध्यमातून ऐकल्यावर विश्वरूपाची ओढ अर्जुनाला लागली. वसुदेव, देवकी, गरूड इ. निकटस्थांनीही इच्छा केली नाही. मग आपण विश्वरूप दाखवा असें न म्हणणेच बरे! पण 'आता पुसो अळुमाळसे। मग करू ठाके तैसे। या विचाराने आपली इच्छा व्यक्त करताच,

**''पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रश:**
**नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च।।५।।''**

अर्जुना, शेकडो हजारो रूपांनी नाना आकृती वर्ण अशी रूपे पहा. शब्द थोडे अर्थ खोल अशी प्रतिभा असणारे ज्ञानदेवच हे दर्शन घेऊ शकतात. येरा गबाळाचे काम नोहे. वेद जिथे नेति नेति असें वर्णन करतात ते आश्चर्य प्रत्यक्ष बघ असं भगवंत म्हणतात. पण अर्जुन होता तैसाचि आहे असे लक्षात येताच त्याला ज्ञानदृष्टी दिली. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात,

**'हे अवतार सकळ। जे समुद्राचिये कल्लोळ।**
**विश्व हे मृगजळ। जया रश्मिस्तव दिसे।।''**

भगवंतांचे अवतार सुद्धा सागराच्या लाटांप्रमाणे आहेत. ज्याच्यामुळे सारे विश्व मृगजळाप्रमाणे भासते. असे म्हणण्यात केवढे धाडस आहे. महासागरातील बुडबुड्याप्रमाणे अर्जुनाला जग दिसले. बापुड्या त्रैलोक्याचा होतसे हुरडा। अनेक वक्त्रनयनं अनेकाद्‌भुत दर्शनम्' या अद्‌भुत दर्शनाचे दृष्टीच्या भावाचे स्वामींजींनी अप्रतिम विवरण केले. ते म्हणतात, माणसाच्या साऱ्या भाव-भावना डोळ्यांत दिसतात. मन:स्थितीचे प्रतिबिंबही डोळ्यातून प्रगट होते. पाहण्या पाहण्यातही फरक असतो. प्रेमाने, रागाने, लोभाने, थट्टेने, उपहासाने हे सर्व निरनिराळे भाव असतात. हे सारे विशेष भाव विश्वरूपात दिसत होते. कारण हे सगळे भाव प्रसंगाने उपयुक्तच असतात. निरुपयोगी कुणीच नसतो. उदा. काटा, चांगला नाही तसा वाईटही नाही. काटा बैठकीवर वाईट, कुंपणावर चांगला। सगळी अक्षरे मंत्रशक्तीने भारलेलीच, पण त्यांच्या उपयोगावर सारे अवलंबून. योजकस्तत्र दुर्लभ: विश्वरूपाची व्यापकता वाढते तेव्हा सगळ्या विसंगती व्यापकतेच्या पोटात सुसंगत होतात. तेही आपले वैशिष्ट्य न गमावता. ही वस्तुस्थिती फक्त भारतानेच ओळखली. भारतात विविधतेत एकता नांदू शकते. कारण विश्वरूपात सर्व ब्रह्मरूप हे आपले अधिष्ठान आहे. हजारों डोळे, पाय, डोकी एका ध्येयाने पाहतील, तर अर्जुनाचे भाग्य आपणही पुन्हा मिळवू शकू.

सनातन म्हणजे नित्य नूतन अशा भगवंताचे अमर्याद, आदी मध्य अन्त ज्याला नाही (१९) असे रूप बघून अर्जुनाचे अंत:करण अनेक भावनांनी भरून आले. त्यात आश्चर्य, श्रद्धा, भक्ती आहे, पण भीतीही आहे. अत्यंत असामान्य धैर्यशील अर्जुन अक्राळ रूपाने घाबरला. पण भविष्यकालीन गोष्टींचा साक्षात्कार त्याला झाला. कारण भीष्म, द्रोण, कर्ण, जयद्रथ, विराट, द्रुपद, अभिमन्यू, पांच द्रौपदी पुत्रांनाही जेव्हा मुखात गेलेले पाहून आता अर्जुन मुळापासून हादरला. भगवान् मी ज्याला विनंती केली तेच तुम्ही? तुम्ही कोण आहात? सौंदर्य, सौम्यता जी अर्जुनाला भावली होती ती कुठेच यात जुळत नाही. तेव्हा श्रीभगवान म्हणतात, 'कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो' असा मी काल आहे. उदा.ने स्पष्ट केले की निर्माणाची प्रक्रिया करावी लागते. विनाशाची आपोआप होते. ते घर प्रयत्नाने बांधावे लागते, पण पडण्याची क्रिया कालानुरूप घडते. अर्जुन थरथरतो. सगद्‌गद् भीतभीत: प्रण्यम्य म्हणतो, अध्यायाच्या उत्ताराधात अर्जुनाच्या तोंडून एक सिद्धांत कळतो. भगवान् खरोखरच तुमच्या कीर्तीचे स्मरण, गुणगान हेच जगाच्या आनंदाचे एकमात्र कारण आहे. माणसाला अन्यत्र आनंद मिळत नाही. सुखाची किल्ली परमार्थात हरवली आहे व माणूस हुडकतो संसारात. त्यामुळे सापडणार कशी? हरवली तिथे हुडकत नाही व हुडकतो तिथे सापडत नाही. अर्जुनाचे पुढील प्रार्थनारूप श्लोक मंत्ररूप आहेत. ''देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत्'' यात पू. स्वामीजी म्हणतात सगळा वेदांत आला. वेदान्तातील तत्वज्ञान सांगते परमेश्वर सगळ्याच वादाच्या पलीकडे आहे. कारण तो अक्षर ब्रह्म आहे. 'अक्षरं ब्रह्म परमं' हे अक्षर ब्रह्म कसे आहे? 'सद सत् तत्परं यत्' सामान्य माणसाला सत् कळते असत् कळते. पण दोन्ही आहे हे समजत नाही आणि म्हणूनच भगवंत कुठे आहेत हे चटकन समजत नाही. कारण ते सत् असताच्या पलीकडे आहेत. पण तरी त्याचे ज्ञान होऊ शकते, पण केव्हा? भगवंतावर श्रद्धा ठेवून जो वाटचाल करतो तो श्रद्धावन्ताला बुद्धियोग देतो. असाल तेथून पुढे चला, यत्न सोडा ना। रामकृष्ण हरि जय जय भावाने म्हणा।'' अर्जुन हजारो नमस्कार घालतो. सर्व व्याप्ताला प्रदक्षिणा घालणार कशी? शास्त्राने तत्त्वज्ञान बाधित होऊ न देता प्रदक्षिणेची व्यवस्था केली. स्वत:भोवतीच फिरून प्रदक्षिणा घालायची. कारण तो हृदयस्थ आहे. श्लो. ४१, ४२ मध्ये अर्जुनाचे हृदयच ओतले. कारण भगवंताचे

व्यापकपण न समजल्याने अजाणता झालेल्या अपराधांची जाणीव अर्जुनाला झाली. तुमचे मोठेपण मला क्षमा करूनच तुम्ही करा. मला विश्वरूप नको, पूर्वीचे मनोहारी रूप दाखवा. प्रार्थनेने भगवंत प्रसन्न झाले. भारी वस्त्र दुकानदाराने उलगडून दाखवले व परत घडी करून ठेवून द्यावे तसे मधुर सुंदर रूपात प्रगट झाले. असा भगवंत वेदाध्ययन, तपश्चर्या, दान, यज्ञ, कर्मकांडाने नाही तर भक्तीने कळतो. भक्तियोग अध्यायाचे बीजारोपण भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन। ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रविष्टुं च परंतप।।५४।। ज्ञानदेवांनी या अध्यायात ओवीरूप मोकळी फुले सद्भावांच्या ओंजळीत घेऊन ती विश्वरूपाच्या पावलांवर अर्पण केली आहेत. नम्रपणे विश्वरूप प्रभुला व त्याच्याशी आत्मयोग साधणाऱ्या अर्जुनाला प्रणाम! भक्तियोगाचे बीज उगवले व प्रकटले तो बारावा अध्याय म्हणजे प. पू. स्वामी वरदानंद भारती यांचा आवडीचा अध्याय आहे. त्यातही श्री ज्ञानेश्वरीच्या अंगाने विवेचनाचा बाज असणारा हा बारावा अध्याय त्याचे चिंतन स्वामींच्या चरणाशी बसून करण्याचा प्रयत्न करू या. कारण त्यांनी शुद्ध भक्तीचा पुरस्कारच केला.

कृष्णभक्त अर्जुनाच्या प्रश्नाने हा भक्तियोग अध्याय सुरू झाला. अर्जुनाने ''तेजोमयं विश्वमनंतमाद्यं - यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम्।'' असे भव्यरूप बघून प्रसन्न आहे. पण गीतेच्या २ ते ६ व्या अध्यायापर्यंत निर्गुणाचे आधिक्य आहे. ७ ते ११ पर्यंत सगुणाचे वर्णन आहे. विश्वमूर्ती लाख चांगली तरी चतुर्भुज मनोहारी मूर्ती चांगली असे अर्जुनाला वाटले. भगवंताने फटकारलेही. पण स्थिरबुद्धी झालेले (१) तुझी उपासना करणारे भक्त व अव्यक्त अशा अक्षराची उपासना करणारे या दोहोत ज्यांना नेमके ज्ञान झाले असे उत्तम योगी कोण? या प्रश्नाने भ. श्रीकृष्ण प्रसन्न झाले. म्हणाले, माझ्या ठिकाणी मन ठेवून, नित्ययुक्त होऊन श्रद्धेने उपासना करतात ते उत्कृष्ट योगी! असे मी समजतो.

या अध्यायाचे विवेचन हे स्वामींनी श्री ज्ञानेश्वरीच्या आधारे केल्याने 'जय जय शुद्धे । उदारे प्रसिद्धे। अनव्रत आनंदे। वर्षतिये।।' अशा श्रीगुरु-महात्म्याचे वर्णन त्यातील शब्दांचे सूक्ष्म अर्थ स्वामींनी केले. श्रीगुरुकृपेने विषय व्याळें मिठीतून सुटका होते. याचा अर्थ विषय नाहीसा होत नाही. विषयाचा परिणाम नाहीसा होतो. डोक्यात चढत नाही. म्हणूनच साधकांसाठी तू माऊली आहेस. श्रीगुरु-माऊली, श्रोत्यांना अवधान दीजे म्हणून अर्जुनाला भक्तीचा महिमा सांगते. श्रद्धायुक्त मनाचे उपासक मला येऊन मिळतात. यात श्रद्धा महत्त्वाची. प्रेमगली अति साँकुरी दोनो नाही समाये। आपुन है तो हरि नाही हरि है तो आपुन ना।'' रस्ता इतका अरुंद की द्वैतासकट शिरताच येणार नाही. अहं ब्रह्मास्मि मधले 'अहं' व 'अस्मि' सुद्धा गळणे ही श्रद्धा. पू. स्वामी म्हणतात माणसाला असेल ते मिटवा आणि नसेल ते भेटवा याची खोड लागलेली असते. त्यामुळे विरघळताना ढेकूळ, मीठ पाण्यात विघळते. तसेच विरघळावे लागते का? पाण्यात ढेकळाचे व मिठाचे अस्तित्व राहतेच. विरघळावे लागते ते बर्फाच्या खड्यासारखे. अद्वैती संतानांच असा सुंदर दृष्टान्त स्फुरणे शक्य आहे.

जे भक्त अव्यक्ताची उपासना करतात त्यांना दु:ख, क्लेश सोसावे लागते. 'अग्निप्रवेश नित्य नवा' असे माऊलींनी वर्णन केले. भक्तिमार्गात सेफ्टी व्हॉल्व्ह चांगले आहेत. आऊटलेट छान, निरुपद्रवी आहे. पण ज्ञान वा भक्तीपैकी जो कोणत्याच मार्गाने जात नाही त्याला सगळेच कठीण!

सामान्यत: पूजा, पोथीवाचन, उपास तापास , भजन, कीर्तन, यात्रा इ. म्हणजे भक्तिमार्ग व हे करणारा भक्त अशी समजूत किती चुकीची, वरवरची, दंभ अहंकार वाढवणारी आहे. हे हा बारावा अध्याय व त्यावरील भाष्य वाचले की कळते. आपली सर्व कर्मे, क्रिया मला अर्पण करतात. माझ्यामध्ये सोडतात. मत्पर होऊन अनन्यतेने मला भजतात. ते माझे भक्त होत. राधेची, गोपींची, प्रल्हादाची, मीरेची अनन्यता आपल्याजवळ नाही. कुठलाही स्वार्थाचा यत्किंचित स्पर्शही इथे चालत नाही. सुदामदेवांसारखा चेक आम्हाला देत येत नाही. त्यामुळे अंत:करण एकरूप करणाऱ्यांचे मी संसार सागरातून रक्षण करतो. मी हजारो नावा घेऊन येतो. तुला वाटेल त्यात बस. भक्तासाठी भगवान् नाम तर विरक्तासाठी ध्यान.

भगवंतांशी ऐक्य साधण्यासाठी सामान्य माणसाला श्री ज्ञानदेवांनी अनेक साधने ठेवली.

**''अगा, मानस तू एक । माझ्या स्वरूपी सवृत्तिक। करुनि घाली निष्टक।''** निदान **''मोटके निमिषभरी। देत जाई।''** किंवा **''अभ्यास कर कारण अभ्यासासी काही । सर्वथा दुष्कर नाही।''** **''जेणे वेळे। घडती कर्मेसकळे। तयाची फळे। त्याजित जाय।''**

यावर स्वामीजींचे भाष्य सांगते की हे सोपे नाही. ते सांगतात, हे उपाय काय एकापेक्षा एक सोपे आहेत? तसे नसून एका पेक्षा एक निराळे आहेत ते कसे? स्वामीजी म्हणतात, सगळ्यांची बुद्धी सगळीकडे चालते असे थोडेच आहे? कोणाची साहित्यात, विज्ञानात, व्याकरणात असंख्य विषयात. प्रत्येकाची बुद्धी वेगवेगळी चालते. यात कोणता विषय सोपा? प्रत्येक विषयात खरे ज्ञान मिळवायचे तर ते सोपे नाही. प्रत्येक विषय एकापेक्षा दुसरे वेगळे आहे. प्रत्येकाची बुद्धी, प्रकृती, परिस्थिती संस्कार याचा विचार करता एकेक गोष्ट सोयीची असू शकते. म्हणून भगवान कृष्ण सांगतात, हे जमत नसेल तर ते कर. हा वेगवेगळेपणा सोयीच्या दृष्टीने आहे. हे मार्ग एकापेक्षा दुसरा सोपा म्हणून नाही. या विवेचनामुळे साधकाने या उपायातून स्वत: विचाराने उपाय शोधावा हे अप्रतिम मार्गदर्शन मिळते. माणसाला परमेश्वराने बुद्धी देऊन कृपा केली. पण सद्गुरु दासगणू महाराज म्हणतात, 'बुद्धी कराया पुण्य जाय परि मन खेची अघडोही' अशीच माणसाची स्थिती होते.

अभ्यासाने कठीण विषयही आत्मसात करता येतो. समर्थांचा दाखला- रूपलावण्य अभ्यासिता नये। सहज गुणासी न चले सोये। जे असेल त्यातून वर जाता येते. अभ्यासाने एकी वाग्ब्रह्म थोकडे केले या साधते. अभ्यास, ज्ञान, ध्यान, कर्मफलत्याग मग शांती. शांतीसुखाला प्राप्त भक्ताची लक्षणे सांगितली. अद्वेष्टा सर्वभूतानां.... मैत्र: करुण एव च। निर्ममो निरहंकार: समदु:खसुख: क्षमी या १३ व्या श्लोकापासून १८ श्लोकांत यो मद्भक्त: स मे प्रिय: यासारख्या पालुपदातून अतीव प्रिय भक्त लक्षणे सांगितली. श्रीगीतेत स्थितप्रज्ञ, संन्यासी, उत्तम पुरुष ज्ञानी, गुणातीत ह्या सर्व नावांत भिन्नता असली तरी भक्तियोगातल्या

भक्ताचीच ती नावे आहेत. यात अद्वैतच भरले आहे. भक्ताच्या कारुण्यातील बारकावा कसा? आईत करुणा असते पण ती श्रेष्ठ नर्स होऊ शकत नाही. कारण आईची करुणा ममत्वाने युक्त असते. आपली मन, बुद्धी ईश्वरअर्पण करणारा श्रेष्ठ भक्त आहे. स्वामींनी याचे स्पष्टीकरण फार मार्गदर्शक शब्दात केले. ते म्हणतात, मन बुद्धीला ईश्वरा व्यतिरिक्त विषय नसेल तर व्यवहार कसा व्हायचा? तर आपल्या हे लक्षातच येत नाही की आपल्या शरीरात हायर सेंटर्स व लोअर सेंटर्स दोन प्रकारे आहेत. हायर सेंटर परमेश्वराच्या स्वाधीन करायचे, लोअर सेंटर व्यवहारात ठेवायचे. यामुळे काही बिघडत नाही. सायकलचे उदाहरण दिले की सायकल चालवताना अनेक गोष्टींवर लक्ष ठेवून माणूस तोल सांभाळतो. तसेच व्यवहारातील सर्व तोल सांभाळत भगवद् चिंतन घडले तर आपल्याला ईश्वर सांभाळतो.

सुख, दु:ख, मान, अपमान, इच्छा, द्वेष, अशा सर्व द्वंद्वातून मुक्त झालेला भक्त हा मोक्षाचा अधिकारी होतो. तो भक्त **हें विश्वचि माझे घर। ऐसी मती जयाची स्थिर। किंबहुना चराचर । आपण जाहला।।** असा असतो. या ओवीतून महाराज व्यवहार आणि तत्त्वज्ञान दोन्ही सांगतात. अद्वैत ज्ञानाचे ते पुरस्कर्ते आहेत. सर्वं खल्विदं ब्रह्म हे महावाक्य सर्वत्र एक ब्रह्मच भरून आहे. जे जे भासते, दिसते, प्रत्ययाने येते ते शुद्ध ब्रह्मच. ह्या सर्वोत्कृष्ट सिद्धांताची छाया या ओवीवर पडली. ''किंबहुना चराचर । आपण जाहला।'' यातून ती स्पष्ट होते. जगावरचे त्यातील वस्तुमात्रांवरील उपभोगाची कल्पना सोडली तरच हे विश्व माझे घर होईल. विश्वावरील स्वामित्व असते ते उपभोगशून्य असते. हे विश्व माझे घर आहे असा भाव असणे सोपे नाही. अशा भक्ताला अलिंगन द्यायला दोन हात पुरत नाहीत. म्हणून **''दोवरी दोनी। भुजा आलो घेऊनी ।। आलिंगावया लागून। तयांचे अंग।।** ''भक्तासाठी चतर्भुज होणाऱ्या भगवान श्रीकृष्ण व निर्गुणाला सगुण व्हायला लावणाऱ्या भक्तांना प्रणाम!

मोक्ष ही कुठे जाऊन मिळवायची गोष्ट नाही. एखादी कॉलनी वा हिलस्टेशन नाही. तर मोक्ष ही चेतो विमलं। लहान मुलासारखे निरागस अंत:करण म्हणजे कसे सम्यज्ञान विमोहितं, सम्यक ज्ञान जे ईश्वरी ज्ञानाने मोहीत झालेले आहे. ज्यात वासना, अपेक्षा, कामक्रोधांचा मळ, अहंकार, अंत:करणात नाही अशी स्थिति म्हणजे मोक्ष. ज्ञानयुक्त अंत:करण असा मोक्ष संतांच्या संगतीत रोकडा म्हणजे कॅश म्हणजे रोख मिळतो असे प. पू. स्वामी वरदानंद भारतींनी आश्वासन दिले. त्यांच्या गीतेतील अध्याय १० विभूतीयोग अध्याय ११ विश्वरूप दर्शन, अध्याय १२ भक्तियोग या भाष्यावर त्याचे कृपेनी त्यांच्या ग्रंथरूप वाङ्मूर्तीच्या संत संगती जेवढे सुंदर वेचता आले ते वेचलेली ही त्यांचीच शब्दफुले त्यांना अर्पण! समर्थेसमर्थ करावे ही प्रार्थना!

**संदर्भ ग्रंथ :** श्रीमद् भगवद्गीता (गोरखपूर)
गीतामृतम् (प. पू. पांडुरंगशास्त्री आठवले)
सर्व आधार स्वामींचे अ. १०, ११, १२ वरील भाष्य ग्रंथ.

**सौ. ममता गद्रे**
२२२, ए गोकुळपेठ, कॉफी हाऊसची गल्ली,
नागपूर, ४४० ०१० फोन : ०७१२-२५४८९२४



# ज्ञानयोगावरील प.पू. स्वामींचे सूत्रबद्ध भाष्य

**प्रा. डॉ. सौ. आरती दातार**

एम्.ए.; पीएच.डी., आबासाहेब गरवारे महाविद्यालयात 'मराठी'चे अध्यापन, ३० वर्षे. निवृत्त मराठी विभागप्रमुख, पीएच.डी. साठी मार्गदर्शन. संतसाहित्य, संतचरित्र हा भक्तीचा भाव. व्याख्याती, प्रवचनकार, लेखिका. २०१२ गदिमा प्रतिष्ठान तर्फे पुरस्कार 'गृहिणी, सखी, सचिव. २०१३ – कवी अनंत फंदी साहित्य पुरस्कार, 'शून्यातून सूर्याकडे' 'आत्मकथनासाठी'

श्रीरामायण, महाभारत, श्रीज्ञानेश्वरी, भगवद्गीता, शिवचरित्र हे ग्रंथराज आपल्या वैभवशाली संस्कृतीचे कळस आहेत. या ग्रंथांवर प्रतिभावंतांना बोलावं, लिहावं असं वाटतं. कारण त्यातून स्फूर्ती मिळते. सनातन म्हणजे नित्यनूतन. हे सारे ग्रंथराज सनातन तत्त्वज्ञान सांगणारे आहेत. हे तत्त्वज्ञान कुणालाही, कधीही शिळं वाटत नाही, वाटणार नाही. रोज उगवणारा सूर्य जसा ताजा असतो, तसे हे ग्रंथ नित्य ताजे आहेत.

प.पू. स्वामी वरदानंद भारती म्हणतात, ''मानवाच्या उद्धारासाठी वा त्याच्या चित्तशांतीसाठी अनेक प्रकारच्या तत्त्वज्ञानांचे प्रतिपादन करणाऱ्या शास्त्रांच्या अभ्यासाची काहीच आवश्यकता नाही. भगवान गोपाळकृष्णांच्या मुखांतून उपनिषदांचे सार गीतारूपाने प्रगटले, तेवढेच नीट अभ्यासिले की काम झाले, असे श्रीमत् भगवद्गीतेच्या महात्म्यांत म्हटलेले आणि ते अक्षरशः खरे आहे. गीतेच्या या थोरवीची पकड सामान्य जनमनावर फार प्राचीन काळापासून अशी दृढ आहे की, प्रत्येक मत-संस्थापक आचार्याला आपले तत्त्वज्ञान हे गीतेशी सुसंगत आहे असे दाखविण्यासाठी जीवाचा आटापिटा करावा लागला आहे. हे विसावे शतकही याला अपवाद नाही. लो. टिळक, गांधीजी वा विनोबाजी यांचे गीताविषयक ग्रंथ पाहिले म्हणजे माझ्या म्हणण्याचा प्रत्यय येईल. भूदान चळवळीचे प्रणेते श्री. विनोबा भावे तर आपल्या सर्व जनप्रणालींचा उगमच गीतेत मानतात. गीता ही त्यांना जीवनाधार वाटते. ते म्हणतात,

**'गीता ही माऊली माझी तिचा मी बाळ नेणता ।**
**पडतां रडतां घेई उचलून कडेवरी ।।'**

गीतेच्या या सर्वसंग्राहकतेमुळेच तिचे माहात्म्य फार थोर मानले गेले. श्रीज्ञानेश्वरमहाराज तर गीतेला परमेश्वराची वाङ्मय मूर्ती मानतात.''

मला असे वाटते, त्रैलोक्य आनंदानं भरून जाण्यासाठी श्रीज्ञानदेवांनी 'ज्ञानेश्वरी' लिहिली. जग सुखी, आनंदी हवं ही माऊलींची तळमळ आहे. जीवन सुंदर, आनंदी कसं बनवावं याचा मंत्र सांगणारा हा ग्रंथ लोकांचं जीवन होऊन जायला हवा. जीवनाच्या व मनाच्या दशदिशा उजळून टाकण्याचं सामर्थ्य या ग्रंथात आहे. त्यासाठी आर्त मनानं, भावनेनं 'ज्ञानियांच्या राजा'ला साद घातली पाहिजे. 'ज्ञानेश्वरी' ही संतवाणी आहे, पंडितवाणी नाही. अति प्रेमानं, लडिवाळपणे परमश्रेयस्कर अशा जीवनमार्गाचं दर्शन घडवून, विश्वात्मक प्रेमाचं रहस्य उलगडून दाखविणं हा 'ज्ञानेश्वरी'चा हेतू आहे. 'ज्ञानेश्वरी' हा नुसता धर्मग्रंथ नाही, तर तो जीवनाचा ग्रंथ आहे. यात कर्मशास्त्र आहे. यात व्यवहार व परमार्थ यांचा समन्वय आहे.

**म्हणौनि फळी लागू । सांडोनि देह संगु ।**
**कर्मे करावी हा चांगु । निरोपु माझा ।।**

विश्ववाङ्मयात 'माऊली' ही पदवी प्राप्त झालेला एकमेव ग्रंथ म्हणजे 'ज्ञानेश्वरी'!

अध्यात्मशास्त्र म्हणजे जीवन जगण्याची, मन:स्वास्थ्य राखण्याची कला आहे. अध्यात्म हे एक प्रकारचं विज्ञान आहे. विज्ञान म्हणजे विशेष ज्ञान. मनाचा मूळ स्वभाव ओळखणं म्हणजे अध्यात्म. अध्यात्म म्हणजे आपणच आपल्याला समजून घेणं! आपलं मन हे विचारांचं कोठार आहे. विज्ञानाच्या दृष्टिकोनातून या ब्रह्मांडाच्या प्रचंड पसाऱ्यात आपण अत्यंत नगण्य आहोत. पण अध्यात्मदृष्ट्या मनुष्य या साऱ्या ब्रह्मांडाला जिंकून घेतो. अध्यात्म हे एक प्रकारचं विज्ञानच आहे. आपण कुणी हीन दीन नाही तर परमात्म्याचं रूप आहोत. अध्यात्मसाधना म्हणजे जे आपल्याजवळ आहेच, पण ते झाकून गेलं आहे ते अनावृत करणं होय. सर्वसामान्यांना समजेल, उमजेल, प्रत्यक्षात आणता येईल यासाठी त्यांच्या समजशक्तीच्या पातळीपर्यंत पोचणं अवघड असतं. हे अवघड काम परमपूज्य स्वामी वरदानंदभारती महाराज यांनी मार्मिक पद्धतीने, त्यांच्या सहजसुंदर शैलीत केलं आहे. सर्वसामान्यांची जीवने उजळून टाकण्याची क्षमता त्यांच्या निरूपणात आहे. त्यांचं अभ्यासपूर्ण, साधं-सोपं निरूपण भाविक मनाला आनंद देतं, जाणिवा परिपक्व करतं. त्यांचं निरूपण ऐकताना, वाचताना साक्षात भगवंत आपल्याशी संवाद साधतो आहे असा साक्षात्कार होतो. त्यांच्या देववाणीत आपल्यातल्या देवत्वाला जागं करण्याची प्रचंड ऊर्जा आहे. त्यांच्या दैवीवाणीला अमृताचा स्पर्श आहे. या स्पर्शानं जीवनाचा अर्थपूर्ण सूर सापडतो. 'सोयरा' भेटल्याचा दिलासा मिळतो. ब्रह्मलीन स्वामी वरदानंद भारती यांचा दृष्टिकोन विज्ञाननिष्ठ आहे. त्यामुळे विवेचनात भारदस्तपणा येणं साहजिक आहे. पण त्यांच्या प्रासादिक शैलीमुळे व योग्य ठिकाणी विषय

उदाहरणांनी नटविल्यामुळे भाविक मनाला विषयाचं आकलन होतं. **'अनुभवे आले अंगा । ते जगा देतसे ।।''** या संतवृत्तीनं विश्वमनाशी संवाद साधण्याची हातोटी स्वामी वरदानंद यांची आहे.

भगवद्गीतेचा महिमा अर्थाच्या दृष्टीनं सोपा पण मार्मिक, अर्थवाही, परिणामकारक करून सांगण्याची हातोटी स्वामी वरदानंद यांची आहे. १३ वा अध्याय तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने अति गंभीर म्हणून महान आहे. ज्ञान हे मोक्षप्राप्तीचं साधन आहे. ते ज्ञान हा १३व्या अध्यायाचा मुख्य विषय आहे. 'मी'चं स्वरूपदर्शन हा विचार यात विस्ताराने मांडला आहे. जो 'मी' या जगात चांगले-वाईट, श्रेष्ठ-कनिष्ठ असे नानाविध व्यवहार करतो त्या 'मी'चं स्वरूप समजणं अत्यावश्यक आहे. 'मी'चं स्वरूप समजण्यासाठी अंतरंगात डोकावणं गरजेचं आहे. 'अंतर्मुखी सदासुखी' असं आपण म्हणतो, पण ब्रह्मदेवानं आपली इंद्रिये बहिर्मुख बनविल्यामुळे आपण अंतरंगाचा वेध फारसा कधी घेतच नाही, बिघडलेलं बहिरंग दुरूस्त करायला डॉक्टरांची मदत होते, पण आपलं अंतरंग स्वच्छ करण्यासाठी अध्यात्म, शाश्वत मूल्य, संतविचार यांच्या वाटेनं जावं लागतं.

आपल्या शरीराला क्षेत्र म्हणतात हे जो जाणतो तो क्षेत्रज्ञ आहे. क्षेत्र म्हणजे शेत. शरीर हे शेत म्हणजे क्षेत्र आहे. क्षेत्रज्ञ म्हणजे जीव. आपलं शरीर, आपले अवयव केव्हा, कसे वापरायचे हे आपल्याला माहीत असते म्हणून आपण क्षेत्रज्ञ. आपण शरीराला 'मी' म्हणतो. शरीराचा व माझा काही संबंध नाही असं म्हणणं योग्य नाही. शरीराचा व माझा संबंध किती? या दोन्हीमधील अंतर किती हे आपण जाणून घ्यायला हवं. आपण कधी कधी क्षेत्रालाच क्षेत्रज्ञ म्हणतो. कधी क्षेत्रज्ञाला क्षेत्र म्हणतो. शरीराला 'मी' म्हणणं परमार्थात योग्य नाही.

क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्यातील अंतर ज्ञानचक्षूंनी समजून घ्यावं लागतं. ही जाण ज्याला असते तोच स्वतःची खऱ्या अर्थानं प्रगती साध्य करू शकतो. या भूतप्रकृतीमोक्षाचं विवेचन या अध्यायात आहे. भूत म्हणजे जे अस्तित्वात नव्हतं पण अस्तित्वात आलं, उत्पन्न झालं ते. एका भगवंताखेरीज सगळीच भूतं आहेत. ईश्वराला अस्तित्व आहे. त्याला नास्तित्व कधी नाहीच. बाकी सगळ्यांना येणं-जाणं आहे, उत्पत्ती-स्थिती-लय आहे. अशा भूतांमध्ये जो बाकी सगळ्यांना बघतो तो ज्ञानी. या भूतांमध्ये विविधता आहे. पण त्या विविधतेतील एकता जो बघतो तो ब्रह्मपदाला जाऊन पोचतो.

ब्रह्मपदाला जाऊन पोचण्यासाठी माणसाजवळ गुणसंपदा आहे. देहाच्या ठिकाणी असलेली अठरा लक्षणं भगवंतांनीं अत्यंत विस्तृतपणे सांगितली आहेत. जन्मतःच मिळालेली गुणसंपदा केवळ स्वतःसाठी नसून ती समाजकल्याणासाठी आहे याची जाण प्रत्येकाला हवी. त्यासाठी माणसाला बुद्धी दिली आहे. आपल्या अंतरंगीचे सद्गुण व दुर्गुण यांचं मार्मिक वर्णन वरदानंद भारती यांनी आपल्या निरूपणात केलं आहे. आपल्या सद्गुणांची आपणच काळजी घ्यायला हवी. दुर्गुणांकडे आपण दुर्लक्ष केलं तर शरीररूपी शेतात दुर्गुणांचे तण माजेल. ते काढून टाकण्यासाठी कष्ट पडतात. आपलं शरीर हे आपलं आहे. या शरीररूपी शेतात, क्षेत्रात जर पीक चांगलं यायला हवं असेल तर त्याची मशागत उत्तम पद्धतीने केली पाहिजे. शेतात काय पिकवायचं, कुठली बियाणं पेरायची याचं स्वातंत्र्य प्रत्येकाला आहे.

शरीराच्या स्वच्छतेच्या काळजीबरोबरच प्रत्येकाने मनाची काळजी घ्यायला हवी. शरीर दुरुस्त असलं की मनही तंदुरुस्त राहातं. मनाच्या प्रसन्नतेमुळे बुद्धी योग्य दिशेने काम करते. बुद्धीच्या विकासामुळे, ज्ञानामुळे अहंकार नष्ट होईल. अहंकाराला मरण आलं की, आत्म्यापर्यंत पोचता येईल. मनाचा आत्म्यापर्यंत होणारा प्रवास समजणं अवघड आहे, विषय गहन आहे. पण वरदानंद भारती यांनी उदाहरणांनी तो फुलविला असल्यामुळे तो आपल्याला समजतो. समजल्यामुळे त्याचं स्मरण ठेवून कृती करावीशी वाटते, हे सगळं ज्याला समजतं तो क्षेत्रज्ञ.

क्षेत्रज्ञ हाच शेताचा स्वामी आहे, धनी आहे. त्यामुळे तो सगळ्या क्षेत्राला प्रकाशमान करतो. सूर्य व क्षेत्रज्ञ यातील साम्य दाखवून विषय सोपा केला आहे. सूर्याच्या प्रकाशात चांगल्या व वाईट दोन्ही गोष्टी दिसतात. सूर्याच्या प्रकाशात सौंदर्य दाखवावं का कुरूपता दाखवावी याच्या निवडीचा अधिकार सूर्याला नाही. दाखविणे हा सूर्याचा धर्म आहे. सूर्याच्या प्रकाशात आपण काय बघायचं हा आपला धर्म. क्षेत्रज्ञ सगळ्या शेताला प्रकाशमान करतो.

१४व्या अध्यायाच्या सुरुवातीला आत्मज्ञानाचं मोठेपण सांगितलं आहे. आत्मज्ञान संपादन करणाऱ्या ज्ञानी पुरुषाचं वर्णन केलं आहे. 'गुणातीत पुरुषाच्या मूर्ती'चं वर्णन वाचताना आपल्या डोळ्यापुढे माऊलींची शांत, सात्त्विक, तेजस्वी मूर्ती उभी राहाते. निसर्ग त्रिगुणात्मक आहे. मनुष्य त्रिगुणात्मक आहे. सत्व, रज, तम या तिन्ही गुणांचं महत्त्व या अध्यायात विशद केलं आहे. 'गुणत्रयविभागयोग' यात गुणातीत होण्याला खूप महत्त्व आहे. गुणातीत पुरुषाची मूर्ती साकार करताना सत्वगुणांचं महत्त्व सांगितलं आहे. ज्ञानवृद्धी म्हणजे सात्त्विक गुणांची वृद्धी. यासाठी रजोगुण व तमोगुण यांचा विनाश व्हायला हवा. गुणातीत होणं हे मनुष्य जन्माचं सार्थक आहे. त्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा हवी. गुणातीत होण्यासाठी अत्यंत तळमळीची भक्ती आवश्यक आहे. भक्तीची तीव्रता वाढली की, गुणातीत अवस्था निर्माण होते.

जो अव्यभिचारी भक्तीने , अनन्य भावाने भगवंताची सेवा करतो, तो या गुणांतून तरून जातो, गुणांच्या पार जातो आणि ब्रह्मभावाला प्राप्त होतो. १३व्या अध्यायात अव्यभिचारी भक्तीवर मार्मिक चिंतन केलं आहे.

गुणांच्या अतीत होण्यासाठी भक्ताने उपासना करावी. १४व्या अध्यायाचा संबंध मागील-पुढील दोन्ही अध्यायांशी आहे. म्हणजे पूर्वानुबंध व उत्तरानुबंध यांचा विचार करताना लक्षात येतं की, १३ व्या अध्यायातील पुरुष-प्रकृती तत्त्ववर्णनाच्या अधिक विवरणासाठी १४व्या अध्यायाचा प्रपंच केला आहे. १४व्या अध्यायाचा उत्तरानुबंध १५व्या अध्यायाशी आहे.

प्रकृतीप्राप्त शरीराबरोबर अटळपणे येणारा त्रिविध गुणांचा पसारा व त्या पकडीत न सापडणाऱ्या आत्मज्ञानी, परमपुरुष शरण गुणातीताचे सामर्थ्य याचं नेमकं भान आणून देणं हेच १४व्या अध्यायाचं मर्म आहे. भगवंत स्पष्टपणे सांगतात की, या तिन्ही गुणांच्या पसाऱ्यात सत्त्वगुण हा

त्यातल्या त्यात चांगला आहे. त्याचं फळ भौतिक ज्ञानसंग्रह व लौकिक सुखसोबत हे आहे. पण रजोगुणाचे फळ म्हणजे जणू इंद्रायणीची फळे, निंबोळ्या या फक्त बाहेरून साजिऱ्या-गोजिऱ्या दिसतात. त्याच्या आत मात्र कडू घाण असते. तमोगुणाचं फळ म्हणजे तर घोर अज्ञानच. ही तर विषवृक्षाची फळं आहेत. सत्वगुण ज्ञान आकांक्षा वाढवितो. तर रजोगुण लोभ वाढवितो. तमोगुण म्हणजे अज्ञान, प्रमाद यांची मिरास यासाठी विवेकी पुरुषाने सत्त्वगुणाची संगत धरावी, ती अंतिम उन्नतीकडे अंगुली निर्देशन तरी करणारी आहे. पण रजोगुण व तमोगुण म्हणजे मात्र विनाशाची प्रवेशद्वारेच!

अर्जुनाच्या अंत:करणात ममत्व उत्पन्न झाले. या ममत्वाचा नाश कर्तव्यासाठी आवश्यक आहे. सत्व-रज-तमाचे विचार आले ते ममत्वाच्या नाशासाठी. ममत्वाच्या नाशासाठी योग-भक्ती-कर्म यांचं सविस्तर निरूपण महत्त्वाचं आहे. ममत्वाचे धागे विलक्षण असतात. विविध प्रकारांनी ते बांधलेले असतात. त्यातला प्रत्येक धागा इतका बळकट असतो की, माणसाचे सबंध जीवन त्यामुळे अडखळल्यासारखं होतं. या प्रत्येक धाग्याचा नाश करणं अत्यावश्यक आहे. ममत्व म्हणजे काय यासाठी वरदानंद भारती यांनी मार्मिक उदाहरणं देऊन नेमका अर्थ सांगितला आहे. एक नावाजलेला, यशस्वी सर्जन होता. त्याच्या मुलावर शस्त्रक्रिया करण्याची वेळ येते, तेव्हा तो स्वत: शस्त्रक्रिया करत नाही. तो कुशल शस्त्रवैद्य इतरांची शस्त्रकर्म करतो, पण स्वत:च्या मुलाची नाही असं का? इतरांची शस्त्रक्रिया करताना ते दगावले तरी चालतील, पण स्वत:च्या मुलाच्या बाबतीत दगावण्याची भिती नको असा विचार त्या शस्त्रवैद्यांच्या मनात आला असेल का? इतरांबद्दल ममत्व नाही पण स्वत:च्या मुलाबद्दल ममत्व असल्यामुळे स्वत: शस्त्रक्रिया करायला नको हा विचार महत्त्वाचा आहे. मनातील ममत्व कौशल्याला बाधक ठरतं. हे ममत्व कर्तव्याच्या आड येतं. म्हणून जीवनात ममत्वाचा नाश करता यायला हवा. अर्जुनाच्या मनात ममत्व निर्माण झाल्यामुळे त्याने पराक्रमाकडे पाठ फिरविली आणि गीतेचा जन्म झाला.

गुणातीत पुरुषाची मूर्ती १४व्या अध्यायात साकार केली आहे.

१५व्या अध्यायात संसारवृक्षाचे रम्य रूपक सजवले आहे. संसारवृक्षाची मुळे म्हणजे मनुष्यदेह. या मुळांना सुवासनारूप मोड निघतात. त्याच्या कोंबांना सत्कर्मरूपी अंकुर फुटतात विकास पावणाऱ्या ज्ञानयोगामुळे बुद्धिचातुर्याचे तीक्ष्ण अंकुर एका क्षणात विस्तारतात. बुद्धीचे फोक स्फूर्तीच्या बळाने विस्तारतात. विवेकाच्या जोराने बुद्धीत प्रकाशाचा उदय होतो. त्यावेळी मेघारस भरलेले सद्‌वृत्तीचे सरळ कोंब फुटतात आणि अखेरीस कर्मप्रसादावर ज्ञानरूपी कळस चढतो.

१५व्या अध्यायाची भूमिका सांगताना भगवंत म्हणतात,

**ऊर्ध्वमूलमध: शाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ।**

**छन्दांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ।।**

या अध्यायात संसाराची व्यर्थता, भ्रमात्मकजा वा मिथ्यत्व हे भाव स्पष्ट झाले आहेत. जीव-जगत-जगदीश्वर या तिघांचं स्वरूप या अध्यायात सांगितलं आहे. निखळ तत्त्वज्ञानाचा हा अध्याय केवळ २० श्लोकात मांडला आहे. १४व्या अध्यायाचा शेवट नीट समजून घेतला तर १५व्या अध्यायाचा उपयोग, महत्त्व लक्षात येतं. हा अध्याय म्हणजे गीतातत्त्वज्ञानाचा समारोप आहे. येथे ज्ञानकांड पूर्णत्वास येते. यात सोलीव तत्त्वज्ञान आहे.

यातील अश्वत्थवृक्षाच्या रूपकातून संसाराचं चित्र साकार होतं. या चित्रामधून जगताचा, सृष्टीचा विचार मांडला आहे. या विचारातून माणसाचं स्थान निश्चित केलं आहे. विविध अध्यायातील संदर्भावरून माणसाचं पापपुण्य, सदसद्‌विवेकबुद्धी, स्खलनशीलता, विषय-वासनात्मक पशुत्व यांचा एकसमयावच्छेदक विचार परिणामकारकरीत्या मांडला आहे.

या अध्यायात पुरुषोत्तमयोग सांगितला आहे. विश्वात विश्वंभर पाहणाऱ्या मानवी जीवनाचं संपूर्ण शास्त्र प्रकट करणारा हा १५वा अध्याय, त्यातील तत्त्वज्ञान कठीण आहे, पण प्रत्येक व्यक्तीच्या आत्मोद्धारासाठी ते पूरक आहे, जनकल्याणासाठी ते आवश्यक आहे. म्हणून हे तत्त्वज्ञान तुम्हा-आम्हाला, सर्वसामान्यांना समजेल, पचेल, रुचेल व प्रत्यक्षात आणता येईल या पद्धतीने सांगण्याचं काम स्वामी वरदानंद भारतींसारखे थोर सत्पुरुष आपल्या निरूपणातून करतात.

ज्ञानाने मोक्षाची प्राप्ती होते. पण ते ज्ञान स्थिर होण्यासाठी अंत:करण शुद्ध हवे. ज्ञानासाठी वैराग्याची नितांत गरज असते. १५व्या अध्यायाच्या प्रस्तावनेत वैराग्याचं महत्त्व विशद केलं आहे. माणसाला संसाराविषयी आसक्ती वाटते. वैराग्य उत्पन्न होण्यासाठी ज्याच्याविषयी आसक्ती वाटते त्याचं स्वरूप समजावं लागतं. संसार सत्य, शाश्वत, सुखदायक आहे अशी आपली धारणा असते. संसाराचं मिथ्यत्व आपल्याला पटलं तर आपण संसारात राहून त्यापासून अलिप्त, विरक्त होऊ. पंधराव्या अध्यायाची प्रवृत्ती यासाठीच आहे. प्रवृत्ती-निवृत्ती या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. माऊलीही ज्ञानेश्वरीत सांगतात,

**तैसी संसारा या समस्ता । जाणिजे जै अनित्यता ।**

**तै वैराग्य दवडिता । पाठी लागे ।। अ.१५, ओ. ३९**

संसार अनित्य व क्षणभंगुर आहे अशी मनाची धारणा झाली तरच वैराग्य स्वाधीन होईल. एकत्वाचा अनुभव येण्यासाठी प्रखर वैराग्य, संतसहवास, सत्कर्म यांची गरज असते. त्यामुळे 'मी देह आहे' यापासून सुटका होते. या सुटकेनंतर मी वासुदेव आहे हा अनुभव येतो. देहासक्ताच्या सहवासात दु:ख मिळतं. मी ब्रह्म आहे या ज्ञानाने, मी देह आहे हे अज्ञान नष्ट होते. यालाच परमात्मा म्हणतात. तो सदैव आहे. विश्वाचा नाश झाल्यावर तो कमी होत नाही आणि विश्व निर्माण झाल्यावर तो जास्त होत नाही.

ज्ञानकांडाचं महत्त्व सांगणारा हा १५वा अध्याय आगळावेगळा आहे. प्रपंचाचा लटकेपणा, मिथ्यत्व दाखवून व जीवाला आत्मस्वरूपाची प्राप्ती करून देऊन, त्याच्या पूर्व जन्म-मरणाची येरझाऱ्या संपविणं हा या अध्यायाचा विषय आहे.

गीतेतील १३,१४,१५ या त्रयींना 'ज्ञानविभाग' मानलं गेलं आहे. १३वा अध्याय आत्मनात्मविवेक सांगणारा आहे. १४ वा अध्याय सत्व-रज-तम या तीन गुणांच्या उत्कर्ष व निस्सारणावर चिंतन करणारा

आहे. १५ वा अध्याय विश्वी विश्वंभर पाहणाऱ्या मानवी जीवनाचं संपूर्ण शास्त्र सांगणारा पुरुषोत्तम योग आहे. या तीनही अध्यायातील तत्त्वज्ञान प्रत्येकासाठी आवश्यक असलं तरी समजायला अति कठीण आहे. त्यासाठी या तिन्ही अध्यायात गुरुवंदनाला महत्त्व दिलं आहे.

**अवघाचि संसार सुखाचा करीन ।**
**आनंदे भरीन तिन्ही लोक ।।**

आनंदाने अवघ जग भरून टाकण्यासाठी १३,१४,१५ या तीन अध्यायांचा बारकाईने अभ्यास करण्याची खरी गरज आहे. या अभ्यासासाठी, तीनही अध्यायातील अवघड पण आवश्यक तत्त्वज्ञान समजून घेण्यासाठी प्रत्येकानं स्वामी वरदानंदभारतींसारखे थोर पुरुष जे लिहितात ते समजून घ्यायला हवं. जगाच्या कल्याणासाठी, उद्धारासाठी असे थोर सत्पुरुष जन्माला येतात. कृतज्ञतेने, नम्रभावाने भाविकांनी संतसत्पुरुषांविषयीचा मनातील भाव व्यक्त करताना असं म्हणायला हवं...

**काय वानू मी । संतांचे उपकार ।**
**मज नित्य जागविती ।।**


**– प्रा. डॉ. सौ. आरती दातार**
वुडलॅन्ड सी-५१/५२, कोथरूड,
पुणे ४११०३८.
मो. ९३७२४४१३६९


•••



# पूजनीय स्वामी वरदानंदांची गीताध्याय - भाष्य त्रयी

**प्राचार्य डॉ. मुकुंद दातार**

शिक्षण - एम. ए. (मराठी, संस्कृत)
पीएच. डी. (विद्यावाचस्पति). विषय - 'संतश्रेष्ठ एकनाथांचे वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व.'
वारणानगर (जिल्हा - कोल्हापूर) महाविद्यालयात ३४ वर्षे मराठी - संस्कृत भाषांचे प्राध्यापक व त्याच महाविद्यालयात तीन वर्षे प्राचार्य. आता सेवानिवृत्त.

आपणा सर्वांना प्राणाप्रिय असणारी, श्रीमद् भगवद्गीता ही, योगयोगेश्वर भगवान् श्रीकृष्णाने, साक्षात गायिलेली आहे. महायोगेश्वर श्रीकृष्ण आणि त्याच्या मुखीची ही भगवद्गीता म्हणजे शिव-शक्ति-रूप अभेद-स्थितीचे आणि व्याकरणातील अनन्वय अलंकाराचेही, अप्रतिम उदाहरण आहे. श्रीज्ञानदेव म्हणतातच -

**'गीता जाणा हे वाङ्मयी । श्रीमूर्ति प्रभुचि।।'**

म्हणजे श्रीमद भगवद्गीतेच्या श्लोकाश्लोकांतून भगवान श्रीकृष्णाचीच, भक्तिभावार्थरूप श्रीवरदमूर्तीच, प्रकट झाली आहे.

ऐतिहासिक दृष्टीने बोलायचे तर, प्राचीन भारत वर्षातील, सकल ऋषिमुनींच्या, उत्तुंग प्रज्ञा-प्रतिभेचे आणि समष्टीशरण कर्तव्य-सन्मुखतेचे, समग्र दर्शन घडविण्यास भगवद्गीता हा सर्वश्रेष्ठ ग्रंथ आहे. तो अनुपमेय असा, अद्वितीय असा, श्रेष्ठतम तत्त्वचिंतन ग्रंथ आहे. तो आपल्या सर्वप्रिय अशा उदारमतवादी भारतीय संस्कृतीचा, सार-स्वरूपी मार्गदर्शक ग्रंथ आहे. त्याची भाषासरणी प्रासादिक आहे आणि प्रसन्न आहे. त्याचा उपदेश मानव्य-धर्माच्या नीतितत्त्वांचाच आहे. तसेच या गीता-ग्रंथाचा पिढ्यान्‌पिढ्या दृग्गोचर झालेला सामाजिक परिणामही, सर्वांसर्वांना सुसंस्कारित करणारा आहे. त्याचप्रमाणे सदाचार-प्रवण बनविणारा आहे.

अशा श्रीमद्भगवद्गीतेच्या सलग तीन अध्यायांवरची (म्हणजे अध्याय क्र. सोळा, सतरा आणि अठरा - यांवरची) पूजनीय स्वामी वरदानंद भारती यांची गीताभाष्यरूप ग्रंथ-त्रयी (पृष्ठे - अनुक्रमे ८८, १२४ आणि २४६) अत्यंत महत्त्वाची आहे. मुळात स्वत: पूजनीय स्वामी वरदानंद भारती म्हणजे आपल्या महान भारतीय संस्कृतीचे थोर भाष्यकार आहेत. त्यांनी आपल्या विविध ग्रंथरूप, अक्षरसृष्टीने, मराठी भाषेतील वैचारिक ग्रंथसाहित्याला अमूल्य योगदान अर्पिले आहे. उपनिषदे, ब्रह्मसूत्रे आणि भगवद्गीता या प्रस्थान त्रयीवरचे, त्यांचे सकल ग्रंथलेखन हे त्यांचे सर्वमान्य आचार्यत्व, अभिव्यक्त करणारे आहे.

स्वत: पूजनीय वरदानंदजी कसे होते? तर ते संतचरित्रकार संतकवी दासगणू महाराजांचे, आद्य उत्तराधिकारी होते. तसेच ते स्वत: व्यासंगी अभ्यासक आणि रसाळ निरुपणकार होते. स्वामीजी हे देव-देश-धर्म यांचे जाज्वल्य अभिमानी होते. तसेच ते आत्मज्ञान आणि विज्ञाननिष्ठा यांचा संगम घडविणारे थोर विचारवंत होते. अशा प्रकारे मुळात बहुआयामी व्यक्तिमत्त्व असणाऱ्या, पूजनीय स्वामी वरदानंद भारती यांनी पुढील पिढ्यांना, 'धन्य: स: संन्यासाश्रम:।' असाही श्रेष्ठ वारसा दिलेला आहे.

अशा पूजनीय स्वामीजींनी, स्वत: श्रीमद् भगवद्गीतेची महती गाताना, म्हटले आहे, - ''श्रीमद् भगवद्गीतेने साधलेल्या, तत्त्वचिंतन क्षेत्रातील सर्व संग्राहकतेमुळे, तिचे माहात्म्य फार थोर मानले गेले आहे. केवळ सातशे श्लोकांचा हा ग्रंथ, पण त्याला उपमा शोभावी ती, क्षणात विश्वरूप धारण करणाऱ्या बटु वामनाचीच! उदाहरणार्थ सर्व वटवृक्षांचे सार, जसे लहानशा बीजामध्ये एकवटावे व पुढे त्या बीजातूनच, महान वटवृक्षाचा विस्तार व्हावा, त्याप्रमाणे भारतीय तत्त्वज्ञानाचे सर्वप्रकारचे वैशिष्ट्य, भगवद्गीतेत समाविष्ट झाले आहे. याचबरोबर हेही लक्षात येते की, श्रीमद् भगवद्गीताच, आपल्या भारतीय संस्कृतीच्या विलोभनीय वैभवाला, मूलाधारही झाली आहे.''

अशा या भगवद्गीतेवरचे, या तत्त्वचिंतन ग्रंथावरचे जे भाष्य असेल तेही, विचारपरिप्लुत असावयास हवे आणि तसेच ते संस्कृतिक्षेत्र पुनीत असावयास हवे. ते सामर्थ्यशील हवे. त्याच तोलामोलाचे हवे! अशा स्थितीत, पूजनीय स्वामी वरदानंदांची, भगवद्गीतेच्या विविध अध्यायांवरची, भाष्य-ग्रंथावली वाचली की, याच अपेक्षेची, सर्वथा परिपूर्ती होते. असे सुस्पष्टपणे जाणवते! या संदर्भात एक महत्त्वाचा अभिप्राय उद्धृत करावयास हवा. पूजनीय स्वामी गोविंद देव गिरि (आचार्य किशोरजी व्यास) म्हणतात - ''पूजनीय स्वामी वरदानंद भारती यांनी, वेदोक्त समग्र जीवन, किती कौशल्याने जगता येते हे सिद्ध करून दाखविले आहे. अशा या सिद्ध पुरुषाच्या वाणीतून आणि ग्रंथलेखनातून, प्रकटलेला अर्थ, श्रीमद् भगवद्गीतेचा त्यांनी सांगितलेला अर्थ - हाच खरोखरी, भगवंताला अभिप्रेत असणारा अर्थ होय!''

□□□

अशा पूजनीय स्वामी वरदानंदांच्या मते - भगवद्गीतेतील सोळाव्या अध्यायाचे महत्त्व काय? तर अध्यात्मिक साधनेने, पारमार्थिकाच्या जीवनात, कर्म-भक्ती, ज्ञान या त्रयींनी परिपूर्णता येण्यापूर्वी, ज्या काही सद्गुणांची प्रभा, सद्गुणांचे तेज, प्रकट होऊ

लागते त्या सव्वीस सद्गुणांचे वर्णन, या सोळाव्या अध्यायात अवतरले आहे. तसेच परमार्थ साधकाने आपल्या जीवनात ज्या दुर्गुणांना कटाक्षपूर्वक नष्टच केले पाहिजे, त्या दुर्गुणांचीही स्थिती आणि गती त्या सोळाव्या अध्यायात स्पष्ट करून सांगितली आहे. अशा या आपल्या मानवी जीवनातील दोन्ही बाजू म्हणजे विधायक बाजू आणि विनाशक बाजू आपण नीट समजून घेतल्या पाहिजेत! म्हणजे मग, परमार्थसाधकाला, स्वत: कठोर आत्मपरीक्षण करणे आणि त्यानंतर ध्येयरूप आत्मजागृती साधणे शक्य होते.

स्वामीजी सांगतात – 'सा विद्याया विमुक्तये।' असे म्हणतात. म्हणजे ती एकमेव विद्या आहे, जी तुम्हाला मुक्त करते. आता अशी ती विद्या कोणती? तर अध्यात्मविद्या! आणि तीच नीट समजण्यासाठी भगवंत इथे, दोन संपत्ती सांगत आहेत. एक ग्राह्य ती (एक) दैवी संपत्ती आणि एक त्याज्य ती (दुसरी) 'आसुरी' संपत्ती! यापैकी दैवी संपत्तीचा सेनापती आहे, तो 'अभय' नावाचा दैवी गुण! खरा सद्गुण! आपली वृत्ती 'अभयत्व' जोपासणारी हवी. तीच मानवी मनाची फार उदात्त स्थिती आहे. किंवा असे दिसते की, 'अभय' हा सद्गुण म्हणजे मानवमात्राच्या सदाचारी वृत्तीचा, सत्शील प्रवृत्तीचा, परिपाक आहे. गीतोक्त सोळावा अध्याय पुढे सांगतो की – असाच महत्त्वाचा दुसरा सद्गुण म्हणजे 'ज्ञानयोग व्यवस्थिति:।' म्हणजे तुम्ही एक तर ज्ञानयोगी तरी व्हा किंवा कर्मयोगी तरी व्हा. किंवा ज्ञानाचा जो योग आहे, त्यात टिकून रहा. ज्ञानाचा योग म्हणजे आत्मज्ञानाची प्राप्ती. जे मिळविले आहे ते सतत टिकवून ठेवा. म्हणजे 'व्यवस्थिति:।'

त्याचप्रमाणे महत्त्वाची तिसरी दैवी संपत्ती म्हणजे 'यज्ञवृत्ती.' यज्ञ म्हणजे 'त्यागाची भावना.' समर्पणाची भावना. यज्ञ म्हणजे कर्तव्य–कर्म करणे, असाही अर्थ आहे. 'यज्ञ' वृत्ती या दैवी गुणांत आणखी दोन सद्गुण येतात. आपोआप येतात. ते म्हणजे संयम आणि निरहंकार! हे दोन सद्गुण म्हणजे परमार्थ मार्गासाठीची दोन अत्यंत महत्त्वाची, साधने आहेत. खरे तर 'परमार्थ हा, याच दोन पायांवर चालतो, असे समजावे. त्याचप्रमाणे 'स्वाध्याय' हा सहावा अत्यंत महत्त्वाचा सद्गुण आहे. त्याचा अर्थ आहे – रोज काहीतरी नवीन ज्ञान मिळविणे. तसेच याहून सखोल अर्थ आहे – 'स्व'ला ओळखणे. 'आत्म्या'ला ओळखणे! त्यासाठी जे जे करावे लागेल, तो खरा 'स्वाध्याय' होय. या मध्ये मुख्य गोष्ट आहे, "Know thyself.' म्हणजे 'स्वत:'ला ओळखा. परम 'आत्म्याला' ओळखा! अशीच आणखी महत्त्वाची 'दैवी' संपत्ती सातवा सद्गुण म्हणजे 'आर्जव.' आर्जव या सद्गुणाचा अर्थ आहे – आपल्या नेहमीच्या वागण्यातील सरलता! म्हणजे कपट नाही. फसवाफसवी नाही. वंचना नाही. शोषण नाही. दुष्टपणा तर नाहीच नाही!

सोळाव्या अध्यायाच्या संदर्भात पूजनीय वरदानंद भारती पुढे सांगतात – दैवी संपत्ती म्हणजे मनुष्याच्या शाश्वत कल्याणाचा मार्ग आहे. 'आद्य' पुरुषापर्यंत, 'पुरुषोत्तमा'पर्यंत, जाण्याचा मार्ग आहे. असे पहा की – भगवद्गीतेत, पंधराव्या अध्यायानंतर लगेच सोळावा अध्याय सुरू होतो. मध्ये अर्जुनचा प्रश्न नाही. भगवान स्वत:च हृद्गत सांगत आहेत, ही विशेष गोष्ट आहे! भगवंत सांगतात – दैवी संपत्तीत, 'आर्जवा' नंतरचा महत्त्वाचा आठवा सद्गुण म्हणजे 'अहिंसा' होय. या संदर्भात स्वामीजी सांगतात, हा सद्गुण मात्र एकांगी नको एकान्तिक नको! तर ज्ञानोबा माऊलीने सांगितलेली व्याख्या अत्यंत महत्त्वाची आहे.

**'जगाचिया सुखोद्देशे। शरीर वाचा मानसे।**

**राहाटणे ते अहिंसे। रूप जाण।।'** किंवा तुकोबारायांनी सांगितलेली व्याख्याही महत्त्वाची आहे. 'सर्वथा भूतांचे पालन।....' हवेच, पण... 'आणिक निर्दालन कंटकांचे।' हेही महत्त्वाचे! खरे म्हणजे 'अहिंसा' शिखरीभूत सद्गुणाचा पाया आहे. 'आत्म्यौपम्य' भाव. त्यासाठी आपण प्रथम, स्वार्थ टाकायला हवा आणि अहंकार नष्ट करायला हवा. इथेच भगवंतांनी दैवी संपत्तीत 'तेज' म्हणजे तेजस्विताही सांगितली आहे. या तेजस्वितेत पावित्र्य येते. 'सत्य' रक्षण येते, 'क्षमा'शीलता येते आणि आत्मविश्वासही येतो. याचा पाया आहे पुन: 'पावित्र्य'च! 'अर्थत: शुचि, कामत: शुचि।' ही गोष्ट 'मानवी' जीवनात फार फार महत्त्वाची आहे.

या सर्वांच्या उलट असणारी जी दुसरी संपत्ती, ती म्हणजे आसुरी संपत्ती! 'असुर' म्हणजे कोण? तर, ज्याला इंद्रियांच्या सुखोपभोगापलीकडे, जगामध्ये काही सुखे आहेत, असे वाटतच नाही. तो 'असुर' होय! याची साधने कोणती? तर अनाचार, (अत्याचार), हिंसाचार आणि भ्रष्टाचार! या आसुरी संपत्तीमधील महत्त्वाचा दुर्गुण म्हणजे ढोंग, दंभ, दांभिकता! असे म्हणतात की – जगात सर्व पापांना शेवटी प्रायश्चित आहे, पण दंभाला नाही. खरे तर पंचमहापातकांपेक्षाही दंभ जास्त घातक आहे! जसा दंभ तसाच दर्प! दर्प म्हणजे ताठा, गर्व, उद्दंडपणा! असे जाणवते की, स्वार्थलंपट, आत्मकेंद्रित माणसाचा दर्प हा, अक्षरश: धोत्र्याच्या बोंडासारखा, पूर्णपणे काटेरी असतो! याच्यानंतर जो दुर्गुण अवतरतो तो क्रोध! आपल्या वासनेची पूर्ती झाली नाही, की आलाच तो, तो क्रोध! हा तर दंभ, दर्प, गर्व, अभिमान यांचा थोरला भाऊ आहे. या तथाकथित प्रमुखाचा सहाय्यक म्हणजे 'पारुष्य' हा दुर्गुण होय. हीच ती निर्दयता, क्रूरता! म्हणजेच 'मार्दव' या दैवी संपत्तीच्या पूर्णपणे उलट स्थिती ती, 'पारुष्य' ही सर्वथा त्याज्य अशी आसुरी संपत्ती होय.

पू. वरदानंद भारती पुढे सांगतात – जरा विचार करू या! या सर्व आसुरी संपत्तीचा पाया कोणता असतो? तर अज्ञान! सर्वथा अज्ञान! म्हणजे योग्य काय? ते कळत नाही. खऱ्या हिताचे काय? ते कळत नाही. उलट केवळ इंद्रियांना जे सुखाचे वाटते, तेच ज्याला पूर्णपणे आवडते तो ठार अज्ञानी! तोच 'असुर' होय! त्याला 'श्रेयस' म्हणजे काय? याचाच पत्ता नसतो. मुळीच पत्ता नसतो! उलट माणसाच्या उपभोग – तृप्तीसाठीच या साऱ्या सृष्टीची निर्मिती झाली आहे असा याचा सिद्धांत असतो. तो तर सर्वथा घातक आहे. असे हे उग्रकर्मी असुर, अखिल जगाच्या नाशासाठीच काम करीत राहतात! यांच्याजवळ 'दुष्पूर कामवासना' असते. हिचा उल्लेख भगवंतांनी, या अध्यायात विशेष म्हणजे अनेक श्लोकांतून केलेला आहे. या असल्या 'कामातुरांची' ओळख 'अशुचिव्रता:' या संज्ञेतून नेमकी पटते. घडते

काय? तर उपभोग, सतत उपभोग, हेच असुरांना आपल्या जीवनाचे सार-सर्वस्व वाटते. परिणामी सर्व समाजजीवनच अस्वस्थ होते. उद्ध्वस्त होते. म्हणून काम, क्रोध, लोभ या नरकलोकीच्या तीन प्रवेशद्वारांचा, समूळ त्याग करणे, हेच सर्वथा इष्ट आहे. आपले वर्तन हे अध्यात्मशास्त्र - संमतच असले पाहिजे, असे श्रीभगवंतांनी, सोळाव्या अध्यायातही निर्धारपूर्वक सांगितले आहे.

□□□

श्रीमद्‌भगवद्‌गीतेतील सतराव्या अध्यायावर भाष्य करताना पू. स्वामीजी सांगतात, श्री भगवंतांनी सोळाव्या अध्यायाच्या शेवटी सांगितले आहे की, 'तस्मात् शास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ।' कोणतीही गोष्ट करायची की नाही? या संबंधी (अध्यात्म) शास्त्राचे प्रामाण्य स्वीकारले पाहिजे. शास्त्राच्या वचनाचा, अवलंब करूनच, कार्य आणि अकार्य, विधी आणि निषेध या गोष्टी ठरविल्या पाहिजेत. यावर अर्जुन विचारतो, हे भगवंता, शास्त्र तर सर्वांना माहीत असत नाही. मग काय करायचे? त्यावर भगवान सांगतात अनन्यनिष्ठ श्रद्धापूर्वक, स्वकर्तव्यकर्म, प्रत्येकाने चोख आचरावयाचे! तत्पूर्वी भगवंत म्हणतात, हे अर्जुना, नीट लक्षात घे. या सर्व जगाची स्थिती कशी आहे? तर 'त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा।' (यापैकी सात्विकतेची कास धरावयाची, राजसाला नियंत्रित करायचे आणि तामसाला हद्दपारच करायचे! पण तत्पूर्वी) श्रद्धेचे महत्त्व लक्षात घ्यावे. 'श्रद्धा सत्त्वानुरूपा।' सत्त्व म्हणजे (इथे अर्थ) मन. मानवी मन. त्यात अंत:करण, बुद्धी, अस्तित्वभाव या साऱ्या गोष्टी समाविष्ट केल्या तरी चालतील. हीच श्रद्धा, कृतीत अवतरली की, तिला निष्ठा म्हणतात. निष्ठा याचा अर्थच, श्रद्धापूर्वक केलेले कर्म! श्रद्धा हे माणसाचे वैशिष्ट्य आहे. सगळ्या जगात सात्विक, राजस, तामस असे भेद आहेत, पण श्रद्धाच नाही असा माणूस सापडणार नाही!

सतरावा अध्याय आपणास पुढे सांगतो - जो जो मनुष्य सात्विक, तो तो त्याच्या इच्छा, अभिलाषा कमी असतात. आणि जो जो राजस आणि तामस असतो, त्याच्या त्याच्या अभिलाषा जास्त उत्कट असतात. तसेच त्या अभिलाषांच्या पूर्ततेच्या आकांक्षाही उत्कट असतात. म्हणूनच आपण प्रयत्न करायचा की, आपली श्रद्धा पूर्ण सात्विक रहावी. तिच्यामध्ये भेसळ होऊ नये. आपल्या श्रद्धा शुद्ध झाल्या पाहिजेत. पुढे सतराव्या अध्यायात, भगवंत - त्रिविध श्रद्धांचे म्हणजे, सात्विक, राजस, तामस या श्रद्धांचे वर्णन करताना विशेष म्हणजे सात्त्विक आहाराचेही वर्णन करतात! ते तसे का? याचे कारण आपल्या शास्त्राप्रमाणे आहार हा, नुसते शरीराचे पोषण करतो, असे नाही तर तो मन आणि बुद्धीचेही पोषण करीत असतो. म्हणून सर्वांचा आहार सात्त्विक हवा. तो कसा? कोणता? तर ज्या आहारामुळे आपले आयुष्य वाढते, मनाचे सामर्थ्य वाढते, तसेच बल, आरोग्य, सुख, प्रीती वाढते. असा जो आहार आणि जो रसपूर्ण, रुचकर आणि स्निग्ध आहे तो आहार, सात्विक आहार होय!

पुढे श्रीभगवान् म्हणतात, 'यज्ञदानपत:कर्म। न त्याज्यं कार्यमेव तत्।' मानवमात्राने जे टाकू नये, केलेच पाहिजे, अशा ज्या तीन गोष्टी आहेत, त्या म्हणजे यज्ञ, दान आणि तप होय. यज्ञ शब्दाने, अग्नी पेटवायचा आणि त्यात अहुती द्यायच्या - एवढाच अर्थ अभिप्रेत नाही. यज्ञ म्हणजे त्यागभावना. म्हणून तर द्रव्ययज्ञ, तपोयज्ञ, दानयज्ञ, ज्ञानयज्ञ असे सगळे यज्ञच आहेत. कारण ईश्वराच्या प्राप्तीच्या उद्देशाने केले, म्हणजे त्याला 'यज्ञत्व' येते. 'यज्ञानां जपयज्ञोऽस्मि।' असे गीतावचन आहे. तसेच यज्ञाचे अनेक प्रकार आहेत. पण 'जपयज्ञ' जो आहे, तो भगवंताचेच 'स्वरूप' आहे. असे त्याचेच सांगणे आहे. इथेच भगवान असेही सांगतात की 'यज्ञ' करायचा तो 'अफलाकांक्षिभि:।' कोणत्याही फळाची अपेक्षा न करता करावयाचा! 'यष्टव्यमेव' म्हणजे हे माझे कर्तव्य आहे म्हणून करावे! ते फार महत्त्वाचे आहे.

पू. वरदानंद भारती, सतराव्या अध्यायावर भाष्य करताना पुढे सांगतात, मानवाचे वैशिष्ट्य काय? तर 'धर्मपालन.' आता हे कसे करावे? तर यज्ञाला, तपाची जोड द्यावी. यज्ञ म्हणजे त्याग भावना. पण तप म्हणजे काय? खरे काय? तर आपल्या वृत्ती प्रवृत्तीतील राजस-तामसाचे प्रमाण सतत कमी व्हावे आणि सात्त्विकाचे वाढावे, यासाठी सावधान रहावे, दक्ष रहावे, म्हणजे तप! तसेच शरीराने तप घडावे, त्याला मनाची आणि बुद्धीची साथ मिळावी - हे महत्त्वाचे! खरोखरच जेव्हा शरीर, मन आणि बुद्धी एकत्र येऊन ईश्वरशरण झाल्या की खरे तप झाले! यापुढचा महत्त्वाचा मुद्दा आहे की, आपली वाणी, आपले बोलणे कसे असावे? तर पू. स्वामीजी सांगतात, पहिले हित, मग सत्य, आणि मग प्रिय! खऱ्या हिताला बाध येऊन, सत्य असता कामा नये. तसेच सत्याला बाधा येऊन प्रिय असता कामा नये. या तीन्ही पातळीवर, तुम्ही बोललात म्हणजे उत्तम झाले. 'अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितंच यत्।' असे बोलले पाहिजे. म्हणजे दुसऱ्याला दु:ख न होईल असे 'खरे', 'प्रिय' व हितकर असे बोलले पाहिजे.

महत्त्वाची गोष्ट अशी आहे की, असे हे आदर्श बोलणे, संतांना येते. त्याचे कारण मानवमात्राचे हित कशात आहे, हे त्यांनाच समजते. त्यांच्या अंत:करणातून, रजोगुण, तमोगुण पार निघून गेलेले असतात. फक्त 'बुडती हे जन, न देखवे डोळा। म्हणून कळवळा, येतो मनी।।' एवढीच त्यांची वृत्ती असते. म्हणून त्यांनाच असे बोलणे साधते. आपणही प्रयत्नपूर्वक, त्याचेच अनुसरण करावे! यापुढे आणखी काय हवे? तर श्रीभगवंत पुन्हा पुन्हा सांगताहेत 'व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनन्दन।' म्हणजे व्यक्ती ही रागद्वेष-वियुक्त झाली की, मग मनाची प्रसन्नता, मन:प्रसाद लाभतो. तो लाभला की बुद्धी स्थिर होते. स्थितप्रज्ञाचे तेच मोठे लक्षण आहे. सगळ्या गीतेचा हा एकच महापुरुष आहे. आणि हे साधणे म्हणजे 'मन:प्रसाद'! आणि तेच मानसिक तप आहे, असे भगवान म्हणतात. म्हणून नेहमी 'आत्मवश्यतां' हवी. रागद्वेषविमुक्त होण्याची सवय लागावी, यासाठी 'भावसंशुद्धीही हवी!' खऱ्या अर्थाने आपले अंत:करण, पवित्र झाले, काम-क्रोध, लोभ-मद-मोह-मत्सर सगळे गेले, तर ते 'मानस तप' झाले. या स्थितीत भगवंताची प्राप्ती होते. आपणास या तपाचे फळ मिळते.

भगवद्‌गीतेचा सतरावा अध्याय आणखी एक महत्त्वाची गोष्ट सांगतो की, पू. स्वामीजी म्हणतात, 'फलाकांक्षा' आणि 'ध्येयवाद' ही

एकच गोष्ट नाही! उलट फलाची आकांक्षा नसली की, परमश्रद्धा टिकते आणि परमश्रद्धा असली की फलाची आकांक्षा उत्पन्नच होत नाही. यासाठी पुढे भगवंत, आणखी एक विशेषण उपयोजितात. ते म्हणजे 'युक्तैः' म्हणजे योग्य रीतीने, विवेक करणारा मनुष्य हवा! ज्याचा स्वाध्याय योग्य रीतीने झाला आहे, ज्याचे मनन चिंतन योग्य रीतीने झालेले आहे, ज्याची कर्तव्यकर्मे योग्य रीतीने पार पडत आहेत, ते सगळे 'युक्त' मध्ये येते. जर युक्ततेत कुठे उणीव राहिली तर 'अफलाकांक्षी' आणि 'परमश्रद्धया' जमतच नाही. अशी व्यक्तीच सर्वोत्तम 'दान' देऊ शकते. ज्ञानोबामाऊली तर सांगते, 'मी दान दिले की, ती व्यक्ती आशिर्वाद देईल. या कल्पनेने दान देणे हे सुद्धा दान नव्हे! तर माझे कर्तव्य आहे, म्हणून दान दिले - असे झाले पाहिजे!' ही गोष्ट महत्त्वाची आहे.

श्रीभगवान, सतराव्या अध्यायात सांगतात - 'यज्ञ, दान, तप' या मनुष्याच्या उद्धाराच्या तीन गोष्टी आहेत. पण त्या कर्माचे मूल्य कसे वाढेल? तर ओम तत् सत् या ब्रह्मवाचक संज्ञा, त्या कर्माशी श्रद्धापूर्वक जोडाव्या. कोणतेही काम करताना, ते ईश्वराचे नाव घेऊन करावे. ईश्वरासाठी करावे. 'ब्रह्मवादिन्' होऊन करावे. जसे माता रुक्मिणीने, श्रीकृष्णतुलाप्रसंगी, तराजूच्या पारड्यात, तुळशीचे पान ठेविले. अर्पिले. तसे! यासाठी आपणही भगवंताची प्रार्थना करू या की, आपले सारे कार्य श्रद्धायुक्त असावे. सात्त्विक असावे. सद्भावयुक्त असावे आणि त्या योगयोगेश्वरासाठीच असावे!

□□□

श्रीमद भगवद्गीतेतील अठरावा अध्याय कसा आहे? तर गीतेत विविध अध्यायांतून आलेले, सारे विषय या अठराव्या अध्यायात पुन्हा एकदा, अवतरले आहेत. श्रीज्ञानदेव, या अठराव्या अध्यायाचे महत्त्व सांगताना म्हणतात, हा अध्याय म्हणजे 'गीताप्रासादाचा कळस' आहे. (१८-३३) किंवा **'अठरावा अध्यायो नोहे। हे एकाध्यायी गीताचि आहे।।'** (१८-८४) अशा या अध्यायावर भाष्य करताना पू. स्वामी वरदानंद भारती म्हणतात, ''मनुष्यमात्राच्या वैयक्तिक किंवा सामाजिक जीवनासाठी जे जे आवश्यक आहे, चारही पुरुषार्थांच्या प्राप्तीच्या दृष्टीने साधन म्हणून जे जे महत्त्वाचे आहे, ते ते सर्व मुळात श्रीमद् भगवद्गीतेत, उद्बोधक रीतीने प्रतिपादिले गेले आहे. आणि तो सर्व उपदेश अठराव्या अध्यायात, सूत्ररूपाने पुनः एकदा प्रगट झाला आहे.'' अठराव्या अध्यायाच्या प्रारंभी अर्जुनाने विचारलेली शंका फार महत्त्वाची आहे. 'त्याग' आणि 'संन्यास' या गोष्टी 'परमार्थाचा पाया' आहेत. अर्जुनाने विचारलेल्या प्रश्नांपैकी, गीतेतला हा शेवटचाच प्रश्न आहे.

यावर श्रीभगवान सांगतात, काही तरी मिळविण्याची इच्छा किंवा कामना ठेवून, जे कर्म केले जाते, त्याचा त्याग करणे, म्हणजे 'संन्यास' असे विद्वान लोक मानतात. आणि सर्व प्रकारच्या कर्मापासून स्वाभाविकपणे निर्माण होणाऱ्या फलाचा त्याग करणे, याला विचक्षण लोक, पंडित जन, 'त्याग' असे म्हणतात. यापुढे भगवंत आणखी सांगतात, हे अर्जुना, 'त्यागाच्या' संदर्भात, तुला निश्चयाने माझा निर्णय सांगतो, तो ऐक. ''यज्ञ, दान आणि तप'' ही कर्मे केलीच पाहिजेत. त्यांचा कधीही त्याग करता कामा नये. अरे 'यज्ञ, दान, तप' यांच्या आचरणाने, विद्वान स्वाभिमानी पुरुषही पावन होतात. पवित्र होतात. आणखी विशेष गोष्ट अशी की, यज्ञ, दान, तप ही तीनही कर्मे, बरीचशी परस्परावलंबी आहेत. कोणत्याही एकाबरोबर, उरलेली दोन यावयाचीच! म्हणूनही त्यांचा उल्लेख संयुक्तपणे केला जातो! मात्र महत्त्वाची गोष्ट अशी की, यज्ञ, दान, तप ही कर्मेसुद्धा, आसक्तीने करू नयेत. त्यातून काही फळ मिळावे, काही लाभ मिळावा, अशी अपेक्षा ठेवू नये. हे फार महत्त्वाचे आहे, असेही भगवंत निर्णयपूर्वक सांगतात.

अठरावा अध्याय सांगतो जन्मस्वभावाने कुणी सात्त्विक, कोणी राजस, कोणी तासम असेल, पण प्रयत्नाने वृत्ती, प्रवृत्तीवर नियंत्रण ठेवून, राजस-तामसालाही हळूहळू सुधारता येते. मनुष्याने आपली नियत कर्मे, आपली कर्तव्यकर्मे, फलत्यागपूर्वक केल्यास, 'नराचा नारायण' होऊ शकतो. पू. स्वामीजी सांगतात, अध्यात्म हे मानवतेचे आरोग्य आहे. मानवी जीवनाला यथार्थता आणावयाची असेल तर अध्यात्माचा अवलंब केलाच पहिजे. नियत कर्माचा त्याग न करणे, ही अध्यात्मप्राप्तीची, अत्यंत महत्त्वाची साधना आहे. तिची उपेक्षा करणे, हे तामसवृत्तीचे आहे. अध्यात्ममार्गी हा त्यागी, सत्त्व समाविष्ट, मेधावी आणि छिन्नसंशय असावा. जे जे कर्तव्य म्हणून आवश्यक असेल, ते ते प्रत्येक कर्म निष्ठेने करावे; पण त्याच्या फलाविषयी मात्र, पूर्णपणे निरिच्छ राहावे, हा आदर्श, मनुष्यमात्राला सुसंस्कृत करण्यासाठीच, भगवद्गीतेने सांगितलेला आहे. मनुष्यजन्माचे एक वैशिष्ट्य प्रत्येकाने लक्षात ठेवणे आवश्यक आहे. ते म्हणजे मनुष्य हा भोगाबाबत, परतंत्र असला तरी, कर्मात स्वतंत्र आहे. ब्रह्माचा शोध घेण्याचे बुद्धिसामर्थ्य, त्याच्याच ठिकाणी, ईश्वराने ठेवलेले आहे.

निष्काम कर्मयोग, हेही 'त्यागसंन्यासाचेच' स्वरूप आहे. कोणतेही प्राप्त कर्म, आसक्ती न धरता, फलकांक्षा न ठेवता केले, म्हणजे त्याचा लेप लागत नाही हे ध्यानात ठेवावे. पुढचा मुद्दा असा. कर्म तडीस जाण्यासाठी, वेदान्तशास्त्र, पंचविध कारणे सांगते. पैकी 'दैव' हे पावसासारखे आहे. तो कसाही पडो, मनुष्याच्या स्वाधीन असणाऱ्या अधिष्ठानादी चार गोष्टी साक्षेपाने अवलंबिल्या पाहिजेत. पुढे श्रीभगवंत सांगतात, (श्लोक क्र. २०) वेगळ्या वेगळ्या दिसणाऱ्या सर्व भूतजाताच्या ठिकाणी एकच, कोणताही भेद नसलेले, अविनाशी अथवा अविकारी तत्त्व नांदत असते. असे आकलन, ज्या ज्ञानामुळे होते, ते सात्त्विक ज्ञान आहे, असे समज. याच आकलनासाठी, अद्वैत तत्त्वज्ञान उपयुक्त ठरते. म्हणजे असे की, अद्वैत तत्त्वज्ञानाने स्वीकारलेल्या, प्रातिभासिक, व्यावहारिक आणि पारमार्थिक या त्रिविध सत्ताभेदाने, 'अनेकातील एकतेचा', अनुभव कसा घेता येतो ते दाखवून दिले आहे. हे ज्याला जमते तो 'सात्त्विक कर्ता' होय. (श्लोक क्र. २६) कारण त्याच्या ठिकाणी आसक्ती नसते. तो निरहंकारी असतो. यश किंवा अपयश, याबाबत तटस्थ असतो आणि तरीही तो कर्तव्याचरण करताना धैर्य आणि उत्साह, यांनी युक्त असतो.

आता महत्त्वाचा प्रश्न असा की, 'सात्त्विक सुख' म्हणजे काय?

या संदर्भात पू. स्वामीजी म्हणतात या सात्त्विक सुखाच्या व्याख्येसाठी, श्लोक क्रमांक ३६चा उत्तरार्ध आणि श्लोक क्र. ३७ संपूर्ण एकत्र घेतले पाहिजेत. म्हणजे उपदेश असा की, अभ्यासामुळे सातत्यामुळे, ज्याच्या विषयी गोडी वाटू लागते, ज्याच्यामुळे दु:खाचा निरास होतो, जे आरंभी विषाप्रमाणे नको वाटते, पण परिणामी अमृतासारखे हितकर ठरते त्याला 'सात्त्विक सुख' म्हणतात. हे सात्त्विक सुख, आत्मा-परमात्मा विषयक बुद्धीच्या निर्मलतेतून, उत्पन्न होत असते! 'आत्मबुद्धिप्रसादजम्।' (श्लोक क्र. ३७) यापुढे भगवंत असेही सांगतात की, या पृथ्वीवर अथवा देवलोकात, स्वर्गात अशी एकही व्यक्ती अथवा वस्तू नाही, जिच्यात सत्त्व-रज-तम हे तीन गुण नाहीत. (श्लो क्र. ४०) मात्र एकटे ब्रह्म, एकटे ईश्वरी तत्त्व, तेवढेच काय ते त्रिगुणातीत आहे. इतर सर्वांचा उल्लेख त्रिगुणात्मकतेच होतो.

आता महत्त्वाचा प्रश्न असा की, अशा स्थितीत मनुष्य मात्राचे आचरण, कर्तव्यधर्मपालन कसे असावे? यासाठी भगवद्गीता चार वर्णांची मांडणी करते. (हे चारही वर्ण, 'गुणकर्मविभगश:' च आहेत.) या व्यवस्थेत, समाजातील शक्तिशाली गुणांची चार वर्गात विभागणी मानली आहे. या व्यवस्थेत ज्ञान, सत्ता, संपत्ती आणि श्रमकौशल्ये (सेवाव्रत) यांचे पूर्णपणे विकेंद्रीकरण साधण्याचा प्रयत्न केला आहे. या चार शक्तिस्रोतांचे केंद्रीकरण होणार नाही, याचीही दक्षता घेण्याचा प्रयत्न केला आहे. याच संदर्भात श्रीभगवंताचा उपदेश म्हणून श्लोक क्र. ४५ 'स्वे स्वे कर्मण्यभिरत:'... आणि श्लोक क्र. ४६ 'यत: प्रवृत्तिर्भूतानां'... ही श्लोकद्वयी फार महत्त्वाची आहे. तिच्यामध्ये सारा 'गीताधर्म' आहे. खराखुरा 'मानवधर्म' आहे. हा सारा अर्थ, हा सारा भाव समजायला ज्ञानोबामाऊलीची ओवी, अत्यंत महत्त्वाची आहे. अत्यंत उपयुक्त आहे.

**''तयां सर्वात्मका ईश्वरा। स्वकर्मकुसुमांची वीरा।**
**पूजा केली होय अपारा। तोषालागीं।।'' (१८-९१७)**

श्री ज्ञानेश्वर महाराज नुसते कर्म न म्हणता स्वकर्मरूप फुले म्हणतात. वनस्पतीच्या अंगोपांगांपैकी फूल हे सर्वात अधिक सुंदर, आकर्षक, निरनिराळे मनोहर रंग धारण करणारे, कोमल, सुगंधी असे असते. त्यात मध असतो आणि तेच फळाचे जनक असते. कर्माला फूल म्हणण्यात, फुलाचे हे सर्व वैशिष्ट्य, लक्षात आणून द्यायचे आहे.'' पू. स्वामीजींचे हे सारे विवेचन फार महत्त्वाचे आहे.

तात्पर्य असे की, आपले कर्तव्यकर्म आसक्तिरहित वृत्तीने आणि पूर्ण प्रामाणिकपणे पार पाडणे, याच्याइतके आत्मोद्धाराचे दुसरे साधन नाही. पू. वरदानंद भारती असेही सांगतात की, भगवद् गीतेला 'नैष्कर्म्य' या संज्ञेचा नेमका कोणता अर्थ अभिप्रेत आहे? तर या संज्ञेचा धात्वर्थाने अर्थ, 'काम न करणे' असा असला तरी, नेमका अर्थ निवांतपणा असा आहे. निवांतपणा म्हणजे अंत:करणाची प्रसन्नता. अशी नैष्कर्म्याची सिद्धी कधी प्राप्त होते? तर आपल्या कर्तव्याचरणाच्या परिपूर्ती नंतरच ती प्राप्त होते, असेही दिसते की, श्रीमद् भगवद्गीता अध्याय १८ मध्ये श्लोक क्र. ५० पर्यंत सांगिलेला बोध हा, परमार्थ आणि व्यवहार या दोघांनाही धरून सांगिलेला आहे. पण श्लोक क्र. ५० ते ५५ या श्लोकांमध्ये सांगितलेली साधना, ही पारमार्थिक साधना आहे. ही साधना ब्रह्मप्राप्तीकरिता आहे. ब्रह्माच्या साक्षात्काराकरिता आहे. यानंतर महत्त्वाचा ५६ वा श्लोक येतो या संदर्भात एकूण विचार करिता, या श्लोकात, परमपदापर्यंत पोचविणारा, 'भक्तियुक्त कर्ममार्गच' सांगितला आहे. आणि येथून पुढे दहा श्लोकांत, या भक्तीयुक्त कर्ममार्गाचेच प्रतिपादन केले आहे. यातही वैशिष्ट्य असे की, भगवंताच्या कृपाप्रसादाने, भगवद्भक्त हा, सर्व संकटातून तरून जातो म्हणजे नेमके काय? त्याचा अर्थ काय? तर, 'खऱ्या शूराला जसे युद्धाचे भय नसते, तसे खऱ्या भक्ताला आपत्तीचे भय वाटत नाही. प्रतिकूल परिस्थितीतही त्याची 'चित्ती असो द्यावे समाधान।' ही स्थितप्रज्ञ वृत्ती ढळत नाही हेच ते 'तरून जाणे' आहे.

यासाठी महत्त्वाचे काय? तर या जगातील सारे कर्तव्य ईश्वराचे आहे, मूलत: सर्व प्रेरणांचा स्रोत ईश्वर आहे, असे जर मनुष्यमात्रास प्रामाणिकपणे वाटले, तर तो विनम्र राहील. त्याची कर्मे निष्काम होतील. तसेच कर्मफलाविषयीच्या आसक्तीचा स्पर्श, त्याच्या अंत:करणास, चुकूनही होणार नाही. याचप्रमाणे 'सर्व धर्मान् परित्यज्य' म्हणजे, काय? तर भगवंत आपणास भगवंताशी साधावयाच्या ऐक्याच्या, आड येणारे सर्व धर्म म्हणजे स्थूल आणि सूक्ष्म द्वैताच्या आधाराने राहणारे सर्व धर्म, सर्व प्रकारचे गुणदोष - यांचा समूळ त्याग करावयास सांगत आहेत. अशा या आतापर्यंत सांगितलेल्या 'गीताधर्मा'चे सार कशामध्ये आहे? तर पू. स्वामीजी सांगतात ते अध्याय १८ मध्ये, शेवटच्या श्लोकात (क्र. ७८ मध्ये) आहे. तोच तो सर्वप्रसिद्ध श्लोक, ''यत्र योगेश्वर: कृष्णो....''

ज्ञानोबा माऊलीच्या शब्दांमध्ये सांगायचे तर श्रीव्यासांचा शिष्य असलेल्या संजयाचा पूर्णोद्गार, गीतेतील सातशे श्लोकांचा इत्यर्थ गीतोपदेशाचे सर्व 'सार' या एकाच श्लोकात एकवटले आहे. या एकाच श्लोकावर विश्वास ठेवून जो आचरण करील, त्याला संपूर्ण विद्यांचे यथार्थ स्वरूप, स्वाधीन करून घेता येईल. या श्लोकाचा इत्यर्थ या श्लोकाचा संदेश असा की, ''योगेश्वर असा श्रीकृष्ण आणि धनुर्धारी असा अर्जुन, यांच्या सहयोगातून संपत्ती, विजय. वैभव मिळवावयाचे असते. आणि त्यांना शाश्वत अशा नीतीचे, न्यायाचे अधिष्ठान असते. तसे असले तरच, त्या संपत्तीला, विजयाला आणि ऐश्वर्याला खरी शोभा प्राप्त होते. त्यांना स्थिरता लाभते आणि त्यातून निरामय प्रसन्नतेचा लाभ होतो.'' असे हे गीतेचे तत्त्वज्ञान पुन्हा एकदा प्रभावीपणे समाजापुढे मांडणे आपले कर्तव्य आहे, असे पू. स्वामीजी सांगतात. त्यांच्या गीताध्याय-भाष्यत्रयींचा हाच संदेश आहे.

**- प्राचार्य डॉ. मुकुंद रघुनाथ दातार**
ग्रॅनाडा - ए-३०४, फोर्टालिझा कॉम्प्लेक्स,
कल्याणीनगर, पुणे ४११ ००६.
(०२०) २६६०८८२३/ ९८२२८७६०३८

•••



# 'श्रीवरदानंद भारती' वंदना


**रचना – सौ. शैला सुहास पटवर्धन**

एम्.ए.बी.एड्.- सेवानिवृत्त शिक्षिका,
'पार्ले टिळक विद्यालय', सध्या वास्तव्य- पुणे.
आदर्श शिक्षिका म्हणून ३ पुरस्कार प्राप्त. 'शामरंग' श्रीकृष्ण चरित्रावरील १२ गीताची ध्वनिफीत.


।। ॐ नमो भगवते वासुदेवाय ।।

ऐका माझे बोल ग्रंथांनो, मनापासून बोलते
'श्रीवरदानंदभारती' चरित्र वाचनी डोलते ।।
'तेजाचे चांदणे' 'ही अनंत संपदा'
हरवलेले गवसले अन् दूर झाल्या आपदा ।।
''उभे राही शून्यातून विश्व'' सत्य हे कळे
'दादा-अण्णा-अप्पा' त्रिदेव 'दत्तरूप' पाहिले ।।
सहकार्याच्या शिवधनुष्या उंच उचलता अभिनंदन! अन् वंदनही!
'श्रीवरदनारायण' पदी विनम्र प्रार्थना-
''येवो जागृति जना- शांति समाजजीवना''
जया ध्यास, त्याचे प्रयास, घेई चक्रधारी-
'शुक्लांबरधर विष्णु' सतत साह्यकारी!!
परि त्यासी आवडते 'शांति, सदनी प्रसन्नता'
आल्या गेल्या अतिथ्यां द्वार खुले स्वागता ।।
हिंदुधर्म सनातन शिस्त नित्य जनीसदनी-
सूर्योदय-सूर्यास्ती, मंगलमय शुभचिन्ही-
वृद्ध-तरुण गृहलक्ष्मी, प्रसन्न मुखी निशिदिनी-
लखलखीत सारे घर । चांदण्याची जणु धरणी ।
स्वच्छ-शुद्ध-शांतिमया रंगावलि देव्हारी,
सुस्वर रव स्तोत्रांचे, घुमती प्रार्थनेपरी-
तेवतसे तेलवात, लखलखत्या समईत,

इवलासा बाळ गुणी 'जय जय' करी जुळवुन कर ।
माझे-तुझे नच सहसा । एक तीळ सातां पुरे
सारे चित्र केले उभे
अनंतचरित्र सुखद खरे ।
प्रतिष्ठान 'गोरटे'- प्रतिष्ठान 'दामोदर'
संतसृष्टी- श्राव्य होई- अन् सवेचि प्रभुदर्शन
उत्तरेत गिरीवर-कल्लोलिनी गंगाही
शुभ्र शिखरी शिवशंभू- नील गगन नारायण
यतिवर जे ज्येष्ठ श्रेष्ठ घरबसल्या ते दर्शन
'तेजाचे चांदणे' अप्रुप ते सुदर्शन!
शब्दसृष्टीचे ईश्वर 'श्रीवरदानंद' स्वत:
त्यांचे आप्तगोत तसे सुहृद ज्ञानी ज्ञात होतां-
पावले भरून हृदय, आनंदले अनेकदां
नेत्रही ओलावले हृद्य शब्दे- थरथरता...
सात समुद्रांची खोली- उभ्या आकाशाचा पार
अनंत-दर्शनी 'प्रसाद'
''सत्य-शिव-सुंदर-अपरंपार!!''
श्रीवरदानंदस्मृतिप्रति विनम्र वंदना
अमृतकलशदात्री 'कल्याणी' अभिनंदन!

।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।
।। ॐ शान्ति: शान्ति: शान्ति:।।



# श्रीशालिवाहन- महाकाव्य (पुरवणीसह)
## थोडेसे चिन्तन...

**सरस्वती कवी मो. बा. रवंदे**

संस्कृत काव्यतीर्थ, डी.एड., निवृत्त संस्कृताध्यापक. संतकवी दासगणूमहाराजांनी दिलेली सरस्वतीकवी ही पदवी. काव्यनिर्मिती- श्रीगणुदासायन (५५५५ पद्य संख्या असलेले महाकाव्य) श्रीशालिवाहन पद्य पुरवणी व गद्य कादंबरी, श्रीसंतकवी दासगणू विरचित आठ कीर्तनाख्यानांचे संस्कृत पद्यमय सयमक त्याच चालीवर असलेली अशी रचना, गीतेमध्ये- कालीदासाच्या मेघदूताच्या खंड काव्यावरची २१ गीते (गीतरामायणाप्रमाणे) थोडेशी मराठीत (पद्यमय) सुभाषिते. आणि प्रसंगानुरूप विविध रचना इ.

'श्रीशालिवाहन' हे एक राष्ट्रीय विचारांनी आणि भारतीय राजनीतीने भरलेले दिव्य असे महाकाव्य. याचे रचनाकार कवी आहेत पूर्वाश्रमीचे पूजनीय श्री.अ.दा.आठवले म्हणजेच ब्र.भू.श्री.स्वामी वरदानंद भारती. (आमचे अप्पा.)

ज्यावेळी या महाकाव्याचा लेखनारंभ झाला त्यावेळी स्वातंत्र्य संपादण्यासाठीचा संग्राम सुरू होता. इंग्रजांविरुद्ध सारा देश पेटून उठला होता. त्यावेळी तरुणांच्या मनामध्ये स्वातंत्र्यप्रेम, इंग्रजांविषयीची कटुता-तिरस्कार आणि सर्व तरुणांची संघटना निर्माण करणे अत्यावश्यक होते. केवळ याच उद्देशाने प्रेरित होऊन हे महाकाव्य लिहिण्याचा उपक्रम कवीने केला होता. त्यावेळी रचनाकाराचे वय केवळ वीस वर्षांचे होते.

शके १८६२ च्या चैत्रापासून ते शके १८६५च्या चैत्रापर्यंत या तीन वर्षांत हे महाकाव्य पंधरा सर्गापर्यंत लिहिले गेले होते. पुढे ते कार्य का खंडित झाले हे केवळ तर्कानुमेयच आहे. कदाचित् कार्याचा व्याप वाढला असेल म्हणा वा इ.स. १९४७ मध्ये, खंडित का होईना मिळालेल्या स्वातंत्र्यामुळे, उद्दिष्टपूर्ती झाल्याने म्हणा हे काव्य-लेखन-कार्य स्थगित झाले असावे. गेल्या सत्तर वर्षापासून हे महाकाव्य उपेक्षितच राहिले होते.

स्वा. सावरकरांच्या 'कमला' काव्याप्रमाणेच हे श्रीशालिवाहन महाकाव्य, कथानक ऐन रंगात आले असतानाच बंद पडले.

या महाकाव्याची रचनाच रूपकात्मक आहे. येथे इंग्रजांच्या ठायी शकांना कल्पून इंग्रजांचीच कूटनीती या शकांनी कशी वापरली होती याचे स्पष्टतया दर्शन, उपलब्ध असणाऱ्या या १५ सर्गातूनच वाचकांना चांगल्याच प्रकारे घडू शकते.

सर्व प्रथम या शकांनी विद्यमान भारतीय सम्राटाकडे त्याच्या राज्यामध्ये व्यापार करण्याची अनुज्ञा घेणे, विक्रेय वस्तूंचे चोर-लुटारू पासून संरक्षण व्हावे म्हणून सैन्य ठेवण्याची अनुमती मिळवणे इत्यादी सारे प्रसंग, इंग्रजाच्या कूट कारस्थानाचेच दर्शन घडविणारे आहेत.

श्रीशालिवाहन या महाकाव्याच्या कथानकातील शालिवाहन, गुणाढ्य आणि शकराजा रुद्रदामन या तीन व्यक्तीच ऐतिहासिक आहेत. बाकीचे सारे प्रसंग व अनुषंगिक पात्रांची नावे हे सारे काल्पनिक आहे. उदा. जसे चाणक्यचंद्रगुप्त, वीरधवल, मित्रचंद्र इ. या जुन्या कादंबऱ्या आहेत तसेच या काव्यातील कथानक आहे, फरक एवढाच आहे की, वरील कादंबऱ्या गद्य स्वरूपात आहेत आणि प्रस्तुत महाकाव्य शालिवाहन हे पद्यमय आहे.

या महाकाव्याच्या कथानकामध्ये, 'वामदेव' या नावाच्या एका विद्वान ब्राह्मण युवकाचा एक्या क्षत्रिय कन्यकेशी गांधर्वविवाह होतो. हेच दोघे शालिवाहनाचे जननी जनक होत. (वर हा ब्राह्मण व वधू ही संस्कारित अशा क्षत्रिय वा वैश्य वर्णातील असेल तर त्या विवाहास 'अनुलोम' विवाह असे म्हणतात. हा विवाह शास्त्र संमत असून परिणामी हितकर ठरणारा असा आहे. या अनुलोम विवाहाचे उदाहरण म्हणजे जमदग्नीपुत्र परशुरामाची माता रेणुका आणि पितामही सत्यवती या दोघीही क्षत्रिय कन्या होत्या. परंतु जेथे कनिष्ठवर्णीय वर आणि श्रेष्ठवर्णीय वधू असेल तर त्या विवाहास 'प्रतिलोम' विवाह असे म्हणतात. हा विवाह समष्टीच्या (समाजाच्या) दृष्टीने परिणामी हितकारक ठरलेला नाही. या प्रतिलोम विवाहाचे उदाहरण म्हणजे ययाती-देवयानी यांचा विवाह होय. येथे देवयानी ही ब्राह्मणवर्णीय- शुक्राचार्यांची कन्या आहे तर ययाती हा क्षत्रिय वर आहे. हा विवाह परिणामी हितावह ठरलेला नाही. हे कसे ते थोडक्यात पाहू.)

या ययातीची दुसरी पत्नी 'शर्मिष्ठा' ही दैत्यराजा वृषपर्वा याची कन्या होती. (येथे केवळ संदर्भापुरतेच मी संक्षिप्त वर्णन केलेले आहे. त्यावर सोदाहरण व सविस्तर लिहिणे हा स्वतंत्र लेखाचा विषय ठरू शकतो.)

या ययाती राजाला देवयानीपासून यदु व तुर्वसु या नावाचे दोन पुत्र झाले होते आणि शर्मिष्ठेला अनु, द्रुह्यू व पुरू असे तीन पुत्र झाले होते.

पुढे काही कारणाने शुक्राचार्यांने ययातीला 'तू वृद्ध होशील' असा शाप दिला होता आणि ययाती हा तत्काळ वृद्ध झाला.

आपल्या अविचाराने दिलेल्या या शापामुळे, आपल्याच मुलीचे (देवयानीचेही) सुख आपण नष्ट केले आहे हे लक्षात येताच शुक्राचार्यांने 'तुझे हे वृद्धत्व तुला स्वेच्छानुसार कुणालाही देता येईल आणि त्याचे तारुण्य तुला मिळेल' असा परत उ:शापही दिला होता.

पुढे तारुण्यात आलेल्या या पाच मुलांपैकी केवळ पुरूनेच या ययातीचे वृद्धत्व घेतले. यामुळे ययातीने आपल्या पूर्ण राज्याचा उत्तराधिकारी म्हणून पुरूसच नियुक्त केले. हाच पुरू कौरव-पांडवाचा

पूर्वज होता. आता उर्वरित असलेल्या या चार पुत्रांपैकी केवळ यदु हाच भारतात राहिला होता. (याच्याच वंशात पूर्णावतार भगवान् श्रीकृष्ण अवतरले होते.) पण त्या यदूस राज्याधिष्ठित होता येत नव्हते. कारण 'ययाति-शापात् यदुभिर्नासितव्यं नृपासने' असा स्पष्ट उल्लेख महाभारतात आला आहे.

त्यानंतर इतर जे तिघे तुर्वसु, अनु व द्रुह्यू हे पुत्र भारताबाहेर गेले त्यांनी तेथे मोठमोठी साम्राज्ये प्रस्थापित केली होती (म्हणूनच आजही परदेशामध्ये हिंदूंच्या देव-देवता यांच्या मूर्ती दिसून येतात. तसेच जर्मन लोक स्वत:ला आर्यवंशीयच मानतात हे विश्रुत आहे.) परंतु भारताबाहेर गेलेल्या या तीन पुत्रांसमवेत येथील ब्राह्मणसमाज मात्र गेला नव्हता. त्यामुळे उत्तरोत्तर ययातीच्या वंशातील या पुत्रांच्या पुढील सर्व पिढ्या संस्कारहीन होत गेल्या. महाभारतात पुढील उल्लेख स्पष्टपणे आले आहेत-

'इमा: क्षत्रियजातय: ।। वृषलत्वं गता लोके ब्राह्मणादर्शनेन च।' त्याचप्रमाणे 'तुर्वसोर्यवना: स्मृता:।।' इत्यादि.

यवन म्हणजे संस्कारविहीन. (मुसलमान नव्हेत) ते आहेत ग्रीकजातीय लोक. (श्रीमद्भागवतात आलेली 'कालयवनाची कथा सर्वश्रुत आहे') या ग्रीकजातीयापैकीच सिकंदर-आलेक्झांडर हा एक होता. त्याने भारतावर आक्रमण करून अगणित धन-संपदा लुटून नेली आणि भारतातील धर्म-संस्कृतीवरही आघात केल्याची नोंद इतिहासात सापडते.

तसेच देवयानीचा प्रतिलोमज पुत्र यदु जो होता त्यापासूनच वृष्णी, अंधक, कुकुर, भोज इत्यादी अनेक यादव-कुले निर्माण झाली होती. (यापैकी वृष्णी कुलात पूर्णावतार भगवान श्रीकृष्ण अवतीर्ण झाले होते. तसेच भोज या कुलांत कंस हा जन्मला होता. कंस हा कसा अत्याचारी व क्रूर होता हे निराळे सांगण्याची गरज नाही.)

यदु हा भारतातच असल्यामुळे त्याच्या वंशातील अनेक पिढ्या, भारतीय धर्म-संस्कृतीच्या प्रभावामुळे, सुसंस्कारीच राहिल्या. परंतु पुढे भगवान श्रीकृष्णाच्या अवतार समाप्ती समयी हे यादवही अत्यंत उन्मत्त झाले होते. ते धर्म-संस्कृतीच्या विपरित वागू लागले. त्यांना मान-मर्यादा उरली नाही. मद्यपान, कलह, व्यभिचार या दुर्गुणातच ते राहू लागले होते आणि शेवटी ते आपसातच कलह-युद्ध करून संपले. त्यातून जे कुणी जिवंत होते ते श्रीकृष्ण व बलराम यांनी स्वहस्ते ठार केले आणि ते निजधामास गेले.)

वाचक हो! हे एवढे कांहीसे अप्रस्तुत वाटणारे संदर्भ-वर्णन करण्यामागचे प्रयोजन असे की प्रतिलोम- विवाहातून निर्माण झालेली संतती ही, परिणामी कशी सामाजिक स्वास्थ्यास विघातक ठरते हे ध्यानी यावे म्हणूनच.

श्री. आठवले यांनी प्रस्तुत महाकाव्यात, शालिवाहनाचे माता-पिता, वामदेव हे ब्राह्मण आणि माता क्षत्रियकन्या 'सुशीला' यांचा शास्त्रमान्य, परिणामी हितकर असा अनुलोम विवाह झाल्याचे वर्णन करून शास्त्राची मर्यादा सांभाळली आहे. असा हा बारकावा सहजा सहजी लक्षात येण्यासारखा नाही.

आता या महाकाव्यातील आणखी एक दोन पैलूवर थोडक्यात विचार करून या लेखाची विस्तार-मर्यादा सांभाळणे अत्यावश्यक आहे.

श्रीशालिवाहनास, राजाची कर्तव्यें, उत्तरदायित्व व राजनीती सांगतांना श्रीवामदेव (या महाकाव्याच्या पद्य-पुरवणीमध्ये) म्हणतात-

राज्यातील जनसामान्यांससुद्धा वस्त्रान्न-निवारा यांची कधीही उणीव भासू नये. प्रजाजनांचे जीवित-वित्त सदैव संरक्षित असावे. राज्यात सर्वत्र निर्भयपणे कुणासही प्रवास करता यावा. रुग्ण-जनांना सर्व ठिकाणी विनामूल्य औषधोपचार मिळत जावा. या एवढ्या तरी सुखसोयीची व्यवस्था राज्यात असावी अशी ही प्रजाजनांची किमान अपेक्षा असते. राजाने दक्षपणे वरील सुखसोयी प्रयत्नपूर्वक निर्माण केल्याच पाहिजेत.

शालिवाहना! आणखी एक मुद्दा दक्षतापूर्वक ध्यानात घेणे तुला अत्यावश्यक आहे. तो लक्षपूर्वक ऐक. तो महत्त्वपूर्ण मुद्दा असा-

एखाद्या राजाने दक्षपणे प्रयत्नपूर्वक स्वराज्यात वरील साऱ्या सुखसोयी निर्माण केल्या, ऐहिक व भौतिक उन्नतीची सारी साधने प्राप्त करून दिली, प्रजेचे जे प्रेय (म्हणजे आवडणारे, सुखाचे वाटणारे ते ते सर्व) प्रजाजनांस मिळवून दिले तरी एवढ्यानेच राजाचे कर्तव्य परिपूर्ण होत नाही. भारतीय-राज्य-शासन-यंत्रणाही, प्रजाजनांस, असे हे केवळ प्रेय प्राप्त होणे या स्थितीस परिपूर्णता मानीत नाही. साऱ्या प्रजेला प्रेयाबरोबरच तिचे श्रेय सुद्धा प्राप्त झालेच पाहिजे असे मानते. प्रजाजनांच्या चित्तीं श्रेय जर नसेल तर सर्व-संपन्नता असून देखील माणसातील पशुत्व नष्ट होत नाही.

म्हणूनच श्रीकृष्णकथामृतामध्ये असा उल्लेख आला आहे. यात श्रीकृष्ण धर्मराजास राजधर्म सांगताना म्हणतात-

**'सुयोधनाने स्वार्थापोटी । प्रजा वळविली प्रेया-पाठी।।**
**मिळवुनि द्यावे श्रेयतयाचे । कार्य असे हे निर्लोभाचे ।।'**

शालिवाहना! नव्वद प्रतिशत व्यक्तीमध्ये, समाजात, राज्यामध्ये क्षुद्रता, लोभ, अहंकार, स्वार्थादि मनोविकार स्वाभाविकतयाच (जन्मजातच) असतात. हे दुर्गुण म्हणजेच पशुत्व. ते पशुत्व पूर्णतया संपविणे हे राजाचे सर्वात श्रेष्ठ असे कर्तव्यच आहे. प्रजाजनांचे ठायीं, नि:स्वार्थपणा, कर्तव्य-निष्ठा, त्याग, विशुद्धसे चारित्र्य, दयालुता हे दैवीगुण (म्हणजेच श्रेय) राजास प्रयत्नपूर्वक निर्माण करावे लागतात. नाही तर समाजातील बलवान माणूस, दुर्बलास पूर्णपणे गिळंकृत केल्याशिवाय राहणार नाही. मोठा मासा लहान माशास खाऊन टाकतोच. कारण बलवान माणसाचे पशुत्वही बलवान असते. ते पशुत्व संपविणे हे राजाचेच उत्तरदायित्व (जबाबदारी) आहे.

साऱ्या प्रजाजनांच्या ठायी, उदात्त उन्नत अशा जीवनाची महती, दैवी गुणसंपदा केवळ दंडभयाने वा धाकाने निर्माण करता येत नाही. हे दैवीगुण प्रजेच्या हृदयात प्रत्यक्षपणाने प्रकट व्हावेत, रुजावेत म्हणून बालपणापासूनच तसे विवेकयुक्त संस्कार करावे लागतात. विद्यार्थ्यांच्या हृदयामध्ये उदात्ततादि सद्गुण निर्माण होतील अशीच शिक्षण पद्धती राजास निर्माण करावी लागते की, ज्यामुळे विद्यार्थ्याचे सारे जीवन पूर्णपणे उजळून निघेल तसेच मानवी जीवन हे देवजीवनात परिणत

होईल. (म्हणजेच नराचा नारायण होईल) अशीच सामाजिक-जीवन-प्रणाली स्वराज्यात निर्माण करून ती सतत- अखंडपणे टिकून राहू शकेल अशी व्यवस्था करणे हेच राजाचे परमश्रेष्ठ कर्तव्य व उत्तरदायित्वही आहे. आणि भारतीय संस्कृती सुद्धा हेच मानवी जीवनाचे अंतिम साध्य मानते. हेच ते श्रेय (मोक्ष, मुक्ती, कल्याण, हित, इत्यादी) होय. असे हे श्रेय व्यक्ती व्यक्तींच्या हृदयात नित्य जागृत असेल तरच समाजात शांतता नांदू शकते. जनसामान्य सामंजस्याने जगू शकतात.

शालिवाहना! आणखी एक विचार सदैव ध्यानी असणे आवश्यक आहे की, सामान्यजनास केवळ सदाचाराचा उपदेश करून भागत नाही. तर राजाचे जीवन सुद्धा सदाचार संपन्न, जितेंद्रिय असावयास हवे. संयमीही हवे तरच प्रजाही आदरपूर्वक धाकात राहू शकते. त्यातूनच राज्याचे, राजसत्तेचे, धन-वैभवाचेही संरक्षण होत असते. 'यथा राजा तथा प्रजा' हे वाक्य शब्दशः यथार्थ आहे. म्हणनूच राजानेही सदैव सदाचारीच असले पाहिजे. नाहीतर जन-मानसात असंतोष व क्षोभही निर्माण होतो ही स्थिती राज्याच्या स्थैर्यास घातक ठरू शकते. राजाविषयीच्या प्रेम, निष्ठा, आदर इत्यादी भावनाही उणावतात. याचा घातक असा परिणाम होऊ शकतो हे विसरून चालत नाही.

शालिवाहना! राजा हा समष्टीचा (समाजाचा) प्रतिनिधी असतो. केवळ प्रजाहितच त्याचे कार्य असते. तो कुणाचाही पुत्र, पिता व पती नसतो. तो असतो तो केवळ राजाच. वैयक्तिक अधिकार म्हणून जें जें काही असते ते या राजास कधीच मिळू शकत नाही.

ज्या ज्या गोष्टीत प्रजा-हित समाविष्ट आहे असे उदात्त, उन्नत कार्य करताना जो कुणी आततायी आडवा येईल तर त्यास निःसंकोचपणे ठेचून ठार करावे. मग तो कुणीही असो. त्या स्वभाव-दुष्टास सदाचारोपदेश करून भागत नाही. कारण अशा त्या दुष्टाचे सदुपदेशाने कधीही हृदय-परिवर्तन होत नसते. सारासार-विवेक सोडून सरसकट लोकांना सत्य-अहिंसादि सद्गुणांचे प्रतिपादन करणे म्हणजे संकट विकत घेणेच होय. असे भोंगळ तत्त्वज्ञान कुणाचेच संरक्षण करू शकत नाही. मग कल्याण कसे करू शकेल? कारण सारेच लोक एकाच पातळीवरचे कधीच नसतात. सत्त्वादिगुणामध्ये जोवर विषमता आहे तोवर व्यक्ती-व्यक्तीच्या ठिकाणी स्वभाव-भिन्नता असतेच यात मुळीच शंका नाही. 'जेवढ्या व्यक्ती तेवढ्या प्रवृत्ती' ही लोकोक्ती सर्वथा खरी आहे. या स्वभावभिन्नतेमुळे उदात्त असे तत्त्वज्ञान सर्वांनाच सारख्या प्रमाणात लागू पडत नाही. विविध अशा रोगासाठी औषधेही विविधच असावी लागतात.

शालिवाहना! जे लोक जन्मजात दुष्ट व क्रूर असतात त्यांच्या बाबतीत सदुपदेश हा वांझोटा ठरतो. म्हणूनच ही दुष्टता ज्या शरीराच्या माध्यमातून प्रत्यक्ष कार्यान्वित होते असे ते त्या दुष्टाचे शरीरच संपवावे लागते तेथे अन्योपायच नसतो.

तात्त्विक दृष्ट्या सत्य असलेली- 'सर्प विंचू नारायण । परि ते वंदावे दुरून।।' ही संतोक्ती व्यवहारात ध्यानी ठेवलीच पाहिजे. देव्हाऱ्यात दडून बसलेल्या विंचवास ठेचण्यासाठी- 'पैजाराचे काम । व्हावे अधमासी अधम।' 'जीवो ब्रह्मैव नापरः' हा विचार व्यवहारात कामी येत नाही. 'तत्त्वाची नी व्यवहाराची । मिसळ कधी न करावी' हे तत्त्व ध्यानी ठेवलेच पाहिजे. येथे विवेक सुटला तर त्यातून दुःख यातनाच निर्माण होतात.

सामान्य व्यक्तीच्या बाबतीत विवेक सुटला तर त्यातून निर्माण होणारे संकट वा दुःख त्या व्यक्ती पुरतेच मर्यादित असते. परंतु राजाच्या बाबतीत हा सारासार विवेक सुटला तर साऱ्या राष्ट्रावरच आपत्ती येऊ शकते. राजाची स्वल्पही चूक साऱ्या सम्राज्यासच दुःखाच्या खाईत लोटू शकते.

शालिवाहना! ज्या राजवटीत केवळ इहवादच पोसला जातो, जेथे काम व अर्थ यांनाच महत्त्व दिले जाते त्या राज्यातील प्रजाजन परमार्थ विसरतात. श्रेय सोडून प्रेयाच्याच पाठीमागे लागतात. तेथे दुःख-विषमता इत्यादी संकटांना वेगळे निमंत्रण देण्याची गरजच ठरत नाही.

ज्यांना दंड करू नये अशा व्यक्तींना जर का राजाने दंड केला तर राजास जे काही पाप लागते तेवढेच नव्हे तर त्या पेक्षा अनेक पटीने अधिक पाप, दंडनीय व्यक्तीस (भूत दयेच्या नावाखाली) दंड न करता मोकळे सोडल्यासही लागते याची नित्य जाणीव राजाने स्वचित्ती धरावी. अशा विवेकविहीन कृतीमुळे राजाची जगात अपकीर्ती तर होतेच, लोकक्षोभही वाढतो. तसेच मरणोत्तर त्याचा नरकवासही टळत नाही. ही गोष्ट राजाने नित्य निरंतर ध्यानी ठेवलीच पाहिजे.

वाचक हो! या महाकाव्यात वर्णिलेल्या अनेक अशा साऱ्याच पैलूंचे विवेचन करणे हे या लेखाच्या व्याप्तीमर्यादेत न सामावणारे आहे. म्हणून त्यापैकी तीन-चार पैलूंवरच मी माझे विचार यथामति मांडण्याचा प्रयत्न केला आहे. असे हे महाकाव्य आहे. ज्यातील संस्कृत-प्रचुर प्रगल्भ अशी मराठी भाषा, गगनास गवसणी घालणाऱ्या अशा भव्योत्तुंग कल्पना, त्यातील विचारांची मांडणी, विविधालंकारांची रेलचेल, निसर्गवर्णने, भारतीय संस्कृत-काव्य-शास्त्रानुसार असलेले सारे संकेत, इत्यादी अनेकोत्तम गुण मंडित असे हे श्रीशालिवाहन महाकाव्य असले तरी ते अपूर्ण असल्याची खंत परिवारामधील भाविक वाचकांच्या मनातून जात नव्हती म्हणूनच अनेकांनी हे महाकाव्य पूर्ण करण्यास पू.श्रीस्वामीजींना अनेकदा विनंती केली होती. पण दुर्दैवाने ती परिपूर्ण झाली नाही. तरीपण ते अपूर्ण असे केवळ १५ सर्गाचेच महाकाव्य, नांदेडच्या 'संस्कृती विचार सेवक संघ' या संस्थेचे सक्रिय कार्यकर्ते श्री. विवेक इनामदार यांनी प्रकाशित करून वाचकांची सोय केली. पुढे उत्तरकाशी येथे पू. स्वामीजींचा निवास असताना, पुण्याचे विद्यावाचस्पती श्री.ग.प्र. परांजपे यांनी, 'या १५ सर्गानंतरचे पुढचे कथानक काय आहे' याची पृच्छा केली आणि पू. स्वामीजींनीही अगदी सूत्र-स्वरूप वाक्यातून पुढील कथानकाची संभवनीय रूपरेषा सांगितली आणि ती श्री. परांजपे यांनी लिहून घेतली व प्रकाशित केली. त्यामुळे वाचकांची दुधाची तहान ताकावरच भागली. पुढे माझे स्नेही ॲड.श्री.विनायकराव नांदेडकर यांनी दिलेल्या प्रेरणेने व श्री.परांजपे यांच्या त्या सूत्रमय लिखिताने आणि श्रीसद्गुरू कृपेनेच माझ्याकडून त्या महाकाव्याची पद्यमय अशी सात सर्गाची पुरवणी लिहून घेतली. जणू काय माझ्याकडूनच ही पुरवणी लिहिली जावी याच हेतूने पू.स्वामीजींनी

पुढील रचना केली नसावी की काय असे वाटते. ती पद्य-पुरवणीही श्री.इनामदार यांनी मुद्रित करून आपल्या सद्गुरू सेवेची खऱ्या अर्थाने परिपूर्तता केली आहे.

श्रीशालिवाहन हे महाकाव्य मराठी भाषेत जरी असले तरी ते समजण्यास अत्यंत दुरूह आहे. यातील संस्कृतप्रचुर भाषा, जुन्या संस्कृत काव्य शास्त्राधारित संकेत व कल्पना यांनी भरलेले आहे. या महाकवीची काव्यप्रतिभा तर आकाशापर्यंत झेपावणारी आहे. अशा या काव्याचा रसास्वाद घेणे हे सामान्य जनांच्या आवाक्याबाहेरचे आहे. म्हणूनच या काव्याधारित गद्यमय अशी ती श्रीशालिवाहन-चरित-कथा (प्रदीर्घ कादंबरी) सरलतया लिहिण्याचा मी उपक्रम केला आणि श्रीभगवत्कृपेने व पू. स्वामीजींच्या आशीर्वादाने तो तडीसही गेला. मला गद्य लिहिण्याचा विशेषसा सराव नाही. आता हे लेखन कसे आहे ते रसिक व सूज्ञ वाचकांनीच ठरवावे. इति लेखन-सीमा.

का.शु.११ शके १९३५. बुधवार
दि. १३/११/२०१३, श्रीनामदेव म.जयंती

**– सरस्वती कवी**

मो.बा. रवंदे (संस्कृत काव्यतीर्थ)
ए११६-४३/३ नवे नांदेड, सिडको-हडको (दक्षिण)
भ्रमणध्वनी : ८०८७३१०२७३



# कृष्णकथेची शुभ गंगा ही ....

**सौ. सुमेधा आठवले**
बी.एससी., एम.ए., पीएच.डी.,
सरकारी नोकरीतून स्वेच्छानिवृत्ती, गृहिणी
'श्रीकृष्ण कथामृत या महाकाव्याचा चिकित्सक अभ्यास' या विषयावरील प्रबंधास मुंबई विद्यापीठातून पीएच.डी. पदवीसाठी मान्यता व त्यावर्षीचा स्वामी स्वरूपानंद पुरस्कार प्राप्त.

'श्रीकृष्ण कथामृत' हे महाकाव्य प. पू. अप्पा अर्थात वैद्य श्री अनंत दामोदर आठवले – परमहंस स्वामी वरदानंद भारती यांच्या वाङ्मय संपदेतील पहिले अमोल रत्न आहे. या महाकाव्यात अवतारपीठिके पासून ते अवतार समाप्तीपर्यंत संपूर्ण श्रीकृष्ण चरित्र काव्यबद्ध केले आहे. त्याआधी शालांत परीक्षेनंतर अप्पांनी 'श्री शालिवाहन' या महाकाव्यरचनेला प्रारंभ केला होता. १५ सर्गानंतर ते काव्य अपूर्ण राहिले. श्री शालिवाहन या महाकाव्याद्वारे स्वातंत्र्यपूर्व कालीन परिस्थितीवर भाष्य व त्यासाठी उपाययोजना यांचा निर्देश केला आहे, तर श्रीकृष्ण कथामृत या काव्याद्वारे स्वातंत्र्योत्तर काळातील समाजासाठी उपयुक्त ठरणाऱ्या नीतिमूल्याधिष्ठित शासनासाठी मार्गदर्शन होते. नेता कसा असावा याचे श्रीकृष्ण हे एक आदर्श उदाहरण प्रस्तुत काव्यातून प्रकट होते. मानवी जीवनमूल्यांचा द्रष्टा, तत्त्वज्ञानाचा बोधकर्ता, सज्जनसंरक्षक व दुर्जन संहारक असा धुरंधर राजकारणी नेता श्रीकृष्ण हा या महाकाव्याचा नायक आहे.

प्रस्तुत महाकाव्याच्या प्रथमावृत्तीचे प्रकाशन १९५० मध्ये झाले. सद्गुरु दासगणू यांच्या आदेशानुसार अप्पांनी वयाच्या २४-२५ व्या वर्षीच प्रस्तुत महाकाव्य लेखनास प्रारंभ केला. मिरजेचे संस्थानिक श्री. नारायणराव पटवर्धन यांनी पंढरपुरला दासगणूंशी झालेल्या त्यांच्या भेटीत तुलसीदास विरचित रामचरित मानस – तुलसी रामायण – यातील चौपाई व दोहे याप्रमणे रचना करून श्री कृष्णचरित्र काव्यबद्ध करावे अशी इच्छा व्यक्त केली होती. त्याप्रमाणे दासगणूंनी प्रारंभही केला होता. परंतु अप्पांनीच या काव्याची रचना करावी अशी दासगणूंची इच्छा होती. त्यामुळे प्रस्तुत काव्यलेखनामागील प्रेरणा 'सद्गुरु आज्ञा' हीच होती. श्रीकृष्ण कथामृतात अनेक ठिकाणी तसे उल्लेख आढळतात.

**'वत्सा म्हणुनी' वदती गुरुवर, ''घे मम कार्य शिरी हे''**
**आज्ञा कैशी मोडू यास्तव धजलो मद हा नोहे ।।१-३४।।**

**आज्ञा गुरो जाहलि आपुली मला**
**म्हणोनि हा भार सहर्ष घेतला ।।७-२।।**

**गावी कृष्णकथा आज्ञा आपुली मज जाहली**
**आता आपणची दासा सांभाळा गुरुमाऊली ।।११-८।।**

या कवनांवरून काव्यामागील प्रेरणा स्पष्ट झाली आहे.

अगदी तरुण वयात एवढी प्रगल्भ महाकाव्यरचना हा एक चमत्कारच वाटेल. परंतु अप्पांनी संस्कृत मधील कालिदास, माघ, भवभूती, श्रीहर्ष या कवींच्या विदग्ध महाकाव्यांचा अभ्यास करून लिहिलेल्या 'कालिदास नि भावगीते' व रघु-कुमारांची ज्येष्ठश्रेष्ठता' या निबंधांवरून त्यांचा व्यासंग कळून येतो. २० व्या वर्षीच महाकाव्य या साहित्य प्रकाराचा सर्वांगीण अभ्यास झाला होता. हे 'श्री शालिवाहन' या महाकाव्य रचनेवरूनही स्पष्ट होते. महाभारत, रामायण ही आर्ष महाकाव्ये, भागवतादी पुराणे, संतकवींचे साहित्य, पंडित कवींचे ग्रंथ या सर्वांचे परिशीलन व अभ्यास होता. संस्कृत भाषेवर प्रभुत्व होते. कृष्णकथेची कवींना मनापासून आवड होती. उत्कट कल्पनाशक्ती होती. त्यामुळे महाकाव्य रचनेची सिद्धता झाली होती.

रामायण व महाभारत ही आर्ष – ऋषिप्रणीत – महाकाव्ये होत. आजच्या काळात अशी महाकाव्ये होणे अशक्यप्राय आहे. परंतु विदग्ध महाकाव्यरचना मराठीतही उपलब्ध आहेत. साहित्य शास्त्रकारांनी 'महाकाव्य' या वाङ्मय प्रकाराच्या लक्षणांच्या केलेल्या चर्चेचा विचार करता विदग्ध महाकाव्य रचनेबाबत खालील अपेक्षांचा निर्देश दिसून येतो.

महाकाव्य हे अनेक सर्गांनी युक्त, अनेक वृत्तांत रचलेले दीर्घ कथाकाव्य असते. त्यात ८ ते ३० सर्ग असावेत. त्यातील कथा आर्ष महाकाव्यातील वा इतिहासातील प्रसंगांवर आधारित असावी. महाकाव्याचा नायक महान, उदात्त, सर्वगुणसंपन्न, अद्वितीय व पराक्रमी असावा. नायकाच्या समग्र जीवनपटाचे दर्शन महाकाव्यात आलेले असावे. महाकाव्य विविध रसालंकारमंडित असावे. त्याची भाषाशैली प्रौढ व व्यासंगाने पुष्ट असावी. सर्गांतील वृत्तबदल असावा. महाकाव्याचा प्रारंभ हा आशीर्वाद वा नमस्क्रिया यांनी व्हावा. त्यात सूर्य, चंद्र, ऋतु, पर्वत, समुद्र आदींची वर्णने असावीत. महाकाव्याच्या विषयावरून वा नायकाच्या नावावरून महाकाव्याचे शीर्षक असावे. महाकाव्याचे प्रयोजन चार पुरुषार्थांची प्राप्ती हे असावे. महाकाव्यात सर्वस्पर्शी व्यापक जीवनानुभवाचे भव्योदात्त, प्रभावशाली चित्रण असावे. अशा अपेक्षा साहित्यशास्त्रात आढळतात.

मराठीतील अनेक संत कवी, महानुभाव पंथीय कवी, पंडित कवी

व शाहीर सर्वांनी श्रीकृष्ण चरित्रावर आधारित कवने, पदे, अभंग, पोवाडे, भावगीते, गीतमालिका अशा स्फुट काव्यरचना विपुल प्रमाणात केलेल्या आहेत. आधुनिक काळातही श्रीकृष्ण चरित्रावर आधारित काव्यरचना होत आहेत. दीर्घकाव्य रचनेचा विचार करता श्रीकृष्णाच्या चरित्रातील काही प्रसंगांवर आधारित स्वयंवर काव्ये, खंड काव्ये, गीतमालिका यांची रचना आलेली आहे. परंतु साहित्य शास्त्रकारांनी केलेल्या विदग्ध महाकाव्य लक्षणांच्या निकषांनुसार काव्याचे बहिरंग व अंतरंग या दोनही दृष्टीने परिपूर्ण असे संपूर्ण कृष्णचरित्र काव्यबद्ध करणारे मराठीतील 'श्रीकृष्णकथामृत' हे एकमेव विदग्ध महाकाव्य आहे.

'श्रीकृष्ण कथामृत' या महाकाव्यातील कथाभाग मुख्यत: श्रीमद्‌भागवत, महाभारत, हरिवंश या ग्रंथांवर आधारित आहे. प्रस्तुत काव्यात १८ सर्ग आहेत. प्रत्येक सर्गाला उचित शीर्षके दिलेली आहेत. सर्गारंभी शिववंदनपर संस्कृत श्लोक व मराठीतील कवी, संतजन व ईश्वर संतजन यांना नमन करणारी कवने आहेत. ती विविध वृत्तांत रचली आहेत. 'पादाकुलक' वृत्तातील चार पाच चौपायांनंतर 'साकी' वृत्तातील रचना आहे. सर्गांती वृत्तबदल आहे.

प्रस्तुत महाकाव्यातील प्रारंभीची नमने व काव्यातील उपसंहार हे कृष्णकथा निरपेक्ष असे स्वतंत्र लेखन आहे.

**श्रीकृष्ण कथामृतातील नमने :** सर्गारंभी शंकर वंदनपर संस्कृत श्लोक विविध वृत्तांत काव्यबद्ध केले आहेत. शिवशंकरांची विविध रुपे, यातून साकार झाली आहेत. शंकरांच्या रूपवर्णनपर नमनांपेक्षा त्यांचे गुणवर्णन अधिक श्लोकांतून केले आहे. अनेक ठिकाणी त्या त्या सर्गातील कथाभागाच्या आशयाशी सुसंगत असेच शिववर्णन औचित्यपूर्ण रीतीने मांडले आहे. उदाहरणार्थ 'पूर्वपीठिका' या प्रथम सर्गात कृष्णावताराची पार्श्वभूमी मांडली आहे. त्या सर्गातील शिवनमनात कवींनी जगताच्या उत्पत्ति- स्थिति लय यांना कारणीभूत असलेल्या, अगोचर असूनही भक्तीने गोचर होणाऱ्या उमा - महेश्वरांना वंदन केले आहे. 'समर प्रसंग' या सतराव्या सर्गात कौरव-पांडवांतील महासंग्रामाचा कथाभाग आहे. त्या सर्गारंभी महाभीषण तांडव करणाऱ्या, खदिरांगाराप्रमाणे आग ओकणारे डोळे असणाऱ्या, भयंकर गर्जना करून पर्वतांचे तुकडे-तुकडे करणाऱ्या व पृथ्वीचा थरकाप उडविणाऱ्या उग्ररूपधारी शिवरूपाला नमन केले आहे. हे शिवनमनपर श्लोक कवींची उत्कट व तरल कल्पनाशक्ती व संस्कृत भाषेवरील प्रभुत्व दर्शवितात. श्रीविष्णूंच्या कृष्णावताराचे चरित्र काव्यबद्ध करताना सर्गारंभी शिवनमन कवींच्या गुरुपरंपरेतील हरी-हर समन्वयाचेच द्योतक आहे.

शिववंदनपर श्लोकानंतर येणाऱ्या कवनात कवींनी अनेक देवता, संत, व्यास, वाल्मिकी यांसारखे महाकवी, ज्ञानेश्वर-नामदेव-समर्थ इ. संतश्रेष्ठ, कालिदासादी कवी, संतस्त्रिया आणि कवींचे सद्‌गुरू यांना नमन करून महाकाव्य पूर्ण करून घेण्यासाठी कृपायाचना केली आहे. त्या नमनातील शब्दाशब्दांतून कवींच्या मनातील त्यांच्या श्रद्धास्थानांविषयी आदर, प्रेमभाव व नम्रता प्रकटली आहे. सद्‌गुरु दासगणू यांना काव्यरचनेचे श्रेय देऊन त्यांच्या कृपाप्रसादाची प्रार्थना केली आहे. देव-धर्म यांचबरोबर कवींच्या मनातील धगधगते देशप्रेम आविष्कृत झाले आहे ते त्यांनी पुढील शब्दांत केलेल्या शूरवीरांच्या वंदनेतून.

**शीर घेऊन तळहाती लढले धर्मास्तव जे वीर।**
**देशास्तव तनु झिजली ज्यांची नमन तया बहुवार।।१-१९।।**

प्रस्तुत महाकाव्यातील माधुर्य, उदात्तता व भक्तीरसाचे प्राबल्य यांची रमणीयता नमनांपासूनच प्रकटली आहे.

श्रीकृष्ण कथामृतातील कथाभाग वर्णनानंतर अंतिम १८ व्या सर्गातील १९३ ते २४८ या चौपायांमधून अप्पांनी त्यांचे मनोगत व्यक्त केले आहे. हरिचरित्र काव्यबद्ध करण्याचे कार्य सिद्धीस गेल्याबद्दलची कृतार्थता तर त्यात प्रकटली आहे, पण त्यात अहंकार लवमात्रही नसून त्यातून अप्पांच्या व्यक्तिमत्त्वातील आत्यंतिक विनय, नम्रता, सद्‌गुरु शरणता हे गुणच प्रतीत होतात. सद्‌गुरुंप्रती प्रेम, कृतज्ञता व श्रद्धा शब्दाशब्दांमधून प्रकटली आहे.

**वस्तुगतीने या कार्याचे ।**
**कर्तृत्व न लव मजसी साचे।।**
**सद्‌गुरुराया हे तुमचे बळ ।**
**झालोसे मी निमित्त केवळ ।।१८-१९५**

या शब्दात प्रस्तुत काव्यरचनेचे श्रेय अत्यंत नम्रतेने दासगणूंना दिले आहे. ज्ञानेश्वरांच्या लीनतेचे स्मरण करून देणाऱ्या या पंक्ती आहेत. दासगणूंनी प्रस्तुत काव्याविषयी दिलेला अभिप्राय व काव्याची फलश्रुती शब्दबद्ध केलेल्या यातील काव्यपंक्तींतून दासगणूंचे अप्पांवरील अपार प्रेम, अप्पांविषयी त्यांना वाटणारा अभिमान व समाधान पुढीलप्रमाणे अनेक शब्दांतून आविष्कृत झाले आहे.

**शब्दांची तव सुंदर रचना ।**
**मजलाही हे बघ जमते ना।।**
**काव्य बघुन हे मम मन धाले।**
**आज मम श्रम सार्थक झाले ।।** (१८-२३९)

ज्ञानेश्वर-निवृत्तीनाथांचे स्मरण करून देणारी ही गुरु-शिष्यांची जोडी आहे.

उपसंहारातील अंतिम रचनेत स्वत:साठी काहीही न मागता 'सर्व जगात सुखशांती नादू दे' या केलेल्या प्रार्थनेतून अप्पांचे संतत्वच प्रकटते. या उपसंहारात अप्पांनी मोठ्या खुबीने आपले नाव गोवले आहे. उपसंहारातील प्रत्येक कवनातील प्रथम अक्षर घेऊन तयार होणारे वाक्य आहे, असे 'आठवले कुलजात दामोदरसुत अनंत विरचित श्रीहरिचरितयुत महाकाव्य गुरुकृपा सांग जाहले ते परमेश्वरपदी सादर हो इति शं।'

तसेच उपान्त २४८ व्या कवनात कवींनी अंकलेखनासाठी सांकेतिक शब्दयोजना करण्याच्या पद्धतीचा अवलंब करून काव्यरचना पूर्ण होण्याचा काळ शकामध्ये, काव्यातील सर्गसंख्या आणि काव्यातील एकूण पदसंख्या सांगितली आहे, ती पुढीलप्रमाणे.

**तिथी शुभ आश्विन वद्य पंचमी ।**
**शशिगिरीधृतिमितशक तटि भैमी।**

**धृतिसर्गी तर होत समाप्ता ।**
**इषुपरमुनिदोर्मित ही कविता।।१८-२४७**

शशिगिरीधृतिमित शक- शशि = १, गिरी = ७, धृति = १८.
म्हणजे काव्यनिर्मितीचा काळ शके १८७१.
धृतिसर्गी - धृति = १८ म्हणजे सर्गसंख्या १८.
इषुपुरमुनिदोर्मित - इषु=५, पु र = ३, मुनि = ७, दो: = २
म्हणजे कवनसंख्या २, ७३५.

प्रस्तुत काव्यातील नमने व उपसंहार अशी वैशिष्ट्यपूर्ण आहेत.

**प्रस्तुत महाकाव्यातील घटना-प्रसंग :** यातील विषयाचा आवाका फार मोठा आहे. विस्तार मर्यादेचा विचार करून कवींनी कृष्णचरित्रातील काही प्रसंग संक्षेपाने तर काही विस्ताराने मांडले आहेत. घटनाप्रसंगांची निवड व त्यांची मांडणी यावरून कवीची मूल्याधिष्ठित जीवनदृष्टी प्रकटली आहे. कवींना दुर्जनसंहारक, सज्जनसंरक्षक, जगद्गुरु, धर्माधिष्ठित शासनव्यवस्था प्रस्थापित करणारा कृष्ण अधोरेखित करायचा आहे असेच घटनाक्रमांची निवड व मांडणी यांतून जाणवते. या महाकाव्यातील घटनाबहुलतेमुळे मानवी जीवनातील विवाहादी संस्कार, कौटुंबिक आनंद व दुःखाचे प्रसंग अशा लोकव्यवहाराचे वर्णन त्यात आहे. परंतु महनीय व्यक्तींचे चित्रण असल्यामुळे, कृष्णासारखा अलौकिक पुरुषोत्तम काव्यनायक आहे त्यामुळे काही अद्भुत व अलौकिक प्रसंग उदा. आकाशवाणी होणे (सर्ग २), कंसाच्या हातून यशोदेची कन्या निसटून नभात प्रकटणे (सर्ग २), उत्तरेच्या पुत्राला कृष्णाने दिलेले जीवनदान (सर्ग १८) यात साहजिकच आले आहेत. पण कवींनी शक्य असेल त्या स्थळी कृष्णचरित्रातील अद्भूतता, चमत्कार यांत वास्तवाचे रंग चढविले आहेत. उदाहरणार्थ श्रीकृष्ण जन्मानंतर वसुदेव गोकुळात जाण्यास निघाले असता तुरुंगाची दारे उघडणे का शक्य झाले तर देवकीचे नऊ महिने भरण्याआधी आठव्या महिन्यातच कृष्णजन्म झाला. त्यामुळे रक्षक बेसावध होते, मध्यरात्र असल्यामुळे ते झोपेत होते. या वास्तवाची कल्पना कवींनी दिली आहे. (३-७९) वसुदेवाला यमुनेने दुभंगून वाट दिली म्हणजे वसुदेवाला पुत्रप्रेमामुळे पुराची तमा वाटली नाही हे वास्तव कवींनी मांडले आहे. अनेक घटनांचे चित्रण करून महाकाव्याचा विशाल पट चितारला आहे. त्या त्या प्रसंगांचे वर्णन करताना सहभागी व्यक्तींच्या हालचालींचे व लकबींचे चित्रदर्शी वर्णन करून तो प्रसंग साकारला आहे. मान वेळावून जीभ दाखविणारा कृष्ण, गोपींना प्रश्न विचारण्याआधी बासरी कटीस खोचणारा कृष्ण, डोळ्यांतून टपटप धारा वाहत असलेली व दोन्ही हातांनी मुख झाकून रडणारी द्रौपदी, गरोदर स्त्रीचे सोंग घेतलेला मंद गतीने चालणारा व मुरकत प्रश्न विचारणारा सांब अशा वर्णनांतून ती ती व्यक्ती जिवंत केली आहे. कोणत्याही साहित्यकृतीत प्रसंग व घटना यांच्या वर्णनातील स्थल-काल-व्यक्तिविशेष यांच्या प्रत्ययकारी वर्णनासाठी वातावरणनिर्मितीचे स्थान मोठे असते. उचित प्रतिमा-प्रतीकांच्या उपयोजनांतून ती साधली आहे.

**निसर्ग वर्णन :** प्रस्तुत महाकाव्यात कथनाच्या ओघात, प्रसंगांच्या अनुषंगाने वने, उपवने, नगरे, आश्रम, प्रभातसमय, संध्यासमय, निशासमय, विविध ऋतु, पर्वत, समुद्र, नद्या या सर्वांची चित्रदर्शी वर्णने आली आहेत. परंतु कथाभागातील आशयाशीही ते निसर्गवर्णन सुसंगत आहे. उदा. गोकुळातील प्रभातकालाचे वर्णन सर्ग चौथा, आठवा, अकरावा यात आले आहे. पण प्रत्येक वर्णनात वेगळेपणा आहे. कृष्णाच्या गोकुळातील प्रथम आगमनाच्या समयी श्रावण महिना असूनही कुंद नसलेले वातावरण, पूर्व दिशेला उसळणारे तेज, आसमंतात उसळणारे उज्वल अमृतमयी किरण यातून कृष्णपदार्पणातील मंगलता, तेज, पावित्र्य, उज्ज्वलता समर्पक उपमाने व प्रतिमा यातून सूचित केली आहे. तर आठव्या सर्गात अक्रुराने कृष्ण-बलरामांना मथुरेत नेले, त्यावेळच्या प्रभात समयीच्या वर्णनात गोकुळवासीयांची खिन्न मनोवृत्ती प्रतिबिंबित झाली आहे, तर अकराव्या सर्गातील उद्धवाच्या व्रजभूमीतील आगमनाच्या समयी त्या शांत प्रभात कालातील पक्ष्यांचे कूंजन, भ्रमरांचे गुंजन, धेनूंच्या गळ्यातील घंटांची रुणझुण, दुग्धपात्रात पडणाऱ्या धारांचा ध्वनी, मंथनाची खळबळ, जात्याची घरघर आणि गोपबंधूंच्या भजनाचा मंजुळ स्वर अशा सुमधुर नादप्रतिमांतून गोकुळातील ह्या प्रभात समयीची भक्तीपूर्ण मधुरता साकार झाली आहे. ऐंद्रिय प्रतिमांद्वारे उत्कट संवेदनांचा पुनः प्रत्यय आणून देणारे कवींच्या शब्दांतील हेच सामर्थ्य वनवर्णन, आश्रम वर्णन, उपवने, पर्वत, द्वारकानगरी यांचे वर्णन यांच्या चित्रणात प्रकटले. त्या त्या वर्णनातील निसर्ग चित्रण कथेतील आशयाशी उपरेपण राखणारे नसून पात्रांच्या भावावस्थेशी सुसंगत, एकरूप झालेले आहे.

प्रस्तुत काव्यात संवादही आहेत. त्या त्या संवादांतून पात्रांची भावावस्था साकारून प्रसंगातील कथाभाग पुढे नेला आहे. सहभागी व्यक्तींच्या परस्पर संबंधांवर संवादातून प्रकाश टाकला आहे. काव्यातील कवींनी केलेल्या भाष्यपर टिपणीतून सनातन वैश्विक सत्य सामान्य सुभाषितांतून प्रकटले आहे. उदाहरणार्थ -

**लाभतसे फळ जशी पेरणी** (१-१०६),
**स्वत:वरी बेतता येऊनी । प्रेम खलांचे टिके कोठुनी** (२-५३),
**कुलकन्येचे संपदेतही। शुचित्व विलयासी न च जाई** (३-४०),
**मधुर खेळकर साधे वर्तन। यातच मोठ्यांचे मोठेपण** (४-८३)
यासारखी सुभाषिते पाहता येतात.

कवींनी या काव्यात काही वेळा नामांपासून क्रियापदे बनवून त्यांचा वापर समर्पकपणे केला आहे. जसे की, फुले जलाने **अंधुळली, तुटुंबले** जल नयनी, बघुन **शंकला** खळ निज चित्ती इ. शब्द योजले आहेत.

महाकाव्यासारख्या दीर्घ काव्य प्रकारात विविध प्रकारच्या रचना आढळतात. प्रस्तुत महाकाव्यातील काही 'कटाव'सदृश रचना आहेत. (६-४३ ते ४७), (३-३२ ते ३८), (९-१०४, १०७ ते ११३) या कीर्तनातील कटावाप्रमाणे आहेत. सर्ग ५ वा मधील ३ ते ५ व ५ -१५ या रचना स्वतंत्रपणे भावगीतात्मक आहेत. महाकाव्याची भाषा अभिजात आहे. तसेच त्यातील नावीन्यपूर्ण शब्दयोजना, संस्कृत सामासिक शब्दांचे व छोट्या संस्कृत वाक्यांचे औचित्यपूर्ण उपयोजन यामुळे महाकाव्यास अभिजातता प्राप्त झाली आहे. काव्यातील

प्रासादिकता व माधुर्य यामुळे काव्याचे 'श्रीकृष्ण कथामृत' हे नाव सार्थ झाले आहे.

**'श्रीकृष्ण कथामृत' या महाकाव्यातील व्यक्तिचित्रण :** प्रस्तुत काव्यातील १८ सर्गांमधून कवींनी श्रीकृष्ण, रुक्मिणी, नंद-यशोदा, वासुदेव-देवकी, नारद, राधा, कंस, पांच पांडव, भीष्म, द्रोण, द्रौपदी, बलराम-सुभद्रा अशा अनेक पात्रांच्या विविधरंगी चित्रणातून काव्यपट चितारला आहे. काव्यातील कथा-उपकथा यातून विविध वृत्तींच्या, विविध स्वभाव वैशिष्ट्ये असणाऱ्या व्यक्तींचे दर्शन घडते. कृष्णावर प्रेम-माया, भक्ती करणाऱ्या व्यक्तीप्रमाणे बालकृष्णाला मारण्याचा हरप्रकारे प्रयत्न करणारे पुतना, अघासूर, धेनुकासुर आदी दैत्य, कंसाप्रमाणे विरोधी असणारे शिशुपाल, जरासंध, जरासंधाने साहाय्यासाठी पाचारण करणारा कालयवन, शाल्व, अश्वत्थामा, जयद्रथ इ. कौरवांमधील खलवृत्तीच्या व्यक्ती, कौरवांतील दुर्योधन, दुःशासन, शकुनी अशा अनेक कृष्णविरोधी व्यक्तिमत्त्वांच्या चित्रणाने साम्यविरोधी पार्श्वभूमी लाभून महाकाव्यात अभिप्रेत असलेला संघर्ष, विरोध परिणामकारक रीतीने साकार झाला आहे. त्यामुळे श्रीकृष्णाची व्यक्तिरेखा अधिकच उजळून समोर आलेली दिसते. या सर्वच व्यक्तिरेखा सर्वविश्रुत आहेत. परंतु कवींनी प्रस्थापित व्यक्तिरेखांतील काहीशा अपरिचित पैलूंचे दर्शन घडविले आहे. नारदांच्या कळलाव्या वृत्तीचे चित्रण सामान्यत: कथा-कीर्तनांतून केले जाते. परंतु प्रस्तुत महाकाव्यात, नारदांच्या भूमिकेचा सखोल शोध घेऊन अत्यंत परोपकारी, लोककल्याणाची तळमळ असणाऱ्या, त्यासाठी कोणत्याही त्यागाला, तयार असणाऱ्या भक्तीच्या प्रकारासाठी ईश्वरावताराची अपेक्षा करणाऱ्या नारदांच्या संवेदनाशील संतत्वाचे अविष्करण झाले आहे. गंगापुत्र भीष्म हे अतुलनीय पराक्रमी, निश्चयी, संयमी, कुरुकुलावर निष्ठा ठेवून जीवनक्रमण करणारे महात्मे. त्यांच्या मनातील कृष्णाच्या महानतेची जाणीव, वेळोवेळी त्यांनी केलेली कृष्णस्तुती, कृष्ण तसेच पांडव यांच्याबद्दल भीष्मांचा प्रेमभाव यांना सर्वाधिक महत्त्व देऊन 'ज्येष्ठ कृष्णभक्त' अशी भीष्मांची प्रतिमा चितारली आहे. गोपींच्या व विशेषत: राधेच्या विशुद्ध प्रेमभावनेचे चित्रण ही प्रस्तुत महाकाव्याची विशेषता आहे. राधा-कृष्ण संबंधांचे, रासलीलेचे शृंगारिक, कामुक वा क्वचित विकृत वर्णन काही साहित्यकृतींमधून केलेले आढळते. परंतु प्रस्तुत महाकाव्यात राधेचे उदात्त स्वरूपवर्णन आले आहे. अकराव्या सर्गात उद्धवाच्या मुखातून भवभयहारिणी, पवित्र, यज्ञज्वाला, ज्ञानमार्गी उद्धवाला भक्तीचे महत्त्व पटविणारी राधा अशा वर्णनातून राधेची उदात्तता साकारली आहे. राधेचे रुक्मिणी व इतर कृष्णभार्या तसेच द्रौपदी यांच्याबरोबर असलेले प्रेमादराचे नाते प्रस्तुत काव्यातून साधार स्पष्ट केले आहे. 'भावभक्तीची परिसीमा, मांगल्याची मूर्ती, मोहतमाचा स्पर्श नसलेली भक्तिरसाची गंगोत्री, श्रीहरिची चिन्मय छाया' अशा शब्दांतून राधेची उदात्तता, राधा-कृष्ण यांच्यातील कामविहीन प्रेमभाव चित्रित केला आहे.

कृष्णसखा उद्धव व अर्जुन, कृष्णाचा बालमित्र सुदामा यांच्या कृष्णावरील सख्यभावाचे व निष्काम प्रेमाचे विलोभनीय दर्शन मनाला आनंद देणारे आहे. देवकीची वत्सलता, कंसाची दुष्टता, यशोदेचे वात्सल्य, कृष्णपत्नी रुक्मिणीचे जगताची वत्सल माता व परमेशाची शक्ती हे स्वरूप, कृष्णसखी द्रौपदीचा मानी स्वभाव व अनन्य कृष्णभक्ती, गोपींची उदात्त मधुराभक्ती, कृष्णभगिनी सुभद्रा व भ्राता बलराम इ. सर्व पात्रांची स्वभाववैशिष्ट्ये पात्रांचे वर्तन, त्यांचे वक्तव्य, त्यांचे विचार यांच्या वर्णनाद्वारे सहजपणे समोर येतात. सर्वच पात्रांच्या रूपवर्णनादी बाह्य तपशीलाला महत्त्व न देता त्यांच्या अंतर्यामी असणाऱ्या शाश्वत अशरीरी गुणदर्शनातून ती ती पात्रे जिवंत केली आहेत. काव्यातील दुय्यम व्यक्तिरेखा उदा. विकर्ण, कुब्जा, रुक्मिणीची सखी इत्यादी पात्रांना मिळालेल्या अल्प अवकाशातही समर्पक विशेषण व प्रतीकांच्या उपयोजनातून ती पात्रे सजीव करण्याची किमया कवींनी साधली आहे. महाकाव्यातील सर्वसामान्य स्त्रीवर्गाच्या स्वभावाचे, मनोवृत्तीचे, लकबींचे सूक्ष्म तपशिलाद्वारे केलेले चित्रण व स्त्री स्वभावावरील भाष्य कवींच्या सूक्ष्म निरीक्षणशक्तीचा प्रत्यय देते व काव्याच्या रसात्मकतेत भर टाकते. या विविध व्यक्तिचित्रणातून वाईटावर विजय मिळविणारी सत्प्रवृत्ती दर्शविली आहे.

या विविध व्यक्तिरेखांचे कवींनी काव्यातून घडविलेले दर्शन विस्तारभयास्तव समग्रतेने करणे शक्य नाही. कथानायक श्रीकृष्ण याचे व्यक्तिरेखाटन आपण थोडक्यात पाहू.

**महाकाव्याचा नायक श्रीकृष्ण याचे व्यक्तिरेखाटन :** प्रस्तुत महाकाव्यातील श्रीकृष्ण-वर्णन हे काव्यातील उदात्त वातावरण व भक्तिपूर्ण शांतरसाला अनुरूप अशा प्रतिमा, उपमानांतून सजीव झाले आहे. या महनीय व्यक्तिमत्त्वाचे पुत्र, भ्राता, पती, पिता, सखा, शिष्य, सद्गुरु अशा व्यक्तिगत नातेसंबंधांचे चित्रण हळुवारपणे प्रकटले आहे. श्रीकृष्णाच्या मनमोहक सौंदर्याचे वर्णन अनुप्रासादी अलंकारयुक्त शब्दांतून प्रत्ययकारी रीतीने साकार झाले आहे. महाकाव्यातील ३-५२, ४-३७,-३८, ७-३४ ते ३८, ८-५५, ९-१४३ ते १४६, १०-३२ ते ३७. ५-१४४ ते १४७, १८-१७२ ते १७५ या कवनातून साकारलेले रूप मुळातूनच वाचले पाहिजे. श्रीकृष्णाच्या प्रथम दर्शनाचे वर्णन पहा.

**कुंदरदन अरविंदवदन शतचंदमदनसम चारुतरा**
**पीतांबरधृत कंवरमाला अंबरकांती मुकुटधरा।**
**चतुर्भुजा भास्वरा गोजिरी प्रियंकरा जी भक्तांची**
**अशी देवकीचिया समोरी प्रगटे मूर्ती श्रीहरीची।।३-५२**

अशा सौंदर्याबरोबरच गुणसंपदेने लहानपणापासूनच कृष्णाने सर्वांचे मन आकर्षून घेतले होते.

अन्यायाविरुद्ध लढण्याचा त्याचा गुण बाललीलांपासून ते पांडवांना विजयी होण्यास साहाय्य करून धर्माधिष्ठित शासन व्यवस्था निर्माण करण्यासाठी झटणाऱ्या प्रौढ कृष्णापर्यंत जीवनातील सर्वच प्रसंगातून कवींनी अधोरेखित केला आहे. बालपणापासून श्रीकृष्णाचा नेतृत्वगुण व त्याची लोकप्रियता त्याचा पराक्रम हे गोवर्धन पूजनाचा संकल्प, दैत्यांचे परिपत्य, द्वारकेत स्थलांतर करण्याचा श्रीकृष्णाचा आदेश व त्याचे प्रजाजनांनी केलेले पालन, पांडवांना केलेले मार्गदर्शन व

भीष्मासारख्या ज्येष्ठाने राजसूयप्रसंगी अग्रपूजेचा श्रीकृष्णाचा दिलेला मान, सर्व राज्यांनी कृष्णाला कौरवांकडे जाऊन समेटाचा प्रयत्न करण्यासाठी केलेली विनंती अशा अनेक घटनांमधून श्रीकृष्णावरील सर्वांचा प्रगाढ विश्वास आणि गोकुळवासी, मथुरावासी, द्वारकानिवासी, पांडव या सर्वांमधील त्याच्या लोकप्रियतेचे दर्शन घडते. श्रीकृष्णाने त्याच्या जीवनातील सर्वच कार्य निर्भयतेने, अलिप्ततेने आणि नि:स्वार्थीपणाने केलेले आहे. श्रीकृष्णाचे चातुर्य, सावधानता व बुद्धिमत्ता कंसवध, महाभारतीय युद्धातील जयद्रथ, भीष्म, द्रोण यांच्या वधाची योजना अशा अनेक प्रसंगातून कवींनी स्पष्ट केली आहे. कृष्णाने प्रत्येक शत्रूचे मर्मस्थान जाणून त्यानुसार त्यांच्या संहारासाठी योजना आखल्या व दुर्जनसंहार घडवून आणला. उत्तरेच्या पुत्राला जिवंत करण्यासाठी कृष्णाने केलेल्या प्रतिज्ञेतून त्याची शीलसंपन्नता दिसून येते. कृष्णभार्या, द्रौपदी, सुभद्रा, कुंती, नरकासुराच्या कैदेतील स्त्रिया या सर्वांवरील संकटांच्या वेळी श्रीकृष्णाने त्यांना पाठिंबा देऊन संकटांचा परिहार केला आहे. श्रीकृष्ण अविकारी निश्चल होते. जीवनातील कोणत्याही प्रसंगी, त्यांची चित्तवृत्ती विचलित झालेली नाही. श्रीकृष्णाची राजनीती व तत्त्वज्ञान हे श्रीकृष्णाचे आचरण, त्याने वेळोवेळी केलेले मार्गदर्शन, त्यातील बोध व तत्त्वविचार, भगवद्गीता याद्वारे त्याने केलेले शाश्वत मार्गदर्शन तसेच प्रस्तुत महाकाव्यातील भीष्माप्रमाणे इतर पात्रांच्या मुखातून प्रकट केलेले तत्त्वज्ञान यातून साकल्याने स्थलकालातीत असे शाश्वत स्वरूपाचे विचारधन प्रकट करून 'जगद्गुरु' ही पदवी कृष्णाने सार्थ ठरविली आहे.

**प्रस्तुत महाकाव्यातील विचारवैभव :** केवळ बहिरंग लक्षणांच्या पूर्ततेने कोणतेही दीर्घकाव्य 'महाकाव्य' ठरत नाही. महाकाव्याचा खरा आत्मा त्यातील शाश्वत विचारधन हा आहे.

बालपणापासून श्रीकृष्णाचे आचरण पाहता त्यातून बालपणात खेळाचे व योग्य आहाराचे महत्त्व कळते. भक्तीचे खरे स्वरूप व निष्काम आणि समर्पणशील वृत्तीचे भक्तिमार्गातील महत्त्व, गोपींच्या भक्तींतून कळते. विद्वान, सज्जन, गुरुजन यांचा आदर करण्याचे महत्त्व कृष्णाचे गुरुकुलातील वर्तन, सुदेव ब्राह्मण तसेच सुदामा यांचा कृष्णाने केलेला सन्मान दर्शविते, कृष्णाने जरासंध व कालयवन यांच्याशी लढताना विजयासाठी घेतलेली माघार, समेटासाठी गेलेला असताना दुर्योधनाशी केलेले वर्तन, सांदिपनींच्या गुरुकुलातून आल्यानंतर मथुरेतील अधिकाऱ्यांना श्रीकृष्णाने केलेले मार्गदर्शन, राजसूययज्ञानंतर युधिष्ठिराच्या विनंतीवरून कृष्णाने त्याला केलेला राज्यकारभारा-विषयक सविस्तर उपदेश या सर्वांतून राजनीतीचे शाश्वत मार्गदर्शन शब्दबद्ध केले आहे. कृष्णाने अर्जुनाचा मोहनिरास करण्यासाठी गीतेच्या रूपाने केलेले शाश्वत मार्गदर्शन काव्याच्या सोळाव्या सर्गात आले आहे. त्यात तत्त्वज्ञानपर, आध्यात्मिक अशा अनेक तत्त्वांचे विवरण आहे. तसेच शोकाकुल उद्धवाला कृष्णाने केलेला उपदेश ब्रह्मविषयक ज्ञानाने परिपूर्ण आहे. त्या व्यतिरिक्त नंदराजाने इंद्रयाग प्रसंगी गोकुळवासीयांना उत्सवप्रसंगी श्रमविभागणी, सर्वांचा त्यातील सहभाग, कामातील निष्ठा या विषयी केलेले कथन आजही मार्गदर्शक ठरणारे आहे. यशोदेने कृष्णभार्यांना केलेला बोध संसारातील व्यवस्थापनासाठी आजच्या काळातही उपयोगी ठरू शकतो भीष्मांनी युधिष्ठिराला नृपनीतीची जी रहस्ये समजावून दिली आहेत ती आजच्या काळातही राजकारण्यांना आचरण्यास योग्य आहेत.

**मनुष्य म्हणुनी चुकावयासी। अवसर नाही लव नेत्यांसी।।**

१८-४१।।

यासारखा बोध आजही मौल्यवान ठरणारा आहे. कंसाने भरविलेल्या सभेतील सभासदांचे वर्णन (३-१२६-१२७) कंसाच्या राज्यातील अधिकाऱ्यांचे वर्णन आजच्या सामाजिक व राजकीय परिस्थितीचे स्मरण करून देतो.

पुराणकालीन कथेला स्वकालोचित परिमाण देणे हे महाकवींचे अपेक्षित कार्य आहे. चिंतनशील आणि समाजहितैषी कवी स्वकालीन समस्या व त्यावरील उपाय यांचे प्रकटन कौशल्याने पौराणिक कथेतून करत असतो. प्रस्तुत महाकाव्याद्वारेही शासक कसा असावा, त्याने प्रजाहितदक्षता कशी बाळगावी, त्याचे वर्तन कसे असावे या विषयीचे आजच्या काळातही उपयुक्त ठरणारे मार्गदर्शन राजनीतीसाठी मोलाचे ठरणारे आहे.

**महाकाव्यातील कल्पनावैभव :** ललित्यपूर्ण सौंदर्याने नटलेल्या मनोहर कल्पकतेने परिपूर्ण अशी शब्दरचना प्रस्तुत महाकाव्यास माधुर्य व मंगलता प्राप्त करून देते. क्षीरसागराचे वर्णन करताना त्याचा धवलिमा कसा आहे हे सांगताना 'पतिव्रतेची शील संपदा, आद्यकवीची उज्वल कीर्ती आणि शिवाचे मनोहर हास्य हे जर चंद्रकिरणांनी वितळविले, ते मोत्याच्या पात्रात घेऊन हंसपिसांनी मंथन केले तर त्यावर जे नवनीत येईल तसा क्षीरसागराचा धवलिमा सुंदर आहे. (१-७१-७२) असे वर्णन आले आहे. श्रीकृष्णाच्या मुरली वादनातील अलौकिकतेचा प्रत्यय आणून देण्यासाठी कवी वर्णन करतात, 'योगामधील सकल सिद्धी, उषेची घरची वर्णसमृद्धी, हिमालयाचे सौंदर्य तसे वेणूनादाचे सौंदर्य आहे.' सखीसह कमलतंतू खाताना राजहंसांचा अभिनव कलरव, आम्रमोहर आल्यानंतरचे कोकिळेचे कूजन, अरुणोदय समयीच्या वाऱ्याने होणारी पानांची सळसळ, चंद्राने कर ओढल्यानंतर जललहरींचे भणित, मेघनिनादाची गंभीरता, भ्रमराची प्रभात संध्याराग, मोहिता अशी गोड आर्तता या सर्व मधुरवांची गोडी एकवटली तरी ती हरीच्या वेणुरवाशी तुलना करता थोडीच वाटेल. (७-९ ते १३) या मुरलीरवाच्या माधुर्याची कल्पना कोणाला येईल हे सांगणाऱ्या शब्दांतूनही कवींचा कल्पनाविलास तितकाच माधुर्यपूर्ण आहे. (७-१४ ते १८) शब्दांतील ऐंद्रिय प्रतिमासृष्टीतून अलौकिकाचा प्रत्यय घडविणारी कवींची कल्पनाशक्ती अशाच रमणीयतेने काव्यात अनेक ठिकाणी मोहून टाकते.

**श्रीकृष्ण कथामृत या महाकाव्यातील अलंकारसृष्टी :** प्रस्तुत महाकाव्यातील वर्णनात अनुप्रास, यमक, श्लेष यांच्यासारखे शब्दालंकार सहज साधले आहेत. त्याचप्रमाणे कथाभागातील रचनेतील अर्थाला शोभा आणून देणारे उपमा, उत्प्रेक्षा, रूपक, दृष्टांत अशा अर्थालंकारांनी काव्याचे सौंदर्य वाढले आहे. विस्तार मर्यादेमुळे त्यांची

उदाहरणे येथे देणे कठीण आहे. तरी या अलंकारसृष्टीत येणारी विविध क्षेत्रातील उपमाने, प्रतीके व प्रतिमा यांचा विचार करु.

कंसाच्या रथाला जोडलेले सुंदर दहा अश्व म्हणजे जणू वेदार्थाला जोडलेले दशग्रंथ (२-२६), हरीबरोबरील गाई म्हणजे जणू प्रणवासह वेदऋचा (५-३२), अशी उपमाने वेद, उपनिषदे, पुराणे वा संस्कृत वाङ्मयाच्या व्यासंगातून प्रकटणारे श्रुतयोजन दर्शविणारी आहे. अनेक पंक्तींतील शब्दांवरील ज्ञानेश्वरांच्या शब्दकलेचा प्रभाव जाणवतो. उदा. सुंदरता ये सौंदर्यासी मधुर होत लावण्य। मोहकताची मोहित झाली उपमा नुरली अन्य।। (७-३८). साहित्यशास्त्र, नृत्य, गायन, चित्रकला आदी कलांचे संदर्भ विविध उपमानांतून दिसतात. उदा. रासक्रीडेत हरीभोवती नाचणाऱ्या गोपी म्हणजे छंदाभोवती जणू बहु चाली (७-८९) किंवा रविकिरणांचे मेघातून घडणारे दर्शन कवींना चित्रकाराच्या हातातील तबकात खोचलेल्या कुंचल्याची आठवण करून देतात. (१२-२१), खगोलशास्त्र (१८-७८) व ज्योतिषशास्त्राचे (१०-१०३) संदर्भ येऊन जातात. संस्कृत वाङ्मयातील चंद्रकांत मणी, चिंतामणी, शीलाचा व कीर्तीचा धवल वर्ण यासारख्या काव्यसंकेताचे उपयोजन आहे. कौटुंबिक जीवनातील अनेक संदर्भातून कधी वत्सलता तर कधी नर्मशृंगाराचेही आविष्करण होते. प्रस्तुत महाकाव्याचे कर्ते लौकिक जीवनात वैद्य होते. त्यामुळे 'पारद स्थिर होण्यासाठी औषधी लागतात. त्याप्रमाणे चित्ताच्या स्थिरतेसाठी कृष्णकथा गावी लागते. (१-४१) असे अनेक वैद्यकीय संदर्भ स्वाभाविकपणे येतात. विविध स्थळी अलंकारातील उपमाने ही वेदऋचा, हिमालय, गंगा, ध्यानरता, मुनी वृत्ती, हिरण्यगर्भातून होणारा ओंकाराचा उदय अशी उदम्यतेने परिपूर्ण आहेत. अशा उपमानांचे प्रस्तुत काव्याच्या भव्य, उदात्त, शांत व भक्तीपूर्ण वातावरणाला साकार करण्यात महत्त्वाचे योगदान आहे. पण त्यातील नाना रसांच्या आविष्करणाने काव्य परिणामकारक झाले आहे.

**प्रस्तुत महाकाव्यातील रसाविष्कार :** रस हा काव्याचा आत्मा आहे. प्रस्तुत काव्यातील प्रसंग वर्णनातील उत्कटता, वातावरण निर्मिती करणारी उचित शब्दयोजना यामुळे वाचक किंवा श्रोता भावनांची अनुभूती घेत असतो. स्वाभाविकच त्या त्या वेळी त्या त्या भावना, रस आविष्कृत होतात प्रस्तुत काव्यातील प्रमुख रस शांत व भक्ती मुख्यत्वाने सर्ग क्र. १, ७, ११, १३, १६ व १८ यामधून भक्तिरसाची अनुभूती येते. संपूर्ण महाकाव्यातील उदात्त अशी प्रतीके, उपमाने व प्रतिमा यामुळे मनाला शांती लाभते. त्याचबरोबर करुण, रौद्र, हास्य, वीर, शृंगार, भयानक, अद्‌भुत, बीभत्स अशा नवरसांचा परिपोष प्रस्तुत महाकाव्यात झालेला आहे. कोठेही शब्दांची ओढाताण करावी न लागता रसालंकारांचे उपयोजन स्वाभाविकतेने साधले आहे. या स्वाभाविकतेमुळे काव्यशरीराला रसालंकारांचे ओझे झालेले नाही. ग्रंथकर्त्यांनी अलंकारांचा भडीमार करण्याचा मोह टाळला आहे.' असा अभिप्राय प्रस्तावनेत गुरुदेव रानडे यांनीही दिला आहे. यात पांडित्य व विद्वत्ता यांच्या प्रदर्शनाचा सोस जराही नाही. अध्यात्म व आशय यालाच प्राधान्य दिले आहे.

'श्रीकृष्ण कथामृत' हे नितांत सुंदर नावाप्रमाणे मधुर असे परिपूर्ण विदग्ध महाकाव्य आहे. परंतु ते साहित्य विश्वातील फारच थोड्या समीक्षक, वाचक, साहित्यिक गटापर्यंत पोहोचलेले आहे हे वास्तव नाकारता येत नाही. या काव्याच्या पाच आवृत्त्या निघाल्या आहेत. तरीही दाते यांच्या ग्रंथसूचीत काव्याची नोंद 'खंडकाव्य' म्हणून केली असून प्रस्तुत काव्याचे कर्तेसंतकवी गणूदास २ हे आहेत असे त्या ठिकाणी नमूद केले आहे. डॉ. प्र. न. जोशी यांच्या 'मराठी साहित्यातील मधुराभक्ती' या ग्रंथातही 'श्रीकृष्ण कथामृत' हे काव्य संतकवी दासगणू यांनी लिहिले आहे असा उल्लेख आढळला. डॉ. द. भि. कुलकर्णी यांनी त्यांच्या 'महाकाव्यः स्वरूप व समीक्षा' या ग्रंथात महाकाव्यांची सूची दिलेली आहे. यातही प्रस्तुत ग्रंथाची नोंद आढळली नाही. त्यामुळे अनंत दामोदर आठवले विरचित 'श्रीकृष्ण कथामृत' हे महाकाव्य समाजासमोर विशेषतः विद्यार्थ्यांसमोर येण्याची अत्यंत आवश्यकता आहे असे प्रकर्षाने वाटते. आजचा काळ अस्थैर्य, अशांती, अनिश्चितता यांचे प्राबल्य असणारा व जीवनमूल्यांच्या अवमूल्यनाचा आहे. प्रस्तुत महाकाव्याच्या अभ्यासाने व्यक्तिगत पातळीवर मनःशांती आणि सामाजिक पातळीवर स्थैर्य प्राप्त होऊ शकते. हे काव्य सद्यस्थितीतील समस्यांवर मार्गदर्शन करणारे आहे. आजही प्रस्तुत महाकाव्याचा अभ्यास राजकीय नेते सूक्ष्मतेने करतील तर प्रजेचे कल्याण आणि राष्ट्रसंरक्षण कसे करावे याचे धडे श्रीकृष्ण चरित्रातून त्यांना योग्य रीतीने मिळतील.

'श्रीकृष्ण कथामृत' या महाकाव्याच्या रचनेमुळे तत्कालीन आत्मनिष्ठ काव्यपरंपरेशी समांतर अशा भक्तिमार्गी काव्याची काहीशी खंडित झालेली परंपरा पुनरुज्जीवित करण्याचे कार्य घडले आहे. पौराणिक कथेमधून घेतलेला विषय, विविध वृत्ताबद्दल, नवरस व अलंकार यांनी युक्त रचना, काव्यातील मंत्रमयता, प्रौढ गंभीर भाषा, काव्यातील व्युत्पत्ती, त्यातील विचारवैभव अशी पंडिती काव्य-परंपरेतील लक्षणे प्रस्तुत महाकाव्यात आढळतात. त्याचबरोबर भक्तिरसाने परिपूर्ण रचना, काव्यातील प्रासादिकता व माधुर्य, त्यातून प्रकटणारी नम्रता व ईश्वरशरणता, सद्‌गुरुनिष्ठा, त्यातील शांत रसाचे अधिक्य, नीती व धर्म आणि तत्त्वज्ञान यांचा काव्यातून होणारा बोध यामुळे हे महाकाव्य संतकाव्याशी जवळीक साधते.

प्रस्तुत महाकाव्य रचनेच्या काळी सुप्त असलेले अप्पांमधील संतत्व पुढील काळातील त्यांच्या आध्यात्मिक विकासानंतर 'परमहंस स्वामी श्री वरदानंद भारती' या रूपात प्रकट झालेले आहे. त्यामुळे हे महाकाव्य पंडित काव्य व संत काव्य यांच्या परंपरा जोडणारे संत काव्यच ठरते.

प. पू. अप्पांच्या चरणी सादर अर्पण.

**सौ. सुमेधा आठवले**
२ अ, यशवंत अपार्टमेंटस, मेन रोड,
रोहे जि. रायगड, ४०२१०
फोन : ०२१९४-२३३४७९,
मो. ९४२१२५४०३७

•••



# ज्ञानेश्वरीचा अनुभवसिद्ध आविष्कार अनुवाद ज्ञानेश्वरी

**चैतन्य भानुदास महाराज देगलूरकर**

तत्त्वज्ञान विषयांत एम.ए. स.प.महाविद्यालय, पुणे येथे काही दिवस व्याख्याता म्हणून नोकरी. धुंडामहाराज देगलूरकर यांचे नातू. घराण्याच्या परंपरेनुसार सांप्रदायिक प्रवचन, कीर्तनाच्या माध्यमातून समाज प्रबोधन, धुंडामहाराजांच्या विवेचनावर आधारित ज्ञानेश्वरीच्या त्रिखंडात्मक ग्रंथाचे संपादनाचे कार्य सुरू. एका खंडाचे प्रकाशन झाले. ऋग्वेदभूषण आदि पुरस्कारांनी सन्मानित.

श्रीमद्‌भगवद्‌गीता भारतीय विचारपरंपरेमध्ये स्वत:चे असे एक विशेष स्थान बाळगून आहे. भगवान श्रीकृष्णांनी अर्जुनाला केलेल्या उपदेशामध्ये मानवी जीवनाच्या परिपूर्णतेची सर्व सूत्रे समाविष्ट झालेली आहेत. म्हणूनच गीतेचे वर्णन करताना श्रीवैशंपायनमुनी म्हणतात,

**गीता सुगीता कर्तव्या: किमन्यै: शास्त्रसंग्रहै: ।**
**या स्वयं पद्मनाभस्य मुखपद्माद्विनिसृता: ।।**

अर्थ असा की, एका गीतेचे व्यवस्थित, सांगोपांग चिंतन केले तर अन्य शास्त्रांचा संग्रह करण्याचे काय कारण? कारण ही गीता स्वत: भगवंताच्या मुखकमलातून प्रकटलेली आहे. ज्ञान, कर्म, योग, उपासना या मार्गांचा अधिकारानुरूप विचार सांगून त्या त्या साधनेचे, त्यातून प्राप्त होणाऱ्या साध्याचे स्वरूप स्पष्टपणे मांडले आहे. भगवत्प्राप्ती हे मानवी जीवनाचे ध्येय सांगून त्यासाठी माणसाने स्वधर्मप्रवृत्त झाले पाहिजे हा गीतेचा आग्रह आहे.

कुरुक्षेत्रासारखी युद्धभूमी, युद्धाचे वातावरण, शत्रूरूपाने समोर उभे असलेले नातलग, बंधू, श्वशुर, वंदनीय व्यक्तिमत्त्वे, गुरू यांच्या समोर उभा असणारा अर्जुन, त्यांच्या मनातील कर्तव्याकर्तव्याची संदिग्धता, चुकीच्या कल्पनांनी ग्रस्त झालेली बुद्धी आणि मर्यादित वेळेमध्ये अर्जुनाला एका निर्णायक, निश्चयात्मक भूमिकेवर आणण्यासाठी भगवंतांनी केलेले युक्तिवाद, सांगितलेले सिद्धांत ही सर्व परिस्थिती ध्यानात घेतली तर हा उपदेश केवळ आणि केवळ अर्जुनासाठी नसून 'अर्जुनाचे पंगतीत' बसणाऱ्या सर्वांसाठीच आहे हे लक्षात येते. यावर तर श्रीज्ञानेश्वरमहाराज स्पष्टच म्हणतात,

**अर्जुनाचे नि व्याजे । गीता प्रकाशूनि श्रीराजे ।**
**संसारायेवढे थोर ओझे । फेडिले जगाचे ।।**

कारण बारकाईने पाहिले तर श्रीतुकाराममहाराज म्हणतात, त्याप्रमाणे-

**रात्रीदिवस आम्हा युद्धाचा प्रसंग । अंतर्बाह्य जग आणि मन ।।**

अशी सर्व जीवाची अवस्था असते. आयुष्याची अस्थिरता, निर्णयाची संदिग्धता, संशयाचे भूत, या सर्वाचे कारण अज्ञान, तरीही ज्ञानाभिमानिता हेच तर जीवाचे लक्षण आहे. म्हणून हा गीतेचा उपदेश सर्वांनाच लागू पडतो.

परंतु तरीही हा उपदेश, त्याचे प्रयोजन आणि फलश्रुती यांचे निर्विवादत्व सोडून त्यातील तपशीलावर अनेकांनी आपापली मते टीकांद्वारे व्यक्त केली आहेत. श्रीमद्‌भगवद्‌गीतेवर अनेकानेक टीका आहेत. त्यामध्ये मतमतांतरे आहेत. भिन्न भाषा, भिन्न विचार एकाच गीतेतून अनेकांनी व्यक्त केले आहेत.

**'नहि ते मुनयो भ्रान्ता: सर्वज्ञत्वात्तेषाम् ।'** या श्री मधुसुदन सरस्वतींच्या मतानुसार सर्वांच्याच मतांना त्यांच्या अनुयायांमध्ये आणि समाजामध्ये आदराचे आणि श्रद्धेचे स्थान आहे, मान्यता आहे. मराठी भाषेपुरते बोलायचे झाल्यास मराठी भाषेमध्ये श्रीज्ञानेश्वरमहाराजांची ज्ञानेश्वरी ही सर्वांग सुंदर टीका सर्वमान्य आहे. केवळ एवढेच नाही तर मराठी वाङ्मयाची ती अभिषिक्त सम्राज्ञी आहे. तत्कालीन आणि तदुत्तरकालीन संतांनी केलेले श्रीज्ञानेश्वरीचे वर्णन पाहिले तर श्रीज्ञानेश्वरीची थोरवी लक्षात येईल.

प्राकृत, संस्कृत प्रचुर मराठी, बोली मराठी आणि उत्तरकालामध्ये बदलत जाणारे मराठीचे स्वरूप लक्षात घेता श्रीज्ञानेश्वरीतील ओवीबद्ध मराठी (शके बाराशते बारोत्तरे मधील) आता अवघड वाटू लागली आहे. त्यामुळे नंतरच्या काळात श्रीज्ञानेश्वरीचा अनुवाद सरळ मराठीमध्ये करण्याची गरज वाटू लागली. कालौघाच्या आवश्यकतेची परिपूर्ती करणारा अलिकडच्या काळातील एक सहजसुंदर, सोपा, प्रेमळ आविष्कार म्हणजे नारायणस्वरूप स्वामी वरदानंदभारतींनी (पूर्वाश्रमीचे पू.प्राचार्य अनंतराव आठवले) केलेली अनुवाद ज्ञानेश्वरी! पू.ती.आप्पांची ही अनुवाद ज्ञानेश्वरी म्हणजे श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या ज्ञानेश्वरीची समओवी आहे. ओवी छंदातून सोपी केलेली ज्ञानेश्वरी म्हणजेच अनुवाद ज्ञानेश्वरी होय.

पू.स्वामीजींची ही ज्ञानेश्वरी म्हणजे खरोखरीच सहज, सोपी आहे. श्रीज्ञानेश्वरीतील तात्त्विक चिंतन सांगणाऱ्या अनेक ओव्यांचे दाखले या संदर्भात देता येणे शक्य आहे. हे सांगण्याचा हेतू असा की, वेदांताच्या परिभाषेचा विचार करता पारिभाषिक शब्द बदलणे बऱ्याच वेळा विषयानुषंगाने शक्य नसते. आणि संज्ञा स्पष्ट झाल्याशिवाय संकल्पना स्पष्ट होत नसते. पण अनुवाद ज्ञानेश्वरीमध्ये तात्त्विक विषयही नवागतालाही सोपा, सुलभ वाटावा अशा भाषेमध्ये मांडला आहे. उदाहरण सांगावयाचे झाल्यास आठव्या अध्यायामध्ये 'परस्तस्मात्तु

भावोऽन्योऽव्यक्तोव्यक्तात्सनातन:।' या श्लोकावरील भाष्यात व्यक्ताव्यक्ताचे अधिष्ठान परब्रह्म आहे. आणि अधिष्ठान भूमिकेतून व्यक्ताव्यक्त सापेक्ष असल्यामुळे अधिष्ठानच सत्य आहे. व्यक्ताव्यक्त नाही. हा कठिण विषय स्पष्ट करताना श्रीज्ञानेश्वर महाराज दृष्टांताने सांगतात,

**तेवि आकारलोपासरिसे । जगाचे जगपणभ्रंशे ।**
**परि जेथे जाहाले ते जैसे । तैसेचि असे ।।**
**तै तया नाव सहज अव्यक्त । आणि आकारावेळी तेचि व्यक्त ।**
**हे एकास्तव एक सूचित । एऱ्हवी दोन्ही नाही ।।**
**जैसे आटलिया रूपे । आटलेपण ते खोटी म्हणिपे ।**
**पुढती ते घनाकारू हारपे । जे वेळी अलंकार होती ।।**

विषयाचे गांभीर्य, मुलभूत संज्ञा, संकल्पनांची जाणीव नसेल तर हा विषय समजण्यास कठीण आहे, परंतु श्रीस्वामाजींनी या ओव्यांचा अनुवाद करताना विषय सोपा केला आहे. ते म्हणतात,

**तेवी आकाराचा लोपता भाग । जगपणास मुके जग ।**
**परी जेथून ते धरी अंग । जसेच्या तसे ते राही ।।**
**म्हणून त्या म्हणती अव्यक्त । आणि आकारा येता तेचि व्यक्त ।**
**ऐसे हे परस्परसंबंधित । एरवी तरी दोन्ही नसे ।।**
**अलंकार जेव्हा आटती । तेव्हा त्यासी चीप म्हणती ।**
**पुन्हा दागिने झाल्यावरती । चीपपणा लोपे जसा ।।**

अशी अनेक स्थळे दाखला म्हणून देता येतील. अठराव्या अध्यायाचे नमन हे समजण्यास काय पण उच्चारण्यासही कठिण आहे. येथील एक उदाहरण देतो. श्रीसद्‌गुरूंना नमन करताना श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात,

**जय जयदेव विशुद्ध । विदुद्योद्यानद्विरद ।**
**शमदममदनमदभेद । दयार्णव ।।**

येथील ओव्यांसाठी मात्र पू.स्वामीजींनी अधिक (दोन) ओव्या खर्ची घातल्या आहेत. पण सहजता आणि सुलभता पहा–

**अत्यंत शुद्ध रूप आपुले (विशुद्ध)**
**ज्ञान जे का जाणवले । ते जणू उद्याम, तया भलो । नाशण्या आह । गज तुम्ही ।। (विदुद्योद्यानद्विरद) तुम्ही कामाची उन्मत्तता। शमदमाने निस्तारिता । (शमदममदनमदभेद), दया सागर (दयार्णव), हे श्रीमंता (देव), सतत असो तुमचा जय ।। (जय जय)**

येथे मुद्दामच कंसामध्ये मूळ शब्द दिला आहे. असे अनेक दाखले देता येतील.

या अनुवादामध्ये आणखी एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे की, हा अनुवाद केवळ अर्थानुवाद नाही. कारण एखाद्या शब्दाला समानार्थी शब्द सापडतात. त्यानुसार त्या शब्दाऐवजी एखादा समानार्थी शब्द ठेवून व्याकरणाच्या यमकादि मर्यादा सांभाळून ओवी निर्माण करणे त्यामानाने सोपे आहे. परंतु येथे अर्थाबरोबर भावाचाही विचार आहे. हा भावानुवादही आहेच! शब्दासोबत भाव बदलला तर तो अनुवाद रहाणार नाही. शब्दाचा सोपेपणा, अर्थाची सुलभता आणि भावाची एकवाक्यता म्हणजे पू.स्वामीजींची अनुवाद ज्ञानेश्वरी होय! श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी जसा भगवंताच्या भावाला शब्दरूप देऊन प्रकट केले तसे पू.स्वामीजींनी श्रीज्ञानेश्वरीतील श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या भावाला कुठेही धक्का लागू दिला नाही. श्रीज्ञानेश्वरीच्या निर्मितीमागील तळमळ, व्यापक हिताचे चिंतन हे सर्व येथेही प्रकट झाले आहे आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी जसा नम्र भाव वारंवार प्रकट केला आहे तोच नम्र भाव येथेही प्रत्ययाला येईल. अनुवाद ज्ञानेश्वरीचा उपसंहार वाचला तर ते आपल्या ध्यानात येईल. नम्रता ही हिमालयासारखी उत्तुंग असते याचा प्रत्यय येतो.

श्रीज्ञानेश्वरमहाराजांनी गीतेवर टीका सांगावी कारण त्याचा त्यांना अनुभव आहे. तसा श्रीज्ञानेश्वरीमधून प्रकटलेल्या प्रमेयांचा अनुभव घेऊनच अनुवाद ज्ञानेश्वरी प्रकट झाली आहे. म्हणून तसे पाहिले तर ही 'अनुवाद ज्ञानेश्वरी' नसून 'अनुभव ज्ञानेश्वरी' आहे असे म्हणावे वाटते. हा अनुवाद वाचताना अनेक ओव्यांतून पू.स्वामीजींचे स्मरण होते.

त्यांचे चरणारविंदी ही भावांजुळी समर्पित करतो!

**– चैतन्य भानुदास महाराज देगलूरकर**
४०१ श्रीयश अपार्टमेंटस, उजवी भुसारी कॉलनी,
पौड रोड, पुणे ४११०३८
फोन : ९८२२४३०२२१

•••



# मनुस्मृति-भूमिका - एक आलोचन

**पं. वेदान्तकोविद प्रमोदशास्त्री कुलकर्णी**

प्रधान अध्यापक, आचार्य वेदशास्त्र पाठशाला परभणी, एम. ए. संस्कृत - वेदांताचार्य
श्री मज्जगद्गुरु शंकराचार्य शकरपूर मठ - आस्थान विद्वान, करवीर पीठ - पुरस्कृत विद्वान
प्रवचनकार, व्याख्याते, संस्कृत पंडित

प. पू. स्वामी वरदानंद भारती (पूर्वाश्रमीचे अ. दा. आठवले) यांनी आपल्या तप:पूत परमपवित्र जीवनात अनेक ग्रंथनिर्मिती केली. व्याख्याने दिली, प्रवचने, कीर्तने करून समाजात गढूळ झालेले वातावरण पवित्र, मंगलमय करण्याचे व्रत आजीवन सांभाळले. त्यासाठी भारतीय संस्कृतीप्रमाणे स्वत: चारही आश्रम पूर्ण केले व अंती 'योगेनान्ते तनुत्यजाम्' या कवि कुलगुरू कालिदास यांच्या उक्तीप्रमाणे समाधीने देह त्याग करून चैत्यनता संपादन केली. या सर्व कार्यात कळस म्हणून जर कोणत्या कामाचा उल्लेख करावा लागेल तर ते म्हणजे मनुस्मृती या ग्रंथावरचे लिखाण होय.

आधुनिक काळात २१ व्या शतकात वावरताना मनुस्मृती हा शब्द उच्चारणे म्हणजे एक मोठे घोर पातक करणे होय अशी परिस्थिती सध्या आहे. पण समाजाचे सर्वतोपरी कल्याण व्हावे, त्यात जशी आधिभौतिकता आहे तसेच पारलौकिकता पण आहे. या विचाराने प्रवृत्त झालेले खरे तत्त्वचिंतक समाजाचा ओघ कुठे आहे हे न पाहता आपले खरे निर्णय सांगत असतात व त्यांचे ते निर्णय मान्य करणे हेच समाजाच्या हिताचे असते. प. पू. स्वामीजी अशाच तत्त्वचिंतकापैकी एक होते. म्हणूनच त्यांनी या ग्रंथावर आपली समर्थ लेखणी समर्थपणे चालविली.

मनुस्मृतीबद्दल अनेक अपसमज आहेत. काही पूर्णपणे तत्त्व न कळल्यामुळे झाले आहेत तर काही मुद्दामहून पसरविण्यात आले आहेत. धर्मशास्त्र म्हणजे मनुस्मृती अशीच परंपरागत धारणा आहे. अनेक स्मृतिग्रंथ जरी निर्माण झालेले असले तरी मनुवचन हेच सर्वात प्रमाणभूत आहे. कारण वेदाने स्पष्टच म्हटले आहे की, 'यद्वैमनुरवदत् तद् भेषजम् (तै. सं.) म्हणजे मनु जे सांगतो ते औषधच आहे. हितकर आहे आणि याचमुळे मनूचा व इतर स्मृतिकारांचा विरोध जर झाला तर तिथे मनुस्मृतीशी विरोध होणार नाही असा त्या स्मृतिकाराच्या वचनांचा अर्थ लावतात. अशीच परंपरा आहे.

प. पू. अप्पांनी मनुस्मृतीचे नुसतेच भाषांतर केले नाही तर त्यावर भाष्यही केले. आणि आपल्या भूमिकेचा परिचय सर्वांना व्हावा यासाठी त्यांनी प्रदीर्घ जवळजवळ १०० पृष्ठांची प्रस्तावना पण जोडलेली आहे. त्यात त्यांनी आजच्या काळातही मनुस्मृती कशी योग्य आहे, तिचे पालन केल्यास कशाप्रकारे देशाचे, समाजाचे हित होईल या विषयाचा ऊहापोह केला आहेच. त्याबरोबर चातुर्वर्ण्या व्यवस्था, स्पृश्यास्पृश्यता, स्त्री मुक्ती, स्त्री रक्षण याचाही विचार अत्यंत तर्कशुद्ध पद्धतीने मांडला आहे. हे वाचल्यानंतर आधुनिक विचारवंतही निश्चितच प्रभावी होतील यात मला तरी यत्किंचित्‌ही संशय नाही.

पाश्चात्य विचारांनी प्रभावित झाल्याने व त्यांच्या ऐहिक प्रगतीनेच डोळे दिपलेल्या वेदबाह्य, आधुनिक विचारकांना चातुर्वर्ण्य-व्यवस्था ही अत्यंत दोषास्पद वाटते. एवढेच नाही तर ती शोषण-व्यवस्था वाटते. तसाच सध्या प्रचार आहे. जाता येता यासाठीच जुने विचार कुणी सांगितले की त्याला मनुवादी म्हणून हिणविण्यात येते. पण ही कृती अत्यंत घातक आहे. त्यासाठी प. पू. स्वामी चातुर्वर्ण्य व्यवस्थेसंदर्भात आपले मत स्पष्टपणे सांगतात की, चातुर्वर्ण्य व्यवस्था ही कमीतकमी दोषास्पद आहे. कुठल्याही देशात अथवा समान व्यवस्थेत चार विभाग अथवा चार वर्ग असतातच. ज्ञानदान करणारा, रक्षक, व्यापार करणारा, व सेवक अशी त्याची विभागणी होय. यालाच आपल्याकडे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र अशी संज्ञा आहे. आपल्याकडे ही व्यवस्था जन्माधिष्ठित मांडली आहे एवढेच पण त्यातही ती तसेच मानणे हेच योग्य होय. यानेच समाधान होते.

चातुर्वर्ण्य पद्धतीत ब्राह्मणाला मान मिळतो म्हणून जर कोणाला वैषम्य वाटत असेल तर पू. स्वामीजी म्हणतात की, 'ज्याने आपले ब्राह्मण्य टिकवलेले नाही त्यांना मान देण्याचे काहीच कारण नाही. त्याला शूद्रासारखेच लेखावे असे सांगितले आहे. ब्राह्मणाने मात्र सन्मानाची अपेक्षा करू नये. राजाचा आश्रय मागू नये. त्याच्यावर अन्याय झाला तरी त्याने न्यायालयात जाऊ नये असाही दंडक मनूने सांगितला आहे. आपण हे सगळे व्यापक प्रमाणात विचारात घेत नाही. आणि मग मनुस्मृती जाळायला निघतो.'

या देशात शूद्रांना अज्ञानात ठेवले असा एक आक्षेप ऐकण्यात येतो. त्यालाही स्वामीजींनी उत्तर दिले आहे. स्वामीजी म्हणतात - 'शूद्राने वेदाध्ययन करू नये असे म्हटले असले तरी त्याला ज्ञानच मिळू नये अशासाठी ही व्यवस्था होती हे म्हणणे योग्य नाही. इतिहास पुराणे - महाभारत - रामायणासारखे ग्रंथ यांच्या अध्ययनाने शूद्रालाही ज्ञान मिळविण्याचा मार्ग मोकळा होता. हे झाले आध्यात्मिक ज्ञानाबाबत पण राजीव दीक्षित यांनी आपल्या व्याख्यानात इंग्रजांनी केलेल्या परीक्षणानुसार १८५७ नंतर केवळ मद्रास प्रांतातच सुतारकी, लोहारकी

वगैरे शिकविणारी महाविद्यालये जवळ जवळ १५ होती असे सांगितले आहे. त्यामुळे शूद्रांना शिकविलेच नाही, त्यांना अज्ञानातच ठेवले हे म्हणणे म्हणजे एक प्रकारचा केवळ अपप्रचार आहे. हा अपप्रचार इंग्रजांनी मुद्दामहून केला. कारण त्यांना इथली समाज व्यवस्था मोडल्याशिवाय राज्य करता येणे शक्य नव्हते. त्यासाठी त्यांनी विद्वान लोक विकत घेतले. त्यात परदेशी होते तसेच एतद्देशीय होते. आणि या सगळ्याचा परिपाक म्हणजे मनुस्मृती बद्दलची आजची घृणा होय.'

शूद्रांच्या बाबतीतला सेवा हा शब्द बोचतो असे जरी असले तरी पूज्य स्वामीजी याबाबतीत असे म्हणतात की आजच्या श्रेष्ठ अधिकार पदावर ज्यांची नियुक्ती केली जाते त्यांना सेवक हीच पदवी (सर्व्हंट) असते हेही लक्षात घ्यावे.

इतर धर्मीय आपल्या धर्मग्रंथांचा विचार करतात, अभ्यास करतात पण हिंदू धर्मीयच तसे करत नाहीत, ही खेदाची गोष्ट आहे आणि त्यामुळेच आजच्या ब्राह्मण समाजातील युवकांनाही हाच प्रचार बरोबर आहे असे वाटते हे दुर्दैव. अमेरीकेत न्यायालयाच्या बाहेर मनूचा पुतळा आहे असे ऐकतो. ते जर खरे असेल तर आपण किती करंटे, अज्ञानी आहोत हे लक्षात घेतले तर बरे होईल. पाश्चात्य जर्मन विचारक नित्शे तर असे सांगत असे की बायबल फेका व मनुस्मृती डोक्यावर घ्या. पण हा विचार भारतात पाहायला मिळत नाही. यापेक्षा कमनशिबीपणा तो कोणता?

अध्ययनाबाबत विद्यार्थ्यांचे जीवन कसे असावे? गुरुशिष्य संबंध, आश्रम व्यवस्था, पिता-पुत्र, पति-पत्नी, बहीण-भाऊ, भाऊ - भाऊ नातेसंबंध या सर्वांची खरोखरच परिपूर्ण व्यवस्था मनुस्मृतीत सांगितली आहे. ती एकदा तरी डोळसपणे पाहणे गरजेचे आहे. आणि म्हणूनच 'बुडते हे जन देखवेना डोळा। म्हणूनी कळवळा येतसे।' हे संत वचन दृष्टीसमोर ठेवून प. पू. स्वामींनी (अप्पांनी) हे शिवधनुष्य पेलले.

स्त्रियांसंबंधीचीही मनूची भूमिका प. पू. स्वामींनी अत्यंत स्पष्टपणे निर्भीड आणि तितक्याच शास्त्रीय पद्धतीने मांडलेली आहे. 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' या वाक्याचा अर्थ स्त्री संरक्षण विरहीत असू नये असा आहे. कारण त्या श्लोकात रक्षति हे क्रियापद प्रथमत: आले आहे. असा संपूर्ण श्लोकाचा अन्वयार्थ स्वामीजींनी सांगितलेला आहे. रांधा वाढा, उष्टी काढा, यातच स्त्रीचे आयुष्य जाते असे म्हणणाऱ्यांना विमान परिचारिकेचे उदाहरण (एअर होस्टेस) डोळ्यात झणझणीत अंजन घालणारे आहे. जाहिरातीत सर्वत्र आज जे स्त्री देहाचे ओंगळ प्रदर्शन होते यात स्त्रीही उपभोग्य वस्तू आहे हाच समज दृढमूल होत नाही का? असा खणखणीत सवालही स्वामीजी करतात.

स्त्रीच्या आर्थिकतेच्या बाबतीतही त्यांची भूमिका अत्यंत स्पष्ट आहे. कदाचित् आजच्या लोकांना वरवर विचार करणाऱ्यांना बोचेल पण समाजात आज जी बेकारी वाढत आहे आणि आर्थिक दरी जी मोठी होत जात आहे, त्यासाठी पू. स्वामीजींचा विचार विचारवंताला तरी योग्यच वाटेल.

सनातन्यांना जी भीती होती ती आज खरी झाली आहे. त्यामुळे रोज वर्तमानपत्रात स्त्रीवरच्या अन्यायाचा उल्लेख असतोच. हे कधी तरी लक्षात घेतले पाहिजे. शिवाय आजचे साहित्यिक कथा, कादंबऱ्या यातून दूरदर्शनद्वारे व्यभिचारालाच खतपाणी घालत आहेत. दूरदर्शनातील मालिकेत हे विष जास्त पसरताना दिसत आहे. पातिव्रत्य, एकनिष्ठता ह्या ज्या भारताच्या मौलिक बाबी आहेत त्याला हरताळ फासला जात आहे. हे असेच जर चालू राहिले तर किती अवनती होईल याचा कुणी विचार करणार आहे का? आणि यासाठीच पू. स्वामीजी व मनुस्मृती या दोघांची गरज आहे.

प्रगती कोणत्या मापाने मोजावयाची? असा प्रश्नही स्वामीजी करताना आपल्याला दिसतात. तेही त्यासाठीच. एखादी सत्शील गृहिणी जास्त शिकलेली नसेल, आर्थिक सक्षमही नसेल पण कुटुंबाची व्यवस्था उत्तम पार पाडते तर ती जास्त वंदनीय होय.

वस्तुत: शिक्षणाचा उपयोग सुसंस्कृत होण्यासाठी व्हावा, पण आज तसे होताना दिसत नाही. उलट सुशिक्षित लोकांतच घटस्फोटाचे प्रमाण वाढले आहे आणि ते काळजी करण्यासारखे आहे. पाश्चात्यांना भारताबद्दल जो आदर होता तो भारतातील कुटुंब व्यवस्थेमुळे. आज ती व्यवस्था लयाला जात आहे. या सर्वांवर रामबाण औषध जर कोणते असेल तर सर्वांनाच संस्कृतीचे शिक्षण देणे आणि हे काम मनुस्मृतीशिवाय पूर्ण होणार नाही.

सध्या कोणीही मनुस्मृतीच्या वचनांवर विश्वास ठेवायला तयार नाही, पण जर उद्या कोणाला वाटलेच तर आजच्या काळातही मनुस्मृतीचा उपयोग कसा करावा हा प्रश्नही शिल्लक राहू नये म्हणून पूज्य स्वामीजींनी या आपल्या भूमिकेत त्याचेही मार्गदर्शन केले आहे. हे सर्व पाहिले म्हणजे समाजोद्धाराची किती तळमळ पूज्य स्वामीजींच्या अंत:करणात होती हे आपल्याला कळेल. जिज्ञासूंनी मुळातूनच ही प्रस्तावना वाचावी. नुसती वाचावी असे नसून ती अभ्यासावी, अशी सूचनाही मी करत आहे. व्यक्तिश: मला माझ्या दृष्टिकोनासाठी - जीवन ध्येयासाठी पू. स्वामींचे सर्व वाङ्मय व सहवास फार उपयोगाला आलेले आहेत. तर्कशुद्ध विचार कसा असावा आणि आधुनिकांना कसे गप्प करावे हे तर मी पू. स्वामीजींकडूनच शिकलो आहे.

आधुनिक लोकांच्या विचारसरणीत कसा फोलपणा असतो हे सुलभपणे पूज्य स्वामींनी मांडले आहे. वस्तुत: सनातन्यांत पंडित राज राजेश्वर शास्त्री द्रविड, करपात्र स्वामी, गुरुवर्य महामहोपाध्याय यज्ञेश्वर शास्त्री कस्तुरे, परमहंस परिव्राजकाचार्य जेरे स्वामी या सर्वांनीही लिखाण केलेले आहे. या सर्वांच्याही लिखाणात हाच विषय आहे. पण तर्ककर्कश भाषेत आहे. पू. स्वामींनी तो सुलभपणे मांडला. लहानपणी मला तो पहिल्यांदा समजला. या दृष्टीने स्वामींचे वेगळेपण मी मांडत आहे. शेवटी मनुस्मृतीचा अभ्यास घराघरात होवो व मनूचे विचार सर्वत्र प्रसृत होऊन - **एतद्देशप्रसूतस्य सकाशादग्रजन्मनः।**

**स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्यां सर्वमानवाः।**

हा जो मनूने आत्मविश्वास दाखविला आहे तो पुढील काळातही यथार्थ होवो ही त्या जगन्नियंत्या परमात्म्याच्या चरणी प्रार्थना. इति शम्।

**पं. वेदान्तकोविद प्रमोदशास्त्री कुलकर्णी**
Email : shashtripramod@gmail.com.
मो. ०९४०३०६५०९६



# सद्‌गुरु स्मरण

श्री. प्रदीप भोगावकर

सामान्या व्यवहार चोख कथिला वागूनही दाविले।
ज्यांचे वर्तन वा विचार अवघ्या आदर्शची जाहले।।
ज्यांचा आठव शांतवी मन झणी श्रद्‌धाळुनी जाणिले।
श्री स्वामी चरणी प्रणाम आमुचे भाग्येच ज्या पाहिले।।
तेज:पुंज प्रसन्न शांत रुप ते आवाज तो घोगरा।
दृष्टी भेदक वाटते परी सदा दे भाविका आसरा।
बांधा सुदृढ गौरवर्ण झळके साक्षात योगीच ते।
ऐसे दर्शन ते हृदात वसता शांती मना लाभते।।
सामर्थ्या निज अंगिच्या लपविले सांसारिकापासूनी।
जे आले जवळी हितावह दिले प्रत्यक्षता टाळुनी।
जे जेथे असती तिथून पुढती जाण्या पथा दाविले।
सर्वा सर्व सदैव देऊनि कधी काही न पै वांछिले।
विद्याभ्यास अखंड तत्त्व मनने जिव्हेवरी शारदा।
धर्माधिष्ठित भोगण्या रसिकता ना आड आली कदा।।
संसारातहि वानप्रस्थ जमतो अभ्यासुनी दाविला।
साधावी प्रगती कशी, क्रम कसा, भावार्चनी नोंदिला।।
श्रद्धा भक्ति कृतज्ञता गुरुपदी ऐशी, गुरू पावले।
वाटे शून्यच की उरे वगळिता तत्प्रेम त्यांच्यातले।।
संताचे म्हणणे जयी अनुभवे प्रेमे समाजा दिले।
दोघांनी व्यवहार पाळुनी इथे नारायणा गाठले।।
ज्यांनी स्पष्टपणे सदैव सकला वाटा हिताच्या दिल्या।
सध्याच्या पुढच्या परिस्थितीतल्या खाचा खुणा दाविल्या।।
त्यांना खडसाविले तळमळे कर्तव्य पाळावया।
केले सावध हालवून तरुणा जाणून वागावया।।
हिंदू संस्कृतिने कशी तगतसे राष्ट्रीय एकात्मता।
खोटे वाईट खोडुनी जगविले ज्यांनी महाभारता।।

स्वार्थे वा लिहिले विडंबन मिषे, साधार जे खोडिले।
शास्त्रोक्ती समजून वर्तन करी त्या जे मिळे दाविले।।
कोणी, काय, कधी, कसे आचरणे कर्तव्य पाळावया।
उद्धारा निज काय यत्न करणे, वैफल्य टाळूनिया।।
कोणाचे चुकते कुठे हित कुठे, सोपेपणे बोधिले।
त्याचा शोध कुठे कसा नि कवणा लागे, आम्हा दाविले।।
शास्त्रांची व्यवहार्यता उकलली, जिज्ञासू आनंदले।
दैवा योग्य महत्त्व देऊन खऱ्या यत्नास वाखाणिले।।
वेदान्तातिल अर्थगर्भ कळण्या सोपे जधी जाहले।
चर्चान्ती, जणु मूळ लेखक तधी भावानुवादी डुले।।
भाषापंडित, सिद्ध हस्त कवि ते, खासे टिकाकार ते।
नामी कीर्तनकार, नि:स्पृह खरे, तत्वज्ञ, आचार्य ते।
ज्ञाते, साधक, राष्ट्रभक्त कडवे, सर्वज्ञ, मर्मज्ञ ते।
कोणा काही असोत, ब्रह्मच आम्हा ते बोलते चालते।।
ज्यांनी केशरकस्तुरी लुटविण्या भांडारची फोडिले।
आम्ही हिंगजिरेच मागुनी तया भंडावुनी सोडिले।।
मातेच्या ममते तरीही असते जे लक्ष भक्तावरी।
ते मार्गी अडताच मुक्त करिती त्या जन्म जन्मांतरी।।
मागू काय, तुम्हास सर्व कळते आयू सरू लागले।
माझा यत्न कमी पडे कळुनही काही न साधे भले।।
यावे नाम मुखी, विवेक हृदयी, बुद्धीस द्या आसरा।
साष्टांगे प्रणिपात माय वरदानंद दयासागरा।।

**श्री. प्रदीप भोगावकर,**
२३६, ज्योती नगर, स्वरदा रेसिडेन्सी,
कविता बागे शेजारी, औरंगाबाद ४३१००१
मो ९८२२९७९३३०.

•••



# श्रीवरदरचना अर्थात् स्तोत्रवाङ्मय

**कु. गार्गी (वसुमती) देशपांडे**

एम्.ए. संस्कृत, दासगणु प्रतिष्ठान, गोरटे येथे सहसचिव.
प.पू. अप्पांच्या लेखनिका म्हणून काम केलेले आहे.

उपनिषदांनी म्हटल्याप्रमाणे 'एकाकी न रमते' म्हणून परमेश्वरी तत्त्वाला 'बहुस्याम्' असे वाटले. या भगवंताच्या संकल्पातून वैविध्याने नटलेल्या, विशिष्टतेने साकार झालेल्या, औचित्याने भारलेल्या सृष्टीची निर्मिती झाली. भगवंतनिर्मित या सृष्टीमध्येही परिपूर्णता दिसून येत नाही. प.पू. स्वामी वरदानंद भारतींनी देवा! माझेच अवगुण तू कां पाहतोस या संदर्भात केलेल्या प्रार्थनेत म्हटले आहे की-

**ना चंदनास सुम, सौरभ ना सुवर्णा ।**
**अंभोनिधी विपुल घोटहि घेववेना ।।**
**अंब्यात बाठ, फणसावरि फार काटे ।**
**ना वस्तुही अवगुणाविण एक कोठे ।।**

अशीच वस्तुस्थिती दिसून येते. श्रीमद्भगवद्गीतेने म्हटल्याप्रमाणे, ''निर्दोषं हि समं ब्रह्म'' एक भगवत्तत्त्वच काय ते निर्दोष व परिपूर्ण असे आहे.

स्वत:ला जाणणाऱ्या मानवी जीवालाही भगवंतानेच निर्माण केले असले तरी तेथेहि अपूर्णता आहेच. ती अपूर्णता नाहीशी व्हावी म्हणून मनुष्य नाना प्रकारांनी प्रयत्न करीत असतो. स्वत:च्या प्रयत्नाच्या बळावर पूर्णताप्राप्तीसाठी धडपडत असतो. यश न आले तर अगतिकतेने दुसऱ्यांचे सहाय्यही घेऊ लागतो. कधी धनसंपत्ती हेच सर्वस्व मानून रात्रंदिवस त्याच्या प्राप्तीसाठी काळ घालवीत असतो. कधी शिक्षणाच्या खोऱ्याने धनसंपत्ती ओढीत राहण्याचा प्रयत्न करतो तर कधी शरीर कष्टाच्या बळावर ऐहिक सुखोपभोग सर्वस्व मानून अहोरात्र शिणत असतो. त्यासाठी आपण होऊन आपली बुद्धिमत्ता विकत आहोत, आपण होऊन आपल्या शरीरसंपत्तीला दुर्बल करीत आहोत याची जाणीव त्याला असत नाही. व्यवहारात ज्याच्याकडून सहकार्याची अपेक्षा असते, त्याच्या गुणांचे, असलेल्या- नसलेल्या गुणांचे आपण कौतुक करतो. त्याला मोठेपणा देण्याचा देखावा करीत राहतो. य:कश्चित गोष्टीसाठी आपण हे करतो तर मानवी जीवनातील खरीखुरी अपूर्णता घालविण्यासाठी सर्व अंगांनी खऱ्या अर्थाने जो सहकार्य करतो, त्याच्या गुणांचे वर्णन केले तर...? त्याचे श्रेष्ठत्व मान्य केले तर...? त्या परमेश्वराची स्तुतितोत्रे गायिली तर...?

**आदरेण यथा स्तौति धनवन्तं धनेच्छया ।**
**तथा चेत् परमात्मानं को न मुच्येत बंधनात् ।।**

धनाच्या प्राप्तीसाठी ज्या आदराने श्रीमंताची स्तुति केली जाते त्याच आदराने जर कुणी भगवंताची स्तुति करेल तर तो संसारबंधनातूनच मुक्त नाही का होणार? या कल्पनेतूनच स्तोत्रवाङ्मयाचा उगम झाला. वेदवाङ्मयातही स्तोत्रांची रचना असल्याचे दिसून येते. इंद्रसूक्त- आश्विन सूक्त- सौरसूक्त, श्रीसूक्त- गणपति अथर्वशीर्ष अशा अनेक देवता-स्तुतिपर रचना वेदवाङ्मयात आढळून येतात. तसेच शुक्लयजुर्वेदामध्ये राष्ट्रसुक्तांत राष्ट्रदेवतेची स्तुति, तेहतीस कोटी देवतांची जननी असलेल्या गोमातेची स्तुति सामवेदातील 'हाव वृषभपत्नीहाव''... या मंत्राने केली जाते तर 'इदमाम् उपव्हरे गिरीणां' या नदीसूक्तातून सर्वत्र सुखसमृद्धी देणाऱ्या नदीचे स्तवन केले जाते. मात्र गोडवे गायिले की मनुष्य जसा हरखून जातो आणि सहाय्य करण्यास प्रवृत्त होतो तसे परमेश्वराचे नाही. त्याला कोणाच्याही स्तुतीची गरज नाही. कारण स्तोत्र हे त्याचेच स्वरूप आहे असे विष्णुसहस्रनामामध्ये व्यक्त झाले आहे. भगवंताचे जे वर्णन केले जाते, ती त्याची वास्तव स्थिती असतेच. तेव्हा त्याचे वर्णन करण्याने, त्याचे गुणानुवाद गाण्याने त्याचे श्रेष्ठत्व मान्य करण्याने जो करतो त्याच्या अंत:करणातील अहंकार उणावून नम्रता प्रगट होते, अनन्यता प्रगट होते. श्रीनारदांनी म्हटल्याप्रमाणे तो 'दैन्यप्रिय' आहेच. स्तोत्रवाङ्मयाची निर्मिती झाली ती यासाठीच.

हिंदू धर्मांत जशी स्तोत्रे, प्रार्थना आहेत तशाच त्या ख्रिश्चन धर्मांतही आहेत. फरक इतकाच की हिंदूधर्म ईश्वराचे अस्तित्व निश्चितपणाने जाणतो व स्तुतिस्तोत्रे गातो तर ख्रिश्चनधर्म Oh God! If there is God? Save my sole, if I have sole!! अशा तऱ्हेच्या निरर्थक प्रार्थना करतो. आपल्या अडचणीच्या वेळी कोणाला तरी साद घालावीशी वाटणे हा भाव सगळीकडे सामान्यच आहे. हिंदूधर्मीय आपली लीनता, कोमलता देवापुढे व्यक्त करतात त्याचबरोबर भगवंताच्या उदार हृदयाचाही परिचय करून देतात. तो कधी भगवंताच्या दिव्य विभूतीच्या दर्शनाने आश्चर्यचकित होतो तर कधी भगवंताच्या अमर्याद कृपेने व भक्तवत्सलतेने स्वत:लाही हरवून बसतो. काहीवेळा आपल्या क्षुद्रतेमुळे अस्वस्थ बनतो व त्यातून बाहेर पडण्याचा मार्ग शोधतो. त्याची परिणति व्याकुळतेने केलेल्या प्रार्थनेत होते. पारमार्थिक जीवन उन्नत- प्रगत- विकसित व्हायचे असेल तर बुद्धि, भावना व

कर्मशक्ति यांची वाढ होणे आवश्यक आहे. भावनांचा विकास करण्याचे कार्य स्तोत्रवाङ्मय करीत असते. कारण तत्त्वज्ञानाच्या ग्रंथाप्रमाणे स्तोत्रे नुसती वाचली जात नाहीत तर त्यांचे पठण केले जाते. त्याचा स्वाभाविक परिणाम म्हणून त्यातील विचार अंत:करणात ठसून बुद्धि-भावना यांचा विकास होत जातो. अशा आशयाचे श्री. गुरुदेव रानडे यांनी आपल्या ग्रंथात लिहिले आहे. खरे म्हणजे प्रतिभेच्या विकासाशिवाय स्तोत्ररचना अशक्यप्रायच. भाव हा काव्याचा आत्मा असल्याने तो जेवढा उत्कट तेवढी स्तोत्ररचना सरस उतरते. तत्त्वज्ञान हे परमार्थाच्या शेताला घातलेले कुंपण आहे. भ्रामक समजुतीची मोकाट गुरे त्या शेतात शिरू नयेत म्हणून असे कुंपण आवश्यक ठरते. पण भाव निर्मितीसाठी स्तोत्रगानच महत्त्वाचे ठरते. ज्याची आराधना करावयाची ते आराध्यदैवत व आराधना करणारा यांच्यात एक प्रकारचा नातेसंबंध निर्माण होतो. मग ते नाते कधी आईलेकराचे असते, कधी कांतावल्लभाचे असते, कधी पिता-पुत्राचे असते तर कधी धनी-सेवकाचे असते. संतवाङ्मयात हे चारी भाव प्रगट झाल्याचे आपल्याला दिसून येतात. प.पू. स्वामी वरदानंद भारती यांच्या स्तोत्रवाङ्मयाचा आपण त्या दृष्टीनेच विचार करणार आहोत.

श्रीमत् जगद्गुरू शंकराचार्य हे कट्टर अद्वैती. आपल्या मताच्या प्रसारार्थ त्यांनी तीन वेळा आसेतु-हिमाचल परिभ्रमण केले. देवदेवतांच्या पूजनादीतून संप्रदाय अभिनिवेश प्रगट होऊ लागला म्हणून त्यांनी पंचायतनपूजा सुरू केली व त्या त्या देवतांच्या स्तुतिस्तोत्राची रचना केली. त्या सर्व स्तोत्रांच्या रचना एवढ्या भावोत्कट, एवढ्या लालित्यपूर्ण, एवढ्या प्रासादिक आहेत की अद्वैती शंकराचार्यांनी याची रचना केली याचे आश्चर्य वाटावे. ही स्तोत्रे गायिली जातात तेव्हा काही काळ तरी अंत:करण ईश्वरप्रेम, ईश्वरीमहात्म्याचे ज्ञान, त्याच्याविषयीची कृतज्ञता, त्याच्या तात्त्विक स्वरूपाचे भान या सर्व गोष्टींनी भरून येते.

प.पू. स्वामी वरदानंद भारती हेही श्रीआचार्यमतानुयायीच. ब्रह्मसूत्रार्थदर्शिनीचे लेखन झाले त्यावेळी तर्ककर्कश ब्रह्मसूत्रांचे स्वरूप, त्याचे काठिण्य इत्यादींचे वर्णन करताना स्वामीजी म्हणतात-

**विपुल दूध असूनही । धन्याविणे कुणालाहि**
**हात कासे न लावू देई । सूत्रेहि त्या गायीपरी ।**
**....आचार्यांचे उपकार । म्हणून फार जगावर ।**
**त्यांनी उघडिले भांडार । अर्थरत्नांनी भरलेले ।।**
**त्या भाष्याचा आधार । घेतला मी असे फार ।**
**बसून मातेच्या कडेवर । चालवे तसे केले मी ।।**

यावरून प.पू. स्वामीजींचे नाते श्रीज्ञानेश्वरमहाराज ज्ञानेश्वरीत अनेकवेळा 'श्रीनिवृत्तिनाथसुते' म्हणतात तसेच होते. त्यामुळे आचार्यांच्या स्तोत्रवाङ्मयाचे जे सर्व गुण ते प.पू. स्वामीजींच्या स्तोत्रवाङ्मयात दिसून येतात. प.पू. स्वामीजींच्या स्तोत्रवाङ्मयाचे दोन प्रकारात वर्गीकरण करता येईल. एक म्हणजे देवतापर स्तोत्रे आणि दुसरा प्रकार म्हणजे संतांची स्तुति. यांत आणखीही दोन भेद मानता येतील ते म्हणजे मराठी भाषेचे सौष्ठव स्वीकारून केलेली स्तवने व संस्कृत भाषेच्या समृद्धीच्या आविष्काराने नटलेली स्तोत्रे.

प.पू. स्वामीजींनी (अप्पांनी) संपूर्ण भारतभर बदरिनाथ ते कन्याकुमारी व सोमनाथ ते जगन्नाथपुरी तीन वेळा भ्रमण केले आहे. काही ठिकाणच्या निसर्गसौंदर्याने त्यांना विमोहित केले तर काही देवतांच्या पवित्र दर्शनाने त्यांच्या चित्तवृत्ति उल्हासित झाल्या. काही ठिकाणी त्यांना आपल्या प्राचीन परंपरेचे उत्कट स्मरण झाले तर कांही ठिकाणी देवतांच्या उत्तुंगतेची जाणीव होऊन त्यापुढे आपल्या खुजेपणाच्या ज्ञानाने मन विषण्ण झाले. काही रम्य स्थानातील देवतादर्शनाने भगवंताच्या साक्षात्काराची उत्कट इच्छा निर्माण झाली तर काही ठिकाणी त्या अनंतकोटीब्रह्मांड-नायकाच्या सगुणसाकार दर्शनाने- निरामय आनंदाच्या अनुभूतीने अंग अंग रोमांचित झाले. हे सर्व भाव शब्दांच्या आविष्काराने स्तोत्ररचनेत प्रगट झाले आहेत.

भावार्चना या प.पू. अप्पांच्या काव्यसंग्रहाच्या पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत कै.ॲड. आनंदीदासराव लव्हेकर म्हणतात - या काव्याची अभिव्यक्ति ही इतर जनांना उल्हसित करण्यासाठी नसून गोस्वामी तुलसीदासांनी म्हटल्याप्रमाणे, ''स्वांत:सुखाय तुलसी रघुनाथगाथा भाषानिबद्धमतिमंजुलमातनोति'' अशा स्वरूपाची असते. अशा काव्यनिर्मितीचा उद्देश भगवत्चिंतन करणे, भगवन्नामस्मरण करणे किंवा अक्षरब्रह्माची अविरत उपासना करणे हाच असतो. ते काव्य आपोआप स्फुरते. त्यासाठी विशिष्ट स्फूर्ति, विशिष्ट वातावरण, विशिष्ट काळ यांची अपेक्षा नसते. वारा आणि सूर्यप्रकाश यांना जसे कशाचेही वावडे नसते त्याप्रमाणे हे काव्य निर्माण करणारी प्रतिभा स्वतंत्रतेने कोणत्याही वातावरणात प्रफुल्लित होते. प.पू. अप्पांच्या स्तोत्ररचनेचे तसेच आहे.''

प.पू. अप्पांच्या स्तोत्ररचनेचे मला जाणवलेले वैशिष्ट्य असे की, कोणत्याही शांत-प्रसन्नवेळी ही स्तोत्रे स्वत: गायिली वा चांगल्या गायकाकडून ऐकावयास मिळाली तरी काही काळ अंत:करण ईश्वरप्रेम, ईश्वरी उदात्तता, त्याच्याविषयीची कृतज्ञता इत्यादि भावनांनी उचंबळून येते व साधक ते स्तोत्र स्वाभाविकपणेच गुणगुणूं लागतो. आपण काही स्तोत्ररचनांचे आलोकनच करूया...

भाललोचन स्तोत्रामध्ये भगवान शंकरांचे मोठेपण अप्पांनी किती प्रकारांनी सांगितले आहे! प्रत्येक कडव्याच्या शेवटी ''श्रीशिवा भजतो अशा मज बाधते नच आपदा'' असे म्हणून पहिल्या तीन ओळीत शंकरांची निर्लेपता, शंकरांचे पावित्र्य, शंकरांची निस्पृहता, शंकरांची व्यापकता, शंकरांचे धवलत्व, शंकरांची भक्तवत्सलता, शंकरांचे श्रेष्ठत्व इत्यादि मोठेपणाचे बारकावे वर्णन केले आहेत. मात्रावृत्तातील हे स्तोत्र गेयतेमुळे अनेक भाविक वैखरीने गुणगुणत राहतातच. पण त्यांच्या हृदयातही भावांची गुणगुण चालू राहते.

याच वृत्तातील श्रीहरिस्तोत्राचेही तसेच आहे. भगवान् श्रीकृष्णाच्या कांतीच्या निळ्या रंगाचे वर्णन करताना प.पू. अप्पा म्हणतात-

**भासते जलदात जी नलिनात वा गगनी छवी ।**
**सागरी उमटे शिखावलकंधरेप्रति भूषवी ।।**
**इंद्रनीलमणीहि ज्यापुढती प्रभो गमतो उणा ।**
**दिव्यसुंदर रूप हरि तव दाखवी मम लोचना ।।**

हे श्रीहरि! पाण्याने भरलेल्या मेघाच्या ठिकाणी असणारी नीलिमा, नीलकमलातील, आकाशाच्या ठिकाणी असणारा निळा रंग, क्षितिजापर्यंत पसरलेल्या अथांग सागराचा निळा रंग, मोराच्या डौलदार मानेला भूषविणारा रंग, नीलमण्याचा रंग या सर्व नीलवर्णाचे सौंदर्य तुझ्या नीलवर्णापुढे फिके ठरावे असे जे तुझे दिव्य रूप त्याचे दर्शन मला दे.

एका कडव्यात श्रीहरीच्या तेजाचेच सुंदर वर्णन करतात. एके ठिकाणी भगवंताची दिव्यता- भव्यता- व व्यापकता यांचे स्वरूप सांगतात. श्रीहरीच्या चर्मचक्षूंनी दिसणाऱ्या रूपाचे वर्णन करता करता अप्पांना उपनिषदांनी सांगितलेल्या ब्रह्माच्या 'अवाङ्मनसगोचर' वर्णनाचे स्मरण होते. कारण भगवंतांनीच गीतेच्या १४व्या अध्यायात 'ब्रह्मणोऽ हि प्रतिष्ठाऽहं' असे म्हटले आहे. ते म्हणतात-

**शोधिता शिणली श्रुति प्रभवे न जेथ सरस्वती ।**
**कुंठले मुनि सन्मति स्मृतिलाहि ना गंवसे गति ।।**
**इंद्रियाप्रति लाग ना मनबुद्धिही त्यजि चेतना ।**
**दिव्य सुंदर रूप हरि तव दाखवी मम लोचना ।।**

तुझ्या स्वरूपाचा शोध घेता घेता वेदांनी हात टेकले. त्यांना 'नेति नेति'- असे नाही, असे नाही, असेच म्हणावे लागले. प्रत्यक्ष सरस्वतीचे जे रूप ती वाणीही आपला प्रभाव दाखवू शकली नाही. हाताने ज्याला स्पर्श करता येत नाही, डोळे ज्याला पाहू शकत नाहीत, मुख ज्याचे वर्णन करू शकत नाहीत, एवढेच काय वाऱ्याच्या वेगाने धावणाऱ्या मनालाही ज्याचे स्वरूप कळत नाही, तैलधारावत् असलेली बुद्धीहि अचेतन बनते, आपले कार्य करू शकत नाही असे जे तुझे रूप, देवा! त्याचे दर्शन दे.

''सगुण-निर्गुण एकु गोविंदु रे' या श्रीज्ञानेश्वर वचनाला अनुसरून प.पू. अप्पा श्रीहरीच्या सगुण रूपाचे वर्णन करताना महाभारतातील प्रसंगाचे स्मरण करून देतात. दुर्योधनाच्या अर्वाच्य बोलण्याला वैतागून भीष्माचार्य अपांडवी पृथ्वी करण्याचा निश्चय करून युद्धभूमीवर येतात व आपल्या कौशल्याने तीक्ष्ण बाणांनी अर्जुनाला जर्जर करून टाकतात. तो रथात कोसळतो. त्याच्या मस्तकावरील मुगुट खाली कोसळतो. केस मोकळे होतात. समोरून भीष्माचार्यांकडून बाण येताहेत पण आपल्या मागून अर्जुनाकडून प्रतिकारार्थ बाण येण्याचे बंद झाल्याचे कळतां क्षणी ''न धरी शस्त्र करी मी गोष्टी सांगेन युक्तिच्या चार' ही स्वत:च केलेली प्रतिज्ञा विसरून भगवंत सुदर्शन चक्र घेऊन भीष्मांच्या अंगावर धावून जातात. अप्पा म्हणतात- 'भक्तवात्सल्यापोटी त्याच्या संरक्षणार्थ जे तुम्ही भयंकर असे रूप धारण केले त्या दिव्य रूपाचे दर्शन देवा! मला होऊ दे.' एकेका देवतेचे परंपरेप्रमाणे एकेक रूप निश्चित ठरले आहे. भगवंताच्या अनेकानेक रूपाचे वर्णन करता करता अप्पा पारंपारिक रूपाकडे वळतात व म्हणतात-

**वस्त्र सुंदर केशरी चपलेपरी तळपे कटी ।**
**रत्नकौस्तुभ राजते हृदयावरी रवि हिंपुटी ।।**
**शंख चक्र गदा करी कमलासवे अभयास दे ।**
**रम्य रूप असे अनंतहृदात संतत राहू दे ।।**

पहाटेच्या शांत वेळी अहिरभैरव रागात हे स्तोत्र गात असताना किंवा कोणी गायिलेले ऐकत असताना प.पू. अप्पांच्या स्तोत्ररचनेच्या मनस्वी आनंदातील काही अंशाच्या तरी आनंदाची अनुभूति साधक घेऊ शकतो अशी प्रभावी स्तोत्ररचना आहे ही!

जानेवारी १९७१ मध्ये प.पू. अप्पा अरुणाचलम् मधील परशुरामकुंड येथे गेले होते. तेथील परशुराम मंदिरात दर्शनाला गेले व समोर दिसणाऱ्या आकर्षक मूर्तीच्या दर्शनाने भारावून गेले. परशुरामस्तोत्रात प.पू. अप्पा म्हणतात-

**दाढी रुळे धवल भार शिरी जटेचा ।**
**मुद्रा सतेज करडी घनतुल्य वाचा ।।**
**उत्तुंग देह पिळदार कुठार हाती ।**
**तो वंदितो परशुराम प्रभु प्रभाती ।।**

या वर्णनाबरहुकूम एक तेजस्वी करडे व्यक्तिमत्त्व आपल्याही डोळ्यासमोर उभे राहते पण 'घनतुल्य वाचा' कांही ऐकायला मिळत नाही. त्यासाठी प्रतिभावंत कवि असणे, निष्ठावंत भक्त असणे आवश्यक असते तरच त्या क्रांतदर्शित्वामुळे ''जे न देखे रवी ते देखे कवी' हे साध्य होऊ शकते. परशुरामांच्या कर्तव्यकठोर शरीराचे वर्णन करता करता अप्पांना परशुरामांचा इतिहास आठवतो व कठोर कर्तव्य डोळ्यांसमोर उभे राहते. ते म्हणतात-

लोहित नदीच्या तीरावर तपश्चर्या करणारे, खांद्यावर धनुष्यबाण लटकवून पूर्वोत्तरसीमेचे संरक्षण करणाऱ्या पर्वतांचे कठीण कठीण कडे तोडून ज्यांनी नदीचे पाट काढले व भारतभूमीला सुजला सुफला केले, सर्व सत्ता हातांत असल्याने ज्यांनी न्यायअन्याय पाहिला नाही, सर्वसामान्य प्रजेला जे लुबाडित राहिले, त्यांना नि:क्षत्रिय पृथ्वी करण्यापर्यंत ज्यांनी शासन केले त्या परशुराम पदांना मी आदराने वंदन करतो. श्रीपरशुराम चरित्रातले उदात्तत्व सांगतांना अप्पा म्हणतात-

**उच्चार्थ नीच जरि नीच तरी करावे ।**
**लागेल दोष तरि त्यास सुखे सहावे ।।**
**हे तारतम्य शिकवी निज जो कृतीने**
**तो वंदितो परशुराम पदां शिराने ।।**

वडिलांची आज्ञा मोडू नये म्हणून प्रत्यक्ष जन्मदात्या आईचाही ज्यांनी वध केला, त्यासाठी मातृहत्यारा हा दोषही ज्यांनी पत्करला. पण त्याच आज्ञापालनाच्या कृतीने संतुष्ट झालेल्या अधिकारी जमदग्नि ऋषींनी वर दिल्यावर ज्यांनी आपल्या आईला पुन्हा जिवंत करावे ही उत्कट इच्छा व्यक्त करून मातृप्रेम व्यक्त केले. त्या परशुरामांना मी पायावर डोके ठेवून नमस्कार करतो असे अप्पा म्हणतात. परशुरामांच्या केलेल्या या स्तुतितून आपल्यासारख्या सर्वसामान्य माणसाने व्यवहारी जगात कसे तारतम्याने वागावे याचा वस्तुपाठच जणू आप्पा देत आहेत.

आपल्याकडे गायत्रीमंत्राला वेदवाङ्मयातला अमृतमंत्र म्हटले आहे. सविता- सूर्य हा तेज, ज्योति यांचे उगमस्थान आहे. साऱ्या विश्वाचे जीवन त्याच्यावरच अवलंबून आहे. सूर्यतेज हे माणसाच्या मानसिक क्रियांचेही प्रेरणास्थान आहे. म्हणूनच या मंत्रात बुद्धीला प्रेरणा देण्याची प्रार्थना केली आहे. साधनेच्या परंपरेत गायत्री मंत्राला 'चिंतामणि' असे मानले आहे. गायत्री मंत्राच्या जपाने जपकर्त्याच्या बुद्धीला, सद्भावनांना उत्तेजन मिळते. हे तर निश्चितच पण त्याच्या

भोवतीचे वातावरणही उच्च पातळीच्या विचारांनी व्यापून जाते असे वर्णन शास्त्रात केले आहे. असे जरी आहे तरी प्रयोगशाळेतील प्रयोग यशस्वी होण्यासाठी उपकरणांची काच ही विशिष्ट प्रकारची लागते त्याप्रमाणेच शरीर-मन-बुद्धीची विशिष्ट पातळी या मंत्राच्या साधनेकरिता आवश्यक असते. तेव्हाच तो जप फलदायक होतो. या सर्व गोष्टींचा खोलवर विचार करून प.पू. अप्पांनी तळागाळापर्यंतच्या साधकांना आपले इच्छित साध्य करून घेण्यासाठी जणू या सूर्यनारायण स्तोत्राची निर्मिती केली.

खऱ्या प्रतिभावंताला वातावरणाच्या विशिष्टतेची आवश्यकता नसते याचा प्रत्यय या सूर्यस्तोत्ररचनेच्या वेळी आला. नांदेड-पंढरपूर पदयात्रेच्या वेळी प्रतिदिनी सूर्योदयाच्या मंगळ वेळी एकेका श्लोकाची रचना होऊन हे स्तोत्र पूर्ण झाले आहे. 'बुद्धी प्रकाशित करी आमुची तमारि' असे ध्रुपद असलेल्या या स्तोत्रांत बुद्धीला प्रेरणा देणाऱ्या सूर्यनारायणाची लालिमा माणसाला कुठेकुठे पहावयास मिळते त्याचे सुंदर वर्णन अप्पांनी या स्तोत्रांत केले आहे. ते म्हणतात-

**माणिक्य कोकनद राजगिरा तुऱ्यात ।**
**प्रेमात शूरनयनी नवपल्लवात ।।**
**आरक्तता तव विभो रुधिरीहि सारी ।**
**बुद्धि प्रकाशित करी आमुची तमारि ।।**
**वाचे बरवे कवित्व । कवित्वी रसिकत्व ।**
**रसिकत्वी परतत्त्व- । स्पर्शु जैसा ।।**

या श्रीज्ञानोबांच्या उक्तीप्रमाणे वाणीला परतत्त्वाचा स्पर्श असलेले अप्पा राष्ट्रभक्तीचा, देशभक्तीचा, समाज कल्याणाचा विचार विसरत नाहीत. कारण देव- देश नि धर्म यांचाच विचार सातत्याने माणसाच्या मन-बुद्धीला व्यापून असला पाहिजे याची जाण प.पू.अप्पांसारखा एक उत्कट देवभक्त, एक परंपरारक्षक, एक संस्कृतिप्रेमी ठेवणार नाही असे होईलच कसे?

या स्तोत्राच्या शेवटी ते म्हणतात,

**देवा समृद्ध विजयी करि भारतास ।**
**सन्मार्ग दाखिव विभो सगळ्या जनास ।।**

बाळबुद्धीतून प्रागल्भ्याकडे ज्यांना प्रवास करावयाचा आहे त्यांनी प्रतिदिनी हे स्तोत्र नित्यपठणात ठेवावे. त्याचे फल निश्चितपणे आहे. (भावार्चना नवीन आवृत्ती पृ.)

फाल्गुन वद्यात शके १८९८ मध्ये प.पू. अप्पा शृंगेरीला गेले. जगद्गुरू शंकराचार्यांनी धर्मजागृतीसाठी चारी दिशेला मठांची स्थापना केली. त्यांतील दक्षिण दिशेचे हे पीठ शृंगेरी. श्रीशारदांबेच्या स्थापनेसाठी शुद्ध-पवित्र भूमीचा शोध घेत घेत फिरत असताना ऐन कडक उन्हाच्या वेळी आपला फणा काढून नागोबा बसलेले होते व त्या फण्याच्या सावलीत बेडूक विश्रांति घेत होता असे दृश्य आचार्यांनी पाहिले व आपल्या शिष्यांना ते म्हणाले - 'अरे! हे दृश्य पाहिलेत का? यापेक्षा निर्वैरभूमी, यापेक्षा पवित्र भूमी कोठे मिळणार चला, येथेच शारदांबेची प्रतिष्ठापना करूया. स्वच्छ-निर्मळ जलाने खळखळ वाहणारी तुंगभद्रा, भोवतालच्या दाट झाडीने, सुवासिक फुलझाडांच्या दाटीने आकर्षक असलेला परिसर, सुंदर सुशोभित आल्हाददायक श्रीशारदांबेची मूर्ती, 'देव पूजोनि पाहिजे' या श्रीज्ञानेश्वरांच्या उक्तीप्रमाणे रम्य अशा पूजाबांधणीने मन खिळवून ठेवणारी मूर्ती, मंदिरातील प्रशांत शीतल वातावरण अशा वेळी प.पू.अप्पांचे भाव उचंबळून येतात व ते म्हणतात-

**रूपे मनोहर धरून इथे वनश्री ।**
**सेवेसि तत्पर असे तव ही जयश्री ।।**
**तुंगा-तरंग चरणां अभिषेकिताती ।**
**तारून ने मजसि अंब धरून हाती ।।**

श्रीमद्शंकराचार्यांनी त्यांच्या काळात जेथे उपनिषद् भाष्य व ब्रह्मसूत्रभाष्य सांगितले, शिष्यांसाठी कडक थंडीच्या परिसरात गरम पाण्याची व्यवस्था केली, त्या बदरीनाथ येथे वास्तव्य करून व्यासनिर्मित ब्रह्मसूत्रावर मराठी ओवीबद्ध टीका लिहिण्याची आपली उत्कट मनीषा अप्पा श्रीशारदांबेपुढे व्यक्त करतात-

**जे ब्रह्मसूत्र विपुलार्थक फार गूढ ।**
**ते इच्छितो विवरण्याप्रति मी विमूढ ।।**
**आशा मदीय पुरवी लव ना विलंबे ।**
**शृंगेरिवासिनि महेश्वरि शारदांबे ।।**

श्रीशारदांबेचा कौल मिळाला व बदरिनाथ येथे ब्रह्मसूत्रार्थदर्शिनी या टीका ग्रंथाचे लेखन झाले.

शके १९०२ मध्ये प.पू. अप्पांनी उत्तरकाशी येथे राहून उपनिषदांवर भाष्य लिहिण्यासाठी सहाय्य करावे म्हणून 'श्रीशारदेदेवि सरस्वती तू कृपाकटाक्षे मजलागी पाही'' या दीर्घउपजाति वृत्तांत स्तोत्ररचना करून शारदांबेची प्रार्थना केली. श्रीसरस्वतीच्या, श्रीशारदांबेच्या कृपाकटाक्षाशिवाय कोणतीही शब्दरचना केवळ अशक्य असे असल्यामुळे 'रसात्मकं वाक्यं काव्यं' अशा रचनेची, वेदविस्ताराची, शब्दाच्या रूपाला यथार्थता देण्याची किमया शारदांबेचीच. म्हणून अप्पा किती प्रकाराने 'त्या कृपाकटाक्षे मजलागी पाही'' अशी शारदांबेलाच विनंती करतात!

सृष्टीतील चराचरावर जी आपला कल्याणकारी नेत्रकटाक्ष टाकते, विद्वज्जनांना प्रसन्न रचना करण्याची स्फूर्ति ज्या कृपाकटाक्षांमुळे प्राप्त झाली, सृष्टीच्या निर्मितीचे कौशल्य ब्रह्मदेवाला ज्या कृपादृष्टीमुळे प्राप्त झाले कारण आधी ॐकार निर्माण झाला व मग सगळी पृथ्वी निर्माण झाली-

**(ॐकारश्चाथ शब्दश्च द्वावेतौ ब्रह्मण: पुरा ।**
**कंठं भित्वा बहिर्यातौ तस्मान् मांगलिकावुभौ ।।)**

व्यासवाल्मिकादि कवींद्रांना, आचार्यादि थोर थोर भाष्यकारांना ज्या कृपाकटाक्षांनी सामर्थ्य प्राप्त झाले, ज्या कृपादृष्टीमुळे अंत:करणातील विवेक, आनंद, समाधान, भक्ति इत्यादि अनेकानेक भावांची निर्मिती होते, सरस्वतीच्या 'त्या' कृपाकटाक्षांचे वर्णन करता करता प.पू. अप्पांना जगद्गुरू शंकराचार्यांच्या चरित्रातील काश्मीरमधील सरस्वतीपीठ आरोहणाच्या घटनेचे स्मरण झाले. श्रीनगर येथील शारदापीठाला चारी दिशेना दरवाजे आहेत. पूर्व- पश्चिम- उत्तर

या तीन दिशांची दारे त्या त्या स्थानाहून विद्वान जाऊन वादविवाद करून उघडण्याची संधी प्राप्त झाली होती. पण दक्षिण दिशेचे दार अद्याप बंदच होते. आचार्य तेथे गेले व त्यांनी आपल्या विद्वत्तेच्या बळावर तेथील पंडितांना पराभूत करून दक्षिण दिशेचे दार उघडले व त्या शारदापीठावर त्यांनी आरोहण केले. प.पू. अप्पा म्हणतात– या घटनेने तुझ्या दृष्टीमध्ये जो आनंद, जी प्रसन्नता भरून राहिली, शारदांबे माय! त्या कृपाकटाक्षांनी माझ्याकडे पहा.

कालिदासादि कवींच्या काळामध्ये एकदा कविसंमेलन भरले आणि त्या सभेत सर्वात श्रेष्ठ कवी कोण? यासंबंधी चर्चा होऊन 'कविर्दंडी कविर्दंडी कविर्दंडी न संशयः' असा निर्णय सरस्वतीने दिला. आपल्या कविताशक्तीचा सार्थ अभिमान असलेले कालिदास रागाने म्हणाले– 'हे उद्धट स्त्रिये! मग मी कोण?' तेव्हा त्याने आपला अपमान केला याकडे दुर्लक्ष करून, आनंदाने तुझ्या नेत्रांमधून वात्सल्य भाव ओसंडू लागले व तू त्या कवींच्या सभेत कालिदासाला 'अरे! तू म्हणजे मीच' असे उत्तर दिले. ज्या दृष्टीतून तो वात्सल्यभाव स्फुरला हे देवी! त्या कृपाकटाक्षांनी माझ्याकडे पहा. मी ही विनवणी तुला का करतो आहे ते सांगताना प.पू. अप्पा म्हणतात –

**''विभाग जे शेवटचा श्रुतीचा जिथोनिया तत्त्वविचार सारे**
**जगातले अंकुरले विशेषे पुढे यथाभू फुलती प्रसारे ।।**
**तयावरी भाष्य लिहावयाची इच्छा खुळी मद्हृदयांतराही ।**
**म्हणून हे माते!**
**श्रीशारदेदेवि सरस्वती तूं कृपाकटाक्षे मजलागी पाही ।।**

नऊ श्लोकांचे हे स्तोत्र रसिकांनी मुळातूनच वाचावे. (भावार्चना–तृतीयावृत्ति पृ. १०८)

आपल्या दत्तभक्त स्नेह्याकरिता नित्यपठणाकरिता निर्माण केलेले दत्तात्रेयांचे स्तोत्र इंदूर–पुणे रेल्वे प्रवासांत झालेले आहे. स्वतःला राबविण्याची शक्ती म्हणजे प्रतिभा अशी व्याख्या श्री.द.के. केळकर यांनी आपल्या काव्यालोचन या ग्रंथात केली आहे. प.पू. अप्पांची नवनवोन्मेष–शालिनी प्रतिभा पाहिल्यावर त्याचे स्मरण झाल्याशिवाय रहात नाही.

गंगोत्री–जम्नोत्री–केदार–नारायण या हिमालयातील चारी धामांशिवाय इतरही अनेक यात्रा प.पू. अप्पांनी केल्या. पंचबदरी, पंचकेदार, सुरकंडादेवी, हेमकुंड, गोविंदघाट, संतोपथ, वासुकीताल, त्रिजुगी नारायण, माना इत्यादि स्थानांचेही त्यांनी दर्शन घेतले. त्या त्या ठिकाणच्या देवतास्तोत्रांमध्ये त्यांच्या प्रतिभेला, काव्यशक्तीला, त्यांच्या अंतःकरणातील कोमल भावाला बहर आल्याचे दिसून येते.

''हिमाच्छादित प्रांतात असलेल्या देवतांच्या दर्शनाला जाणारे दाक्षिणात्य कमीच. तेथे गेल्यावर रममाण होणारे विरळाच आणि तेथे अत्यंत शीतल वातावरणात राहून काव्यनिर्मिती करणारे तर फारच थोडे! अतिशीत वातावरणात देवदर्शनाच्या काळजीपेक्षा स्वतःच्या शरीराची काळजी घेणारीच मंडळी अधिक असतात. निरनिराळ्या यात्रा लोक करतात पण 'धड देवळांत आणि चित्त संसारात' असे त्यांचे असते. त्यामुळे परमार्थही फाटका व प्रपंचही तोटका पडतो. पण या स्तोत्रकारांचे तसे नाही. यांचा यात्रेचा उद्देशच वेगळा! त्यांना बदरीशाची भक्ती हवी. अंतःकरणाची निर्व्याजता, निर्मलता हवी आणि पुन्हा पुन्हा मागणे काय तर– **''तुका म्हणे तुझी नलगे दसोडी । परी आहे आवडी दर्शनाची.''** असे श्री. लव्हेकर यांनी म्हटले आहे. ती स्तोत्रकारांची केवळ स्तुति नसून वस्तुस्थितीच आहे.

११७०० फूट उंचीवरील केदारनाथाच्या दर्शनाला प.पू. आप्पा गेले, ते १९६४ साली. त्यावेळी आजच्या इतक्या सोयी नव्हत्या नव्हे. अडचणीच होत्या. कुंडचट्टीपासून चालावे लागत होते. थंडीच्या दृष्टीने सुरक्षित म्हणून बंदिस्त इमारती नव्हत्या. झोपडीवजा चट्ट्या असायच्या पण त्या त्या लोकांनाच राहण्या झोपण्यासाठी पुरेशा होत. त्यामुळे ओसरीसारख्या मोकळ्या भागातच राहावे, झोपावे लागे. मग शौचकूप–न्हाणीची व्यवस्था कुठली? पण प.पू. अप्पा त्या त्या वातावरणाशी समरसून जात. कारण त्याचे सहल हे ध्येयच नव्हते ना! भोवताली ५–१० कि.मी. थोडी सपाटी. व त्यापुढे उंच उंच डोंगर तेही बर्फाच्छादित. दिवसाच्या सूर्यप्रकाशात त्यांची शिखरे सोन्याची टोपणे असल्यासारखी दिसत तर रात्रीच्या चंद्रप्रकाशांत चांदीचा द्रव करून शिंपडल्यासारखी दिसत. प.पू. अप्पा तेथे पोचले. केदारनाथाचे जवळून दर्शन झाले व अप्पांचा आनंद गगनात मावेना. केदारनाथाच्या स्तोत्रात ते म्हणतात–

**''पूर्वजन्मकृत भाग्यें झाले दर्शन पावन आज मला ।**
**सार्थकता जीवनी लाभली धन्य देह हा मज गमला ।।**
**सर्व विरोधा सोसुन जणु का कृपे तुझ्या जिंकिले रणा ।**
**केदारेश्वर जय शिव शंकर वंदन भावे तव चरणा ।।**

'देवा? माझी कांही पूर्वजन्माची भाग्याची कमाई होती म्हणून तुझे दर्शन झाले असे वाटते, जीवन कृतार्थ झाले. वाटेत येणाऱ्या अडथळ्यांच्या शर्यतीला पार करून येथे येऊन पोचलो। जणू एखादे युद्ध जिंकून विजयच मिळाला. शंकरा! तुमचा जयजयकार असो.!

चारी धामांमध्ये केदारनाथाचा रस्ता थोडा अवघडच म्हटले तरी चालेल. एकीकडे उंचच्या उंच कडे व दुसऱ्या बाजूला पाताळलोकाचे दर्शन करविणाऱ्या खोल दऱ्या. अप्पा देवालाच विचारतात की, तुम्हाला एकांताची आवड आहे म्हणून, कोणी जवळ येऊ नये याकरिता अशा अवघड ठिकाणी येऊन बसलात का? पण एक निश्चित आहे की, आई लेकराला बागुलबुवाची भिती दाखविते पण भीति दाखविणाऱ्या आईजवळ जाऊ नये असे लेकराला वाटत नाही, ते त्या आईच्याच गळ्यात पडते. विजयादशमीला अप्पा केदारनाथला होते. त्यामुळे खऱ्या अर्थाने त्यांचे सीमोल्लंघन घडले, म्हणून ते केदारनाथाला म्हणतात–

**प्रारब्धाची सीमा देहा बुद्धि तिला परि माने ना ।**

प्रारब्धाने हा देह मिळाला पण बुद्धीने देहविचारापुरते मर्यादित न राहता व्यापक बनावे व उच्च ध्येयाचा विचार करावा. जेणेकरून तिचेही सीमोल्लंघन घडेल. मात्रावृत्तांतील केदारेश्वराचे हे स्तोत्र विशिष्ट गेयतेमुळे सर्वांनाच खूप आवडते.

बदरिनाथ येथील पद्मासनस्थ नारायणाला अप्पा म्हणतात–

**गिरीवर पुरीत वा नतजन–प्रिया डाकुरी ।**
**विसावरति आठहि उलटुनि युगे पंढरी ।।**

**उभा सतत राहसी कुणी म्हणे न तेथे बसा ।**
**निवांत म्हणुनी इथे बसुन राहसी का असा ।।**

भाषेतून जवळिक कशी साधता येते ते यावरून दिसून येते. प.पू.अप्पांनी या स्तोत्रांत स्वत:तल्या उणीवा प्रामाणिकपणे नारायणापुढे मांडल्या आहेत. आणि तरीही साक्षात् दर्शनाचा हट्ट बोलून दाखविला आहे. इंद्राच्या गर्वहरणासाठी तुम्ही उर्वशीला निर्मिले. ते कार्य झाले तरी ती उर्वशी म्हणजे उपभोगप्रवृत्ति अजूनही लोकांना विमोहित करते. आणि त्यामुळे तुझ्यापर्यंत येऊन पोचण्यासाठी आवश्यक असलेला संयम राहू शकत नाही.

देवा! मोह निर्माण करणाऱ्या गोष्टी तुम्हीच निर्माण करता. तुमच्यापर्यंत येऊ नये म्हणून मोहक वस्तूंचे आकर्षण निर्माण करून ठेवता. त्यांच्या स्वीकाराने आम्ही घसरलो की, आमचा तिरस्कार करता हे कसे चालावे? शास्त्रादि आदेशाप्रमाणे वर्तन घडत नाही. शमदमादिषट्क संपत्ति आमच्यापासून फटकूनच राहते. पण तुम्हीच दया दाखवून माझे मन मोठे केलेत. आता वृत्तींना संयम येण्यासाठी सहाय्य करा ना! सद्गुरूंच्या कृपेचा पोसणा असलेला मी त्या बळावर तर इथवर येऊन पोचलो. मला मिळालेले संसारसुख, मिळालेला लौकिक पुरेसा आहे. त्यातले काही मी मागणार नाही. आता तरी तुम्ही दुर्लक्ष करू नका. लोक मला चांगले म्हणतात- खरेच आहे ते! तुझ्याविषयी हृदयात प्रेम आहे पण नारदांनी म्हटल्याप्रमाणे परमप्रेम नाही. तुझे भजन-कीर्तन करावे हे लोकांसाठी नाही खरोखरीच मला मनापासून आवड आहे. त्यांत माझेच कल्याण आहे ही माझी प्रामाणिक भावना आहे. देवा! या सगळ्याच्या माध्यमातून अर्धे पाणी- अर्धे दूध मिसळलेले असे बोंडल्याने किती दिवस पीत राहू. केव्हातरी मऊ भाताचा का होईना घास भरविणार की नाही? मला माहीत आहे की मी लडिवाळ भक्तीने तुम्हाला प्रसन्न करणारा नामदेव नाही. आपल्या नि:सीम वैराग्याने तुम्हाला लक्ष देण्यास भाग पाडील असा तुकारामही नाही. पण देवा! माझा हट्ट पुरविण्यासाठी दुसरीकडे कोठे जाऊ ते सांगा ना! कारण मला माहित आहे ''**गरुड भरारी ज्या आकाशी । तेथ जशी का उडते माशी।।**'' आई मुलाला चालायला शिकविताना कसा धडपडत चालतो आहे म्हणून कौतुकाने पाहते पण धप्पदिशी पडल्यावर चटकन् उचलून घेते. देवा! असे तुम्ही कधीतरी केलेत का सांगा बरे? सर्व संतजन तुम्हांला माऊली म्हणतात- मी धडपडतो, आक्रोश करतो, भयामुळे आता कसे होईल असे वाटते. दु:खी-कष्टी झालेला मी तुझ्या नावाने टाहो फोडतो आहे पण तुझ्या माऊलीपणाचा प्रत्यय मला का नाही येत?

या स्तोत्रामध्ये व्याकुळतेचा चढता क्रम असल्याचे आपणास जाणवते. श्रीनारदांनी सांगितलेली परमव्याकुळता ती हीच. खरे म्हणजे हे स्तोत्र, ही प्रार्थना मुळातून वाचावयास हवी. माझ्यासारख्या तोटक्या शब्दाने कसे वर्णन करणार?

कल्पेश्वर हे स्थान बदरिनाथला जाणाऱ्या रस्त्यावरील हेलंग गावापासून १५ कि.मी. अंतरावर आहे. तेथे महादेवाचे सुंदर मंदीर आहे. तेथे एक कापालिक होता. गावांतल्या लोकांनी अप्पांना त्या मंदिरात जाऊ नका. तो कापालिक तुम्हाला काहीतरी करील. अशी भिती घातली पण अभय हे दैवीसंपत्तीचे लक्षण प.पू. अप्पांच्यामध्ये पुरेपूर भरलेलं असल्याने त्यांनी त्या सूचनांकडे दुर्लक्ष केले व सरळ महादेवापाशी बसून श्रीविष्णुसहस्रनाम मोठ्याने म्हटले. त्या कापालिकाने वाकडी मान करून, भुवया उंचावून आप्पांच्याकडे पाहिले व तो मंदिरातून निघून गेला. बाहेरच्या लोकांना हायसे वाटले. पाठ संपला आणि अप्पांना ''भावाने नमितो अनंत, मजसी सांभाळ कल्पेश्वरा'' असे स्तोत्र स्फुरले. खरोखरीच आपल्याला कांही शब्दांचे अर्थ कोश उघडल्यावाचून समजत नाहीत. असे शब्द प.पू. अप्पांना कसे स्फुरत असतील बरे! असे निश्चितच वाटून जाते. शशांकधरभूषणा, द्विरदचर्मवासा ही शंकरांना दिलेली विशेषणे संस्कृतोद्भवच वाटतात. इंद्रधनुष्याला अप्पा शचिपतिशरासन म्हणतात. तेव्हा त्यांच्या बुद्धीतील शब्दकोशाने निश्चितच थक्क व्हायला होते.

नेपाळमधील मुक्तिनाथ मंदिरात केलेले स्तोत्र, वंशीनारायण मंदिराच्या परिसरात मुरलीधराला घातलेली भावात्मक साद, जयमानस मानसतापहरा काव्याने मानससरोवराचे केलेले स्तवन अशी कितीतरी स्तवने त्यांच्या भावार्चना या काव्यसंग्रहात आढळतात.

मानसातील निळ्याशार पाण्याचे वर्णन करताना प.पू.अप्पा म्हणतात-

**बहुनील सुनील नभाहुन हा । जलवर्ण कसा जणुं मास सहा ।**
**व्रजनंदन न्हाणित पूर्णशशी । किरणें निज संचित तीच अशी ।।**

किती रम्य कल्पना ना! रासक्रीडेच्यावेळी सहा महिन्याची रात्र झाली होती, असे भागवतात वर्णन आहे. शरदऋतूतील पूर्णिमेची रात्र, त्यामुळे टिपूर चांदणे पडलेले, ते चांदणे भगवंताच्या अंगावरून ओघळते आहे. नीलवर्ण कृष्णाच्या अंगावरून ओघळलेल्या चांदण्याचा जणू या निळ्याशार मानसाच्या पाण्याच्या रूपाने साठा झाला आहे असे वाटते. उत्कटतेचा व प्रतिभेचा परमोत्कर्ष या कल्पनेने साकार झाल्याचे जाणवते. पुढे ते म्हणतात-

**उदधीसम विस्तृत पावनता । रव नीरवते सुखवी जगता**
**करि जागृत सत्त्वगुणा अमिता । मद-मत्सर या नुरते क्षमता**

या मानस सरोवराचा विस्तार किती? एखाद्या समुद्राइतका आणि येथील निरव शांततेलाही विशिष्ट ध्वनी आहे की ज्यामुळे मद-मत्सरादि विकारांना थारा नुरुन सत्त्वगुणांचाच उद्रेक होत जातो. शांततेलाही एक ध्वनि असतो हे आपल्याला कसे कळणार? अशा पुष्कळ संकल्पना प.पू.अप्पांच्या स्तोत्रवाङ्मयात आढळून येतात.

**भजनात कधी प्रियता प्रगटे । कधि चित्तलयी उपमा उमटे ।।**
**नयनांत कधी प्रतिबिंब वसे । मज सर्व इथे मिसळून दिसे ।।**

अधिकारी साधकच या शब्दांना जाणू शकेल. साधक जेव्हा साधना म्हणून भजन करीत असेल त्या प्रत्येक वेळी त्याचे प्रेम उचंबळून येतच असेल असे नाही. म्हणून अप्पांनी 'कधी' शब्द वापरला आहे. श्रीतुकाराम महाराजांनी एके ठिकाणी म्हटले आहे की, 'सकळ कळा शिको येती । प्रेम नाही कवणा हाती ।।'' म्हणून तर समर्थांनी 'दे रे राम' या पालुपदाने असणाऱ्या पदामध्ये 'तुझी आवडी दे रे राम'' असे मागणे मागितले आहे.

ध्यानामध्ये साधक जेव्हा समोरच्या प्रतीकाशिवाय काहीही दिसत नाही जणु पाहणाराही त्यात विरघळून जातो पण अशावेळीही माझे हे प्रतीक कशासारखे आहे? असा श्रेष्ठतेच्या दृष्टीने प्रश्न निर्माण होत असेल तर 'ते त्याच्यासारखेच' असे उत्तर मिळून उठलेली लाट त्याला शांत करीत असेल. साधकाच्या जीवनामध्ये कधी असेही होत असेल.

ध्यानाचे वेळी प्रतीकावर एकाग्रता साधण्यासाठी काही वेळ डोळ्यांनी नेत्रसुख अनुभवित असतानाच केव्हा डोळे मिटले जातील व मिटल्या नेत्रामध्ये प्रतीक दिसू लागेल अशीही अवस्था साधक कधी अनुभवित असेल. प.पू. अप्पा म्हणतात- या सर्व अवस्थांचा अनुभव मी 'मानसाच्या' सान्निध्यात घेतला आहे. मानसाचे स्तुतिस्तोत्र गाऊन झाल्यानंतर शेवटी अप्पा म्हणतात,

**वरचेवर ही अनुभूति मिळो ।**
**स्थिति लाभत जी नच ती वितळो ।**
**परमेशपदी मम जीव वसो ।**
**नित तेथ अनंत वसंत असो ।।**

परमेश्वरचरणी जडलेल्या वृत्तीला भरती-ओहोटी नको. तेथे नेहमी वसंत ऋतूच असो म्हणजे ती वृत्ती तेथेच बहरलेली - 'प्रतिक्षणं वर्धमाना' अशी नारदांनी वर्णन केल्याप्रमाणे राहो. विलक्षण शब्दयोजना एवढेच आपण म्हणू शकतो.

स्तुतिस्तोत्र गातागाताच अप्पा स्वत:च्या अलौकिक अवस्थेचेहि वर्णन करून जातात. काही वेळा भगवंताच्या दिव्यत्वाच्या साक्षात्काराने प्रसन्न झालेले, निर्विकार झालेले अप्पा वर्णन करतात-

**प्रेम्णा स्वभक्तजनवांछित पूरणाय ।**
**संदर्शितात्मवपुषे नतवत्सलाय ।।**
**स्निग्धप्रसन्नहसिताय हितोत्तमाय ।**
**नारायणाय बदरीपतये नमोऽस्तु ।।**

बदरीनाथ येथे नारायणावर स्तुतिसुमने उधळता उधळता अप्पा जणू स्वत:चा अनुभव सांगतात की प्रेमाने स्वत:च्या भक्तांचे इच्छित पूर्ण करणाऱ्या, शरणागताला वत्सलतेने स्वत:च्या रूपाचे दर्शन करविणाऱ्या, प्रेमळ, प्रसन्न, हसतमुख, उत्तमहितस्वरूप असणाऱ्या बदरीपती नारायणाला मी नमस्कार करतो.

**स्पर्शेन दिव्यमृदुना करनीरजस्य ।**
**संवर्धनाय चरणानतभाग्यराशेः ।।**
**संजीवकाय जनकाय च पालकाय ।**
**नारायणाय बदरीपतये नमोऽस्तु ।।**

आपल्या मृदुल कमलाप्रमाणे असणाऱ्या हस्तस्पर्शाने ज्यांनी चरणावर नम्र झालेल्याचे भाग्य वृद्धिंगत केले आहे. ज्याने जन्म दिलाच, पालनपोषण करून संजीवन- तेजस्वितahि दिली अशा बदरीपति नारायणाला मी नमस्कार करतो. भगवंताचे गुणानुवाद गाण्याचा, त्याचे स्तुति-स्तोत्र रचण्याचा किती उत्कट परिणाम अप्पांनी साधलेला आहे ते त्या संस्कृत स्तोत्रांतून दिसून येते.

१९८६ साली हिमालयातील चंबाजवळील कदूरवाळ येथील प्रसिद्ध देवी 'सुरकंडामाता' हिच्या दर्शनासाठी गेले. 'या देवी सर्वभूतेषु मातृरूपेण-शक्तिरुपेण- आत्मरुपेण संस्थिता। नमस्तस्यै नमस्तस्यै नमस्तस्यै नमोनम:।।'' असे जिचे वर्णन केले जाते तिची स्तुती करून अप्पा तिला मागणे मागतात-

**गंगातीरे देहयात्रां समाप्तिं यातु निरुजा ।**
**एतावती ममाकांक्षा सुरकंदनिवासिनी ।।**

हे सुरकंडामाय! शरीराची आरोग्यसंपन्न अशी अवस्था असतानाच गंगामैय्याच्या तीरावर देहयात्रा सांग व्हावी अशी उत्कट इच्छा आहे.

एखाद्याशी जवळीक निर्माण झाली की, आपण आपल्या मनातले त्याच्याशी सहज बोलून जातो. तसे प.पू. अप्पांचे झाले होते.

श्रीपांडुरंग स्तोत्र, रुक्मिणी स्तोत्र, श्रीशंकराचार्य स्तोत्र, श्रीज्ञानेश्वर-तुकाराम-नामदेव-साईबाबा इत्यादी संतांची स्तोत्रे, वामनशास्त्री व श्रीदासगणूमहाराज यांची स्तोत्रे संस्कृत असली तरी भाषेचे अवघडपण त्यात नाही. ज्याला थोडे संस्कृत कळते त्यांना सहज त्या स्तोत्राचा अर्थ कळून जातो.

श्रीरुक्मिणी स्तोत्रांचे पदलालित्य तर श्रीशंकराचार्य रचित स्तोत्रांची आठवण करून देते.

श्रीशंकराचार्य स्तोत्रामध्ये त्यांचे संपूर्ण चरित्र, त्यांचे कार्य यांची पूर्ण ओळख होऊन जाते. लघुसंदेश पदा वाणी कशी असावी त्याचेच हे उदाहरण म्हणता येईल, वयाच्या २०व्या वर्षी अशी रचना साधणे यांत दैवी अंशच प्रामुख्याने म्हणता येईल. शृंगेरीला पहिले शिबिर झाले त्यावेळी शृंगेरी पीठाधीश आचार्य गुरुस्वामी यांनी या स्तोत्राविषयी कौतुकौद्गार काढून प.पू. अप्पांचा भरजरी शाल देऊन सत्कारही केला.

**सद्‌गुरुं सच्चिदानंदं केवलं करुणाकरं ।**
**ज्ञानयोगेश्वरं वन्दे ज्ञानदेवं पुनः पुनः ।।**
**निवृत्तिमार्गिणो मुक्तिः सोपान सुलभाकृता ।**
**कृपया यस्य तं वन्दे ज्ञानदेवं पुनः पुनः ।।**

श्रीज्ञानेश्वरांची स्तुती करता करतां प.पू. अप्पांनी त्यांच्या तीनही भावंडांची नावे मोठ्या खुबीने श्लोकात गोवली आहेत- ज्यांच्या कृपेने निवृत्ती मार्गाने मिळणाऱ्या मुक्ती सोपान जिना-पायऱ्या प्राप्त झाल्यामुळे सुलभ झाली त्या ज्ञानदेवांना मी पुन: पुन्हा नमस्कार करतो.

प.पू. अप्पा या पंधरा श्लोकांच्या स्तोत्रामध्ये माऊलीचे कर्तृत्व, वत्सलता, सदयता, सामर्थ्य, त्यांची वाणी, त्यांची दृष्टी, त्यांचे आसन या सर्वांचे यथास्थित वर्णन करतात की, त्यामुळे श्रीज्ञानेश्वरांची एक शांत तेजस्वी मूर्ती आपल्यापुढे उभी राहते. 'ज्ञानदेवं पुनः पुनः' या पालुपदाने हे स्तोत्र कंठस्थ होण्यासही छान सहाय्य होते.

श्रीगोदास्तोत्र हे प.पू. अप्पांनी रचलेले वैशिष्ट्यपूर्ण स्तोत्र म्हणता येईल. २२ वृत्तांत केलेले हे संस्कृत गोदास्तोत्र संस्कृत वाङ्मयांत फार मोठी भर घालणारे आहे. प्रत्येक श्लोकांतून गोदावरी कशी श्रेष्ठ आहे याचेच प्रतिपादन अप्पांनी केले आहे. एका श्लोकात अप्पा म्हणतात-

**सर्वेषु वन्द्या श्रेष्ठा च गौतमि त्वं विराजसे ।**
**आत्मोद्धाराय तेनाहं स्तवनं कर्तुमुद्यऽतः ।।**

हे माय गोदावरी! तू सर्वांमध्ये श्रेष्ठ आहेस, वंद्य आहेस. म्हणून स्वत:च्या उद्धारासाठी मी तुझे स्तवन करतो आहे.

**तारयिष्यसि महावृजिनं मा पापहेति पदवीमनुमन्ये ।**
**उच्यते मृगमदस्य परीक्षा ह्युग्रगंधहरणेलशुनस्य ।।**

हे गोदावरी! माझ्यासारख्या पाप्याला तू जर तारून नेशील तर 'पापहारक' ही तुझी पदवी सार्थ ठरेल. जसे कस्तुरीची परीक्षा लसणीचा उग्र वास नाहीसा होण्याने होते.

कोणीही भाविक कोणत्याही देवतेची पूजा आपल्या घरी बसून करतो आणि 'सर्वेऽत्र सुखिन: सन्तु सर्वे सन्तु निरामया:' अशी प्रार्थना पूजेच्या शेवटी करतो ही आमची वैदिक संस्कृती आहे. ही आमची हिंदू संस्कृती आहे. प.पू. अप्पाही गोदावरीचे स्तवन २२ श्लोकांमध्ये करतात आणि '**देवा राष्ट्रस्य गुप्त्यै श्रुतिवचनमिदं किं नहि प्रत्ययाय । राष्ट्रे स्वातंत्र्यहीने स्मृतिगतविभवे शत्रुभीत्याऽऽकुलेस्मिन् ।।**'' असे राष्ट्रासाठी तळमळून विचारतात.

मर्यादित लेखनसीमेत किती स्तोत्रांचा, किती विचार करणार, भाविकांनी ती सर्व स्तोत्रे मुळातूनच पहावीत. अनेक ज्येष्ठांनी म्हटल्याप्रमाणे प.पू. अप्पांच्या स्तोत्रवाङ्मयांत आचाराचे वर्म आहे, विचारांचे मर्म आहे आणि या स्तोत्रांच्या चिंतनात राहणे हा साधकांचा धर्म आहे, इतकेच सांगून लेखणीला विराम देते.

१) भावार्चना– तृतीयावृत्ति : प्रकाशक– राधादामोदर प्रतिष्ठान, पुणे
२) सर्वांसवे श्रीहरि, श्रीदासगणू प्रतिष्ठान, गोरटे

– **कु. गार्गी (वसुमती) देशपांडे**
श्रीदासगणू प्रतिष्ठान गोरटे, जि. नांदेड
फोन : (०२४६७) २०२५१४, मो. ९४२१९०१०९८



# भावार्चना

**सौ. वसुधा देशपांडे**

एम.ए., संस्कृत, गृहिणी. प.पू.अप्पांची नात, अप्पांच्या पूर्ण समर्पित एकनिष्ठ शिष्याची, भक्ताची कन्या,. पू. अप्पांच्या एकनिष्ठ शिष्याची पत्नी असा अनोखी त्रिवेणी संगम अनुभवण्याचे परमभाग्य लाभलेली एक सामान्य स्त्री.

भावार्चना! अंत:करणातील विशुद्ध, उत्कट, प्रामाणिक, कोमल भावांनी केलेली अर्चना! ह्दयातील आर्त, सुकोमल, समर्पित भावांनी केलेली परमेश्वराची अर्चना! देशप्रेमाने ओथंबलेल्या प्रखर देशभक्ताने केलेली पितृभू, पुण्यभू भारतभूची अर्चना! थोर संतांनी मनुष्यजातीवर केलेल्या अनंत उपकारांची पूर्ण जाणीव असलेल्या, संतांना, सद्गुरूंना शरण गेलेल्या अनंत ह्दयातील, चिंतनशील मनातील सात्त्विक भावांनी केलेली ही परमेश्वराची, भारतमातेची, संतांच्या मांदियाळीची षोडशोपचार अर्चना आहे.

'भावार्चना' या काव्यग्रंथाच्या वाचनाने प.पू.श्री.अ.दा.आठवले जे चतुर्थाश्रमी संन्यस्त स्वामी श्रीवरदानंदभारती झाले, ज्यांना सगळे प्रेमादाराने 'अप्पा' असे संबोधित त्या महापुरुषाच्या, महाकवीच्या भावविश्वाची ओळख आपल्याला निश्चितपणे होते. अत्युत्कट परमसीमेला पोचलेले त्यांचे अंतरंग, अंतरी चाललेले अविरत विचारमंथन, त्यातून उसळलेले भावामृत यांचा प्रत्ययकारी अनुभव 'भावार्चने'च्या वाचनाने, अभ्यासाने वाचकास येतो. उत्कट भावांचा सर्वोत्कृष्ट शब्दांमध्ये आविष्कार झालेला आपल्याला दिसून येतो. निखळ, प्रामाणिक, उत्कट भावांची अभिव्यक्ति पू. अप्पांच्या अद्वितीय भारदस्त भाषेत सहजपणे झाली आहे. आणि ती 'अमृतातेही पैजा जिंकी' अशा अवीट गोडीच्या, अर्थगर्भ शब्दांमध्ये झाली आहे.

'भावार्चना' हा पू. अप्पांच्या उत्कट भावाविष्काराने ओथंबणाऱ्या विविध मुक्तकांचा, विविध प्रसंगी अनुभविलेल्या विविध भावभावनांचे प्रकटीकरण करणाऱ्या, मुक्त कवितांचा संग्रह आहे. या मुक्त कवितांमधून प.पू.अप्पांच्या आत्मानुभवाची अभिव्यक्ति अत्यंत प्रभावी शब्दांमध्ये झाली आहे. भावांना भरते आले आहे. अव्याहतपणे खळाळणारी, उसळणारी भावगंगा अमृताचे तुषार उडवीत वाहते आहे. भावार्चनेतील एकेका कवितेतून पू.अप्पांच्या सहस्रपैलू व्यक्तिमत्त्वाचा एकेक पैलू आपल्यासमोर येतो. त्यांच्या भावनांची उत्तुंगता आणि विचारांची खोली आपल्या अनुभवास येते.

भावार्चनेच्या आरंभी पू.अप्पांनी पू.दासगणुमहाराज यांस केलेल्या विनम्र अभिवादनाची अर्पण कविता आहे. तीतून त्यांच्या निरहंकारीपणाची साक्ष पटते.

**'तुम्ही लाविल्या तुम्ही फुलविल्या रोपा आली फुले ।**
**तुम्हीच आता त्यांनी पुजा श्रीविठ्ठल पाऊले ।।'**

आज मी जो काही आहे ते पू.दादांनी मला तसा घडविले म्हणून आहे. मी आज जसा आहे त्यात माझे मोठेपण काहीच नाही. सद्गुरू पू.दादांनी साक्षेपाने फुलविलेल्या माझ्या भावरोपास बहर येणारच होता. तसा तो आला यात माझे काय कर्तृत्व! हे तर पू.दादांच्या कृपेचेच फळ आहे. तेव्हा दादा! माझ्या भावपुष्पांनी श्रीविठ्ठलाचे पूजनही तुम्हीच करा. माझी भावसुमने श्रीविठ्ठलचरणी अर्पण करा. 'अंतरीचे धावे स्वभावे बाहेरी' या न्यायाने पू. अप्पांची अंतर्वृत्तीच या श्लोकातून व्यक्त होते. पू. दादांनीच माझ्या ह्दयी ईशप्रेमाचे बीज पेरले. अंकुरलेल्या ईशप्रेमाच्या रोपाला अलोट प्रेम, वात्सल्याचे खतपाणी घालून त्याचे संगोपन केले, त्याला फुलविले आणि म्हणूनच त्या रोपाला भक्तिप्रेमाच्या फुलांचा बहर आला. पू.दादांबद्दल कृतज्ञतेची भावना व्यक्त करणाऱ्या, त्यातून त्यांचा अधिकार दाखवून देणाऱ्या या अप्रतिम श्लोकाने भावार्चनेची सुरुवात होते. पू.अप्पांच्या विचारांची बैठक काही वेगळीच आहे याची जाणीव आपणास होते.

ईशप्रेमाने ओथंबलेल्या अनेक भावकविता भावार्चनेत आहेत. श्रीविठ्ठल, श्रीनारायण, श्रीशंकर, श्रीकेदारेश्वर, श्रीअमरनाथ, श्रीबदरीनाथ, श्रीमुक्तिनाथ, श्रीराम, श्रीदत्तात्रेय, श्रीलक्ष्मी, श्रीशारदा अशा अनेक देवतांची स्तोत्रे, अष्टके, आरत्या यातून पू.अप्पांचे ईशप्रेमही फार वरच्या पातळीवर पोचलेले होते हे आपल्यास जाणवते. पू.श्रीशंकराचार्यांच्या तोडीचे असलेले त्यांचे रचनाकौशल्य आपल्यासमोर त्या त्या देवतेचे चित्र उभे करते. वाचताना आपण त्या स्तोत्रातील वर्ण्य देवतेशी, विषयाशी तदाकार होतो. तादात्म्याचा अनुभव घेतो.

**'पांडुरंग, जगदंतरंग, श्रीरंग भीमेच्या तटी ।**
**विट शोभत पदतळवटी ।**
**कर उभय धरियले कटी ।।**
**....कुंडलमंडित गंड खुले सुमखंड हिरा कीरिटी ।**
**केशरी शरीरा उटी ।**
**पदी रुळे भरजरी पटी ।।....**

श्रीपांडुरंगाचे असे तेजस्वी वर्णन ऐकून अंगावर रोमांच उभे राहतात. पांडुरंगाचे हे शब्दचित्र म्हणताना श्रीपांडुरंग अगदी अशाच रूपात डोळ्यांसमोर उभा राहतो. 'काय इथे सुखाला तुरी'चा अनुभव येतो.

**'पद्मासनाय मणिकुंडलशोभिताय। भास्वज्जटामुकुटमंडितमस्तकाय ध्यानस्थिताय सरसीरूहलोचनाय। विद्युत्प्रभायुतपयोधरसन्निभाय। मंदस्मितेन्दुवदनाय चतुर्भुजाय। नारायणाय बदरीपतये नमोस्तु ।।'**

बदरीपती श्रीनारायणाचे हे रूप वाचले की, मूर्ती डोळ्यांसमोर मूर्त होते. अष्टसात्विकभाव जागृत होतात. कृतार्थतेचे अश्रू दाटून येतात. श्रीवरदनारायणाचे हे दिव्य तेजस्वी रूप प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय त्याचे एवढे मोहक, समर्पक वर्णन करता येणे शक्य नाही. पू.अप्पांची परमेशभक्ती, नारायणाचा झालेला साक्षात्कार, हृदयी दाटून आलेला कृतार्थतेचा भाव या साऱ्यांचीच अभिव्यक्ती या स्तोत्रातून होते. पू.अप्पा हे ज्ञानी, जाणते भक्त आहेत याची साक्ष पटते.

**कर्पूरगौर, शशिसुंदर पुंडरीक।**
**रत्नोज्वल, स्फटिकशुभ्र, पय:प्रतीक ।।**
**सारी विशेषण यथार्थ करावयासी।**
**हा राहिला अमरनाथ हिमालयासी ।।**

श्रीअमरनाथ स्तोत्रातील नीलकंठ, अमरनाथ, शिवाचे वर्णन वाचले की आपल्याला अमरनाथाच्या गुहेत जाऊन प्रत्यक्ष अमरनाथाचे दर्शन घेतल्याचा दुर्मिळ आनंद लाभतो. देवतांची अशी रूपवर्णने वाचून आपल्याही वृत्ती शांत समाहित बनतात.

पू. अप्पांना लागलेली परमेश्वरदर्शनाची ओढ, त्यासाठी होत असलेली तळमळ, शिगेला पोचलेली उत्कटता, परमेशदर्शनाचा धरलेला हट्ट, कृपाळूपणे अल्प धारिष्ट पाहून परमेश्वराने दिलेले दर्शन, चहूहाते आपल्या प्रिय भक्तास दिलेले आलिंगन, हा सारा प्रवास भावार्चनेतील रचनांमधून व्यक्त होत जातो. पू.अप्पांच्या भावावस्थेचे एकेक पदर उलगडत जातात. प्रत्येक वाचनाबरोबर एकेक पैलू प्रकाशित होत जातो आणि आपले मस्तक आदराने विन्रम होते.

**'नारायणा नरहरे न करी उशीर।**
**आता नसे बळ मला धरण्यास धीर।**
**दे खावयास क्षणि शांतवी भूक माझी।**
**वाहू तयावीण कशी तरि सांग ओझी।**
**आता इथून परतेन न मी भुकेला।**
**ना त्राण अल्प उरले पद टाकण्याला।**
**येई दया कधी तरी तुझिया मनात।**
**राही इथे पसरूनी पदरा अनंत।'**

परमेशदर्शनासाठी व्याकूळ झालेल्या पू.अप्पांची ही स्थिती पाहून करुणावत्सल विठाईमाऊली धावली. आपल्या लेकरास पावली. नारायणाने, वरदाने आपला भक्त उरी धरला. यासमयी अनुभविलेली परमोच्च कृतार्थता पू.अप्पांनी व्यक्त केली–

**'धन्य जाहलो मी खरा धन्य जाहलो।**
**नारायणवरदकृपावर्षि नाहलो ।।**
**....सान्तहि हा अमर हो अनंतसंगमी।**
**चंचलता हृदयासी करित ना श्रमी।**
**तार्किक मी बुद्धीसह आज संपलो।**
**धन्य जाहलो मी खरा धन्य जाहलो ।।**

साक्षात्कारानंतर पू.अप्पांना प्राप्त झालेली उन्मनी, निश्चिंत, द्वंद्वातीत अवस्था व्यक्त करणाऱ्या अनेक कविता आहेत.

**'मस्ती या भक्तीची नांदे जयाठायी।**
**तोचि लोकत्रयी। भाग्यवंत।**
**उरी कंठी वाचे, नाम नारायण।**
**विषय होऊन। राहे तोचि ।।**

असे अभंग ज्ञानी भक्ताला प्राप्त झालेल्या बालोन्मत्त अवस्थेची साक्ष देणारे आहेत. पू.अप्पांनी साक्षेपाने क्रमिलेली सन्मार्गाची वाटचाल, त्यात होत गेलेली त्यांची प्रगती, त्यांनी गाठलेले एकेक शिखर हा सारा आलेख भावार्चनेतून उलगडतो. द्वंद्वातीत झालेल्या पू.अप्पांची वृत्ती व्यक्त करणाऱ्याही अनेक मुक्त कविता आहेत.

**योग्य अयोग्याचे संपलेसे वारे।**
**नावेसी या आता नुरे शीड किंवा सुकाणु ।।**

अथवा

**जनी वसे जनार्दन। त्यांत भला बुरा कोण।**
**नारायण कृपा केली। भ्रांति अनंताची गेली ।।**

अशी मुक्तके, अभंग पू.अप्पांनी प्रयत्नाने साध्य केलेली उन्मनी अवस्था प्रकट करतात. संसारात पूर्ण तृप्त असणारे पू.अप्पा भारतमातेची अवस्था पाहून मात्र व्यथित होत होते हे निश्चित. प्रत्येक स्तोत्रात त्यांनी देवतांना जे मागणे मागितले आहे ते मागणे, त्यांच्या मनातून भारतभूचा, देशहिताचा विचार कधीच गेला नाही हे स्पष्ट करणारे आहे....

**होवो वैभवशाली भारत पुन: जावो लया भीरुता।**
**येवो शौर्य करात, धैर्य हृदयी, बुद्धीत तेजस्विता ।।**
**घृष्णेशा गिरीजावरा तव पदी राहो सदा मन्मन।**
**मागेना गणुदासदास तुजशी कांहीच याच्याविण ।।**

वयाच्या विशी-पंचविशीत पू.अप्पांनी घृष्णेश्वराला हे मागितले होते. पुढे सिंधुस्नानाचे वेळी अनेक भाव हृदयी दाटले. पण सिंधूस मागणे मागताना मागितले ते भारतमातेसाठीच...

**सर्वांगाने दे आलिंगन भारतमातेला।**
**दिव्यरसायन हेच एक तत्क्षयकृशकायेला ।।**

भारतमातेची अवस्था पाहून संतापलेल्या पू.अप्पांनी जाब विचारला तो थेट श्रीत्रिपुरसुंदरीलाच –

**तुझ्यासमोरी प्रिय भूमि तव दुष्टांनी हरिली।**
**क्रुद्ध जिभेने आता कोणा भय दाविसी काली ।।**
**...अखंड भारत हिंदुत्वाच्या तेजे तळपावा।**
**दुष्टावा उन्मत्तपणासह सर्व नष्ट व्हावा ।।**

भक्त, ज्ञानी, देशभक्ताचा अधिकार दाखवून देणारे हे श्रीत्रिपुरसुंदरी आवाहन स्तोत्र आहे.

भारताच्या रूपात पू.अप्पांनी विश्वरूपदर्शन घेतले.

**'देश वेष नयादि येथ असे पुरे विविधाकृति ।**
**अन्नपानशरीरनासिक- नेत्रवर्णगिराकृति ।।**
**एक ना दुसऱ्यापरी परि आत ऐक्यच राहिले ।**
**भारते प्रिय दाविले मज विश्वरूपहि आगळे ।।**

अशा रचना पू.अप्पांचा स्वदेश-स्वधर्म-स्वसंस्कृति, स्वत्व यांचा सार्थ अभिमान खुलेपणाने दाखवून देतात.

पू.अप्पा या भारतमातेच्या संतांच्या मांदियाळीसमोर नतमस्तक होतात. आपल्या अक्षुण्ण, अनाहत संतपरंपरेचा, त्यांच्या कार्याचा, त्यांना असलेल्या समाजहिताच्या कळकळीचा, करुणेचा, विरक्तीचा पू.अप्पांना अभिमान होता. संत आणि सद्गुरू हे त्यांच्यासाठी परब्रह्ममूर्तीच होते. श्रीशंकराचार्य स्तवन, श्रीज्ञानेश्वराष्टक, श्रीतुकारामाष्टक, श्रीसरस्वतीतीर्थ नमन, श्रीगुरूगजाननाष्टक, श्रीसद्गुरूवन्दन अशा विविध भावकवितांमधून, भावरचनांमधून त्यांचा हा अभिमान, संतश्रेष्ठांसमोर त्यांनी दाखविलेली नम्रता- विनय असे पैलू प्रकाशित होतात.

**'संत थोर साक्षात्कारी । त्यांची वचने मी आदरी ।।'**
**'....चारित्र्ये शुचि जान्हवीसम जनी आदर्श केला उभा ।**
**संतांच्या नित आदरे नमित मी त्या पाऊलासी शुभा ।।'**

अशा रचनांमधून पू.अप्पांनी संतश्रेष्ठांबद्दल जो आदरभाव दाखविला आहे, जी विनम्रता दाखविली आहे ती शब्दांतून व्यक्त करता येणे शक्य नाही....आपण या रचना वाचाव्या आणि डोळे मिटून, नतमस्तक होऊन या संतजनांचे स्मरण करावे...एवढेच आपल्या हाती आहे.

सद्गुरू श्रीदासगणुमहाराजांना (पू.दादांना) वन्दन करताना पू. अप्पा म्हणतात-

**'सन्मार्गदीपकं नाथं प्रसन्नं पावनं शुभम् ।**
**अनंतवरदं नित्यं वन्दे दासगणुं गुरूम् ।।**

एकदा हातात घेतला की, खाली ठेवावासा वाटत नाही असा हा मुक्तकाव्य भावकाव्य संग्रह आहे. भाविक, ज्ञानी, विचारवंत, साहित्यिक, रसज्ञ, देशभक्त अशा सगळ्यांना सारखेच प्रभावित करणारा हा काव्यसंग्रह आहे. शब्दार्थ, अर्थ, अन्वयार्थ, ध्वन्यार्थ, गर्भितार्थ आणि त्या काव्याचा गाभा अशा चढत्या क्रमाने समजून घेत वाचले असता, अभ्यासले असता प्रत्येक वेळी नवीन अनुभव देणाऱ्या काव्याचा संग्रह आहे भावार्चना! शब्दांचे सौंदर्य, अर्थाचे सौंदर्य, रचनेचे लावण्य आणि बावनकशी चोखपणा अशा वैशिष्ट्यांनी सजलेला अलौकिक अलंकार आहे भावार्चना!

आपण आपल्या पूर्ण सामर्थ्यानिशी या भावार्चनेचे वाचन करू, चिंतन करू, आचरण करू. महाराष्ट्र शारदा आपल्यावर कृपा करून अक्षय आनंदाचे वरदान आपणास देईल. 'आनंदाचे डोही आनंदतरंग'चा अनुभव आपणास येईल. अनंताची ही काव्यानंदगंगा भावांचे तुषार आपल्यावरही उडवील. आनंदाच्या अनंतवर्षावात न्हाऊन आपण कृतार्थ होऊन जाऊ. अमृताच्या अनंतवर्षावात संजीवन अनुभवू. अशी अजोड, अद्वितीय भावार्चना वाचण्याची संधी दिली म्हणून श्रीनारायण चरणी नतमस्तक होऊ.

पू. अप्पांनीच म्हटले आहे-

**'मी म्हणजे ना शरीर । मी मद्ग्रंथाचा संभार ।''**

भावार्चनेच्या स्वरूपातील पू.अप्पांच्या सहवासात आपण त्यांच्याच मार्गदर्शनाखाली आपले कल्याण साधू.

।। वन्दे वरदानन्दं ।।

**सौ. वसुधा देशपांडे**
1st, Block 6C Alps Estates, Sarjpaur, Main Road,
Kaikondrahalli, Banglore - 560035.
Mob. : 9663119937

•••

**मना जोंवरी स्वास्थ्य आहे तनूचें ।**
**घडे तोंवरी ध्यान या राघवाचें ।।**
**तिची बळकटी रामकार्यास लावी ।**
**अनीतीमधें ना कदा झीजवावी ।।**



# श्री नारदभक्तिसूत्र – दर्शिनी व विराण्या – एक चिंतन

**सौ. मीरा श्रीकृष्ण शेंडगे**

एम.ए., बी.एड्. (इंग्रजी)
प्राध्यापिका, यशवंत महाविद्यालय, नांदेड
श्रीदासगणू महाराज परंपरेतील कीर्तन, प्रवचन सेवा, आध्यात्मिक विषयांवर लेखनसेवा.

**मोडोनिया वाटा सूक्ष्म दुस्तर । केला राज्यभार चाले ऐसा।**

माणसाला आपले परमात्मप्राप्तीचे ध्येय सुलभतेने गाठता यावे यासाठी संतांनी भक्तीचा राजमार्ग तयार केला. वास्तविक, भक्तीचे बीज वेदातच होते. या सूक्ष्म बीजरूप भक्तीला संतांनी आपल्या निष्ठेचे, प्रेमाचे, पावित्र्याचे, निष्कामतेचे खतपाणी घालून त्याला महान वृक्ष बनविला. स्वभावत: 'भजनशील' असणाऱ्या मनुष्याने या वृक्षतळी येऊन श्रमपरिहार करावा व फलपुष्पांच्या आस्वादाने अवीट आनंद उपभोगावा हा त्यांचा उद्देश होता.

पण मनुष्य असा चमत्कारिक प्राणी आहे की कितीही चांगली वस्तू त्याच्या हातात दिली तरी स्वार्थापायी तो तिला विकृत करून ठेवतो. भक्तीसारख्या श्रेष्ठ वस्तूलाही त्याने याचप्रकारे हीन बनविण्याचा प्रयत्न केला. भक्तिमार्गात मतमतांचा गलबला निर्माण झाला. परिणामी, भक्तीच्या आत्यंतिक प्रयोजनाचा विसर पडून आर्त व अर्थार्थी भक्तांची संख्या वाढू लागली. खऱ्या भक्तीचे स्वरूप व प्रयोजन दृष्टीआड केले जाऊ लागले. म्हणूनच भक्तीचा आत्यंतिक जिव्हाळा असणाऱ्या श्री.तुकाराम महाराजांनाही **''भजन ते ओंगळवाणे । नरका जाणे चुकेना।''** असे म्हणावे लागले. श्री दासगणू महाराजही त्यांच्या एका पदात, **''तेच म्हणावे भजन हरीचे । जे नुरवी कलिमला। इतर जणू बाजारचा गलबला।''** असे म्हणतात ते याच हेतूने.

भक्तीमध्ये दंभाचार शिरू नये, भक्तीचे नेमके व यथार्थ स्वरूप सर्वांना कळावे, कारण अशाच भक्तीचा आविष्कार आत्मोद्धारासाठी अपेक्षित आहे, हे जाणून थोर थोर संतमहर्षींनी भक्तीचे शास्त्र बनविले. कारण शास्त्राच्या नीतिनियमात वंचना होण्याची शक्यता बरीच उणावते. आजवर अशी अनेक शास्त्रे जन्माला आली आहेत. भक्तिशास्त्रेही पुष्कळ आहेत, पण या सर्वांमध्ये 'नारदभक्तिसूत्रे' ही विशेषत: प्रसिद्ध आहेत. म्हणूनच भक्तिशास्त्रात आजही ती महत्त्वाची व प्रमाणभूत मानली जातात.

सृष्टिकर्त्या ब्रह्माजीचे मानसपुत्र असणारे नारद, भगवान् नारायणाचे अनन्य भक्त होते. भक्तिप्रचार हा त्यांच्या जीवनाचा स्थायीभावच असल्याने या क्षेत्रात त्यांच्याएवढा अधिकारी पुरुष सापडणे शक्य नाही. भक्तिसूत्रातील अवघ्या ८४ सूत्रांमधून ते भक्तीचे यथार्थ स्वरूप व माहात्म्य आपल्यासमोर शास्त्रीय स्वरूपात मांडतात.

श्री नारदांच्या मते भक्ती हा श्रेष्ठ प्रेमाचा सर्वश्रेष्ठ अविष्कार आहे. म्हणूनच भक्तिसूत्रांच्या प्रारंभीच ''अथातो भक्तिं व्याख्यास्याम:।'' (आता आम्ही भक्तीचे व्याख्यान करीत आहोत). अशी प्रतिज्ञा करून ''सा त्वस्मिन परमप्रेरूपा'' अशी भक्तीची व्याख्या ते करतात. भक्तीमध्ये उपचार किंवा क्रिया नको किंवा नसते असे नाही, पण त्याच्या मुळाशी जे प्रेम, जो भाव असतो त्याला नारदमहर्षी सर्वाधिक महत्त्व देतात. तसेच हे प्रेमही सामान्य असून भागत नाही तर परमप्रेम पाहिजे. श्री नारद भक्तिसूत्रातील हा मध्यवर्ती सिद्धांत म्हणावा लागेल.

कोणत्याही विषयाचा, स्वरूप साधन व फल अशा तीन प्रकारे विचार करण्याची विद्वानांची पद्धत आहे. या सूत्रांतूनही या तिन्ही गोष्टींचा नि:संदिग्ध विचार नारदमहर्षींनी केला आहे. त्यानुसार भगवद्भक्ति – प्रेमाची व्याख्या, भक्तीचे स्वरूप, तिचा प्रभाव, भक्तीमधील अनन्यता, अनन्य भक्ताचा आचार, भक्ती दृढ झाल्याची लक्षणे, गोपिकांचे या संदर्भात उदाहरण, इतर साधनांपेक्षा भक्तीचे श्रेष्ठत्व, त्याची कारणे, भक्तीचे सुलभत्व, भक्तीच्या प्राप्तीसाठी निषेधात्मक व विधायक कर्तव्ये, एकनिष्ठ भक्तांचे श्रेष्ठत्व, त्यांच्याद्वारे होणारे कार्य, भक्तीविषयक अन्य आचार्यांची मते, एकाच भक्तीचे अनेक प्रकार, भक्तीची परंपरा व फल अशा सर्व अंगांनी भक्तीचा विचार या सूत्रांमधून आलेला दिसतो. वेदांतशास्त्राशी व संतवाङ्मयाशी जवळीक साधणारी ही सूत्रे अतिशय सारगर्भ, मार्मिक व रसाळ आहेत.

नारदभक्तिसूत्रावर स्वामी वरदानंद भारतींनी (पूर्वाश्रमीचे श्री. अ. दा. आठवले) 'श्री नारदभक्तिसूत्र–दर्शनी' ही ओवीबद्ध टीका लिहिली आहे. उपक्रम व उपसंहार वगळता जवळपास ८४ ओव्यांचे हे भाष्य मूळ सूत्रांच्या प्रसादमयतेला शोभेल असेच रसाळ झाले आहे. शास्त्रकार सूत्राची व्याख्या करतात,

**अल्पाक्षरमसन्दिग्धं सारवद्विश्वतोमुखम्।**
**अस्तोभमनवद्यं च सूत्रं सूत्रविदो विदु:।।**

सूत्ररचनेत अक्षरे थोडी असावी, ती असंदिग्ध असावीत. सूत्रे सारस्वरूप असावीत. अल्पशब्दातून अर्थही पुष्कळ निर्माण व्हावा, सूत्राची रचना निर्दोष असावी व त्यातील कोणतेही अक्षर निरर्थक नसावे. सूत्राची ही सर्वच लक्षणे दर्शिनीत प्रकर्षाने प्रगट होताना दिसतात व सूत्ररचना केवळ संस्कृतातच नव्हे तर मराठीतही होऊ शकते याचे प्रत्यंतर

येते. भक्तिसूत्रावर भाष्य करण्याचा हेतू कथन करताना स्वामी वरदानंद भारती उपक्रमात म्हणतात,

**सूत्रमय संस्कृतात । भक्तीचे स्वरूप असे ग्रथित ।**
**ते तसेच मराठीत । आणितो सुलभ बोधास्तव।**
**असावा आपुला आशीर्वाद । तेणे कार्य होईल सिद्ध।**
**जीव जे का भवपाशबद्ध । तेही मार्गी लागतील।। द.३-४**

सद्‌गुरु व परमेश्वरचरणी लीन होऊन, भवपाशबद्ध जीवांना तारण्याच्या उदात्त हेतूने हाती घेतलेल्या कार्याला श्री शारदेचा कृपाशीर्वाद व प्रसाद न लाभेल तरच नवल! सूत्रमय संस्कृतात असलेले परमप्रेमरूपी भक्तीचे अमृतमय स्वरूप स्वामीजी 'दर्शिनीत' सर्वसामान्यांना खुले करून ठेवतात. ज्यातून कुणालाही आपलं कल्याण सहज साधता यावे. गीतेच्या ११ व्या अध्यायावर भाष्य करताना श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात,

**''तीरे संस्कृताची गहने । तोडोनि मऱ्हाटीया शब्दसोपाने।**
**रचिली धर्मनिधाने। श्री निवृत्तिदेवे।।'' ११।९**

इथेही मराठी भाषारूपी पायऱ्यांचे सोपे घाट करून स्वामीजी भक्तिसूत्ररूपी तीर्थापर्यंत साधकांना नेतात.

मूळ गाभ्याला थोडाही धक्का न लावता, भाष्यात कुठेही अधिकत्व वा अपूर्णत्व जाणवत नाही. हे दर्शिनीचे खास वैशिष्ट्य सांगता येईल. उदाहरण द्यायचे झाल्यास, भक्तीला प्राप्त केलेल्या पुरुषाची लक्षणे सांगताना श्री नारदमहर्षी म्हणतात,

**यत्प्राप्य न किञ्चिद्वाञ्छ ति, न शोचति, न द्वेष्टि,**
**न रमते, नोत्साही भवति।।५।।**

(तो पुरुष अन्य कशाचीही इच्छा करीत नाही, शोक करीत नाही. द्वेष करीत नाही, आसक्त होत नाही, उत्साही होत नाही.) यावर पू. स्वामीजी भाष्य करतात,

**भक्ती प्राप्त होता पाही । इच्छा शोक द्वेष नाही ।**
**आसक्ती वा औत्सुक्यही । समूळ विलया जातसे।। ६-८**

ओवीतील ही नेमकी, मधुर व मार्मिक शब्दरचना सूत्राचा अर्थबोध चटकन लक्षात आणून देते.

स्वानुभवाचे अधिष्ठान असलेले काव्य प्रभावी ठरेल यात शंकाच नाही. दर्शिनीतही याचे प्रत्यंतर येते. अन्य एका सूत्रात श्री नारद, भक्ताच्या ठिकाणी प्रगट होणारी शारीरिक लक्षणे सांगतात.

**कंठावरोधरोमाश्राश्रुभिः परस्परं तपमानाः।**
**पावयन्ति कुलानि पृथिवीं च।।६८।।**

(आत्यंतिक भक्तीप्रेमामुळे) कंठावरोध, रोमांच आणि अश्रु यांनी (मुक्त झालेले ते) परस्परांशी संवाद करणारे (श्रेष्ठ भक्त) कुलांना आणि पृथ्वीलाही पावन करतात. स्वामी वरदानंद भारती या सूत्रावर भाष्य करतात.

**भगवंताचे नामस्मरण । करिता कंठ ये दाटून।**
**अश्रूंनी भरती लोचन । रोमांच ठाकती शरीरी।**
**परस्परांशी भेटता । गाती ऐकती हरिकथा।**
**अशांच्या स्पर्शे पावनता। लाभते सर्व पृथ्वीसी ।।द.६५-६६**

स्वानुभवाचे 'हे' बोल 'अंतरीचे धावे स्वभावे बाहेरी' या उर्मीतूनच प्रगट होतात. स्वामीजी सदैव अष्टसात्विकभावात रंगून जात. भक्तीच्या स्वानंदाचा दिव्य अनुभव स्वत: घेतल्यानेच त्यांच्या ठिकाणी इतरांचा उद्धार करण्याचे सामर्थ्य प्राप्त झाले. देहात असताना त्यांनी हे कार्य अखंड केले व देह ठेवल्यावरही त्यांच्या वाङ्मयाद्वारे ते सुरूच आहे. आणि म्हणूनच श्री नारदांच्या-

**सुखदु:खेच्छा लाभादित्यक्ते काले प्रतिक्ष्यमाणे क्षणार्द्धमपि व्यर्थं न नयेम ।।७७।।**

या सूत्रावर ते उत्स्फूर्तपणे भाष्य करतात.

**सुखदु:खासह विकार । इच्छा लाभादि निमाल्यावर।**
**भजन करीन ऐसा विचार । करून क्षण न थांबावे ।।**

पू. स्वामीजी अशा महात्म्यांपैकीच एक होते. म्हणूनच परमार्थाची वाटचाल करताना वाटेत येणाऱ्या प्रतिबंधक गोष्टींना मागे सारून अखंड भजन करण्याचा कळकळीचा संदेश ते साधकांना देतात.

भक्ती प्रेमाला अनुकूल असणाऱ्या गुणांच्या प्राप्तीसाठी प्रतिकूल लक्षणांचा त्यागही अपेक्षित असतो. या दृष्टीनेच १६ व्या अध्यायात (भगवद्‌गीतेत) आसुरी संपदेच्या त्यागाचे महत्त्व सांगताना श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात,

**पै त्याज्य त्यजावयालागी । जाणावी जरी अनुपयोगी ।**
**तरी ऐका ते चांगी । श्रोत्र शक्ती । १६।२१४**

याच हेतूने दासबोधात श्री समर्थही मूर्खलक्षणांच्या संदर्भात,

**लक्षणे अपार असती । परी काही येक येथामती ।**
**त्यागार्थ बोलिले श्रोती । क्षमा केले पाहिजे।।२।१।७४**

भक्तिसूत्रांमध्येही भक्तीला बाधक ठरणाऱ्या लक्षणांचा साधकाला त्याग करावयास सांगितला आहे. परमार्थामध्ये सगळ्यात घातक गोष्ट कोणती असेल तर ती म्हणजे अहंकार. या विषयी अत्यंत सूचक शब्दात २७व्या सूत्रात श्री नारद सांगतात,

**ईश्वरस्याप्यभिमानद्वेषित्वात् दैन्यप्रियत्वाच्च।**

यावर अतिशय स्पष्ट शब्दात स्वामीजी भाष्य करतात.

**अहंकार न रुचे ईश्वरा । गर्वाचा त्या तिटकारा।**
**विनयी दीन असता नरा । प्रेम लाभे देवाचे ।। द. २८**

परमेश्वराला गर्वाचा तिटकारा असल्याने साधकाने तो सोडून द्यावा व परमेश्वराचे प्रेम लाभावे असे वाटत असेल तर सदैव विनयी व दीन असावे. हे भक्तीचे मर्म अतिशय सोप्या व प्रभावी शब्दात पू. स्वामीजी येथे सांगतात.

सूत्र वाङ्मयात बरेचदा सूत्र अत्यंत त्रोटक शब्दात मांडलेले असते. एक किंवा दोनच शब्दात संस्कृतातून मांडलेल्या सूत्रातील अर्थ नेमकेपणाने समजणे सामान्यांना अवघड जाते. ही अडचण लक्षात घेऊन पू. स्वामीजी आपल्या भाष्यातून ते मर्म स्पष्ट करण्यासाठी प्रसंगी थोडा विस्तारही करतात. भक्तिसूत्रातील ''वादो नावलम्ब्य:'' हे सूत्र येथे उदाहरणादाखल घेता येईल. भक्ताला ज्या बाधक गोष्टींचा त्याग करावयास सांगितला आहे त्या प्रकरणात हे सूत्र येते. मूळ सूत्रामध्ये 'वाद' हा एकच शब्द जरी असला तरी त्याच्या पोटात वितंड, जल्प,

तर्क, हेत्वाभास या गोष्टींचा अंतर्भाव आहे हे स्पष्ट करण्यासाठी पू.स्वामीजी भाष्य करतात.

**भगवद्भक्ताने कवणासी । वाद न मांडावा विशेषी।**
**वादामुळे निश्चयासी । कोणी न जगी पावतो।।द.७१**

वादामध्ये स्पर्धा, द्वेष, मत्सर यांना प्राधान्य असते. त्यामुळे साधकाच्या चित्तात विक्षेप निर्माण होऊन तो मूळ ध्येयापासून परावृत्त होऊ शकतो. म्हणून साधक भक्ताच्या जीवनात त्याला स्थान नसावे. या हेतूनेच स्वामीजी हा विस्तार करतात. परमार्थ मार्गाने वाटचाल करताना असे धोक्याचे इशारे साधकाला निश्चितच सावध करतात व आपल्या ध्येयापासून ढळू देत नाहीत. स्वामीजींसारख्या महात्म्याचे हे उपकार अंत:करणात कृतज्ञतेची भावना निर्माण करतात व चित्त आपोआपच त्यांच्या चरणी लीन होते.

गीतेच्या ९ व्या अध्यायात भगवान् भक्ताचे वर्णन करतात

**सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रता:।**
**नमस्यन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ।।९।१४**

स्वामीजी अशा भक्ताचे मूर्तिमंत उदाहरण होते. म्हणूनच विविध आविर्भावात प्रगट होणाऱ्या भक्तीचे वर्णन करताना त्यांच्या प्रतिभेला विशेष बहर येतो. मुळात एकस्वरूपा असलेली प्रेमरूपिणी भक्ती भक्तांच्या भिन्न भिन्न आवडींमुळे विविध प्रकारे व्यक्त होते. त्यामुळे तिचे अकरा प्रकार होतात. हे सर्व प्रकार श्री नारदमहर्षी ८२ व्या सूत्रात गुंफतात.

**गुणमाहात्म्यासक्ति – रुपासक्ति–पूजासक्ति–स्मरणासक्ति–दास्यासक्ति – सख्यासक्ति – कान्तासक्ति – वात्सल्यासक्ति–आत्मनिवेदनासक्ति – तन्मयतासक्ति – परमविरहासक्तिरूपा–एकधाप्येकादशधा भवति ।।८२**

भगवंतावरील आत्यंतिक प्रेमातून स्फुरलेले पू. स्वामीजींचे, या सूत्रावरील भाष्य रसिक मनाला अक्षरश: मोहून टाकते.

**गुण गावे, रूप पहावे। पूजनी आयुष्य वेचावे।**
**स्मरणयोगे वेडे व्हावे। दास्य करावे सर्वकाळ।**
**मित्रता ती संपादावी । भजावा वा कांताभावी।**
**वात्सल्याने धरावी । आवडी बालकृष्णावर।**
**करावे आत्मनिवेदन । रहावे तन्मय होऊन।**
**आवडीप्रमाणे ऐसे भिन्न। प्रकार असती भजनांचे।।**

(द. ८०,८१,८२)

आत्मप्रचीतीचा हा अनुभव श्री शारदेच्या कृपाप्रसादानेच प्रकट होतो. भक्तिप्रेमात आकंठ बुडालेले स्वामीजी येथे साधकांसमोर भक्तीचे विविध प्रकार जणू आकर्षकरीत्या मांडून ठेवतात. ज्याला जो भावेल तो त्याने उचलावा व जीवनाचे सार्थक करून घ्यावे.

दर्शिनीतील सर्वच ओव्या अशा भावमधुर व प्रसादगुणाने ओथंबलेल्या आहेत. ''मी म्हणजे ना शरीर, मी मद्ग्रंथांचा संभार'' असे म्हणणाऱ्या स्वामीजींच्या चैतन्यमयी अस्तित्वाची त्या साक्ष देतात. विशिष्ट शब्दांचे माहात्म्य श्रीज्ञानेश्वर महाराज वर्णितात,

**जैसे बिंब तरी बचकेएवढे। परि प्रकाशा त्रैलोक्य थोकडे।**
**शब्दांची व्याप्ति तेणे पाडें। अनुभवावी।।४।२१५**

भक्तिसूत्रातील व दर्शिनीतील अनुभव यापेक्षा वेगळा नाही. 'अनुभवासाठी' दर्शिनीचे 'परिपूर्ण दर्शन'च घ्यावे लागेल.

## विराण्या–कांतासक्तीचा एक हृद्य आविष्कार

**जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती**
**देह कष्टविती उपकारे।।**

या वचनाप्रमाणे अखिल भारतात अनेक संत होऊन गेले. इतर प्रांतांपेक्षा महाराष्ट्रातील संतांची ऐतिहासिक परंपरा व त्यांची वाङ्मयसंपदाही फार मोठी आहे. त्यांनी जगाला जो उपदेश केला तो प्रामुख्याने वाङ्मयाद्वारेच केला आहे.

या परंपरेला अनुसरून संतशिरोमणी, जगद्गुरु, श्री तुकाराम महाराजांनीही गाथेच्या द्वारे मराठी भाषेत भक्तिशास्त्र सांगितले. जगाला कल्याणाचा मार्ग दाखविला. पारमार्थिक लोकांना वैकुंठीची पायवाट सोपी केली. सगुणसाक्षात्कारापर्यंत ज्यांची भक्ती गेली होती असे श्री तुकाराम महाराज गाथेत 'शिकलेले' नव्हे तर 'अनुभवलेले' बोल बोलतात.

श्री तुकाराम महाराजांनी गाथेत रचलेल्या अनेक विषयांवरील अभंगापैकी २५ अभंगांचे 'विराण्या' हे प्रकरण अतिशय सुरस, भावमधुर व वरच्या पायरीवरील साधकाच्या दृष्टीने मार्गदर्शनपर आहे. ईश्वराची जी भक्ती केली जाते तिच्या मुळाशी भक्ताच्या प्रकृतिप्रमाणे व पात्रतेप्रमाणे भावांची विविधता असते. श्री नारद भक्तिसूत्रात या भावांचे अकरा प्रकार वर्णन केले आहेत हे आपण पाहिले. यातील कांतासक्ती हा भक्तीचा एक प्रकार आहे. तिला मधुराभक्ती असेही म्हणतात. भक्तीच्या सर्व प्रकारात हा प्रकार अतिशय श्रेष्ठ मानला जातो. गोपिकांचे प्रेम हे या जातीतील असल्याने, प्रेमाच्या उत्कटतेचा तो आदर्श मानला जातो. शुकासारखे विरागी महात्मे व अनेक थोर संतांनाही या प्रेमाचे वर्णन करण्याचा मोह होतो, श्रीज्ञानेश्वर महाराज भगवंताच्या मुखातून हा भाव प्रकट करतात.

**अर्जुना गा तो भक्तु । तोचि योगी तोचि मुक्तु ।**
**तो वल्लभा मी कांतु। ऐसा पढिये ।।ज्ञा. १२।१५६**

श्री समर्थ रामदासांसारखे विरक्त संतही भक्तीच्या उत्कट अवस्थेत पोहोचताच कटाक्षाने दूर ठेवलेल्या वल्लभा भावाने नकळत वेढले जातात. परमार्थतत्वाला बिलगलेले समर्थ उत्स्फूर्तपणे बोलून जातात. तो गे तोचि तो राम सर्वत्र पाहे। (म. श्लोक-२००)

भक्तीच्या परमोच्च अवस्थेतील ही स्थिती व मनोवृत्ती संतांनी प्रत्यक्ष अनुभवल्यामुळेच त्यांच्या वाङ्मयात ती स्वाभाविकपणे प्रगट होते. श्रीतुकाराम महाराजही परमोत्कर्षाची समजता येईल अशा कांत भक्तीने तन्मय होऊन गेलेल्या भक्ताचे भावचित्र विराण्यांच्या माध्यमातून प्रगट करतात.

विराण्या हे व्यभिचारिणीवरचे रूपक आहे. विरहिणीच्या तोंडचे रूपकात्मक उद्गार श्री तुकाराम महाराजांनी विराण्यांमध्ये मोठ्या कौशल्याने गुंफिले आहेत. व्यभिचारिणी म्हणजे समाजमान्य अशा

लग्नाच्या नवऱ्याला सोडून दुसऱ्या पुरुषावर प्रियकर म्हणून प्रेम करणारी स्त्री. गोकुळातील गोपी आपल्या सर्व आप्तेष्टांना तर काय पण पतीलाही सोडून श्रीकृष्णावर अतिशय प्रेम करीत असत. तो संदर्भ या वर्णनाच्या मागे आहे. त्यांच्या प्रेमाची ही उत्कटता सर्वांना समजावी म्हणून प्रियकर प्रेयसीच्या प्रेमाच्या व्यावहारिक उपमेची योजना श्री तुकाराम महाराजांनी केली आहे व ते जणू गोपींच्या माध्यमातून स्वत:ची अवस्था सांगत आहे.

श्रीतुकाराम महाराजांचे विराण्या हे प्रकरण वरवर सोपे दिसले तरी समजण्यास तितके सोपे नाही. त्यातील गूढ अर्थ पूर्णपणे पारमार्थिक व उच्च कोटीच्या भक्ताच्या मनोवृत्तीचे वर्णन करणारा आहे. विराण्या समजण्यासाठी मनाला एक विवक्षित उंची व प्रगल्भता लागते. अन्यथा आपल्या गैरवर्तणुकीला 'विराण्यात' आधारही शोधला जाऊ शकतो. लौकिक निरपेक्ष अशा एकनिष्ठ अंत:करणाच्या ज्या अवस्थेतून व पातळीवरून श्री तुकाराम महाराज विराण्या रचतात ती लक्षात येणे सामान्य साधकाला निश्चितच अवघड आहे.

स्वामी वरदानंद भारती यांनी या अभंगावर 'विराण्या' हे गद्यात्मक भाष्य लिहून साधकांची ही अडचण दूर केली आहे. 'अंतरास्थितीचिया खुणा अंतर्निष्ठ जाणती' या श्री समर्थांच्या उक्तीप्रमाणे श्री तुकाराम महाराजांची अवस्था नेमकेपणाने समजल्याने (स्वानुभवामुळे) श्री वरदानंद भारती अतिशय प्रभावी व सोप्या शब्दात त्यातील गूढार्थ साधकांना सहजपणे उकलवून दाखवितात.

संत विरहिणीचे प्रेम गातात; लौकिकदृष्ट्या व्यभिचारी मानल्या गेलेल्या गोपींच्या प्रेमभक्तीचे वर्णन करतात ते त्यातील निरपवाद उत्कटतेसाठी, असे पू. स्वामीजी स्पष्टपणे सांगतात. ज्यामुळे अन्य कोणत्याही विकल्पाला भाविकांच्या मनात स्थान रहात नाही. भक्तीमार्ग हा इतर मार्गांच्या तुलनेने 'सोपा' असला तरी साधकाला या मार्गात परमपदावर आरुढ होण्यासाठी आवश्यक असलेले गुण विराण्यांमधून पदोपदी प्रगट होतात. ह्या गुणांचे त्यांच्या मर्मासह स्वामीजी स्पष्टीकरण करतात. या सर्व विवेचनातून हे प्रकरण आचरणात आणणे तर दूरच पण नुसते समजून घेणेही किती कठीण आहे, याची साधकांना जाणीव होते.

भक्तिसुखाचा अनुभव घ्यायचा असेल तर सर्व लौकिकांचा, दुर्घट अशा लोकेषणेचाही त्याग करावा लागतो. हा त्याग अतिशय अवघड आहे. पण विराण्यांची सुरुवातच मुळी,

**वाळो मज जन म्हणोत शिंदळी।**

**परि हा वनमाळी न विसंबे ।।**

या सांगोव्याने होते. श्रीकृष्णाशी पूर्णपणे रमल्यामुळे आता लौकिकाशी काहीही कर्तव्य नाही. लोकांनी आपल्याला दुराचारी, दुर्वतनी, नीच अशी शिवी दिली तरी चालेल, इतकेच नव्हे तर आम्हाला जीवनाचीही अभिलाषा नसल्याने कशाचेही भय नाही असे श्री तुकाराम महाराज गोपीभावात म्हणतात. इतक्या टोकाला जाण्याचे कारण सांगताना पुढच्याच अभंगात -

**आधिल्या भ्रतारें काम नव्हे पुरा।**

**म्हणोनि व्यभिचारा टेकलिये।।** असे सांगतात.

यातील गूढार्थ समजावून सांगणे म्हणजे तारेवरची कसरतच आहे. पण स्वामीजी सामान्यांच्या अंत:करणापर्यंत तो सहजपणे पोचवितात. इथे 'आधिचा भ्रतार' म्हणजे संसार, प्रपंच, त्यातील विषयोपभोग, ज्यामुळे माणसाला कधीच सुख-समाधान मिळू शकत नाही. उलट अतृप्तताच वाढत जाते. म्हणून आम्ही संसार सोडला व श्रीकृष्ण जोडला असे तुकाराम महाराज म्हणतात.

भक्तिमार्गात सगळ्यात महत्त्वाचा गुण कोणता असेल तर तो म्हणजे उत्कटता. गोपी या उत्कट प्रेमाने वेड्या झाल्या होत्या. श्रीतुकाराम महाराज गोपीभावातून ही उत्कटता व्यक्त करतात.

**न धरावा लोभ काही मजविशी।**

**जाले देवापिशी तुका म्हणे।।** तसेच

**न देखे न बोले नाईके आणिक**

**बैसला हा एक हरि चित्ती ।।**

याहीपुढे जाऊन परमेश्वराशी आपला अभेद कसा आहे ते सांगतात,

**एका जीवे आता जिणे जाले दोही।**

**वेगळीक काही नव्हे आता।।**

अंत:करणाच्या अशा पूर्ण एकरूपतेचा आपणास कधी अनुभवच नसल्याने या प्रेमाची कल्पनाही येणे आपणास शक्य नाही असे पू. स्वामीजी आवर्जून सांगतात.

भक्तीच्या या परमोच्च अवस्थेत आवश्यक असलेला आणखी एक गुण म्हणजे निरपेक्षता व सर्वसमर्पण.

**तुका म्हणे आम्ही बैसलो शेजारी।**

**करील ते हरी पाहो आता।।**

या लहानशा ओळीतून श्री तुकाराम महाराज हा भाव व्यक्त करतात. हरीने काय करावे ते गोपी सांगत नाहीत तर तो जे करील ते समाधानाने मान्य असल्याचे दर्शवितात. भक्तिमार्गात ही स्थिती प्राप्त होण्याची अत्यंत आवश्यकता आहे. नाही तर भक्ती हा व्यापार ठरू शकतो याची जाणीव पू. स्वामीजी करून देतात.

परमार्थाच्या प्राप्तीसाठी किती निरिच्छता असावी लागते ते श्री तुकारामांच्या,

**परपुरुषाचे सुख भोगे तरी । उतरोनि करी घ्यावे सीस।।**

**संवसारा आगी आपुलेनि हाते। लावुनि मागुती पाहू नये।।**

या अभंगाचा भावार्थ सांगून स्वामीजी स्पष्ट करतात. आपल्या हाताने संसार जणू पेटवून द्यावा व त्याच्याकडे पुन्हा मागे वळून पाहण्याची इच्छाही होऊ नये. देहभावाविषयी असे विलक्षण रीतीने उदासीन झाल्याशिवाय परमेश्वराची प्राप्ती होणे शक्य नाही. अशी उदासीनता जर साधत नसेल, प्रपंचाचा मोह टाळता येत नसेल, विषयोपभोगाची आसक्ती जात नसेल, सुख-दु:खाची जाणीव उरली असेल, हवे-नको सरले नसेल तर परमार्थात प्रगती होणे अत्यंत कठीण आहे. उत्कटता, निष्ठा, संयम, सोशिकपणा, प्रयत्नशीलता या गुणांच्या अभावी प्रपंचात कसे तरी निभेल पण परमार्थात मात्र या गुणांवाचून एकही पाऊल पुढे पडणार नाही अशी चेतावणी स्वामीजी येथे देतात.

ज्यांना हे शक्य नाही त्यांना श्री तुकाराम महाराज सांगतात,

**सांगतो ते तुम्ही आयकावे कानी ।**
**आमुचे नाचणी नाचूं नका।।**
**जोवरी या तुम्ही मागिलांची आस।**
**तोंवरी उदास होऊ नका।।**

आम्ही काय सांगतो ते तुम्ही लक्षात घ्या. आमचे पाहून नाचू नका, आमच्यासारखे वागण्याचा प्रयत्न करू नका. अन्यथा अनंताच्या नादाने नवरा सोडला तर संसारसुखही मिळणार नाही.

**तुका म्हणे काय वायाविण धिंद।**
**पति ना गोविंद दोन्ही नाही।।**

भक्तिसूत्रात श्री नारद महर्षी **''तत्रापि न माहात्म्यज्ञान-विस्मृत्यपवादः।''** असे एक सूत्र देतात. हाच भाव श्री तुकाराम महाराज पुढील अभंगांतून व्यक्त करतात.

**त्याचे सुख नाही आले अनुभवा।**
**कठीण हे जीवा तोंची वरी ।। .....**
**..... तुका म्हणे सर्वविशीं हा संपन्न ।**
**जाणती महिमान श्रुति ऐसे।।**

श्रीकृष्णाला आम्ही आपलेसे केले आहे. त्यामुळे दुःखे आता आम्हाला स्पर्शही करू शकणार नाहीत. आम्ही ज्याला आपलेसे केले आहे. तो सर्वदृष्टीने, सर्व सामर्थ्याने, सर्व सद्गुणांनी संपन्न आहे. या अभंगावर भाष्य करताना स्वामीजी विशेषत्वाने लक्षात आणून देतात ती बाब म्हणजे, प्रेम करीत असतानाही गोपी कृष्णाचा मोठेपणा विसरल्या नाहीत. ज्याच्यावर प्रेम करतो तो आपल्या बरोबरीचा वाटणे हा प्रेमातील फार मोठा धोका आहे. तो लक्षात ठेवून टाळला पाहिजे असे स्वामीजी सांगतात.

श्रीतुकाराम महाराजांचे विराण्यातील सर्व अभंग असे भावमधुर व भक्तिप्रेमाचे सर्व आयाम व्यक्त करणारे आहेत. नारद भक्तिसूत्रांशी त्यांची विलक्षण एकात्मता पदोपदी जाणवते. स्वामीजींच्या विवेचनामुळे सामान्य साधकांनाही त्यांचा एरवी कठीण असणारा अर्थबोध सुलभ झाला आहे.

भक्तिमार्गाने वाटचाल करीत असताना साधकांनी परमपदावर आरूढ व्हावे, ही एकमेव तळमळ या विवेचनामागे आहे. म्हणूनच विराण्यांच्या विवेचनाचा उपसंहार करताना या प्रकरणाच्या श्रवण-मनन-निदिध्यासाने आपले सर्वांचे मन या योग्यतेस चढावे अशी श्रीतुकोबांच्या चरणी ते प्रार्थना करतात. आपण सारेच श्री तुकोबारायांच्या व पू. स्वामीजींच्या आशीर्वादाला पात्र होण्याचा प्रयत्न करू या.

**सौ. मीरा शेंडगे**
४४ ब, 'कुलश्री' यशवंत नगर,
पावडेवाडी नाक्याजवळ, नांदेड. मो. ९९६०८७७८३३

•••



# स्नान मज घडले सिंधूचे

**श्री. श्रीराम रघुनाथ आळेकर**

पश्चिम रेल्वेखात्यातून सहाय्यक अभियांत्रिक पदावरून निवृत्त.
प.पू.दासगणुमहाराजांच्या परिवाराचे एक सदस्य. श्रीस्वामी वरदानंद भारती यांचे अनुग्रहीत कीर्तनकार; प.पू. अप्पांच्या तीन पुस्तकांचा हिंदीत अनुवाद

सिंधु नदी ही जरी प्राचीन असली तरी ती पाकिस्तानातून प्रवाहित होते. त्यामुळे आम्ही सिंधूचे नाव घेतो परंतु जी आत्मीयता गंगेच्या नावात येते ती सिंधूच्या नावात येत नाही. कारण ती परदेशस्थ होऊन राहिली आहे. जेवढी गंगेची पवित्रता आहे तेवढीच सिंधुचीही आहे. परंतु स्वदेशात गंगा शीर्षस्थ आहे तशी सिंधू नाही. तिचा केवळ नामोल्लेख होतो आणि म्हणूनच स्वामींना सिंधू नदीच्या दर्शनाची अत्यंत ओढ लागली होती. त्या पवित्र जलात केव्हा स्नान करीन अशी तगमग अहोरात्र त्यांना होती. योगायोग अगम्य असतात तसेच स्वामींचे जाहले.

त्यांचेच एक शिष्य मनोहरबुवा कोकलेगावकर यांचे सुपुत्र भारतीय सेनेत मोठ्या हुद्द्यावर होते. त्यांची नियुक्ती लेह येथील एका सुरक्षा चौकीवर झाली. त्यांनी स्वामींचा पाठपुरावा करून त्यांना तेथे येण्याची विनंती केली. स्वामींनी स्वीकृति दिल्यावर तेथे जाण्याचे सर्व कागदोपत्री सोपस्कार पूर्ण झाल्यावर आपले पुत्र चि. महेशबरोबर सिंधू दर्शनाला जाण्यास प्रस्थान केले.

तेथील एकंदर निसर्गरम्य व चमत्कृतीने भरलेल्या वातावरणाशी जुळवून घेतल्यानंतर एके दिवशी त्यांनी त्या पवित्र नदीत स्नान केले. नित्य स्तोत्रपठण व रोजची संध्या उरकून आपल्या निवासस्थानी आल्यावर 'सिंधु गीत' नावाचे स्फुट काव्य रचले. ते येणेप्रमाणे-

**।। श्रीशंकर ।।**

**श्रीसिंधू-गीत**

पूर्ण जाहले आज मनोरथ कितीक वर्षांचे ।
स्नान मज घडले सिंधूचे ।।धृ।।

वेदामधले भाव वाहति होउन जलधारा ।
सामऋचा वा मांडी तांडव करुनी झंकारा ।।
खळाळते वा अट्टहास्य हिमधवल शंकराचे ।
स्नान मज घडले सिंधूचे ।।१।।

वीर भयानक रुद्ररसाची साकारत मूर्ती ।
दिव्य भव्य सौंदर्य उसळते जलवीचीवरती ।।
हिच्या जलाने तृप्त जाहले द्रष्टे वेदांचे ।
स्नान मज घडले सिंधूचे ।।२।।

पाप-ताप-संताप विमोचक अघ नेई भंगा ।
कैलासाहून येत वत्सला ही सिंधू गंगा ।।
हिच्या स्पर्शाने अंग अंग घे सुख चैतन्याचे ।
स्नान मज घडले सिंधूचे ।।३।।

भव्य भीषणा गिरीदऱ्यातून हासत धावे ही ।
परिस्थिती प्रतिकूल तरी ना खंतावत राही ।।
भयद संकटे धैर्य चळे ना गिरिवरकन्येचे ।
स्नान मज घडले सिंधूचे ।।४।।

कधी शांत कधि उग्र उसळती उथळ हासरी ही ।
कड्यावरून घे उड्या प्रसन्ना मलिन कधी होई ।
पावित्र्य न परि उणावते लव कधी स्वर्धुनीचे ।
स्नान मज घडले सिंधूचे ।।५।।

भू भवती ओसाड रूक्ष वा टाळित ही नाही ।
रम्य वनश्री असता तेथे गुंतून ना जाई ।।
पाठ देत जणु सदा मानवा निज कर्तव्याचे ।
स्नान मज घडले सिंधूचे ।।६।।

देव नदी ही आर्य जनांचे बघे उष:काल ।
वैभव नांदे अध्यात्मासह जेवी स्वर-ताल ।।
हिने हुंगिले गंध कितीदा हयमखहवनांचे ।
स्नान मज घडले सिंधूचे ।।७।।

बाळकडू जो दे संस्कृतिचे पश्चिमगोलाला ।
नरिष्यंत तो हिनेच तारून पार असे केला ।।
हिने दावुनी दिशा नशिले दैन्य तुर्वसूचे ।
स्नान मज घडले सिंधूचे ।।८।।

कीर्तिपताका तूच एक या जगी भारताची ।
अशी उपेक्षा शोभत ना तुज भारतपुत्राची ।।
महत्त्व आहे नित्य तयांना तुझ्या प्रेरणेचे ।
स्नान मज घडले सिंधूचे ।।९।।

अंबितमे हे देवितमे हे नदीतमे माते ।
कसे तोडिले प्रागितिहासापासुनचे नाते ।।

केविलवाणे झाले तुजविण स्वराज्य हिंदूंचे ।
स्नान मज घडले सिंधूचे ।।१०।।

सर्वांगाने दे आलिंगन भारतमातेला ।
दिव्य रसायन हेच एक तत्क्षयकृशकायेला ।।
पूर्ण दर्शने फिटो पारणे अनंत नेत्रांचे ।
स्नान मज घडले सिंधूचे ।।११।।

श्री:श्री:श्री:

भाद्रपद वद्य ६/१८९८ लेह (लडाख)

सिंधुजलाचा नाद ऐकताच अनेक आठवणींची साखळी मन:पटलावरून धावून जाते. आमचे पुरातन वेद, त्यांचे सस्वर गायन करणारे पूज्य ऋषिवर, यांचे स्मरण होते. कारण याच तीरावर भारतीय संस्कृतीची मेख रोवली गेली होती. म्हणून तुझे तीर अत्यंत पवित्र मानले गेले. त्याचप्रमाणे तुझा उगम कैलास पर्वतापासून झाला म्हणून श्रीशंकराच्या सान्निध्याचा स्पर्शही तुझ्या पवित्र जलात जाणवतो. त्यामुळे शरीराला सुखद अशी अनुभूती प्राप्त होते. त्याशिवाय तुझा प्रवाह रूक्ष किंवा नापीक जमिनीला सुद्धा सुपीक करून जातो. तुझा प्रवाह नेहमीच भेदभाव रहित राहतो हे प्रत्ययास येते. तुला देव नदी म्हणूनही संबोधले जाते. कारण तुझ्या तीरावर आर्य संस्कृतीचा उदय झाला व ती संस्कृति फुलली, वाढली आणि चिरकाल टिकून राहिली. तुझ्याच तीरावर आध्यात्माची सर्वांगीण उन्नती झाली. अनेक पुनीत हवने तुझ्या तीरावर झाल्याने त्यांच्या सुगंधाने तुझ्या तीरावरचा दरवळ नेहमीच पसरलेला असतो. त्यामुळे तुझ्या मूळच्या पवित्रतेत आणखीन उन्नती झाली. अनेक नृपतींना सन्नीतीच्या मार्गावरून जाण्यास तूच प्रेरीत केल्यामुळे तुझ्या महत्तम जलाचा महिमा साऱ्या आसमंतात भरून राहिला.

इतकी महानता असून देखील तू भारताला पारखी झालीस ही बोच क्षणोक्षणी जाणवते. त्यामुळे मन उदास होते. वास्तविक तू भारत मातेचीच कन्या, भारत मातेचाच तुझ्यावर अधिकार आहे. परंतु क्षणिक मोहाला बळी पडून राजकारणी नेत्यांनी तुला परदेशात नेऊन टाकले. त्यामुळे भारत अनाथ झाला. भारताच्या शिरावरचा तुझा स्नेहल स्पर्श विलयास गेला. तुझा चिरंतन ध्यास आम्हाला असून सुद्धा तुझे प्रत्यक्ष दर्शन व पवित्र जलाच्या रुचीस आम्ही मुकलो. हा वियोग आम्ही किती काळ सोसायचा? तेव्हा तू लवकर भारतमातेला आलिंगन देण्यास ये अशीच आमची कळकळीची विनंती तुला करीत आहे. ही याचना तू मान्य करून आम्हाला आशीर्वाद दे.

सिंधु नदीच्या ऋणातून मुक्त होण्याकरता स्वामींनी 'राजा दाहीर' जो की तुझ्याच तीरावरील सम्राट होता त्याचे चरित्र कीर्तनकाव्यात सादर केले. त्या चरित्राचा प्रभाव, त्याचे विवेचन व गायन इतके ओजस्वी, उत्स्फूर्त आणि करुणरसाने ओतप्रोत भरलेले आहे की, त्याचा अनुभव घेताना श्रोते करुणरसाने अक्षरश: न्हाऊन निघतात. मी स्वत: या प्रसंगाचा साक्षीदार असल्या कारणाने तो प्रसंग माझ्या स्मृतिपटलावरून पुसलाच जात नाही. ज्या श्रोत्यांनी ते कीर्तन अनुभवले ते धन्य होत. हे सर्व सिंधुजलात स्नान करण्याचे प्रतिफल होय.

या काव्याचा शेवटला चरण दोनदा म्हटल्याने खरोखर स्नान केल्याचा भास होतो. या काव्याची चाल जरा वेगळी आहे. ती प्रत्यक्ष अनुभवताना या काव्याची श्रेष्ठता पटते व सिंधुनदीचा स्पर्शही जाणवतो.

अशा मनोरम निसर्गमय वातावरणात स्वामींना सिंधूचे स्नान घडले. ते पवित्र झाले. म्हणूनच की काय त्यांनी संजीवन समाधी गंगेच्या जलात घेऊन ते सिंधुचा स्पर्श आपल्याबरोबर घेऊन गेले. ते ब्रह्मलीन झाले. कृतार्थ झाले.

''स्नान मज घडले सिंधूचे व भागीरथी कर पवित्र मला निजांगे'' असे म्हणून आपला देह गंगौघामध्ये विलीन केला.

**।। श्री शंकर ।।**

## ''गोदावरीचे स्तवन''

दक्षिणेत गोदावरीला गंगा म्हणूनच संबोधिले जाते. इतका या नदीचा मान मोठा आहे. दक्षिणेत इतर नद्या बऱ्याच आहेत. पण गंगेचा मान मात्र गोदावरीसच जातो. इतकी पवित्रता गोदावरीला मिळाली आहे. श्रीदासगणुमहाराजांचे गोदावरी नदीवर अतोनात प्रेम व निष्ठा होती. त्यांच्या काव्यात गोदावरीचा उल्लेख जागोजागी येतो आणि जिथे तो उल्लेख येतो त्या ठिकाणी गंगेला शिरोधार्यच मानले आहे. त्याचप्रमाणे गोदावरीची प्रदक्षिणा करणे हे पुण्यप्रद मानले गेले आहे. लोकांची आस्था गंगेइतकीच गोदावरीलाही मिळाली आहे. दासगणुमहाराज म्हणतात– ''दासगणु म्हणे वस्ती राहो गोदेच्या काठी' त्यामुळे महाराजांच्या परिवारात गोरटे येथे समाधी मंदिरात ही प्रार्थना रोज म्हटली जाते. ती प्रार्थना येणेप्रमाणे–

**श्रीगोदावरी प्रार्थना**

(चाल– परमदयाघन गर्जे तव)

परम दयाघन दुसरी तुजविण नाहीं या भूवरी ग ।
उचलुनि घे मज पदरीं अंबे गंगे गोदावरी ग ।।धृ०।।

चढती रज तम, झिजती शम दम पाहुनि गौतममुनी ग ।
कळवळला मनिं बसला जाउनि उग्र तपालागुनी ग ।।
प्रसन्न करुनी गिरिजाशंकर आणी तुज महीवरी ग ।
उचलुनि घे ० ।।१।।

टाकुन पश्चिम सह्यगिरीहुन धावसि पूर्वेकडे ग ।
भिजवित रानें, फुलवित धान्यें, फोडित गिरिचे कडे ग ।
शमवित पापा, निववित तापा, सुखवित जन अंतरीं ग ।।
उचलुनी घे ० ।।२।।

शिणला शेषहि महिमा गाता वेदहि मौनावला ग ।
ब्रह्मपुराणीं व्यासें तो परि भावानें गाइला ग ।
देव साधुजन संत महात्मे रमती तुझिया तीरीं ग ।।
उचलुनि घे ० ।।३।।

प्रवाह अंबे प्रसन्न, पावन, पवित्र, डुलवित सुखे ग ।

निर्मळ जळ करि मंजुळ कलरव, जपता हरिसी मुखें ग ।
तरंग तव उत्तुंग अंग करि पुलकित मन केशरी ग ।।
उचलुनि घे ० ।।४।।

स्नेहल जननी व्हावें तू झणिं अनंत-वरदायिनी ग ।
कसे विसरशी सलील, सलिलीं तव, दिधले वाहुन ग ।
वत्सल हृदये सद्‌गुरूराये मजसी रामेश्वरीं ग ।
उचलुनि घे ।।५।।

कवीच्या काव्यकल्पनेला केव्हा बहर येईल हे सांगणे फार कठीण आणि असे विक्रम त्यांच्या जीवनात अनेक ठिकाणी आले आहेत. आता हेच पहाना अप्पा (स्वामी) गोदाप्रदक्षिणेला निघाले होते. बरोबर शिष्य समुदाय बराच होता. त्या उपक्रमात विश्रांतीच्या एका रिकाम्या वेळेत अप्पा सहज आपल्या राहुटीतून बाहेर आले आणि समोरच्या झाडाच्या फांदीवर चढून बसले. एकदम छगनला हाक मारली आणि कागदपेन्सील घेऊन येण्यास सांगितले व काव्य सांगत गेले. ती ही गोदावरीची प्रार्थना.

या काव्याच्या दोन गोष्टी समोर येतात त्या अशा-

१) या काव्याचा छंद अगदीच अप्रचलित आहे. साधारणत: हे वृत्त इतर ठिकाणी ऐकिवात येत नाही. गायन करताना या वृत्ताची विलक्षणता जाणवते. तसेच ही चाल गाण्यास सोपी आहे. अवघडपणा कुठेच नाही.

२) काव्यात जो 'ग'चा प्रत्यय प्रत्येक ओळीत आला आहे तो फारच मजेदार व एकदम हृदयाला जाऊन भिडणार आहे. या 'ग'चे बरेच अर्थ ध्वनित होतात. साधारणत: महिलांच्या बोलण्यात या 'ग'चा उपयोग अनेक वेळा ऐकण्यात येतो. 'ग' हा प्रत्यय लावल्याने शीघ्रतेचा भाव दाखविता येतो. कधी कधी विस्मयताही झळकते. लडिवाळपणाचा भावही येतो. या काव्यात हाच भाव जास्त महत्त्वाचा आहे. प्रत्येक पंक्तीमध्ये कवी आपली भावना या 'ग' च्या प्रत्ययाने व्यक्त करतो. त्या भावनेत कवी म्हणतो, तुझे असे वागणे आहे न? जणू हा विश्वास धरूनच संपूर्ण कविता बांधली गेली आहे. प्रार्थना केली आहे की, तू वरदायिनी आहेस, मी जे म्हणतो ते खरे आहेच. हा आत्मविश्वास कवीच्या प्रत्येक पंक्तीत निरनिराळ्या स्तुतिसुमनांनी नटविला आहे. तू मातृ-हृदयी आहे. म्हणून मला उचलून कडेवर घे आणि पावन कर. जसे लहान मूल खाली बसलेले असते व आईला म्हणते, ''मला उचलून का घेत नाहीस ग'' हा भाव प्रत्येक पद्यांशाच्या शेवटी कवीने साधून हे काव्य अति रमणीय केले आहे.

अंतिम पदामध्ये एक सत्य घटना घडलेली वर्णन केली आहे. त्याचा पूर्वइतिहास असा- दामुअण्णांची पहिली १/२ अपत्ये अल्पायुषी ठरली होती. तेव्हा हे मूल तरी गंगेच्या आशीर्वादाने वाचावे अशी आर्त आणि कळकळीची विनंती केली होती. विनंतीचा प्रकार जरा भिन्न होता. दासगणु महाराजांनी आपल्या नातवास एका लहानश्या पाळण्यात ठेवून गंगेला वाहिले होते. ते स्थान होते गोदाकाठचे रामेश्वर हे गांव. मनात हाच भाव होता की, ''हे लेकरू तुझ्याच पदरी घातलंय याला तूच वाचवलंस तर लेकरू वाचेल'' तो पाळणा बालकासहित तसाच वाहत पैल तीरावर पोहचला आणि लहानग्या अनंताला उचलून जवळ घेतले. ते गाव जे होतं ते बळेगाव या नावाने ओळखले जात असे. गंगेला ही आठवण कवी मुद्दाम या काव्यातून करून देत आहे. अर्वाचीन युगात हा एक चमत्कारच म्हणता येईल. यात दासगणुमहाराजांची निष्ठा, श्रद्धा, भक्तियुक्त अंत:करणाने गंगेला केलेली प्रार्थना या सगळ्यांचा समन्वय जमून आल्यामुळेच ही अतर्क्य घटना घडली.

या सर्व आठवणींचा व आर्जवांचा पट कवीने आपल्या काव्यात गुंफला आहे. त्याचा वाचकांना परिचय व्हावा म्हणून या कवितेबद्दल निवेदन केले. अर्थोत्पत्तीच्या दृष्टीने या काव्यात कठिणता कुठेच नाही. तेव्हा जास्त लिखाणाची मांडणी न वाढविता येथेच विराम देतो.

**श्रीराम रघुनाथ आळेकर**
'रघुकुल' ३४ लोकमान्यनगर,
केसर बाग रोड, इंदोर (म.प्र.) ४५२००९
सचल दूरध्वनि : ९८२६६६८२२८
स्थाई दूरध्वनि : ०७३१-२३६८५८१

●●●

**सर्वांगाने दे आलिंगन भारत मातेला ।**
**दिव्य रसायन हेच एक तत्क्षयकृशकायेला ।**
**पूर्ण दर्शने फिटो पारणे अनंत नेत्रांचे ।**
**स्नान मज घडले सिंधूचे ।।**





वैद्यराज अनंत दामोदर आठवले अर्थात् प.पू. स्वामी वरदानंद भारती (पू.अप्पा) यांचे...

# आयुर्वेदासंबंधीचे कार्य

**वैद्य अविनाश मोरेश्वर लेले**

बी.ए.एम. अ‍ॅन्ड एस., एम.ए.एस्सी., आयुर्वेद निष्णात (शल्यशालाक्य व सर्जरी)
प्राध्यापक, टिळक आयुर्वेद महाविद्यालय, शल्यविभाग सचिव, सावित्री आयुर्वेद प्रतिष्ठान
भूतपूर्व प्राचार्य, आयुर्वेद महाविद्यालय, हडपसर
लेखक, बहुगुणी आवळा, मर्मचिकित्सा, पंचकर्मविज्ञान. अमेरिका, युरोप आदी देशांत आयुर्वेदाचे अध्यापन. १९९४ मध्ये इंटरनॅशनल अ‍ॅकडेमी ऑफ आयुर्वेद या संस्थेची स्थापना.

२७ सप्टेंबर १९२० रोजी अनंतरावांचा जन्म झाला. अन् ३ सप्टेंबर २००२ रोजी उत्तरकाशी येथील कैलास आश्रमात स्वामी वरदानंद भारती या स्वरूपात ते समाधिस्थ झाले. अनंत अनंतात विलीन झाले. या ८०-८२ वर्षांच्या कालावधीत विविध रूपांत आणि विषयांत त्यांनी केलेल्या कार्याचे सिंहावलोकन केल्यास आपण स्तिमित होतो.

मी आप्पांच्या सहवासात १९६० पासून आलो. ८ वर्षांचा होतो मी तेव्हा. आप्पांचे परममित्र वै.मो.य.लेले यांचा मी मुलगा. १९५४ पासून मुंबईतील वरळीच्या पोदार महाविद्यालय आणि रुग्णालयाचे डीन म्हणून १९७४ पर्यंत बाबा सरकारी सेवेत होते. आप्पा (ज्यांना आम्ही आठवले काका म्हणत असू) वरळीच्या आमच्या घरी येत असत. काळी टोपी, पांढरा स्वच्छ सदरा, धोतर आणि बंद गळ्याचा कोट असा अस्सल भारतीय वेष असे त्यांचा. दिवाळी अन् उन्हाळ्याच्या सुट्टीत बाबा आम्हा भावंडांना आठवले काकांकडे राहायला पुणे वा पंढरपूरला पाठवीत असत. १९७४ला माझे आयुर्वेदाचे पदवीपर्यंतचे शिक्षण मुंबईत पूर्ण झाले. सर्जरी म्हणजेच शल्य विषयांत पदव्युत्तर शिक्षणाची सोय पुण्यातच असल्याने माझी रवानगी पुण्याला झाली. टिळक आयुर्वेद महाविद्यालयात व्याख्याता आणि ताराचंद रुग्णालयात रजिस्ट्रार स्वरूपात शल्य (सर्जरी) विभागात माझे काम सुरू झाले. याच काळात खऱ्या अर्थाने मला पू.आप्पा आणि बाबांच्या अन्य सहाध्यायांच्या प्रगल्भ ज्ञानाचा, अनुभवाचा लाभ झाला. वै.शि.गो.जोशी तर माझे मार्गदर्शकच होते. वै. निर्मलाताई राजवाडे यांच्याकडेच मी खाजगी रुग्णालय चालविण्याचे प्राथमिक धडे घेतले.




**प्रधान आचार्य-प्राचार्य आठवले (१९६५)**

'नंदनंदन' आत्रेय रुग्णालय हे सर्वार्थाने पहिले आदर्श आयुर्वेदीय रुग्णालय होय. पू.अप्पांचे आयुर्वेदाचे गुरू मामा गोखले नेहमी म्हणत की जनमानसात आयुर्वेद शास्त्रास आणि वैद्यांना वाखाणले जाण्यासाठी शास्त्रास अनुसरून चिकित्सा करणारे रुग्णालय चालवून दाखवावे. ही आज्ञाच असे समजून आठवले, राजवाडे, लेले व जोशी हे मामा गोखले यांचे चारही शिष्य एकत्र आले. आणि १९७१ पासून स्त्रीरोग व प्रसूती, शल्य, कायचिकित्सा, पंचकर्मादि सोयींनी परिपूर्ण असे रुग्णालय सुरू झाले. पुणेच नव्हे तर अन्य शहरांतूनही येथे रुग्ण चिकित्सेसाठी येत असत. पू. आप्पांचे प्रमुख मार्गदर्शन असे. नंदनंदनात प्रसूत स्त्रीला आपण रुग्णालयात नव्हे तर घरातच असल्यासारखे वाटे. रुग्णालयांतील त्यांचे दहा दिवसांचे वास्तव्य आनंददायी असे. पू. आप्पांनी रूग्णांच्या केवळ शरीराचीच नव्हे तर मनाचीही योग्य काळजी इथे घेतली जाईल असा परिपाठ घालून दिला होता. ते स्वतः नन्दनन्दनातच पहिल्या मजल्यावर राहात असल्याने तळमजल्यावरील रुग्णालयीन कामकाजावर त्यांचे बारकाईने लक्ष असे. बालकांचे स्नान, रुग्णांचा आहार, अभ्यंग, शेकशेगडी, बाळांना धुरी एवढेच नव्हे तर तिन्हीसांजेला गुरुजींचा शान्तिपाठ इथे असे.

**बालकांचे स्नान :** मातेच्या उदरात नऊ महिने वास्तव्य करून नुकतेच जन्म घेऊन वेगळ्या अशा बाह्य विश्वात पदार्पण केलेल्या बालकाची रुग्णालयात आयांनी (सेविकांनी) नव्हे तर प्रधान चिकित्सकाने काळजी घेतली पाहिजे अशी पू.आप्पांची धारणा होती. त्यामुळे सकाळी एकामागून एक अशी ८-१० नवजात अर्भके स्नानासाठी येत असत. त्यांना कोमट तिळाचे वा खोबऱ्याचे तेल ऋतुनुसार लावून आम्ही स्वतः अंघोळ घालत असू. त्यांचे अंग पुसणे, कपडे घालणे, दुपट्यात नीट गुंडाळून वरून वेखंडचूर्ण लावणे असे. यामुळे त्यांच्या श्वासांत, रडण्यात, मलमूत्र-विसर्जनातील बदल चटकन लक्षात येत असत.

**आहार :** आजारपणात पचनक्रिया मंदावते, प्रसूती पश्चात मातेसही पचनास हलके, ताजे व गरम जेवण मिळावे याची व्यवस्था

असे. मूग-तांदळाची खिचडी, कढी, गरम पोळ्या, मेतकूट, भाज्या दिल्या जात. पचनयोग्य असा गुलकंद, बडिशेप, खोबरेयुक्त विडाही दिला जात असे.

**शेकशेगडी व धुरी :** सूतिकेस सर्वांगास तिळतेलाने मालिश व मूग निर्गुंडीच्या वाफेचा शेक रोज मिळे. धुरीमुळे व्हायरस व अन्य जंतुसंसर्ग टाळला जात असे.

**शान्तिमंत्र :** रुग्णालयात तिन्ही सांजेला रोज गुरुजी येऊन धीरगंभीर स्वरांत शान्तिमंत्र म्हणत आणि सर्वांना अंगारा देत. याचा चांगलाच मानसिक आधार सगळ्या रुग्णांना वाटत असे. रुग्णालयाच्या आवारातच तुळस, गवतीचहा, निर्गुंडी अशा उपयोगी वनस्पतींची लागवड केली होती.

आमपाचक वटी, शूलहरवटी, शतावरी कल्प, धात्री रसायन, च्यवनप्राश, त्रिफळा गुग्गुळ अशी औषधही तयार होत असत.

आयुर्वेद ही एकांगी नव्हे तर सर्वांगीण चिकित्सा पद्धती आहे त्यासाठी वैद्य, परिचारक, औषध अन् रूग्ण हे चारही घटक महत्त्वाचे आहेत हे पू. आप्पांनी आमच्यावर बिंबविले.

### पू. अप्पा आयुर्वेदाकडे कसे आले ?

जून १९४० मध्ये पू. अप्पा शालांत परीक्षा उत्तीर्ण झाले. त्यांना संस्कृत व तत्त्वज्ञान विषय घेऊन एम.ए. व्हायचे होते. पण पूज्य दासगणूंच्या आग्रहाखातर त्यांनी पुण्याच्या टिळक आयुर्वेद महाविद्यालयात प्रवेश घेतला. आयुर्वेद हे अस्सल भारतीय वैज्ञानिक शास्त्र आहे. यास्तव आयुर्वेदाच्या शिक्षणाचा पू.दादांनी आप्पांना आग्रह केला.

जुलै १९४४ साली आप्पा आयुर्वेद विशारद झाले.

### प्रसंगी अखंडीत वाचीत जावे

'आयुर्वेद विशारद'चे शिक्षण चालू असताना अगदी प्रथम वर्षापासून चौथ्या वर्षापर्यंत आप्पांचे 'श्रीशालिवाहन चरित' काव्यलेखनाचे कार्यही चालू होते. अभ्यास करताना ते सहजपणे त्या विषयाशी एकाग्र होत. त्यांची एकाग्रता आणि आकलनशक्ती तीव्र असल्याने त्यांचे अनेक विषय एकाच वाचनात पक्के होत. अवघड आणि किचकट औषधी पाठ लक्षात ठेवण्यासाठी त्यांनी असे पाठ ओवी वा श्लोकबद्ध करण्याची भन्नाट क्लुप्ती योजिली. उदा. -

**हेमगर्भं तु पादांशं भागर्थं चाभ्रकं ततः ।**
**सार्धभागंच कर्पूरं निश्रयित्वा निमर्दयेत ।।**

आमच्यासारखा परीक्षेआधी रात्रंदिवस जागून, घोकंपट्टी करून त्यांनी कधीच अभ्यास केला नाही. ज्ञानप्राप्तीचे साधन म्हणनूच त्यांनी त्या त्या विषयाचा समग्र अभ्यास केला.

आयुर्वेदातही प्रथम वर्षात असताना शरीराची रचना यथार्थ समजण्यासाठी शवविच्छेदन प्रात्यक्षिक असते. अप्पांनाही हे किळसवाणे गिधाडकाम आहे असे वाटे. ज्या हातांनी अभ्यासाकरता का होईना शरीर फाडायचे त्याच हातांनी (अगदी दहा वेळा साबण लावून धुतले तरी) जेवताना अन्न घेणे नकोसे वाटे. पण वैद्य होण्यासाठी याचाही त्यांनी स्वीकार केला. प्रथम श्रेणीत आयुर्वेद विशारद झाल्यावर अप्पा तडक पंढरपूरला रवाना झाले.

आयुर्वेद विशारद झालेला आपला नातू पुण्यातील शिक्षण संपवून आपल्या सेवेत पंढरपुरात राहतो आणि पंचविशीत भक्तिभावात चिंब भिजलेल्या कीर्तनांनी भक्तजनांच्या हृदयाचा ठाव घेतो याचा पू.दादांना अपरिमित आनंद झाला. पू. दादांनी अप्पांच्या तिसाव्या वर्षाच्या जन्मदिवशी त्यांना बोध केला. सत् शिष्याला उपदेशावे असेच त्यांचे स्वरूप आहे. 'छात्र-बोध' यातील आयुर्वेदासंबंधी ते म्हणतात,

''अनंता, तू वैद्यक विद्येत पारंगत झालास. त्यावर तुझ्या अनुभवातून ग्रंथ लिहावेस. तुझ्या बुद्धीचा उपयोग देशसेवा, शास्त्रसेवा यांत करावा.

तू वैद्य आहेस, तरी रसशाळा काढून ती नावारूपाला आणावीस. तुझ्या चातुर्यबळे नवीन नवीन औषधे शोधावीत. त्याचा इतरांना उपयोग होईल असे पाहावे. आपली विद्या आपल्या बरोबर गेली असे होऊ नये. रसशाळेला व्यापारी स्वरूप आणू नये, ते उत्तम संशोधन केंद्र व्हावे.

वैद्यकीच्या व्यवसायांत यत्किंचितही कसूर करू नये. रुग्णांची काळजी रात्रं-दिवस अंतःकरणात वाहावी. शारंगधर, वाग्भटाचा आदर्श समोर ठेवून योग्य औषधांच्या निर्मितीसाठी झटावे.

इंग्लिश, जर्मन संशोधकांनी अविश्रांत मेहनत घेऊन, आपल्या वैद्यक शास्त्राला उच्च स्थानावर नेऊन बसविले. आम्ही मात्र उलटे केले. वैद्यकशास्त्रास वाढविले तर नाहीच पण त्याला दीनदशेला नेले. होता होईतो आपल्या औषधांचा चातुर्याने उपयोग करावा. परंतु जगामध्ये एखादे औषध उत्तम निघाल्यास आमच्या वैद्य वर्गाने त्याचा आनंदाने स्वीकार करावा. रोग्यांचे दुःख निवारण हेच ध्येय ठेवावे.

अध्यापनाचे कार्य तू अवश्य करावेस. अध्यापन हे ब्राह्मणाचे श्रेष्ठ कार्य आहे. वैद्य-डॉक्टर-हकीम यांच्याशी विचार विनिमय करावा. फार व्याप वाढवू नये. शरीरस्वास्थ्यासाठी विश्रांती घेण्यास चुकू नये. दर आठवड्याला या छात्र-बोधाचे वाचन करावे. कामाच्या व्यापात जमले नाही तर एकादशीच्या दिवशी तरी तो अवश्य वाचावा.''

पू. दादा जसे अप्पांचे आध्यात्मिक गुरू तसेच वै. मामा गोखले हे अप्पांचे आयुर्वेदाचे गुरू. पुण्यातील सुप्रसिद्ध वै. पुरुषोत्तम शास्त्री नानल यांचा पू. दादांशी दीर्घकाळापासून ऋणानुबंध होता. त्यामुळेच पू.दादांनी अप्पांना आयुर्वेद विशारद होण्यास सांगितले. अप्पांसारखा चांगला विद्यार्थी विशारद तर झाला पण नंतर त्याचा संपर्क आयुर्वेदाशी राहिला नाही. तो तडक पंढरपूरला गेला. पदव्युत्तर उच्च शिक्षणाची चौकशी करण्यासाठीही आला नाही याची रुखरुख वै. मामा गोखले यांना होती. वै. मामा आणि पू. दादांचाही दीर्घकाळापासून स्नेहबंध होता. पू.दादांनी आदेश दिल्यासच अप्पा पारंगत होण्यास राजी होतील यास्तव वै. मामा लोणावळा येथे पू.दादांना भेटायला आपल्या अन्य चार शिष्यांसह (श्री.मो.य.लेले, श्री.शि.गो. जोशी, श्रीमती निर्मलाताई राजवाडे, कु. सिंधु भिडे) गेले. तुमची मी एका हुशार विद्यार्थ्याची ओळख करून देणार आहे असे मामा म्हणाले होते त्यामुळे हे विद्यार्थी त्या व्यक्तीच्या शोधात होते. इतक्यात आखूड पंचा नेसलेले, डोक्याला पंचा बांधलेले

व त्यावर भली थोरली मोळी दोन हातांनी धरलेली अशी व्यक्ती त्यांनी पाहिली. पुढे आयुष्यभर अतूट प्रेमाने बांधल्या गेलेल्या त्यांच्या ज्येष्ठ, श्रेष्ठ स्नेह्याचे प्रथम दर्शन असे झाले.

पू. दादांकडून श्री. अनंतरावांच्या आयुर्वेद पारंगत प्रवेशाचे नक्की करूनच वै. मामा विद्यार्थ्यांबरोबर तिथून निघाले.

महाविद्यालय जुलै १९४८ मध्ये सुरू होणार होते. 'आयुर्वेद पारंगत' हा २ वर्षांचा पदव्युत्तर अभ्यासक्रम होता. मात्र जूनच्या शेवटच्या आठवड्यात अनंतरावांनी 'पारंगत'चा अभ्यासक्रम मिळवला. त्याचा अंदाज घेऊन आपल्या अभ्यासाची दिशा निश्चित केली. परीक्षा, विषयांची व्याप्ती, त्यासाठी महाविद्यालयांत लागणारा वेळ आणि स्वतंत्र अभ्यासासाठी वेळ याची योजना आखली. बरोबरच्या चौघा सहाध्यायींनाही यात सामील केले. फरक इतकाच झाला की, कु. सिंधु भिडे यांचे ऐवजी काही कारणांमुळे श्री. शिवरामन् किरुमाक्की याने त्यांचे जागी प्रवेश घेतला. पारंगतच्या अभ्यासासाठी जोशी, लेले, किरुमाक्की, राजवाडे आणि आठवले यांना एक वर्ग उपलब्ध करून देण्यात आला. महाविद्यालयीन दैनिक काम संपल्यावर रात्री व सकाळी त्यांचा अभ्यास चालत असे.

सकाळचा अभ्यास संपवून सारेजण महाविद्यालयातून गुरू मामा गोखले यांचेसह आपापली सायकल घेऊन बाहेर पडत. रास्ता पेठ ते मामांचे घर असलेल्या प्रभात रोड पर्यंत लकडी पूलावरून बोलत बोलत कधी पोचत याचा त्यांना पत्ताही लागत नसे. वै. मामा हे ख्यातनाम चिकित्सक असल्याने ताराचंद रुग्णालयात त्यांचे भोवती सतत अनेक रूग्णांचा गराडा असे. गुरू मामा रुग्णपरिक्षा कशी करतात. अचूक रोगनिदान अन् त्यानुसार सर्वांगीण चिकित्सेची योजना हे सारे विद्यार्थी अनुभवितच असत. पण यावेळी येणाऱ्या शंका वेळे अभावी मनातच ठेवाव्या लागत. या दीड-दोन तास पायी चालण्याच्या वेळी हे सारेजण त्यांनी पाहिलेल्या रुग्णांवर, अभ्यासलेल्या विषयांवर मामांना शंका विचारीत असत. शंका-समाधानात किती वेळ गेला याचे भान ना विद्यार्थ्यांना ना अध्यापकांना असे.

श्री. अनंतरावांच्या नियोजनबद्ध अभ्यासाचा लाभ किती होतो, विषयाची जाण आणि आवाका त्यांच्यामुळे कसा व्यापक बनतोय याची जाणीव चौघांना प्रतिदिनी होऊ लागली. चौघांनी आपले नेतृत्व अनंतरावांकडे स्वेच्छा बहाल केले होते. त्यांची मैत्री दृढ झाली ती कायमचीच. श्री. अनंतरावांना संस्कृतचे उत्तम ज्ञान होते. त्यामुळे आयुर्वेदाची बृहत्त्रयी असे चरक, सुश्रुत व अष्टांगसंग्रह हे ग्रंथ टीकेसह अभ्यासणे या साऱ्यांना साध्य झाले. पारंगतच्या दुसऱ्या वर्षातही सर्वजण एकत्र बसून अभ्यास करीत असत. हळूहळू या पाच जणांची मैत्री वाढत गेली. मैत्रीतले अंतर कमी होत गेले. एका घरातल्या, नात्यातल्या लोकांपेक्षाही त्यांचे संबंध घनिष्ट होते. इ.स. १९५० मध्ये सर्वजण पारंगत झाले. पुढे वै. मो. य. लेले गुरू मामांच्या सूचनेनुसार व आग्रहाखातर मुंबईच्या सरकारी पोद्दार रुग्णालयाचे व महाविद्यालयाचे अधिष्ठाता म्हणून रुजू झाले. श्री. लेले आपल्या जिवलग मित्रांना, गुरवर्यांना आणि मातृसंस्थेस सोडून मुंबईस जाण्यास अजिबात राजी नव्हते. यास्तव मुलाखतीसाठी त्यांनी अर्जही भरला नव्हता. मात्र मामांचे सूचनेनुसार ती. अप्पांनी मो.य.लेले यांचे नावे परस्पर अर्ज भरला. काही काळाने वै. लेले यांना मुलाखतीस या असे सरकारी पत्र आले. ते पाहून वै. लेले (माझे बाबा) अवाकच झाले. मी अर्जच केला नाही तरी मुलाखतीस कसे बोलविले असा त्यांना प्रश्न पडला. यथावकाश हे काम अनंतरावांचे आहे ते समजले. पोद्दार महाविद्यालय हे शासकीय महाविद्यालय असल्याने तसेच तेथे आयुर्वेदविद्येचा आग्रह धरणारी व्यक्ती असल्यास ते आयुर्वेदाच्या दृष्टीने लाभाचे ठरणार असल्याने श्री.मामा गोखले यांनी अनंतरावांकडून हे काम करून घेतले. नंतर श्री. शि.गो.जोशी- शल्यविभाग, निर्मलाताई राजवाडे स्त्रीरोग व प्रसूती विभाग अन् अनंतराव सुरुवातीस रसशास्त्र-औषधी निर्माण व तद्नंतर कायचिकित्सा विभाग संभाळत महाविद्यालयात राहिले. श्री. शिवराम किरुमाक्की अधिक शिक्षण घेण्यासाठी जर्मनीला गेले. 'न्यूरॉलॉजिस्ट' म्हणून ख्यातकीर्त झाले. अजूनही ते हयात असून आयुर्वेदाची कास त्यांनी सोडलेली नाही.

इ.स. १९५० मध्ये पारंगत झाल्यावर वै. मामा गोखले यांनी श्री अनंतरावांची त्याच महाविद्यालयात अध्यापक म्हणून नियुक्ती केली आणि त्यांची आयुर्वेद क्षेत्रातील कारकीर्द सुरू झाली.

**इ.स. १९५० ते १९६६ : अध्यापक- उपप्राचार्य ते प्राचार्य**

श्री. अप्पांनी 'राष्ट्रीय शिक्षण मंडळाच्या' आयुर्वेद महाविद्यालयांत अध्यापकापासून प्राचार्यांपर्यंत सर्व पदे १९५० ते १९६६ दरम्यान भूषविली. ते प्राचार्य होते तसेच रा.शि. मंडळाचे आजीव सदस्य होते. पुणे विद्यापीठाचे कार्यकारिणी सदस्यही होते. आयुर्वेद रसशाळा, पुणे याचे प्रमुख म्हणूनही त्यांनी काम पाहिले. तसेच ताराचंद रामनाथ रुग्णालयाचे अधीक्षकही होते. या १५ वर्षांच्या काळात त्यांनी विविध जबाबदारीची पदे एका वेळी भूषविली. एक कुशल प्रशासक म्हणून तसेच विद्यार्थ्यांत अप्रतिम शिकवणारे प्राध्यपाक म्हणून त्यांचा खूपच नावलौकिक होता.

**पू. अप्पांच्या कारकीर्दीतील आयुर्वेद महाविद्यालयांतील महत्त्वपूर्ण घटना अशा-**

- १९५६ ते १९६० या अनंतरावांच्या उपप्राचार्य पदाच्या कारकीर्दीत महाविद्यालयाची नवीन इमारत पूर्ण झाली.
- यानंतर इ.स. १९६२ मध्ये अनंतराव प्राचार्य पदावर असतानाच महाविद्यालयाच्या नामकरण प्रस्तावास मूर्त स्वरूप आले. भारताचे त्यावेळचे विद्वान राष्ट्रपती डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन् यांच्या हस्ते उद्घाटन समारंभ झाला. समारंभ अतिशय भव्य आणि आकर्षक झाला.
- उद्घाटनाच्या निमित्ताने 'धन्वन्तरी'ची सुबक मूर्ती इमारतीच्या दर्शनी भागात श्री. अनंतरावांच्या सूचनेवरून प्रतिष्ठित करण्यात आली. या समारंभाचे अध्यक्ष श्री.एस.एम.जोशी होते.
- ५ ऑगस्ट १९६२ रोजी 'लो. टिळक आयुर्वेद महाविद्यालय' असे नामकरण श्री. यशवंतराव चव्हाण यांचे उपस्थितीत झाले. प्राचार्य

अनंतराव सेवकवर्गापासून विद्यार्थ्यांपर्यंत आणि बाहेरून येणाऱ्या डॉक्टर्सपासून ते हाऊसमन्सपर्यंत सर्वांमध्ये सारखेच लोकप्रिय होते. कुशल प्रशासक, उत्तम अध्यापक, सहाय्यास तत्पर असणारे वरिष्ठ अशा अनेक गुणांमुळे त्यांची प्राचार्यपदाची कारकीर्द संस्मरणीय झाली.

**'आयुर्वेदीय ग्रंथसंपदा'**

श्री. अनंतरावांनी आयुर्वेद वाङ्मयामध्ये मोलाची भर घातली. रोगाचे निदान निश्चित झाल्याशिवाय उपचार करणे अयोग्य असते. म्हणून ''रोगमादौ परीक्षेत ततोनन्तरमौषधम् ।'' असे सूत्र शास्त्रकारांनी सांगितले आहे. आयुर्वेद म्हणजे नाडीपरीक्षा. वैद्यास नाडीवरून सर्व काही कळते असा समज आहे. खरे तर शरीराचा प्रत्येक भाग आणि क्रिया आपणास त्या व्यक्तीच्या प्रकृती आणि विकृती बाबत सांगत असतो. शरीराची ही भाषा अनुभवाने समजणारे तज्ज्ञ म्हणजेच वैद्य होय. नाडीपरीक्षा हा त्यातला एक बारकावा. असेच ज्ञान मल, मूत्र, जीभ, स्वर, स्पर्श, त्वचा, नेत्रादि परीक्षणाने होते. यालाच त्रिविध अष्टावेध, दशविध परीक्षा म्हणतात. ही झाली रुग्णपरीक्षा, अशीच रोगपरीक्षा असते, लक्षण समूह असतो. या विषयाचे अप्पा स्वत:च प्राध्यापक असल्याने 'निदान पंचक संप्राप्ति- विज्ञान, व्याधि-विनिश्चय- पूर्वार्ध व उत्तरार्ध हे त्यांचे ग्रंथ म्हणजे दुग्धशर्करा योगच. ३२० पृष्ठांचा हा ग्रंथ १९६१ साली प्रसिद्ध झाला.

रोगांच्या व्याख्या, त्यांचे स्वरूप, रोगनिर्मितीमागील दोष, रोगोत्पत्तीच्या घटना, इ.संबंधी चरक, माधवनिदान, सुश्रुतादि अधिकृत ग्रंथ वचनांचा परामर्श घेऊन समन्वयात्मक दृष्टीने अप्पांनी या पुस्तकाची रचना आयुर्वेद अभ्यासकांसाठी केली आहे.

'श्रीमत् आत्रेय प्रकाशन' ही नवीन संस्था त्यांनी या आयुर्वेद ग्रंथांच्या प्रकाशनासाठी काढली. याचे तीन भागीदार होते आणि तेच लेखकही होते. ती.अप्पा, ताई राजवाडे आणि वै.शि.गो. जोशी.

गुरुपौर्णिमा २० जुलै १९५९ या दिवशी आयुर्वेद महाविद्यालयांत या तीन लेखकांच्या 'कौमारभृत्यतंत्र' (आजच्या भाषेतील स्त्री, बालरोग व प्रसूतीतंत्र) या ग्रंथाचे प्रकाशन वै लक्ष्मीबाई बोरवणकर अध्यक्षा- महाराष्ट्र प्रांत वैद्य मंडळ यांचे हस्ते झाले. या तिघांचे पारंगतचे सहाध्यायी मुंबईच्या पोद्दार आयुर्वेद महाविद्यालयाचे प्राचार्य वैद्य श्री. मो.य.लेले यांना अपरिमित आनंद झाला. त्यांच्या या प्रसंगीचा अभिप्राय असा,

''सध्या अध्यापकांना कौमार्यभृत्यतंत्र हा विषय शिकविताना व विद्यार्थ्यांना शिकताना ज्या अनंत अडचणींना तोंड द्यावे लागते, एकाच व्याधीचे संदर्भ शोधण्यासाठी विविध ग्रंथांतील अध्याय पहावे लागतात त्या साऱ्या अडचणी या ग्रंथ प्रकाशनाने दूर होणार आहेत. तुम्हांला परमेश्वर आयुर्वेदाच्या उत्कर्षासाठी चालू असलेल्या तुमच्या प्रयत्नात पूर्ण यश देवो व अशाप्रकारची पुस्तके प्रकाशित करण्याबद्दलची निमंत्रणे तुमच्याकडून दर वर्षी मिळोत'' सुदैवाने आपल्या स्नेह्याची ही विनंती शिरोधार्य मानून पुढच्याच वर्षी या तिन्ही लेखकांनी १९६० साली त्यांचा दुसरा 'शल्यशालाक्यतंत्र' (आयुर्वेदीय सर्जरी) हा ग्रंथ प्रकाशित केला.

यानंतर जे प्रकाशन झाले ते आयुर्वेद शास्त्रातील ग्रंथराज अशा 'आयुर्वेदीय व्याधिविनिश्चय' या ग्रंथाचे. १००० पृष्ठांचा हा ग्रंथ पू.अप्पांनी त्यांचे विद्यागुरू वै.श्री.भा.वि. तथा मामा गोखले यांना अर्पण केला आहे. तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे हस्ते हा प्रकाशन सोहळा पुणे येथे संपन्न झाला.

एवढ्या प्रचंड ग्रंथ संभाराचे लेखन, तेही आयुर्वेदासारख्या शास्त्रीय विषयावरील, केवळ चाळिशीच्या वयात अप्पांनी पूर्ण केले. त्यास सर्वतोपरी मानमान्यता मिळाली आणि आयुर्वेदाची खऱ्या अर्थाने सर्वोत्तम सेवा घडली. पू.दादांनी छात्रबोधात पुढील इच्छा व्यक्त केली होती-

**या वैद्यक विद्येपरी । विद्या न दूसरी भूमीवरी ।**
**तीच कळसास न्यावी खरी । तू स्वकीय बुद्धि सामर्थ्ये ।।**

प्रिय अप्पांनी पू.दादांची ही इच्छा अपेक्षेपेक्षाही अधिक प्रमाणात निश्चितच पूर्ण केली. पू.दादांना त्याचा अवर्णनीय आनंद झाला. ती. अप्पांच्या आयुर्वेद ग्रंथ संपदेतील मुकुटमणि म्हणावा असा ग्रंथराज १ सप्टेंबर १९८० साली प्रसिद्ध झाला. हा ग्रंथ म्हणजेच श्रीमत् वृद्ध वाग्भट विरचित 'अष्टांगसंग्रह' होय. या ग्रंथाचीही एक हजार पृष्ठे आहेत. या ग्रंथाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे तो अथ पासून इतिपर्यंत संस्कृतात आहे. या ग्रंथामध्ये 'अष्टांग-संग्रहावरील इंदू टीका पू. श्री. अनंतरावांनी समाविष्ट केली आहे.

आयुर्वेदाच्या आठ अंगांचा- शाखांचा- विशेष तंत्रांचा अभ्यास या एकाच पुस्तकाने होतो. आयुर्वेदाची सैद्धांतिक दृष्टि आणि क्रियात्मक अनुभवासाठी हा ग्रंथ वारंवार मदत करतो. भारतभरामध्ये श्री अनंतरावांच्या या ग्रंथाला मागणी आहे. एवढेच नव्हे तर आम्ही युरोप, अमेरिका, दक्षिण अमेरिकेतील ब्राझील सारख्या देशांत जिथे जिथे आयुर्वेदाचे अभ्यासक्रम चालवितो तेथील विद्यार्थी संस्कृत भाषा शिकून या मूलग्रंथांचा रसास्वाद घेण्यास आसुसलेले आहेत. यातच या ग्रंथाचे मोठेपण सिद्ध होते.

प्रिय आप्पांनी आम्हांस शेवटपर्यंत त्यांच्या चंद्रशेखर आणि महेश या मुलांसारखेच वागविले. भरभरून प्रेमही दिले अन् प्रसंगी संस्कृतचा आणि आयुर्वेदीय मूलग्रंथांचा सखोल अभ्यास आम्ही करावा म्हणून कठोरपणे सुनावलेही. त्यांनी स्वत: परदेशांत पाऊल टाकले नसले तरी शास्त्रशुद्ध आयुर्वेदाचा आम्ही करीत असलेला प्रचार अध्यापन याचे मुक्त कंठाने कौतुकही केले. त्यांच्या डोळ्यांतील भाव अन् पाठीवरील कौतुकाची थाप आजही आयुर्वेद महासागरात पोहण्यास आम्हास मदत करते.

**वैद्य अविनाश मोरेश्वर लेले**
'नंदनंदन', आत्रेय आयुर्वेद, वैद्य मो.य.लेले चौक
एरंडवणे, पुणे ४११००४
फोन : २५४४०३८६, ९४२१६९७५०७
avilele@gmail.com

•••



# प.पू.स्वामी वरदानंद भारती रचित-

## १) रुक्मिणी स्वयंवर आख्यान

## २) मराठी ओवीबद्ध श्रीरुक्मिणी स्वयंवर -एक परिचय


**सौ. प्रियंवदा नवाथे**

बी.ए., मानसशास्त्र (पुणे विद्यापीठ), एम्.ए. संगीत (एस.एन.डी.टी. विद्यापीठ)
गृहिणी, श्रीदासगणू महाराजांच्या कीर्तनातील पदांच्या नोटेशनचे काम (तीन आख्याने)
पू. स्वामी वरदानंद भारती यांच्या 'भावार्चना' या काव्य संग्रहातील पदांचे संगीत संयोजन व गायन


(टीप- या लेखात स्वामी वरदानंद भारती यांचा उल्लेख प.पू. अप्पा, आणि ती.दासगणूमहाराजांचा उल्लेख ती. दादा असा केला आहे.)

सुप्रसिद्ध 'संतकवी' ती.दासगणू महाराज यांनी सुमारे ८० ते ८५ कीर्तनोपयोगी आख्याने रचली. ती. दादांकडून आलेला हा समृद्ध वारसा प.पू.अप्पांनी वसा घेतल्याप्रमाणे जपला. त्यामध्ये अधिक भर घातली (१) श्री.लोकमान्य टिळक, २) श्री. दाहिर राजा, ३) श्रीरुक्मिणी स्वयंवर, अशी तीन नवीन कीर्तनोपयोगी आख्याने प.पू.अप्पांनी रचली.

ती.दासगणू महाराजांच्या परंपरेत कीर्तनाची एक ठरलेली पद्धत आहे. ती अशी- कीर्तनाच्या सुरुवातीला काही नमनाची पदे-गाणे यामध्ये -

१) रामदास माय माझी पतित पावना
२) रहम् नजर करो अब मोरे साई
३) साई रहम् नजर करना
४) उभा कैवल्याचा गाभा चंद्रेभागेकाठी

या सारख्या पदांमधून समयोचित अशा पदांचे गायन होते. त्यानंतर पूर्वरंगाचे पद गायले जाते. या पूर्वरंगाच्या पदामध्ये जो पारमार्थिक विचार मांडला त्याचे सविस्तर निरूपण केले जाते. निरूपणानंतर सामूहिक स्वरूपात काही 'गजर' (उदा.- जय सच्चिदघन जानकी जीवन नारायण तव दासोहं) सादर होतात.

आकर्षक चाली मधले, भक्तिरसाने ओथंबलेले असे हे गजर म्हणताना उपस्थित सर्वच श्रोत्यांना त्यामध्ये सहभागी करून घेतले जाते. त्यामुळे सुयोग्य वातावरण निर्मिती होऊन सर्व श्रोते नकळत कीर्तनात एकरूप होऊन जातात. यानंतर प्रत्यक्ष आख्यान सादर होते. पूर्वरंगाच्या पदामध्ये जो पारमार्थिक विचार मांडला होता तो विचार ज्याने प्रत्यक्ष आचरणात आणून दाखविला अशा सत्पुरुषाचे जीवनचरित्र आख्यानामध्ये मांडले जाते. प.पू.अप्पांनीच दिलेली उपमा वापरून असे म्हणता येते की, 'पूर्वरंग' म्हणजे थिअरी तर आख्यान हे प्रॅक्टीकल असते. हे आख्यान नुसते गद्य स्वरूपात न मांडता आकर्षक पदांमध्ये गुंफून मांडले जाते. (आकर्षक-हे विशेषण पदातील काव्य आणि संगीत दोघांना उद्देशून वापरले आहे.)

प.पू.अप्पांनी आपल्या नवीन रचलेल्या आख्यांनांमध्ये हीच पद्धती अनुसरली. तरी सुद्धा सूक्ष्म फरक असला तर इतकाच आहे की, ती.दादांनी आपल्या आख्यानांमध्ये परमार्थ मार्गातील आवश्यक अशाच गोष्टींवर भर दिला तर प.पू.अप्पांचा भर ऐहिक गोष्टींवर सुद्धा होता. ऐहिक गोष्टींचे महत्त्व सांगताना श्री.ज्ञानेश्वर महाराजांच्या वचनाचा अप्पा दाखला देतात.

''ज्यांचे 'ऐहिक' धड नाही । त्याचे 'परत्र' पुससी काई' ।। (संत ज्ञानेश्वर महाराज) इथे अप्पांना हेच सांगायचे आहे की, ज्याला आपला संसारही धडपणे करता येत नाही तो परमार्थ काय करणार! प्रपंच आणि परमार्थाचा योग्य ताळमेळ साधला जावा, याचे भान असावे यासाठी अप्पांनी कीर्तन पद्धतीत थोडी भर घातली. प्रत्यक्ष आख्यान सुरू करण्यापूर्वी-

**''स्थिती काळ देश असो काही का ना ।**
**रामकृष्ण हरि जयजय भावाने म्हणा।।''**

या भजनाचे सामूहिक गायन होते. प.पू. अप्पांनीच रचलेल्या या पदामध्ये भाविक श्रोत्यांना अप्पांनी उपदेश केला आहे की- तुमची शारीरिक, मानसिक, आर्थिक परिस्थिती कशी का असेना नामजपाची साधना सोडू नका. शेवटी अप्पा सांगतात,

**''असाल तेथुन पुढती चला यत्न सोडा ना ।**
**रामकृष्ण हरि जय जय भावाने म्हणा ।।**

नवीन आख्यान रचण्यामागे अप्पांची प्रेरणा काय असेल याचा विचार केला असता असे लक्षात येते- प्रखर देशभक्ती हा प.पू. अप्पांच्या स्वभावातील महत्त्वाचा पैलू आहे. त्याचेच फलित म्हणून श्री.लोकमान्य टिळक व श्री.दाहिर-राजा या दोन आख्यानांची निर्मिती झाली असे म्हणता येईल.

कीर्तन प्रवचनात प.पू.अप्पांनी नेहमीच श्रोत्यांमधील सामान्य साधक केंद्रस्थानी ठेवून त्यांचे हित कशामध्ये आहे हाच विचार कळकळीने मांडला आहे. (एरवी सुद्धा या साधकाला साधनेबद्दल जर काही शंका असतील तर त्यांचे निराकारण करण्यासाठी, त्या अनुषंगाने इतर चर्चा करण्यासाठी अप्पांकडे मुक्तद्वार असे.)

अप्पांनी कीर्तन-प्रवचनात कधीही-'घरादाराचा त्याग करून एकांतात जा आणि परमार्थ साधना करा'- असे सांगितले नाही. उलट प्रत्येक साधकाने कुटुंब आणि परिवारासंबंधीची कर्तव्ये यथासांग पार पाडली पाहिजेत, या गोष्टीवर अप्पांचा कटाक्ष असे. अप्पांचे सांगणे असे

की, भक्कम पाया हाच जसा इमारत सुरक्षित राहण्याचा उपाय आहे त्याचप्रमाणे व्यक्तीच्या आणि समाजाच्या धारणेसाठी, अभिवृद्धीसाठी कुटुंबव्यवस्था टिकून रहाणे अत्यंत गरजेचे आहे. कुटुंबसंस्थेचे महत्त्व विषद करण्यासाठीच 'रुक्मिणी स्वयंवर' या आख्यानाची रचना झाली आहे. या दृष्टीने प.पू. अप्पांनी रचलेले या आख्यानाचे पूर्वरंगाचे पद अभ्यास करण्यासारखे आहे. हे पद पुढीलप्रमाणे-

'समाजधारण- कल्याणास्तव कुटुंब संरक्षिणे-<br>
भान हे ध्यानी सदा ठेवणे ।<br>
गृहस्थधर्मातूनी सुखावह सर्वांना पोसणे<br>
येथचि फिटती सगळी ऋणे ।।<br>
चाल = या कुटुंबरूपी पहा स्यंदनाप्रती ।<br>
अर्थ काम हीचि द्वय चाके शोभती ।।<br>
स्त्री रथी, येथिचा असे सारथी पती ।<br>
(सारथी पुरंध्री, रथी येथीचा पती)<br>
धर्म तुरंगम, कैवल्याचा ध्वज वरती लावणे ।<br>
वैभवा मग ना काही उणे ।।

अशा प्रकारे अनेक अंगांनी कुटुंब संस्थेचे महत्त्व या पदामध्ये व नंतरच्या निरूपणात सांगितले आहे. अप्पा सांगतात- पतिपत्नी हे नाते कुटुंबसंस्थेचा गाभा आहे. (नुसते स्त्री पुरुष नाते नव्हे. सध्या वर्तमानपत्रे, मासिके यामधून ज्याच्यावर चर्चा चालू आहे त्या Live in Relationship वर अप्पांनी त्यांच्या पद्धतीप्रमाणे कडक टीका केली असती) जगातील इतर सर्व नाती उदा. आई-बाप, कन्या-पुत्र, बहीण-भाऊ, सासू-सासरे इ. पतिपत्नी नात्यातूनच निर्माण होतात. यासाठी विवाह संस्कार अत्यंत महत्त्वाचा आहे.

गृहस्थाश्रम सुसंपन्न असेल तर इतर तीन आश्रम-ब्रह्मचर्य, संन्यास, वानप्रस्थाश्रम- त्याचे आधारावर जगू शकतात.

मनुष्य जन्माला येतो तो तीन ऋणे घेऊन अशी आपली परंपराच सांगते. ती तीन ऋणे म्हणजे, १) देव ऋण, २) ऋषि ऋण, ३) पितृ ऋण.

देव ऋण हे यज्ञयाग व अन्य सामाजिक कर्मे केल्याने फिटते. यज्ञयाग आदि क्रियांना पत्नीची उपस्थिती आवश्यक असते. विद्याध्ययन व अध्यापन याने ऋषीऋण फिटते व संतती निर्माण केल्याने पितृऋण फिटते. अशा प्रकारे तिन्ही ऋणे फेडण्याचे सामर्थ्य गृहस्थाश्रमात आहे. (आजच्या जमान्यात ही ऋणत्रयाची कल्पना किती जणांना पटण्यासारखी आहे प्रश्नच आहे!)

या कुटुंबरूपी 'रथाला' (स्यंदन = पूर्वरंगाच्या पदातील शब्द) अर्थ आणि काम ही दोन चाके आहेत; इथे अप्पा, अभिमानाने सांगतात, चार पुरुषार्थामध्ये 'अर्थ' आणि 'काम' (धर्माविरुद्ध नसणारे. भगवद्गीता ७.११) यांना स्थान देणारी फक्त माझी भारतीय संस्कृती आहे. अर्थ आणि काम या नैसर्गिक प्रेरणांचा स्वीकार तर करायचा पण त्यांनी मर्यादा ओलांडू नये म्हणून त्यांची योग्य व्यवस्था ठेवायची यातच कुटुंब संस्थेचे महत्त्व आहे. यासाठीच या कुटुंब रथाला धर्म रूपी घोडे जोडले आहेत.

या रथाला एक सारथी व एक रथी आवश्यक असतो. अर्थार्जन करून कुटुंबरूपी रथाला इंधन पुरविणारा तो सारथी तर कुटुंबातील सर्व सदस्यांची काळजी घेऊन, सर्वांच्या गरजा पूर्ण करण्यासाठी संपत्तीचे योग्य ते व्यवस्थापन करून रथाला योग्य दिशा दर्शवणारी व्यक्ती 'रथी'. पतिपत्नीमध्ये सारथी कोण असावा हे ठरविण्याचे स्वातंत्र्य आहे. (असावे) हे ज्याच्या त्याच्या योग्यतेवर, पात्रतेवर व परिस्थितीवर अवलंबून असावे. म्हणूनच पूर्वरंगाच्या पदामध्ये या संबंधी दोन भेद स्वत: अप्पांनीच उद्धृत केले आहेत ते असे-

**स्त्री रथी, येथिचा असे सारथी पती ।** किंवा<br>
**सारथी पुरंध्री रथी येथीचा पति ।**

(असे असले तरी अप्पांची पहिली पसंती पती 'सारथी असणे आणि पत्नीने 'रथी' होऊन घर सांभाळणे या गोष्टीला होती. अप्पांच्या मते ही श्रम विभागणी निसर्गानुसार व स्त्री पुरुषांच्या प्रकृती धर्माला अनुकूल आहे. इथे कोणाला श्रेष्ठ व कोणाला कनिष्ठ मानण्याचे कारणच नाही.)

या बाबतीत अप्पा एक इशारा देतात. संसाररूपी रथाचे पतिपत्नी दोघेही सारथी आणि रथी कोणीच नाही असे सुद्धा असता कामा नाही. नाहीतर योग्य पंथाने रथ जाणार नाही.

या रथावर 'मोक्ष' रूपी ध्वज फडकत आहे. परमार्थाचे परम ध्येय 'मोक्ष' तो निकोप कुटुंब संस्थेद्वारा मिळवणे शक्य आहे असे अप्पांचे सांगणे आहे. मोक्षाची प्राप्ती हे आपले ध्येय असे सर्वांनाच वाटेल असे नाही. बहुतेक जणांना वैभव, इतर ऐहिक सुखाचीच अपेक्षा असते. या गोष्टी सुद्धा आदर्श अशा कुटुंब संस्थेद्वाराच मिळवणे शक्य आहे.

अशा श्रेष्ठ कुटुंबसंस्थेला साधन होणाऱ्या विवाह संबंधाचे, विवाह संस्काराचे मोठे कौतुक म्हणूनच भारतीय संस्कृतीत झालेले दिसून येते.

विवाह समारंभातील धार्मिक विधींबद्दल अप्पा एक गोष्ट स्पष्टपणे सांगतात, या विधींमध्ये कुठेही वधूपक्षाला वरपक्षापेक्षा कमी लेखलेले नाही. वर आणि वधू दोघांच्या भूमिका परस्परांना कशा पूरकच आहेत- हे विवाहमंत्रांचा अर्थ लक्षात घेतला तर स्पष्ट होते. पण आजकाल विवाह समारंभात कपडेलत्ते, दागिने, खाणे-पिणे, सजावट (डेकोरेशन) यांनाच जास्त महत्त्व आले आहे. विवाहमंत्रांचे स्पष्ट, स्वच्छ उच्चारण करून त्याचा अर्थ वधू, वराला स्पष्ट करून सांगणे ही बाब लोकांना महत्त्वाची वाटत नाही या बद्दल अप्पा खेद व्यक्त करतात.

भारतीय संस्कृतीत आदर्श विवाहाची वर्णने करण्यात महाकवींनी आपल्या प्रतिभेचे सार्थक मानलेले आहे. श्रीव्यास महर्षींनी सत्यवान-सावित्री, नल-दमयंती, कृष्ण-रुक्मिणी यांची स्वयंवरे रसाळपणे गायिली आहेत ती त्यामागील समाज स्वास्थ्य आणि समाज-रक्षणाचा आशय लक्षात घेऊनच.

प्रस्तुत 'रुक्मिणी स्वयंवर आख्यान' याच हेतूने रचले आणि गायिले जात आहे.

रुक्मिणी स्वयंवराच्या कथानकाची पूर्वपीठिका सर्वांना परिचित आहेच. विदर्भ देशाचा राजा भीष्मक याची रुक्मिणी ही रूप-गुणवान, सात्त्विक स्वभावाची कन्या. आख्यानाच्या सुरुवातीला रुक्मिणीची

ओळख करून देणाऱ्या श्लोकात अप्पा तिचे वर्णन असे करतात-

**विदर्भनृपनंदिनी सगुण सुंदरी भीमकी ।**
**रतीहि तुलता जिच्या पद नखास वाटे फिकी ।।**
**धरून अवतार ये परम मंगला श्री रमा ।**
**विवाह परिसा तिचा सकल घालवी जो श्रमा ।।**

रुक्मिणीचा भाऊ 'रुक्मी' हा बहिणीच्या उलट स्वभावाचा आहे. रुक्मीचे वर्णन अप्पांनी -

**उन्मत्त दुष्ट गर्विष्ठ असे तो अती ।**
**शिशुपाल जरासंधादि शोभती त्यास सोबती ।।**

अशाप्रकारे केले आहे.

श्रीकृष्णाची कीर्ति आणि पराक्रम ऐकून तारुण्यात पदार्पण केलेली रुक्मिणी त्याच्या प्रेमात पडून मनाने त्याला वरते. तर भाऊ-रुक्मीचा आग्रह रुक्मिणीचा विवाह शिशुपालाबरोबर लावून देण्याचा आहे. राजा भीष्मक रुक्मिणीच्या बाजूचे आहेत. शिशुपालाकडे सत्ता, संपत्ती आहे तर कृष्णाकडे चारित्र्य आणि पराक्रम. (कृष्णाचे राज्य यादवांच्या गणराज्यापैकी एक असल्याने तो सिंहासनाधीश राजा नव्हता. सत्ता संपत्तीपेक्षा चारित्र्य श्रेष्ठ हा भीष्मकाचा विचार रुक्मीला पटत नाही. या प्रसंगाच्या अनुरोधाने दोन पिढ्यांचा संघर्ष या अनादि विषयावर ती.अप्पांचे जे भाष्य आहे ते भीष्मकाकरवी व्यक्त झाले आहे. या प्रसंगी भीष्मक म्हणतात- ''तरुणांना वृद्धांची मते जुनी (जुनाट) वाटतात. पण जुने ते सर्वच टाकाऊ नसते. सोनं जुनं म्हणून कोणी टाकून देतात का? जुनं ते 'जुनं' म्हणून वाईट नसते. नवीन 'नवीन' म्हणून चांगले नसते. चांगले वाईट उपयुक्ततेवर, त्याच्या परिणामांवर ठरते.)

या परिस्थितीतून मार्ग काढण्यासाठी रुक्मिणी आपल्या मनातले भाव पत्रामध्ये व्यक्त करून कुलोपाध्यायांमार्फत ते पत्र श्रीकृष्णाकडे पाठवते. (इथे ती.अप्पांची मिश्कील टिप्पणी- जगाच्या इतिहासातील हे पहिले प्रेमपत्र. बाकीची सर्व यानंतरची)

पत्रामध्ये - **''सौंदर्य जे बघुनि सार्थक लोचनासी ।**
**माझे जडे हृदय नाथ भवत्पदासी''।।**

असे म्हणून रुक्मिणी पुढे लिहिते-

**''विद्याधिकार- कुलशील- सुरूपताहि।**
**साजेलशी तुज, जगात कुणीच नाही ।।**
**जाणीव ही असून देव कुलीन कन्या ।**
**तू तेच इच्छित पति म्हणुनी अनन्या ।।**

शेवटी अगदी निर्वाणीने रुक्मिणी म्हणते -

**इच्छा जरी न पुरली मम पद्मनाभ ।**
**देइन जीव सहसा हसडून जीभ ।।**
**घेऊन जन्म शत उग्रतपे तुझे ते ।**
**पावेन पाय शिवही नमितो जयाते ।।**

योग्य समयी कृष्ण सर्व विरोध मोडून रुक्मिणीचे हरण करून तिला द्वारकेला घेऊन येतो. रुक्मिणीच्या माता-पित्यांच्या उपस्थितीत, शास्त्रानुसार सर्व धार्मिक विधींसह विवाह सोहळा पार पडून पती-पत्नी नात्याने दोघे एकत्र येतात.

हे सर्व सविस्तर सांगण्याचे कारण विवाह संस्काराने कुटुंब निर्माण होते. कुटुंब संस्था चांगल्याप्रकारे समाज धारण करू शकते हा पूर्वरंगातील पदातील विचार इथे पूर्णत्वास जातो.

या आख्यानाच्या सांगीतिक बाजूचा विचार केला असता असे लक्षात येते की, या बाबतीत सुद्धा ती. दासगणू महाराजांची परंपरा ती.अप्पांनी जपली आहे. ती.दादांच्या आख्यानांची जी सांगीतिक वैशिष्ट्ये होती ती सर्व 'रुक्मिणी-स्वयंवर' आख्यानामध्ये आढळतात. या आख्यानामध्ये साकी, दिंडी, आर्या, ओवी, कटाव वेगवेगळ्या अक्षर-गण वृत्तातील श्लोक या सर्वांचा जागोजागी उपयोग केलेला आढळतो. लावणीच्या बाजावर आधारित पदांचा खूप मोठा ठेवा ती.दासगणू महाराजांच्या आख्यानांमध्ये आढळतो. (ही सर्व पदे भक्तिरसाने युक्त असल्याने या पदांच्या चालींचे मूळ लावण्यांमध्ये आहे हे लोक आता विसरले आहेत.) प्रस्तुत 'रुक्मिणी स्वयंवर' आख्यानामध्येसुद्धा अशी अनेक पदे आहेत. त्याशिवाय शास्त्रीय संगीतातील रागांवर आधारित पदांची संख्यासुद्धा खूप मोठी आहे. उदा. आसावरी, कलिंगडा, काफी, तिलक-कामोद, बिहाग, बहार, मालकंस, सोहनी, भैरवी इत्यादी रागांमध्ये पदांच्या चाली बांधल्या आहेत. या रागांची निवड उगचीच करायची म्हणून केली असे नसून ही निवड विचारपूर्वक केलेली दिसते. काही उदाहरणे देऊन हा मुद्दा स्पष्ट करते-

१) आख्यानामध्ये रुक्मिणीच्या शांत, सात्त्विक स्वभावाचे वर्णन करणारे पद आहे. त्यात तिचे वर्णन -

**शांत सरळ सद्गुणास भूषण । वर्तन लवना विनया सोडून ।।**

अशाप्रकारे केले आहे. या पदाची चाल शांत, उदात्त भाव व्यक्त करणाऱ्या 'दरबारी कानडा' या रागात बांधली आहे.

२) रुक्मिणीने कृष्णासाठी लिहिलेल्या पत्रावर कुलोपाध्याय नजर टाकतात. त्यांच्या मनातील रुक्मिणी बद्दलचे भाव-

**असू आम्ही विद्वान तरीहि । तव वचनाची सरी न येइ ।।**

या पदातून व्यक्त होतात. कुलोपाध्यायांच्या गंभीर, भारदस्त व्यक्तिमत्त्वाला शोभेल अशा 'मालकंस' रागामध्ये या पदाची चाल बांधली आहे.

३) रुक्मिणीच्या प्रेमपत्राचे वर्णन-

**गोल टपोरे सुरेख अक्षर । उत्सुकतेने बघे परात्पर ।।**

अशा शब्दात ती.अप्पांनी केले आहे. प्रेमपत्राचे वर्णन करणाऱ्या या पदासाठी त्याला साजेशा 'बहार' रागाची निवड केली आहे.

४) रुक्मिणीचे भावमधुर पत्र वाचून-

**अभिनव कोमल भाव उदेले परमेशाच्या हृदयी ।**

अशी श्रीकृष्णाची अवस्था होते. कृष्णाच्या या अवस्थेचे वर्णन करणाऱ्या पदाला न्याय देण्यासाठी 'बागेश्री' खेरीज दुसरा सुयोग्य राग असू शकतो का!

५) ठरल्याप्रमाणे रुक्मिणी शिशुपालाच्या लग्नाचा दिवस उजाडतो. पण कृष्णाकडून अजून पत्राचे उत्तर आले नाही. त्यामुळे उदास होऊन सकाळच्या वेळी कुलदेवतेच्या दर्शनासाठी रुक्मिणी मंदिरात आली आहे. आणि-

**मोकलीस का बये अशी मज।**

**भेटिव गे, प्रियसखा अधोक्षज ।।**

अशा शब्दात देवीची करुणा भाकत आहे. सकाळच्या वेळी गायल्या जाणाऱ्या, करुण रसाचा परिपोष करणाऱ्या 'आसावरी' रागामध्ये हे पद बांधले आहे.

६) श्रीकृष्ण-रुक्मिणीचा विवाह सोहळा यथासांग पार पडला. वधू-वराची वरात निघाली. सर्व द्वारिका नगरी आनंदाने न्हाऊन गेली या प्रसंगाचे वर्णन करणारे पद पुढीलप्रमाणे-

**वरातिच्या शुभ मंगल वेळी ।**

**वैभव शोभा शिगेस गेली ।।**

**वाद्यगणांचा ध्वनि शुभमंजुल ।**

**ललनांची वरभूषा उज्वल ।।**

**जयजयकारे जन गर्जति मंगल ।**

**जयतु रमापति जय वनमाली ।।**

हे पद आख्यानातील शेवटचे पद आहे. मैफलीची सांगता 'भैरवी' रागाने करण्याची पद्धत आहे. म्हणूनच की काय वरील पदाची चाल भैरवी रागामध्ये बांधून अतिशय उचित असा आख्यानाचा शेवट केला आहे. अशाप्रकारे ती.दासगणू महाराजांच्या परंपरेत राहूनही आपला वेगळा ठसा रुक्मिणी स्वयंवर आख्यानाने निर्माण केला आहे.

पंढरपूर येथील श्रीरुक्मिणी देवीचे परंपरागत भक्त व पुजारी श्री.वा.ना. उत्पात व कुटुंबीय यांच्या आग्रहामुळे ती.अप्पांनी रुक्मिणी स्वयंवर हे कीर्तनोपयोगी आख्यान रचले. अप्पांच्याच प्रेरणेने या आख्यानातील अनेक महत्त्वाचे प्रसंग सुंदर चित्रांच्या रूपाने पंढरपूरच्या रुक्मिणी मंदिरात विराजमान आहेत. याच मंदिरात श्री.रुक्मिणी मातेच्या पुढे हे कीर्तनाख्यान अप्पांनी सादर केले. ते ऐकण्याचा योग ज्यांना लाभला ते श्रोते भाग्यवान ठरले.

'रुक्मिणी स्वयंवर' हा विषय ती. अप्पांच्या किती जिव्हाळ्याचा आहे हे दाखविणारी अप्पांची आणखी एक रचना म्हणजे 'मराठी ओवीबद्ध श्री रुक्मिणी स्वयंवर' ही पुस्तिका होय. यामध्ये श्रीमद् भागवतातील रुक्मिणी स्वयंवर विषयक संस्कृत श्लोकांचा मराठीत ओवीबद्ध मुक्त अनुवाद ती. अप्पांनी केला आहे. ५०० ओव्यांमध्ये अत्यंत प्रासादिक शैलीत हा अनुवाद केला आहे. यातील ओवी ही नाथांच्या ओवीप्रमाणे चार चरणांची आहे.

रुक्मिणी स्वयंवर हा विषयच किती उदात्त आहे हे ती.अप्पा या काव्यातील पुढील ओवीमध्ये स्पष्ट करतात.

**''कृष्ण पूर्ण ब्रह्माकृति । रुक्मिणी माया आदिशक्ती।**

**धर्मरक्षणा भूवरती । आले लक्ष्मी नारायण ।।**

हे सर्वच काव्य प्रासादिक गुणांनी युक्त आहे. जागोजागी समर्पक उपमा, दृष्टांत यांनी नटले आहे. विस्तार भयास्तव फक्त एकाचाच उल्लेख करते. विवाह प्रसंगी रुक्मिणी-श्रीकृष्ण यांना हळद लावण्याचा प्रसंग आहे. त्याचे वर्णन करताना ती.अप्पा लिहितात-

**गौरवर्णी रुक्मिणी मुळी । हळद जेव्हा लाविली ।**

**तेव्हा दिसाया लागली । जणू फुलावा सोनचाफा।।**

**निलमण्यासम अंगकांति । श्रीहरिची सतेज होती ।**

**हळद लागता अंगास ती । दिसू लागली पाचू परी ।।**

रुक्मिणीच्या सात्त्विक सौंदर्याचे वर्णन करताना अप्पांची लेखणी सुद्धा सात्त्विक भाव सोडत नाही. तिचे वर्णन-

**चरण टेकता पृथ्वी वरती । वाटे कमले उमलती ।**

**जिची पाहूनिया गती । डौल शिकावा हंसाने ।।**

अशा शब्दात केले आहे. श्री.वा.ना. उत्पात यांनी या संबंधात अत्यंत मार्मिक शब्दांत टिप्पणी केली आहे. ते लिहितात- ''स्त्री सौंदर्याचे वर्णन करताना चांगले चांगले कवी वाहात जातात व वर्णन मादकतेकडे झुकत जाते. पण या काव्यात सौंदर्याला सात्विकता प्राप्त झाली आहे. (संदर्भ- 'ही अनंत संपदा' - संपादक - डॉ. ग.प्र. परांजपे)

श्रीकृष्ण आणि रुक्मिणी विवाहबंधनाने एकत्र आल्यावर या नात्याचे वर्णन करताना ती.अप्पांची लेखणी किती उच्च स्थानी पोचली हे जाणण्यासाठी पुढील ओवी पहावी-

**जीव शिवाची भेट झाली । गंगा सागरी मिळाली ।**

**जणू ब्रह्मरंध्री पोचली । योग्याची ती कुंडली ।।**

या काव्याचे आणखी एक महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे विवाह संस्कारातील सर्व धार्मिक विधींचे खूप बारकाईने केलेले वर्णन. जर कुणाला या सर्व विधींची पूर्ण माहिती करून घ्यायची असेल तर त्याने अप्पांनी केलेले सर्व वर्णन मुळातूनच वाचावे असे आहे. कारण ग्रहमखापासून ते लक्ष्मीपूजनापर्यंत सर्व विधी व त्यातील अर्थ ती.अप्पांनी उलगडून सांगितले आहेत.

या काव्यामध्ये वेळोवेळी श्रीकृष्णाच्या तोंडी जी वचने आहेत त्या योगे वाचकास योग्य तो उपदेश अनायासे घडून येतो. उदा.

**जेथे शौर्य आणि न्याय । तेथेच राहि टिकून धैर्य ।** किंवा-

**स्वार्थासाठी आपपर । मी न कोणी मानी नर ।**

**मी सर्वदा निर्विकार । शत्रू-मित्र नाही मला ।।**

**मी न कोणा व्यर्थ जाची । भांडणाची मज ना रुची ।।**

**परी दुष्टा दुष्टतेची । शिक्षा झालीच पाहिजे ।।**

या ओवीबद्ध काव्याचे ज्येष्ठ प्रवचनकार श्री. धुंडामहाराज देगलूरकर यांनी मुक्त मनाने कौतुक केले आहे. या पुस्तकाच्या प्रस्तावनेत (प्रथम आवृत्ती) ते म्हणतात- ''भगवत्चरित्र जरी जुनेच असले तरी त्याचा आस्वाद नित्य नूतन असतो. त्यामुळे त्याचे नवे नवे दर्शन वाङ्मयातून कालाच्या ओघात होत असतेच. पण हे दर्शन करवून देणारा अधिकारी असावा लागतो. श्री. अनंत महाराज आठवले हे असे अधिकारी पुरुष आहेत. हे ओवीबद्ध काव्य अत्यंत रसाळ उतरले आहे. भाविकांना तर ते प्रिय होईलच पण भगवंतालाही प्रिय होईल.'

या पुस्तकाची दुसरी आवृत्ती प्रसिद्ध प्रवचनकार डॉ.सौ.कल्याणी नामजोशी यांनी प्रकाशित केली आहे. आपल्या 'प्रकाशकीय'मध्ये त्या लिहितात- ''श्रीरुक्मिणी स्वयंवराच्या कथेची गोडीच अवीट आहे. त्यातही पू.अप्पांसारख्या सिद्धहस्त, प्रतिभासंपन्न कवीने भक्तियुक्त अंत:करणाने केलेला हा रसाळ अनुवाद उत्कट प्रसन्नतेचा अनुभव देतो. वाचकाला स्वयंवराचा सोहळा प्रत्यक्ष घडतो आहे आणि वाचकही

जणूकाही त्या सोहळ्यात प्रत्यक्ष सहभागी झाला आहे याचा अभूतपूर्व आनंददायी अनुभव येतो.''

श्री.वा.ना. उत्पात यांनी एक महत्त्वाची बाब निदर्शनास आणून दिली आहे. ती अशी, एकनाथी भागवतानंतर नाथांनी जसे रुक्मिणी स्वयंवर लिहीले आहे, त्या प्रमाणे ब्रह्मसूत्र भाष्यानंतर अप्पांनी हे ओवीबद्ध रुक्मिणी स्वयंवर लिहिले आहे. तर्ककर्कश ग्रंथानंतर लिहिलेले हे भावमधुर काव्य आहे. शेवटी श्री.वा.ना. उत्पात यांच्याच शब्दात म्हणावेसे वाटते- ''श्रीदासगणू महाराजांसारख्या श्रेष्ठ संतकवीच्या कृपाप्रसादाने अप्पांच्या कविताकल्पलतेला लागलेले अमृतफळ म्हणजे हे 'मराठी ओवीबद्ध रुक्मिणी स्वयंवर.'

पंढरपूरच्या उत्पात कुटुंबियांच्या प्रेमळ आग्रहामुळे व राधा दामोदर प्रतिष्ठानच्या सहयोगाने 'श्रीरुक्मिणी स्वयंवर-कीर्तनोपयोगी आख्यान' आणि 'मराठी ओवीबद्ध श्रीरुक्मिणी स्वयंवर' या दोन प्रासादिक ग्रंथांचा लाभ सर्व भाविकांस झाला आहे.

**सौ. प्रियंवदा नवाथे**
देशपांडे पुरम् (ब्लॉक ७), दशभुजा गणपती जवळ,
कर्वे रोड, पुणे ४११०३८.
फोन : २५४५५७६६, मो. ९४०५०१५९७१

•••



# मनी विवेक जागृत ठेवी

**विद्यावाचस्पती विवेक गं. इनामदार**
एम. ए., एम. एड. विद्यावाचस्पती.
प्राचार्य, सहयोग सेवाभावी अध्यापक महाविद्यालय, विष्णुपुरी, नांदेड.
कार्यवाह - संस्कृती विचार सेवक संघ, संपादक - मासिक संस्कृती वंदना.

प. पू. अनंतमहाराज आठवले, एक थोर कीर्तनकार, भारतीय तत्त्वज्ञानासंबंधीचे व्यासंगी भाष्यकार आणि श्री सद्गुरु दासगणू महाराज यांचे शिष्योत्तम अधिकारी. आज स्वामी वरदानंद भारती या नावाने सर्वदूर माहिती आहेत. त्यांची विपुल ग्रंथरचना प्रकाशित आहे. कीर्तन आणि प्रवचनाच्या माध्यमातून त्यांनी गुरुपरंपरेची सेवा यशस्वीरीत्या पार पाडली. प. पू. दादा म्हणजेच दासगणू महाराज यांच्या आज्ञेने आणि सूचनेनुसार त्यांनी काही चरित्रआख्यानांची निर्मितीसुद्धा केलेली आहे. उदाहरणादाखल म्हणजे 'श्री राजा दाहिर' तसेच 'लोकमान्य टिळक चरित्र' (उत्तरार्ध)

हिंदुत्व ही जीवनपद्धती आहे. म्हणून सर्वोच्च न्यायालयाने निर्देश दिल्यानंतर तिचे असामान्यत्व लोकांना कळू लागले आणि मग अतिप्राचीनतम असलेल्या हिंदू संस्कृतीबद्दल वेगवेगळ्या माध्यमांतून संशोधनपर चर्चा होऊ लागल्या. सात्विक अंत:करण असलेल्या जिज्ञासू लोकांना या प्राचीनतम आणि शाश्वत नीतिमूल्यांनुसार आधारित असलेल्या संस्कृतीचे महत्त्व कळत होते, पण इतकी चांगली संस्कृती असतानासुद्धा आपल्या समाजाची स्थिती अशी का? असा प्रश्न पडत होता. भव्य आणि दिव्य परंपरा असलेल्या समाजाला असे अपयशी जीवन का जगावे लागते, या सर्वसामान्य सज्जन लोकांच्या प्रश्नावर उत्तरे देण्यासाठी तसेच भव्यदिव्य संस्कृतीतील जीवन पद्धतीसोबतच विचार आणि आचार पद्धतीमध्ये सारासार विवेक तितकाच महत्त्वाचा आहे, हे सांगण्यासाठी चरित्ररूपी आख्यानांची निर्मिती झाली असावी असे मला प्रामाणिकपणे वाटते.

प. पू. अनंतमहाराज आठवले (अप्पा) यांनी लिहिलेल्या चरित्र आख्यानात ऐतिहासिक सत्यता आणि चरित्रातील वास्तवता सोडलेली नाही. आपल्या संस्कृतीने सांगितलेल्या व्यष्टि, समष्टीच्या धर्माची नियमाचरणांची आपण समजून घेण्यात गल्लत केली आहे. वैयक्तिक पातळीवर अंगीकारावयाच्या नियमांना सामाजिक पातळीवर अवलंबण्यासाठी पुढाकार घेतला. वैयक्तिक स्वार्थासाठी सामाजिक लाभ दुर्लक्षित केला. तत्त्व आणि व्यवहार, तसेच सिद्धांत आणि आचरण याचा योग्य समन्वय साधण्यात चूक झाली. परिणाम पदरात यशाऐवजी अपयश येत गेले. अशा पद्धतीने वागल्यामुळे आलेले अपयशाचे खापर भव्यदिव्य अशा संस्कृतीवर ठेवण्यापेक्षा व्यक्ती आणि समाज यांच्या आचरणाचे नियम त्या त्या पातळीवर योग्य, पण राबविण्याचा विवेक हरवून बसल्यामुळे अपयश आले. हे प्रमाण प्रामाणिकपणे समजून घेणे आणि अशा चुका टाळणे यासाठीच प. पू. अप्पांची लेखणी परंपरेच्या सेवेसोबतच सामाजिक जाणीव लक्षात घेऊन संस्कृतीरक्षणार्थ राष्ट्राची जडणघडण सुव्यवस्थित करण्यासाठी झिजली.

सातव्या शतकातील ऐतिहासिक राजा दाहिरांची घटना इ. स. १९४२ साली प. पू. अप्पांनी कीर्तन आख्यानाच्या रूपात आपल्या समोर मांडली. चरित्र आरंभीचा पहिला श्लोक.

**आर्यांची पहिली ध्वजा फडकली जेथे जगत् जिंकुनी।**
**जेथे संस्कृति होत उन्नत अति यज्ञीय होमातुनी।।**
**'हिंदू' ही अभिधा विशाल जिथुनी आर्यांप्रती लाधली।**
**त्या सिंधूस अनंत अर्पण करी भावे प्रणामांजली।।**

म्हणजेच खोटा इतिहास माथी मारून, आर्य बाहेरून आले हे आपल्या डोक्यात भरवून दिलेले खूळ आहे. सत्य म्हणजे,

**या वेदोपनिषत्स्वनादिसमयाद् मूलं बिभर्ति स्वकम्।**
**या रामायण भारतादिषु हिता प्राज्ञैः समाख्यापिता।।**
**या वै व्यष्टिसमष्टि मङ्गलकरी सम्पूर्णताबोधिनी।**
**तां वन्दे विनयेन तत्परतया श्री भारतीसंस्कृतिम्।।**

अशा भव्यदिव्य असलेल्या भारतीय संस्कृतीला सिंधुपासून हिंदू नामाभिधान प्राप्त झाले आहे. प्राचीन काळी हिंदू समाज सिंधु काठी दाहिर राजांच्या आश्रयाखाली वैभवसंपन्न, सुखी आणि समाधानी होता. राजांना दोन मुली व एक मुलगा, मुलगा हा भारतीय संस्कृतीचा परिपूर्ण अभ्यास नसलेला, विरोधी विचारांचा, पण शूर होता. दोन्हीही मुली सुंदर, देदिप्यमान आणि सुलक्षणी. दाहिर कन्येचे वर्णन करताना गणुदास दास कवी म्हणतात, जणू काही ब्रह्मदेवाने यांना कोरून रेखून आधी तयार केले आणि मग यांच्यात प्राण ओतला. जणू काही लावण्याच्या खाणी म्हणजे त्या दोन मुली होत. महाकालीचे तेज दोन्ही मुलींच्या रूपाने अवतीर्ण झाले की काय असे त्या मुलींकडे पाहून वाटत होते.

राजा दाहिराचे राज्य हिंदू आणि मुसलमानांच्या एकसंधतेच्या भावनेतून निरामय सुखात चालले होते. अचानक मोहम्मद बीन कासीम हा हिंदुस्थानातील संपत्तीच्या प्रलोभनाने, खलिफांच्या आज्ञेवरून

हिंदुस्थानकडे वळला. हे राजा दाहिरांना माहीत असतानासुद्धा **'मी कुणाचे वाईट न करणारा राजा असल्यामुळे माझे कोण वाईट करणार'** या बेसावध आणि भोंगळ वृत्तीचा फायदा घेऊन कासिम राज्यावर चालून आला. हिंदू धर्मात अनेक शूरवीर राजे औदार्याचा मूर्तीमंत पुतळा असल्यासारखे वागत होते. हे इतिहासावरून लक्षात येते. परिणाम अशा बेसावध वृत्तीमुळे आक्रमकांचे फावले. आक्रमणामुळे होणारी लूटमार, स्त्रियांवर होणारे अत्याचार, सर्वत्र घबराहट सहन न झाल्यामुळे कासिम आणि राजा दाहिर यांच्यामध्ये युद्धाला झालेली सुरुवात.

राजा दाहिर युद्धाला जाण्यापूर्वीचा प्रसंग वर्णन करताना राणी राजाला औक्षण करून, भालावर भव्य असे कुंकुम तिलक लावून ओवाळल्यावर म्हणते,

**''नाथ नि:शंक जावे रणी।**
**भाग्यश्री आपलीच वाट बघते**
**माला करी घेऊनी।।''**

यातून भारतीय स्त्रीचा धीरोदत्तपणा प. पू. अप्पांनी सांगितला आहे.

शत्रूंच्या युद्ध परंपरेप्रमाणे राजांचा घात झाला आणि युद्ध रणांगणावर राजा कोसळला. नव्हे हिंदूंचे भाग्य कोसळले. राजा पडल्यानंतर सैनिकांनी हतबल व्हावे आणि हातातील शस्त्रे टाकून सैरावैरा पळावे ही आपली संस्कृती नक्कीच नाही. तरीपण त्या वेळेपासून पानिपतच्या युद्धातसुद्धा आणि बऱ्याच युद्धप्रसंगी अशा कचखाऊ भूमिकेमुळे आपल्याला पराभव पत्करावा लागला. हे पराभवाचे सत्य पू. पू. अप्पा पुढच्या चुका टाळणसाठी तळमळीने सांगतात.

ही बातमी ऐकल्यानंतर राणीच्या रूपातील भारतीय स्त्रीचे वर्णन करताना अप्पा म्हणतात,

''नाथ तुम्ही गेलात याचे दु:ख मला आहेच, पण सहगमनाद्वारे मी तुमच्या भेटीला येईनच. पण देशाच्या दारावर तुम्ही अडसरासारखे उभे होतात! आता देशाचे रक्षण कोण करेल याचे मला दु:ख आहे.'' आणि राणी सहगमनास सिद्ध झाली. अशा प्रसंगी त्या घरातल्या 'कुलगुरुंचा' आशीर्वाद घेण्यासाठी राणी जाते. अशा वेळेस पतिनिधनानंतर सहगमनास सिद्ध झालेल्या राणीला 'कुलगरु' उपदेश करतात तो उपदेश म्हणजे, भारतीय संस्कृतीचे भव्य आणि दिव्य, योग्य वेळेला साजेसे रूप आहे. ''राणी, राजा जसा शत्रूचा नि:पात करण्यासाठी लढता लढता मेला तू तशीच गेली पाहिजेस. तुझे सहगमन राजाला साजेसे झाले पाहिजे.'' हा आदेश शिरसावंद्य मानून राणीने सहगमन केले.

राणीच्या तळपत्या सूडाच्या भावनेतून वीरश्री संचारलेल्या धारदार तलवारीच्या पातीतून अनेक शत्रूंना कंठस्नान मिळाले. राणीच्या नेतृत्वाखाली अनेक स्त्रियांनी शर्थीचे प्रयत्न करून उरलेल्या वीरांना प्रोत्साहित करत अतुल पराक्रम करत - करत शरीर अर्पण केले. शत्रूंचा विजय होतो आहे असे चित्र निर्माण झाल्याबरोबर दारावर देव टांगून, अंगणात सोवळे बांधून, लहान मुलांना दारावर उभे करून, लेकरेबाळे असणाऱ्यांना मारू नये म्हणून शत्रूंना दया येईल असा गबाळेपणा अंगीकारून सूडाचा प्रतिकार न करता शौर्याची गाथा न गिरवता जिवंत राहण्याचे आणि संरक्षणाचे अत्यंत हास्यास्पद उपाय समाज करू लागला.

आख्यानाचा उत्तरार्ध म्हणजे, सुमित्रा आणि सुशीला या राजकन्येचा धीरोदत्तपणा. आर्य कन्या म्हणतात आम्ही आर्यकन्या. आपल्या प्राणांचे बलिदान देऊ, पण भ्रष्ट होणार नाही. आम्ही थुंकतो तुमच्या तोंडावर असे म्हणून भारत मातेचा जय-जयकार करीत पंचत्त्वात विलीन झाल्या.

भारतीय संस्कृतीला सारासार विचार करण्याचा संदेश आणि महाभारतातील भगवान श्रीकृष्णाचा उपदेश राजा दाहिरांनी परिपूर्णतेने अमलात आणला असता तर असा दुर्दैवी प्रसंग ओढवलाच नसता, असे प. पू. अप्पांना अभ्यासाअंती वाटते म्हणूनच ते म्हणतात,

**''तत्वाची नि व्यवहाराची । मिसळ कदा न करावी।**
**व्यष्टि समष्टी धर्माधर्मी । मति न गोंधळू द्यावी।।हो।।**
**मनि विवेक जागृत ठेवी।।''**

**विद्यावाचस्पती विवेक गं. इनामदार**
अनुग्रह, श्रीनाथ हॉस्पिलच्या मागे, सन्मित्र कॉलनी
नांदेड - ४३१ ६०५
(०२४६२) २६७४८०, ९४२२१७१६३९
vivekg.inamdar@gmail.com

•••



# स्वामी वरदानंद भारती लिखित हिंदूजनाधीन 'राष्ट्र संरक्षण पोवाडा'

**विद्यावाचस्पती विवेक गं. इनामदार**

शिक्षण - एम.ए., एम. एड., विद्यावाचस्पती.

व्यवसाय - प्राचार्य, सहयोग सेवाभावी अध्यापक महाविद्यालय, विष्णुपुरी, नांदेड.

विशेष उल्लेखनिय बाब- कार्यवाह- संस्कृति विचार सेवक संघ, संपादक- मासिक 'संस्कृति वंदना'

प.पू. स्वामी वरदानंद भारती म्हणजेच पूर्वाश्रमीचे प. पू. अनंत महाराज आठवले. अलिकडच्या काळातील एक दैदिप्यमान व्यक्तिमत्व. व्यष्टी आणि समष्टीच्या हितासाठी सर्वंकषदृष्टीने भूतकाळ आणि वर्तमानकाळाचा मागोवा घेऊन भविष्य आनंदमय, सुखी आणि समाधानी जाईल या दृष्टीने उपदेश करणारा महापुरुष.

भारतीय संस्कृती, हिंदू-तत्वज्ञान, धर्माविषयीचा नेमकेपणा, भारतीय इतिहासातील चांगल्या आणि यासोबतच झालेल्या चुका याची परखड नि:पक्षपणे सडेतोड समीक्षा करणारा तेज:पुंज तारा.

**धर्माचे रक्षण। करणे पाखंड खंडन।**
**हेची आम्हा करणे काम। बिज वाढवावे नाम।।**
**तीक्ष्ण उत्तरे। हाती घेऊन बाण फिरे।।**
**नाही भीडभाड। तुका म्हणे साना थोर।।**

या संतवचनांना अनुसरून आणि **बुडता हे जन न देखवे डोळा** या तळमळीपोटी हितोपदेश करणारा योद्धा संन्यासी.

स्वामींची धार्मिक, आध्यात्मिक, वैचारिक सामाजिक इत्यादी ग्रंथसंपदा विपुल प्रमाणात उपलब्ध आहेच. विषेशत: भारतीय संस्कृती आणि त्यावर आधारित समाजरचना ही किती कल्याणदायी होती, मधल्या काळात म्हणजेच इंग्रजांचे पांढरे पाय लागल्या नंतर ती कशी कोलमडली आणि कळत न कळत का होईना आपले काही लोक इंग्रजांच्या धूर्त कावेबाजाला बळी पडून इंग्रजांचे विचारच कसे चांगले आहेत हे सांगण्यात धन्यता मानू लागले. याचे अभ्यासपूर्ण स्पष्ट विवेचन स्वामींनी राष्ट्रसंरक्षण पोवाड्यात केलेले आहे.

स्वामींचा राष्ट्रसंरक्षण पोवाडा म्हणजे व्यक्ती, समाज आणि राष्ट्र या त्रिसूत्रीचा भारतीय संस्कृतीच्या दृष्टिकोनातून एक उत्तम समन्वय साधणारा धागा आहे. या पोवाड्याचा मूलाधार रामायण आणि महाभारत असून केंद्रबिंदू राष्ट्र आहे.

या देशात नांदणारी हिंदू-परंपरा जी 'वसुधैव कुटुंबकम्' ह्या व्यापकतेच्या दृष्टिकोनातून सर्व पंथ-संप्रदायांना एकसंधतेच्या भावनेतून अव्याहतपणे घेऊन जाताना दिसते आहे. अर्वाचीन काळात हिंदुस्थानातच हिंदूधर्म आणि ओघानेच हिंदूसमाज उत्कर्षातून अपकर्षाकडे वाटचाल करताना त्याला इतिहासात झालेल्या चुका पुन्हा होऊ न देता उत्कर्षाप्रत नेण्यासाठी एक अत्यंत उपयोगी असे विचारपाथेय प.पू. स्वामींनी प्रदान केले आहे.

रामायण, महाभारत, चंद्रगुप्त, राणाप्रताप, शिवाजी यांसारखा आमचा जाज्वल्य इतिहास विकृत करून सांगितला जातो. त्यातील नैतिकतेच्या गोष्टींचा उपहास केला जातो. व आपल्यापैकी असलेले बुद्धिमंत त्याचा पुरोगामित्वाच्या नावाखाली, सुधारणांच्या नावाखाली स्वीकार करतात. नुसतेच स्वीकार करून गप्प रहात नाहीत तर त्याचा प्रचार प्रसार प्रकटपणे करून समाजाचा बुद्धिभेद करतात. यामुळे आजच्या तरुणांसमोर आदर्श म्हणून सांगता येतील अशा गोष्टीच पुरेशा उपलब्ध असूनही समोर आणल्या जात नाहीत. अत्यंतिक अहिंसा आणि सर्वधर्मसमभाव यासारखे विचार आज हिंदू जनमानसात नको त्या प्रमाणात रुजत चालले आहेत असे स्वामींचे मत आहे.

**मेकॉलेने बुद्धिपुरस्सर शिक्षण जे आम्हास दिले।**
**तेणे मेली बुद्धि आमुची खरे असे ते तिज न कळे।।**
**आम्हालागी असे शिकविला अगदी खोटा इतिहास।**
**बुद्धिमंत त्या खरा मानिती तेणे ओढवला नाश।।**

प. पु. स्वामींनी हिंदुस्थान या हिंदुराष्ट्राची होत असलेली पडझड ही अनेक कारणांवरून मांडलेली आहे. शिक्षणाच्या माध्यमातून इंग्रजी राजवटीत मेकॉलेसारख्या अत्यंत धूर्त विचारवंतांनी भारतीय माणसांची बुद्धी संभ्रमित करण्यात कमालीचे यश संपादित केले आहे. आणि आपल्या परंपरेचा शौर्याचा जाज्वल्य इतिहास सोडून स्वत:ला बुद्धिमान मानणा-या भारतीय विचारवंतांनासुद्धा परकीयांचा इतिहास हा उपयोगी आणि आपला वाटतो. एवढे मोठे यश मेकॉलेने या राष्ट्रातून कमावले आहे याचा परिणाम भारतीय सर्वसामान्यांची मने खचली, बुद्धी असूनही प्रज्ञाहत अवस्थेत भारतीय समाज मन हेलकावे घेऊ लागले. नेमक्या याच संक्रमणाच्या स्थितीत देशाच्या राजनीतिमध्ये अग्रगण्य पंक्तीतला मेरुमणी ठरलेल्या ज्यांच्यावर सर्वसामान्य समाजाची श्रद्धा होती अशा राष्ट्रपिता गांधींनी सुद्धा फाळणीला पाठिंबा देऊन फार मोठा घात ओढवून आणला, एवढेच नाही तर त्यांच्या पाठोपाठ त्या काळच्या सत्ताधारी पक्षातील अग्रगण्य नेत्यांनी त्यांच्या विचाराची री ओढून दुर्दैवाने फाळणी सहजतेने स्वीकारली ही खंत स्वामींच्या अंत:करणाला खूप बोचणारी ठरली.

**परके आम्ही मुळातले ना पुत्र असू या भूमीचे।**
**बाहेरुन आलो न कधीही भारत मूल स्थल अमुचे।।**

आम्ही मुळात या भुमीचे पुत्र असूनसुद्धा इंग्रजाळलेल्या शिक्षण पद्धतीमुळे आजही आम्हाला आम्ही बाहेरून आलो असेच अभ्यासक्रमातून शिकविण्यात येते. सबळ पुरावे असूनसुद्धा इंग्रजाळलेल्या मनोवृत्तीला बळी पडून आम्ही खोट्या इतिहासाला कवटाळून बसलो आहोत. आजही ही परिस्थिति फारशी बदललेली नाही. सातव्या शतकापासून मुगल आक्रमकांनी आमची धर्मक्षेत्रे उध्वस्त केली. एकसंधतेने आणि युद्धनीतीचा परिपूर्ण उपयोग घेऊन त्यांना रोखता येणे शक्य होते पण दुर्दैवाने वैयक्तिक स्वार्थ, युद्धनीतीचा अभाव आणि आपला कोण आणि परका कोण हे ओळखण्यात झालेल्या चुका तसेच या संबंधी नेत्यांच्या फसव्या प्रचाराला बळी पडून आमचा पराभव होत गेला.

**त्या काळीही सभ्य सुसंस्कृत ज्ञानवंत आम्ही होतो।**
**वेद उपनिषद् साक्षी याते स्वाभिमान ना पोकळ तो।।**
**रामायण, भारत हे अमुचे जिवंत असती इतिहास।**
**भले कुणी साहित्यिक त्यांचा करो निरर्गल उपहास।।**

हिंदूधर्म हा व्यापक, विशाल, खरा धर्मनिरपेक्ष आणि सहिष्णु आहे. याला साक्ष रामायण आणि महाभारतासारखे, वेद आणि उपनिषदांसारखे ग्रंथ आहेत. यशस्वी व पराक्रमाचा इतिहास असतांनासुद्धा अर्थशास्त्र, समाजशास्त्र, राज्यशास्त्र अनेक क्षेत्रांमध्ये आम्ही अत्यंत प्रगतीशील असतांनाही नेत्यांच्या चुकीच्या धोरणामुळे, अतिविश्वासामुळे आणि गाफीलपणामुळे आमच्या वाट्याला आजपर्यंत पराभवाची परंपरा आली. चांगल्या प्रामाणिक राजकीय विचारवंतांना राजनितीत राजाश्रय पुरेसा नसल्या कारणाने योग्य व्यक्ती असूनही उचित पदापासून दूर फेकले गेले. परिणाम देशाच्या ध्येयधोरणाच्या निर्णयात झाला. आणि म्हणून आज काश्मीर प्रश्न अजूनही धगधगतो आहे. वंशवादाचे भूत भारतीय समाजमनावरून हटेनासे झाले आहे. परिणाम व्यक्तिभोवती मोठीमोठी मंडळीसुद्धा विहित स्वार्थासाठी लोटांगणे घालताना दिसतात. या देशात खऱ्या लोकशाहीपद्धतीने निवडून येणेसुद्धा कठीण होऊन बसले आहे. ही प. पू. स्वामीजींची अभ्यासपूर्ण खंत आहे.

पैशाच्या जोरावर धनसत्तेने राजसत्ता खेचून आणण्याचे प्रयत्न सातत्याने होताना दिसतात. ही बाब घातक आहे असे स्वामींना वाटते. स्वामींची लेखणी देशात उफाळणारा अंतर्गत संघर्ष, बदलत चाललेले समाजाचे आदर्श, मतदानासाठी उदासीन असलेला समाज, राष्ट्रीय सुरक्षेसाठी ठोस पावले उचलण्यात होत असलेली ढिलाई, देशाच्या विविध क्षेत्रात आवश्यक असलेला विकास, बोकाळत असलेला भ्रष्टाचार यासर्व विषयांवर अत्यंत परखडपणे आपले विचार मांडताना वास्तविकतेचे भान सोडत नाही. झालेल्या चुका ह्याही समजून घेतल्या पाहिजेत तरच पुढे चुका टाळता येतील असे स्वामींना वाटते आणि म्हणून आज जगाच्या पाठीवर हिंदुस्थान हे बहुसंख्य हिंदूंचे राष्ट्र आहे. या राष्ट्रात हिंदू हा हिंदू म्हणून ताठ मानेने, वैभवशाली परंपरेला जोपासून संस्कृतीच्या परमोच्च् शिखरावर पुन्हा विराजमान होण्यासाठी अपराधी पणाची भावना समूळ नष्ट करून, खोट्या विकृत इतिहासाला न कवटाळता, फसव्या विचाराला बळी न पडता आपले पाथेय रामायण आणि महाभारत हे मानून, कलियुगात आपला धर्म हा भगवान श्रीकृष्ण यांच्याच विचाराला समजून, पूर्ण विवेकाने, जात, वर्ण आणि कुल यांच्या थोड्याही मतभेदाला बळी न पडता एकसंधतेच्या भावनेतून स्वधर्म, स्वभाषा, परंपरा इत्यादींच्या सावलीतून निष्ठापूर्वक प्रवास करता झाला तर आणि तरच गतवैभव पुन्हा एकदा प्रस्थापित होईल आणि 'वसुधैव कुटुंबकम्' या श्रुतिवाक्याप्रमाणे जगाला शांती आणि समाधान देणारे हिंदूराष्ट्र पुन्हा प्रस्थापित होईल, आणि ते व्हावे यासाठी तरुणांनी प्रामाणिक कर्तव्याला जगले पाहिजे, आळस सोडून कटिबद्ध होऊन, नैतिक मूल्यांची जोपासना करून प्रयत्नपूर्वक राष्ट्र वैभवाप्रति नेण्यासाठी संकल्प केला पाहिजे. अशीच प्रार्थना स्वामीसुद्धा त्यांच्या आराध्यदैवत असलेल्या वरदनारायणाजवळही करतात.

स्वामींनी पोवाड्याच्या उत्तरार्धात मागितलेले पसायदान म्हणजे राष्ट्राप्रती त्यांची अंतरिक तळमळ व्यक्त होताना दिसते आहे.

**विविधतेत एकता बघाया विवेक देई रमावरा ।**
**बुद्धि भक्ति दे शक्ति युक्ति दे धैर्य नीति दे करी त्वरा ।।**
**निस्पृह निर्भय सशक्त सज्जन चतुर तेचि निवडुन यावे ।**
**देश धर्म अभ्यास पराक्रम तरुणांचे दैवत व्हावे ।।**
**कीर्तिमंत होवोत पुढारी प्रसिद्धीची हाव नसो ।**
**कष्ट करोनी पैसा मिळवू ही इच्छा सर्वास असो ।।**
**चैनिचा लोभ तो विद्वानांना नसो।**
**सन्नीति देवता कलामंदिरी बसो।**
**संस्कार चांगला तरुणांवरती ठसो।**
**सद्‌गृहिणी होणे स्त्रियांस भूषण असो।**
**कुणि समाजसेवक दुराग्रही ना फसो ।**
**सत्य हे हितास्तव नव शोधाने दिसो ।**
**असे ईश्वरा प्रार्थुन, यत्ने राष्ट्र वैभवाप्रति न्यावे।**
**न्याय एकता राखुन सावध परिस्थितीसी जाणावे ।।**

अजूनही वेळ गेलेली नाही. देशबांधव जागृत होतील, सत्याचे भान ठेवतील, यथार्थता समजून घेतील तर हेही दिवस पालटतील. त्यासाठीच हे हिंदुत्व जागरण आहे. मागील वर्षात आपण काय केले याचा सत्याधिष्ठित आणि तटस्थ वृत्तीने घेतलेला आढावा आहे. वेळीच सावध होऊन पावले कोणत्या दिशेने टाकावीत याचे नि:संदिग्ध मार्गदर्शन या पोवाड्यात मिळते आणि सद्य स्थितीत त्याची नितांत आवश्यकता आहे.

**विद्यावाचस्पती विवेक गं. इनामदार**
'अनुग्रह', श्रीनाथ हॉस्पिटल जवळ,
सन्मित्र कॉलनी, जंगमवाडी, नांदेड -४३१६०५
०२४६२-२६७४८०, ९४२२१७१६३९
vivekg.inamdar@gmail.com

•••



# महाभारताचे वास्तव दर्शन

**श्री. वा. ना. उत्पात (भागवताचार्य)**
श्रीज्ञानेश्वरी लेखक, श्री सच्चितानंदबाबा यांचे १६ वे वंशज, ५६ वर्षे ज्ञानेश्वरी व इतर ग्रंथावर प्रवचने व कीर्तने. ३३ वर्षे सहकार खात्यात नोकरी करून निवृत्ती, सोलापूर येथे श्रीज्ञानेश्वर, तुकाराम महाराज मंदिर श्री संत साहित्यसेवा संघ, सोलापूर

तथाकथित विद्वानांनी व ललित लेखकांनी आपला स्वैर कल्पनाविलास चालवून महाभारतावर आक्षेपार्ह लिखाण केले. त्यामुळे तरुण पिढीच्या मनात महाभारताविषयी विकृत कल्पना निर्माण झाल्या. त्या वेळी म्हणजे १९७० च्या दशकात आम्हीही त्यापैकी होतो. प्रतिदिन अप्पांबरोबर आमची चर्चा व्हायची. दिवाळी ते मार्गशीर्ष पौर्णिमा अप्पांचा मुक्काम पंढरपुरात असायचा. त्यावेळी आम्ही महाभारताविषयी अनेक शंका त्यांना विचारत होतो. त्यातूनच आम्ही अप्पांची महाभारतावरील पहिली व्याख्यानमाला पंढरपुरात आयोजित केली. त्यांच्या महाभारताचे वास्तव दर्शन या पुस्तकाचा श्री पांडुरंगाला अर्पण करण्याचा समारंभ व त्या पुस्तकावर काही विद्वानांची भाषणे हाही कार्यक्रम पंढरपुरात आयोजिला. त्यानंतर या विषयावर त्यांची महाराष्ट्रात सर्वत्र व्याख्याने झाली. केसरी, लोकसत्ता, सह्याद्री या वृत्तपत्रात त्यांचे लेखही प्रसिद्ध झाले. अप्पांनी महाभारतावर विकृत लिहिणाऱ्यांना अशी साधार उत्तरे दिली की त्या लेखकांची वाचा बंद झाली.

या ग्रंथात आठ प्रकरणे व आठ परिशिष्टे आहेत. ३८५ पानांच्या या ग्रंथात महाभारतावरील सर्व आक्षेपांचे साधार खंडन आहे. महाभारताचे विडंबन करण्याचे काम मोठमोठ्या लेखकांनी केले आहे. आजही ते विडंबन चालू आहे. त्यामुळे महाभारत न वाचलेल्या लोकांचा बुद्धिभ्रम होण्याचा संभव आहे. हे खोटे आक्षेप लोकांना समजावेत म्हणून अप्पांनी हा ग्रंथ लिहिला. या ग्रंथाच्या आधारे महाभारतावरील कोणत्याही आक्षेपांचे खंडन करता येईल.

भारतीय संस्कृती व धर्म यावर कोणी निराधार आरोप केले तर त्याचे लगेच खंडन करावे, हे अप्पांचे मत आहे. भारतीय संस्कृती व परंपरा यावर ज्यांचे प्रेम आहे त्यांनी या वाङ्मयीन आक्रमणासंबंधी जागरूक राहावे. विकृत लिखाणाचा निषेध करावा. संदर्भ वचने मूळ ग्रंथाशी ताडून बघावीत. म्हणजे ललित लेखनातील खोटेपणा कळतो.

महाभारतावर विकृत लेखन करणारी लेखक मंडळी मोठी, नामांकित आहेत. त्यांच्या लिखाणांचे खंडन कसे करावे? असे काहींना वाटले व त्यांनी अप्पांना विचारले. तेव्हा अप्पा म्हणाले, ''या मंडळींनी व्यासासारख्या महाप्रज्ञावंताच्या मताचे खंडण केले. त्यांच्या मोठेपणात व व्यासांच्या मोठेपणात जे अंतर आहे, त्यापेक्षा त्या मंडळीत व आपल्यात नक्कीच कमी अंतर आहे.''

महाभारत हा सार्वकालिक ग्रंथ आहे. त्याच्यावर सतत लिखाण होत राहणार. नवे नवे आक्षेप होत राहणार त्याचे खंडण किंवा मंडण करणासाठी महाभारताचा अभ्यास तरुण पिढीने करावा. यासाठी अप्पांनी हा ग्रंथ लिहिला आहे. हे पुस्तक वाचून मूळ महाभारत वाचण्याची प्रेरणा मिळेल, यात संशय नाही. अप्पांचे लिखाण आक्रमक आहे. त्यांचे वक्तृत्वही तसेच आक्रमक होते. पण त्या लिखाणाला मूळ ग्रंथाचा आधार आहे. ज्या लेखकांचे त्यांनी खंडण केले आहे त्यांच्या चांगल्या गोष्टींचे त्यांनी मंडणही केले आहे. मतभेद सांगितले आहेत. त्यांचे त्यांच्याशी शत्रुत्व नाही.

**कर्णाचे सत्यस्वरूप दाखविले**

महाभारताच्या आधारे लेखन करणाऱ्या विद्वानांनी व ललित लेखकांनी कर्णाचे वर्णन मूळ वस्तुस्थितीपासून बरीच फारकत करून केले आहे. प. पू. अप्पांनी त्याचे स्वरूप, प्रांजळपणे व निःपक्षपातीपणे आपल्या लिखाणातून वाचकांसमोर मांडले आहे. मांडणीची भाषा अत्यंत परखड व क्वचित तीक्ष्ण कठोर स्पष्टोक्ती करणारी आहे. प. पू. अप्पांनी या संदर्भात आपल्या ग्रंथात म्हटले आहे की माझे कोणतेही लिखाण साधार नसेल तर मी जाहीर क्षमा मागेन.

कर्ण, दुष्ट दुर्योधनाचा मित्र होता. दुर्योधनाने भीमाला साप डसविले, विषान्न चारले, डोहात बुडविले, पांडवांना लाक्षागृहात जाळून मारण्याचा प्रयत्न केला. या सर्व कृत्यात कर्ण सहभागी होता. याचा स्पष्ट उल्लेख मूळ ग्रंथात आहे.

कर्ण सूतपुत्र असूनसुद्धा त्याला राजपुत्रांच्या विद्यालयात प्रवेश दिला व द्रोणाचार्यांनी त्यास सर्वांबरोबर विद्या दिली. त्यामुळे त्याची उपेक्षा झाली हा कांगावा आहे. अर्जुन एकनिष्ठ शिष्य होता. विद्यार्थी या नात्यास पात्र होता, म्हणून द्रोणाचार्यांचे त्याच्यावर विशेष प्रेम होते. अर्जुनाने कर्णाचा कोणताही अपराध केला नसताना, कर्ण त्याचा व्यर्थ द्वेष करीत होता. जे व्यर्थ दुसऱ्याचा द्वेष करतात, त्यातून त्यांची दुर्जनता स्पष्ट होते.

पक्ष्याचा डोळा वेधण्याचा प्रसंग काय किंवा द्रोणाचार्यांचा पाय मगरीने धरण्याची घटना काय अर्जुनच त्या परीक्षेत उत्तीर्ण झाला, कर्ण नाही.

द्रोणाचार्यांनी ब्रह्मास्त्र अर्जुनाला शिकविले, कारण तो संयमी होता. त्याचा दुरुपयोग करणार नाही, अशी त्यांना खात्री होती. कर्ण तसा नव्हता म्हणून त्याला ते अस्त्र दिले नाही. बाकी सर्व अस्त्रविद्या त्याला द्रोणाचार्यांनी दिल्या हे कर्णही मान्य करतो. म्हणून त्याची उपेक्षा झाली असा दावा अनेक आधुनिक लेखक करतात हे योग्य नाही. प.पू. अप्पांनी अनेक प्रसंगांचे दाखले देऊन मूळ संदर्भासहीत सिद्ध केले आहे.

कर्ण अहंकारी होता, त्याची भाषा उर्मट होती, तो खोटारडा, थोरामोठ्यांचा अधिक्षेप करणारा होता. स्वत:विषयीच्या मोठेपणाच्या भ्रामक कल्पना होत्या. त्यामुळे अनेक प्रसंगात तो फजित पावला. तो सूतपुत्र म्हणून त्याच्यावर अन्याय झाला नाही तर त्याच्या कर्मानेच त्याचे यश डागाळले होते.

या संदर्भात विदुराचा विचार केला तर विदुर दासी पुत्र होता. पण सज्जन, विनयशील, धर्माने वागणारा होता. त्याची उपेक्षा कुठे झाली? श्रीकृष्णानी शिष्टाई प्रसंगी विदुराच्या घरी पाहुणचार स्वीकारून त्याचे मोठेपण सिद्ध केले.

द्रौपदीस्वयंवराच्या वेळी कर्ण मंडपात आला व धनुष्याला बाण लावणार इतक्यात द्रौपदी म्हणाली, ''मी सुतपुत्राला वरणार नाही.'' या प्रसंगावर कर्णाची बाजू घेणाऱ्या विद्वानांनी गहजब केला आहे. पण अप्पांनी त्यातील खोटेपणा उघड केला आहे. प. पू. अप्पांनी भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिराची संशोधित प्रत प्रमाण म्हणून स्वीकारली आहे. महाभारताच्या अनेक प्रतीत असा उल्लेख आहे की कर्ण धनुष्यावर बाण लावून प्रत्यंचा ओढू शकला नाही. द्रौपदी तसे म्हणाली असेल तर त्यात चूक काय आहे? कारण आरंभीच तिचा भाऊ धृष्टद्युम्न याने जाहीर केले होते की जो कुलाने, रूपाने, बलाने युक्त असेल व पण जिंकेल, त्यालाच द्रौपदी वरेल.'' यात कुलाचा उल्लेख असल्याने कर्णाने त्यात भागच घ्यायला नको होता. शिवाय आपले लग्न कोणाशी व्हावे, कोणाशी होऊ नये हे ठरविण्याचा अधिकार द्रौपदीला निश्चितच होता.

**म्हणे कर्ण अर्जुनापेक्षा पराक्रमी होता!**

कर्ण पराक्रमी होता पण अर्जुनापेक्षा अधिक पराक्रमी नव्हता, हे अप्पांनी अनेक उदाहरणावरून पटवून दिले आहे. द्रोणाचार्यांनी गुरुदक्षिणा म्हणून द्रुपदाला पराभूत करून धरून आणा, म्हणून सांगितले. कौरव कर्णासह चालून गेले पण द्रुपदाने त्यांचा पराभव केला, पण त्याला अर्जुनाने मात्र पराभूत केले.

द्रौपदी स्वयंवरात अर्जुनाने पण जिंकल्यावर इतर राजे दुर्योधन, कर्ण त्याच्यावर चालून गेले त्यात कर्ण नुसता पराभूत झाला नाही तर रणातून पळून गेला.

राजसूय यज्ञाच्या वेळी दिग्विजयासाठी भीम गेला त्यावेळी त्याने कर्णाशी युद्ध करून त्याचा पराभव केला व त्याला मांडलिक केले.

द्वैतवनात दुर्योधन, कर्ण यांचे गंधर्व राजाशी युद्ध झाले. दुर्योधन पराभूत झाला व बंदिवान झाला. कर्ण मात्र त्याला सोडून पळून गेला, हे पांडवांना कळल्यावर भीम व अर्जुनाने गंधर्वाचा पराभव करून दुर्योधनाला सोडवून आणले.

उत्तर गोग्रहणाच्या वेळी भीष्म, द्रोण, दुर्योधन, कौरव, कर्ण, अश्वत्थामा प्रचंड सैन्य घेऊन विराटाच्या गौळीवाड्यावर चालून गेले. त्यावेळी कर्ण गर्वाने बोलला, ''सगळे घाबरलेले दिसतात मी एकटा मत्स्य राजाचा सेना सागर आवरून धरेन.'' त्यावेळी द्रोणाचार्य, कृपाचार्य, अश्वत्थामा यांनी त्याला अर्जुनाच्या सामर्थ्याची कल्पना दिली, पण त्याने अर्जुनाबरोबर युद्ध केले. त्यातही अर्जुनाच्या बाणांनी तो घायाळ झाला व पळून गेला. भीष्म, द्रोण, अश्वत्थामा या सर्वांना एकट्या अर्जुनाने पराभूत केले. त्याला कोणी सहाय्यक नसताना अर्जुनाने कर्णासह सर्वांचा पराभव केला हे विशेष आहे. त्यावेळी अर्जुनाचा सारथीसुद्धा भेकड राजपुत्र उत्तर होता.

भीष्म व कृपाचार्यांनी याच कर्णाच्या लाजिरवाण्या पराभवांचा उल्लेख करून त्याला फटकारले आहे. भीष्म म्हणाले, ''कर्ण अतिरथी नाही रथीसुद्धा नाही, तो अर्धरथी आहे.'' प्रत्यक्ष महाभारतीय युद्धात अर्जुनाशी युद्धाचा प्रसंग आल्यावर कर्णाने शल्याजवळ त्याच्या घोर पराक्रमाची कबुली दिली आहे. तो म्हणतो ''कृष्णासह अर्जुनाला पाहून माझ्या हृदयात धडकी भरली आहे.

अर्जुनाला भीष्मांना मारायला दहा दिवस युद्ध करायला लागले. द्रोणांना मारायला पाच दिवस लागले. पण कर्णाला त्याने दीड दिवसात मारले. म्हणे कर्ण अर्जुनापेक्षा पराक्रमी होता.

कर्णाने इंद्राला आपली कवचकुंडले काढून दिली. म्हणून त्याच्या दातृत्वाचा डिंडीम वाजविला जातो. पण अप्पांनी तोही खोडून काढला आहे. कर्ण म्हणाला, ''इंद्रा, मी कवच कुंडले जर गमावली तर शत्रूंना माझा घात करणे सोपे जाईल. म्हणून मला असा वर दे की ज्यामुळे मला स्वेच्छेने माझ्या बलवान शत्रूचा नाश करता येईल. शिवाय कवच कुंडले काढताना माझ्या सौंदर्याला बाधाही येणार नाही. त्याच्या मोबदल्यात ती मी देईन. नाही तर देणार नाही. (वनपर्व ३-२१७) मोबदला घेऊन दिलेल्या दानात कसली आहे उदात्तता. भीष्मासारख्या महापुरुषांनीही कर्णास दूषणे दिली आहेत. या संदर्भातच प. पू. अप्पांबरोबरच श्री. पेंडसे यांनी सुद्धा कर्ण चारित्र्याचे मूल्यमापन करताना कर्णाला बेशरम, उन्मत्त, पापात्मा अशी विशेषणे दिली आहेत.

द्रौपदी वस्त्रहरणाच्या प्रसंगात कर्णाचे वर्तन व भाषण नीच व अधमपणाची पराकोटी आहे. तो म्हणतो ''ही काय पतिव्रता आहे काय? स्त्रीला एकच पती असतो अनेक पुरुषाशी गमन करणारी ही स्त्री वेश्याच म्हटली पाहिजे. दु:शासना, कर तिचे वस्त्रहरण.'' ही दुष्टतेची किळसवाणी परिसीमा आहे. यामुळे कर्णाचे सगळे गुण मातीमोल झाले. 'एको हि दोषो गुणराशिनाशी.'

ललित लेखकांनी, तथाकथित पुरोगामी विचारवंतांनी कर्णाचे जे खोटे दिव्य, उदात्त चित्र उभे केले त्याचा अप्पांनी साधार परामर्ष घेतला. १०३ पाने कर्णाचे वास्तव चित्र रेखाटण्यासाठी त्यांनी खर्चिली आहेत.

कर्णाचे काही सद्गुणसुद्धा अप्पांनी मान्य केले आहेत. कृष्णाने कर्णाला राज्याचे, द्रौपदीचे प्रलोभन दाखविले, तरी त्याने दुर्योधनाचा पक्ष सोडला नाही, ही त्याची एकनिष्ठता दर्शविते. त्याच्या या गुणाचे प. पू. अप्पांनी कौतुकच केले आहे.

## महाभारताच्या टीकाकारांच्या लेखांचे खंडन

श्री. आनंद साधले यांनी 'हा जय नावाचा इतिहास आहे' हे पुस्तक लिहिले. त्यांनी त्यात युधिष्ठिराचे चित्र अत्यंत विकृत दृष्टिकोनातून रेखाटले आहे. अर्जुनाचे अवमूल्यन केले आहे. पांडवांच्या न्यायाच्या गोष्टी नाकारल्या आहेत. दुर्योधन व कौरव यांचे समर्थन केले आहे. द्रौपदीचा पाच पतींशी विवाह झाला याचे कारण साधले यांनी कल्पना लढवून विकृत दिले आहे. त्याचे अप्पांनी महाभारतातील पुराव्यानिशी खंडन केले आहे. युधिष्ठिर शूर नव्हता या साधल्यांच्या विधानाचे खंडण करताना युधिष्ठिराने त्रिगर्त, श्रुतायु, दुर्योधन, द्रोणाचार्य यांचा पराभव केला होता. याला मूळ महाभारताचा आधार घेऊन सिद्ध केले आहे.

धृतराष्ट्र जन्मांध असल्याने धर्मशास्त्राप्रमाणे त्याला राज्याचा अधिकार नव्हता. म्हणून पंडु राजा झाला. श्री. साधले म्हणतात त्यानुसार तो नावाप्रमाणे रोगी नव्हता. तो तेजस्वी बलदंड व पराक्रमी होता. पंडू राजा झाल्यावर नियमानुसार स्वाभाविकपणे पांडव राज्याचे अधिकारी झाले. साधले राज्य कौरवांचे होते म्हणतात, ते चुकीचे आहे.

धर्मराज व द्रौपदी एकान्तात बसले होते. त्या खोलीत शस्त्रे आणण्यासाठी अर्जुन गेला. ठरलेला नियम मोडल्यामुळे अर्जुन वनवासात गेला. अर्जुन डोक्यात राख घालून वनवासात गेला हा साधले यांचा तर्क निराधार आहे. अर्जुनाची सत्यनिष्ठा व प्रतिज्ञापालन यात दिसते.

युधिष्ठिरावर साधले यांनी केलेले आरोप अप्पांनी साधार खोडले आहेत. साधले यांनी अर्जुनाचे शौर्य, बुद्धिमत्ता, नम्रता, सौजन्य या गुणांचे वर्णन जेथे जेथे आले आहे, त्याला भारूड म्हटले आहे. त्यांनी कौरवांचा, कर्णाचा गौरव केला आहे व पांडवांचे, श्रीकृष्णाचे अवमूल्यन केले आहे. हे आरोपही अप्पांनी साधार खोडले आहेत. अर्जुनाचे शूर, निर्भय, धीरोदत्त व्यक्तिमत्त्व अप्पांनी विस्ताराने वर्णिले आहे. हे मूळातूनच वाचले पाहिजे.

श्रीमती इरावती कर्वे या विदुषीने केलेली असत्य विधाने, आरोप यांचाही अप्पांनी समाचार घेतला आहे. त्यांनी कुंतीविषयी कीव केली आहे. तिचे चित्रण करताना भीष्म व पंडू यांच्यावर अवमानकारक आरोप केले आहेत. कुंतीला पृथा या नावावरून जाडजूड निब्बर ठरविले आहे. पंडुराजाला दुबळा, नपुंसक, व्यंग असलेला ठरविला आहे. ही सर्व विधाने अप्पांनी मूळ श्लोक, संदर्भ देऊन चुकीची आहेत हे सिद्ध केले आहे.

युधिष्ठीर हा विदुराचा पुत्र होता असा इरावतीबाईचा शोध आहे. हा आरोप कसा निराधार व खोडसाळ आहे हे अप्पांनी श्लोकांच्या आधारे स्पष्ट केले आहे.

इरावतीबाईंनी भीष्मासारख्या श्रेष्ठ पुरुषावरही हीन आरोप केले आहेत. भीष्माने सेनापतीपदाचा हव्यास धरला. त्यांनी कर्णाला दुखवून युक्तीने बाजूला सारले. भीष्मांनी आपल्या वंशाच्या वृद्धीपायी कुलस्त्रियांची मानहानी व विटंबना केली. पंडुला स्त्रीसंग शक्य नव्हता. ही सर्व श्रीमती इरावतीबाईंची विधाने अप्पांनी महाभारतातील वचने देऊन कशी चुकीची आहेत हे सिद्ध केले आहे.

''संतती निर्माण करण्यासाठी सर्वांना डावलून एक रानटी ब्राह्मणच (व्यास) का सापडला?'' या इरावतीबाईंच्या विधानाचा अप्पांनी खूप समाचार घेतला आहे. लेखिका एक स्त्री असून गांधारी, कुंती, द्रौपदी यांच्याविषयी त्यांनी असंस्कृत असभ्य लिखाण कसे केले आहे ते अप्पांनी साधार लिहिले आहे. त्यांच्या लिखाणातील गुणसुद्धा त्यांनी सांगितले आहेत.

प्रख्यात विदुषी साहित्यिक दुर्गा भागवत यांनी 'व्यासपर्व' या त्यांच्या ग्रंथात केलेल्या काही विधानांचा अप्पांनी कडक समाचार घेतला आहे. दुर्गाबाईंना महाभारत ही कथा इतिहास म्हणून मान्य नाही. व्यासाने नाट्य उभे केले. कलात्मक सिद्धी मिळविली असे त्या म्हणतात. दुर्गाबाईंच्या लालित्यपूर्ण भाषाशैलीचा, भावुकतेचा, काव्य रसात घोळून निघालेल्या मधाळ शब्दांचा अप्पांनी गौरव केला आहे. पण .... अप्पा म्हणतात, ''दुर्गाबाईंची लेखणी ही सौंदर्याचे मादक समाधान देणारी लावणीतील लावण्यवती ललना नसून आलिंगनानेच काय पण केवळ साध्या ओझरत्या स्पर्शानेही विषनिवेशाने मर्माचा विच्छेद करून प्राण हरण करणारी विषकन्या आहे. स्वरतालाने गुंगविणाऱ्या भाषा सरणीला मोहून तिला प्रेमाने जवळ करण्यात अर्थ नाही. स्पर्श करताच तिच्या रोमारोमातून भिनलेले विष वाचकांच्या अंगात भिनून त्यांच्या सद्भावनेचा घात केल्याशिवाय राहणार नाही. त्यांच्या लिखाणाचा काही भाग असा पयोमुखी विखाराने भरलेला आहे.'' इतके कठोर अप्पांनी का लिहिले? पहा.

द्रौपदीचे असामान्य सद्गुण न सांगता त्यांनी तिला कामिनी, कामकलिका ही विशेषणे वापरली. तिचे मन पाशवी चैतन्याने स्फुरणारे आहे. द्रौपदीच्या वासना प्राकृतिक आणि कमालीच्या उत्कट होत्या आणि त्यामुळेच एका पुरुषाशी विवाह होऊन तिचे भागले नसते.'' असा अत्यंत अधमपणाचा आरोप करणाऱ्या स्त्रीला विषकन्या म्हटले तर अयोग्य काय?

कृष्णाने कर्णाला पांडव पक्षाकडे वळविण्यासाठी 'तुला राज्य मिळेल व द्रौपदीसुद्धा मिळेल' हे प्रलोभन दाखविले. जणू कृष्ण बायका पुरविणारा दलाल विटचेट होता. असे दुर्गाबाईंना म्हणायचे आहे काय? असा परखड प्रश्न अप्पांनी विचारला? त्या म्हणतात, ''द्रौपदीच्या मनात सकामतेचा तंतु होता. त्यामुळे तिचे मन कर्णावर गेले होते. म्हणून ती सदेह स्वर्गात गेली नाही.'' अप्पा म्हणतात अशा अर्थाची एकही ओळ महाभारतात नाही.

याच्यापेक्षाही विकृत आरोप त्यांनी कृष्ण-द्रौपदीच्या भाऊ बहिणीच्या नात्यावर केला आहे. त्या लिहितात, ''द्रौपदी आणि कृष्ण किंवा कृष्ण आणि कृष्णा यांच्या नात्याबद्दल व्यासाने मुग्धता पाळली आहे.'' कृष्ण हा मोठा दीर, त्याच्याशी नववधूची इतकी सलगी व्हावी, ही घटना आश्चर्यकारक खरीच.'' म्हणजे कृष्ण द्रौपदीचे नाते कामुक होते हे दुर्गाबाईंना सुचवायचे आहे. असे लिहिणाऱ्या लेखिकेला विषकन्या म्हटले तर काय चुकले?

त्या अर्जुनाला परिकथेतील नायक समजतात. अर्जुनाने उत्तरेचा

पत्नी म्हणून स्वीकार केला नाही. कारण त्याला वय आठवले हा आरोप खरा आहे का? उत्तरा विद्यार्थिनी होती. गुरूने विद्यार्थिनीला कन्येप्रमाणे मानावे म्हणून पत्नी म्हणून स्वीकार न करता सून म्हणून स्वीकार केला. अशी उदात्त भूमिका असताना दुर्गाबाईंनी त्याचे अवमूल्यन केले.

कृष्णालाही त्या महापुरुष न मानता पुरुष (कामी) मानतात. त्या म्हणतात, ''कृष्ण शरीराने व वासनेनेही आदमच्या जवळचा आहे.'' नर शब्द ज्या पाशवी अर्थाने वापरला जातो त्या अर्थाने त्या कृष्णाला पूर्ण पुरुष म्हणतात. एका विदुषी, अविवाहित, मान्यवर स्त्रीने भगवान श्रीकृष्णाचे असे मूल्यमापन करावे हे अचंबित करणारे आहे.

श्री. शं. के. पेंडसे यांच्या महाभारतातील व्यक्ति दर्शन या पुस्तकातील अनेक आक्षेपांचे अप्पांनी खंडण केले आहे. त्यांनी गांधारीसारख्या श्रेष्ठ पतिव्रतेला आणि न्यायाचाच पक्ष धैर्याने स्वीकारणाऱ्या थोर स्त्रीला व्यक्तित्वशून्य अबला म्हटले आहे. गांधारी धृतराष्ट्रापेक्षा कमी पण लोभीच होती. तिने पती अंध आहे म्हणून जे सुख पतीला मिळत नाही, ते आपण भोगू नये या भावनेने गांधरीने डोळे बांधून घेतले, ही पातिव्रत्याची परीसीमा पेंडसे यांना अतिरेकी वाटते. ते पुन्हा आरोप करतात, गांधारीला युधिष्ठिराची पायाची बोटे डोळ्यावरची पट्टी सैल झाल्याने दिसली व ती काळीकुट्ट पडली. याचा अर्थ गांधारी डोळे झाकल्याचा देखावा करीत होती, असा दुष्ट आरोप पेंडसे यांनी केला आहे. त्याचेही खंडण अप्पांनी महाभारतातील वचनांच्या आधारे केले आहे.

पेंडसे यांनी अर्जुनाचेही अवमूल्यन केले आहे तो केवळ कृष्णाच्या सान्निध्यामुळे थोर भासतो हा त्यांचा आरोप खरा नाही. अप्पा म्हणतात, ''महाभारतात अर्जुन कृष्णाच्या खालोखाल महत्त्वाचा पुरुष आहे.

पेंडसे यांनी पराशर, व्यास यांच्यावरही चिखलफेक केली आहे. पराशराला कामशास्त्राचे दर्दी व शृंगाराचे रसिक ठरविले आहे. व्यासांवर त्यांनी एखाद्या रंगेल माणसाने स्वैर विलासानंतर, वागावे तसे वागल्याचा आरोप केला आहे.

व्यासांना पाहून पाण्यातील अप्सरा लाजल्या व त्यांनी आपली वस्त्रे नेसली, या प्रसंगाच्या आधारेही त्यांनी व्यासांना कामी ठरविले आहे. पराशर व व्यास यांच्यासारख्या लोकोत्तर पुरुषांवर शिंतोडे उडवितांना पेंडसे यांची लेखणी स्वैर झाली आहे. अप्पांनी त्या आरोपांचेही साधार खंडण केले आहे.

श्रीकृष्णासारख्या अवतारी पुरुषाच्या अवतारकल्पना पेंडसे यांनी नाकारली आहे. अप्पांनी शंकचारार्य, रमण महर्षी, रामकृष्ण परमहंस यांची उदाहरणे देऊन कृष्ण अवतारात कसे होते हे स्पष्ट केले आहे.

'पांडवांचे अन्याय' या प्रकरणात पांडवांनी अन्याय केले, अशी तथाकथित बुद्धिवाद्यांनी ओरड केली आहे, त्याचे साधार खंडण केले आहे. द्रोणाचार्यांनी एकलव्याचा अंगठा कापून घेतला. द्रौपदीच्या स्वयंवराला कर्ण हजर नव्हता. (प्रा. नरहर कुरुंदकर) शिखंडीला पुढे करून पांडवांनी भीष्माला मारले. 'अश्वत्थामा मेला' अशी अफवा उठवून द्रोणांना शस्त्रत्याग करायला लावला व मारले. सूर्यास्ताचा भास निर्माण करून जयद्रथाला मारले. दुर्योधनाला गदा युद्धात मांडीवर गदाप्रहार करून गदायुद्धाचा नियम मोडून मारले या साऱ्या आरोपांचे खंडण अप्पांनी सविस्तर साधार केले आहे. ते जिज्ञासूंनी मुळातून वाचावे. अन्यायाने जन्मभर वागणाऱ्याला तशाच प्रकारे मारले तर त्यात दोष नाही हे सूत्र त्यात आहे.

'महाभारतातील अद्‌भुत' या प्रकरणात अप्पा म्हणतात, ''महाभारतात अद्‌भुत पुष्कळ आहे. ते नाकारायचे असल्यास सर्वच नाकारा. आपल्या सोयीप्रमाणे स्वीकारणे वा नाकारणे असे करू नका. कर्णाची जन्मजात कवचकुंडले, गंगेचे स्वर्गीयत्व, सप्त चिरंजीवातील अश्वत्थामा, मंत्राच्या सहाय्याने पांडवांचे जन्म, पंडूला दिलेला शाप, शंभर कौरवांचा जन्म हे सारे अद्‌भुत आहे. ते पूर्ण स्वीकारा किंवा नाकारा. सोयीप्रमाणे स्वीकारणे वा नाकारणे असे करू नका, असे अप्पांचे म्हणणे आहे.

परिशिष्टामध्ये पहिला लेख प्रा. श्री. म. माटे यांच्या 'भारताला गीतेचे ठिगळ' या लेखाचे खंडण आहे. त्यात अप्पांनी सिद्ध केले आहे की गीता हे भारताचे ठिगळ नसून हृदय आहे.

'मूळ गीतेचा शोध' या श्री. ग. श्री. खेर यांच्या लेखांचाही समाचार यात घेतला आहे. खैर यांनी गीतेचे तीन लेखक व तीन कालखंड आहेत, असे प्रतिपादन केले आहे. त्यासाठी त्यांनी जे निकष वापरले आहेत ते कोणत्याही ग्रंथाला लावून पाहिले तर त्याचे लेखक अनेक आहेत, असे लेखकाने सिद्ध केले आहे. खैरांचे निकष त्यांच्या याच प्रबंधाला लावून त्यांच्या ग्रंथाचे अनेक लेखक होते, हे अप्पांनी सिद्ध केले आहे.

पंढरपूरचे पत्रकार, विद्वान लेखक श्री. पांडुंग भानुदास डिंगरे यांच्या 'श्रीकृष्णानी अर्जुनाचा रथ अखेर नरकात नेला' या लेखाला अप्पांनी 'नरकात गेला तो लेखकाचा मनोरथ, अर्जुनाचा रथ नाही' असे अत्यंत जहाल भाषेत उत्तर दिले आहे. धर्मराजाला दाखविलेला नरक हा भास होता, हे महाभारतातील अनेक श्लोकांच्या आधारे अप्पांनी विशद केले आहे. या लेखातील अप्पांची भाषा फारच जळजळीत आहे.

'ललित साहित्यातील कर्ण' या लेखात आधुनिक साहित्यिकांनी कथा, कादंबरी, नाटक यातून कर्णाचे जे अवास्तव उदात्तीकरण केले आहे त्याचे वास्तव स्वरूप अप्पांनी स्पष्ट केले आहे. शिवाजीराव सावंत यांच्या 'मृत्युंजय' कादंबरीत वास्तव नाही. काव्यमय कल्पनांचा अतिरेक झाला आहे. हे महाभारतातील मूळ संहितेशी ताडून सांगितले आहे. वि. वा. शिरवाडकर यांच्या 'कौंतय' नाटकातसुद्धा मूळसंहितेशी प्रामाणिकपणा राखला नाही हे सप्रमाण विशद केले आहे. साधले यांनी तर कर्णाचे उदात्तीकरण करण्यासाठी खोटे पुरावे दिले आहेत हे स्पष्ट केले आहे. शिरवाडकरांच्या 'कौन्तेय' नाटकाविषयी अप्पा लिहितात, ''दुरात्म्याचे समर्थन आणि मातृत्वाचे विडंबन करणारे हे नाटक हाती धरण्याच्याही योग्यतेचे नाही.''

अप्पांच्या पुस्तकावर प्रख्यात समीक्षक श्री. माधव मनोहर यांनी टीका करून त्यांना क्षुद्र मनोवृत्तीचे ठरविले. त्यांच्या टीकेचा एका तरुण प्राध्यापकांनी समाचार घेतलेला आहे. पण तो लेख वृत्तपत्रांनी छापला नाही. म्हणून या पुस्तकात तो समाविष्ट केला आहे.

'महाभारताचे हे विडंबन थांबवा' या लेखात श्री. वा. वि. भागवत यांच्या महाभारतावरील आक्षेपांचे साधार खंडण आहे.

त्यानंतरच्या परिशिष्टात श्री. भागवत यांच्या 'महाभारतावरील विकृत सिद्धांत' या लेखाचे परीक्षण केले आहे. पंडु राजा क्लीब होता, कौरवांनी पांडवांना मारण्याचे प्रयत्न केले नाहीत. भीमाला कौरवांनी विष चारले नाही. कर्ण कौरवांच्या पापात सहभागी नव्हता, ही भागवतांची विधाने अप्पांनी खोडून काढली आहेत. ती कशी निराधार आहेत हे श्लोकांचे आधार देऊन स्पष्ट केले आहे.

परिशिष्ट आठमध्ये डॉ. श्रीराम पंडित यांच्या 'शोध कर्णाचा' या प्रबंधातील विधानाचे परीक्षण आहे. त्यात कर्ण कौरवांच्या पांडवांना मारण्याच्या कटात सामील नव्हता, या त्यांच्या विधानाचे सप्रमाण खंडण आहे. कर्ण अहंकारी, उन्मत्त होता, द्रौपदीच्या बाबतीत त्याचे वर्तन नीचपणाचे होते. तो पांडवांकडून, इतरांकडून अनेक वेळा पराभूत झाला होता. तो अर्जुनापेक्षा शूर नव्हता. हे अप्पांनी सप्रमाण दाखविले आहे.

या ग्रंथामुळे महाभारताविषयी बुद्धिभेद झालेल्या निरागस तरुणांचा बुद्धिभेद दूर होईल यात शंका नाही. अवास्तव लिखाणाविषयी केलेले हे वास्तव दर्शन आहे.

**श्री. वा. ना उत्पात (भागवताचार्य)**
राधानारायण मंदिराचे पश्चिम द्वार,
पंढरपूर, जि. सोलापूर.
भ्र. ९४२२६४७५०७



# भगवान् श्रीकृष्ण- एक दर्शन

**श्री. श्रीकांत नवाथे**

B.E. (Electronics & Telecommunications, M.Tech., (Electrical), Ph.D.
Retired as Director, Ministry of Communication and Information Technology in 2009
स्वामी वरदानंद भारती यांच्या 'मनोबोध' या ग्रंथाचे इंग्रजी भाषांतर (प्रकाशनाच्या मार्गावर)

भारतीय संस्कृती व परंपरा यामध्ये भगवान् श्रीकृष्ण हे एक बहुआयामी व्यक्तिमत्त्व आहे. संगीत, नृत्य, नाट्य, चित्र, शिल्प, काव्य यांसारख्या अनेक कलांमधील सृजनशील कलावंत आणि त्याबरोबर धर्म, अध्यात्म, तत्त्वज्ञान यांसाररख्या शास्त्रीय विषयांमधील व्यासंगी विद्वान हे श्रीकृष्णाच्या व्यक्तिमत्त्वामुळे आकर्षित झालेले दिसतात. श्रीकृष्णाच्या जीवनाचा आलेख हे दैवी अद्‌भुत घटनांप्रमाणेच सामान्य माणसाच्या आयुष्यात येऊ शकणाऱ्या प्रसंगांनी समृद्ध झालेले दिसते. तो अनेक रूपांनी आपल्यासमोर येतो. बाळगोपाळांचा सवंगडी, गोपींचा प्रेमिक, पांडवांचा मित्र व संरक्षक यापासून ते भगवद्‌गीतेसारख्या अजरामर तत्त्वज्ञानाचा जनक अशी त्याची विविध रूपे सर्वश्रुत आहेत. श्रद्धाळू भाविक श्रीकृष्णांना परमेश्वराचा आठवा अवतार मानतात. असे असूनसद्धा एखाद्या वरवरच्या निरीक्षकाला श्रीकृष्णामध्ये सर्वसामान्य माणसात आढळणारे अनेक दोष (खोटे बोलणे, दही दूध चोरणे, जरासंधाबरोबरच्या लढायांमधून पळून जाणे इ.) आणि उणीवा (अधर्माने खेळले गेलेले द्यूत अथवा अभिमन्यूचा मृत्यू टाळता न येणे) दिसून येतात. साहजिकच भारतीय परंपरेमधील इतर कोणत्याही व्यक्तिमत्त्वापेक्षा अधिक प्रेम, स्तुती तसेच टीका भगवान श्रीकृष्णाच्या वाट्याला आलेली दिसते.

अलिकडे भारतीय संस्कृती, परंपरा यांवर कठोर टीका करणे (ती टीका वस्तुनिष्ठ असो वा नसो) हे पुरोगामी असण्याचे लक्षण मानण्याची अनिष्ट परंपरा सुरू झालेली आहे. या प्रवृत्तीमुळे सर्वसामान्य (अज्ञानी) वाचक, विशेषत: तरूण वर्ग यांमध्ये आपल्या उज्ज्वल संस्कृती व परंपरा यांच्या संदर्भात निष्कारण संभ्रम तसेच न्यूनगंड निर्माण होण्याची शक्यता असते. आपल्या देशाला एका उज्ज्वल भवितव्याकडे नेण्यासाठी अशा प्रकारच्या चुकीच्या टीकेचा खंबीरपणे प्रतिवाद होणे आवश्यक आहे. याच कारणासाठी परमपूज्य स्वामी वरदानंद भारती (पूर्वाश्रमीचे प्राचार्य अनंत दामोदर आठवले आणि त्यांचे शिष्य, भक्त व परिवारामधील सदस्यांचे अप्पा) यांनी अनेक अभ्यासपूर्ण ग्रंथ लिहिले आहेत. त्यामधील एक ग्रंथ 'भगवान श्रीकृष्ण- एक दर्शन'. अप्पांची भूमिका ही एक श्रद्धावंत अभ्यासकाची आहे; शब्दांचा वा घटनांचा कीस काढणे, वादासाठी वाद घालणे त्यांना आवडत नाही. अप्पांना अपेक्षित असलेला वाचक हा मूलत: श्रद्धाळू असा आहे. परमेश्वराचे अस्तित्व आणि धर्माची आवश्यकता मानणाऱ्या वाचकांशी अप्पा संवाद साधू इच्छितात. हे सर्व मुद्दे लक्षात घेतले नाहीत तर प्रस्तुत ग्रंथ लिहिण्यामागील हेतू सफल होण्याची शक्यता नाही. अप्पांच्या सदर ग्रंथाचा माझ्या अल्पमतीनुसार परिचय करून देणे हा प्रस्तुत लेखाचा हेतू आहे.

'भगवान् श्रीकृष्ण- एक दर्शन' या ग्रंथात प्रामुख्याने महाभारतामधील अनेक व्यक्तिरेखा व त्यांच्या जीवनामधील महत्त्वाचे प्रसंग यांचे वर्णन आढळते. भगवान् श्रीकृष्णाच्या अवताराचा उद्देश गीतेमधील सुप्रसिद्ध वचनात येतो,

**'परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ।।''**

या वचनाचा सविस्तर अनुवाद पृ.२० वर दिलेला आहे. सज्जनांचे संरक्षण, दुर्जनांचे निर्दालन आणि धर्माची संस्थापना ही स्वत: स्वीकारलेली कर्तव्ये पार पाडत असताना श्रीकृष्णाचा अनेक व्यक्तिमत्त्वांशी संबंध येतो. त्यामध्ये सज्जन, दुर्जन आणि या दोन्हींचे मिश्रण असलेल्यांचा समावेश आहे. धर्मराज, अर्जुन यांसारख्या सज्जनांची श्रीकृष्ण मदत घेतो. अप्पा त्यांचे कौतुक करतात. दुर्योधन, दु:शासन, शकुनी या दुष्ट व्यक्तिरेखा कृष्णाशी शत्रुबुद्धीने वागतात. अप्पा त्यांचा कठोर शब्दांत निषेध करतात. भीष्म, द्रोण यांसारख्या मूलत: सत्प्रवृत्त, परंतु परिस्थितीमुळे कौरवांच्या, पर्यायाने अधर्माच्या, बाजूने युद्धास उभ्या राहणाऱ्या व्यक्तिरेखांचे यथायोग्य चित्रण अप्पांच्या ग्रंथात आढळते. श्रीकृष्णाच्या व्यक्तिमत्त्वाच्या वर्णनाची शैली आत्यंतिक श्रद्धा व भक्तिभावाने ओतप्रोत आहे. पारंपरिक श्रद्धांशी सुसंगत असणाऱ्या भगवान् श्रीकृष्णाच्या बहुआयामी व्यक्तिमत्त्वाचे यथार्थ दर्शन वाचकांना घडविणे हा प्रस्तुत ग्रंथ लिहिण्यामागे अप्पांचा हेतू आहे.

असामान्य प्रतिभेचा कुशल राजकारणी हे भगवान् श्रीकृष्णाचे वैशिष्ट्य आहे (पृ.३५). मथुरेचे राज्य जरी कंसाचा पिता उग्रसेन याच्या अधिपत्याखाली असले तरी प्रत्यक्ष राज्यकारभार (कंसाच्या मृत्यूनंतर) वडील बंधू या नात्याने बलरामाच्या हाती होता. असे असूनसुद्धा अनेक निर्णय श्रीकृष्ण स्वत:च्या इच्छेनुसार अमलात आणीत असे आणि ते सुद्धा बलरामाला राग न येऊ देता! बलरामाचा दुर्योधन हा विशेष आवडता शिष्य व त्याच्याबरोबर सुभद्रेचा विवाह करण्याचा त्याचा बेत होता. श्रीकृष्ण अत्यंत चातुर्याने सुभद्रेचा विवाह अर्जुनाबरोबर घडवून

आणतो. सत्राजित आणि स्यमंतक मणी या संदर्भात कृष्णाचे राजनीतिकौशल्य उठून दिसते. परस्परांशी स्पर्धा करणारे सर्व यादव एकत्र ठेवणे हा श्रीकृष्णाच्या राजनीतिकौशल्याचा आणखी एक दाखला. पण श्रीकृष्णाला प्रत्येक बाबतीत यशच मिळाले असे दिसत नाही. कर्ण हा ज्येष्ठ पांडव आहे हे रहस्य उघड केल्यानंतरही त्याला पांडवांच्या बाजूला वळवण्यात कृष्णाला यश आलेले नाही. कर्णाला हे माहिती होते की दुर्योधनाने पांडवांबरोबर वैर घेतले असले तरी त्याचा भरवसा फक्त कर्णावर होता. भीष्म, द्रोण आदि योद्धे म्हणून अधिक सामर्थ्यसंपन्न असले तरी मनातून त्यांची सहानुभूति पांडवांना असल्यामुळे ते पांडवांबरोबर अटीतटीने लढणार नाहीत. कर्णही जर पांडवांच्या बाजूला गेला असता तर दुर्योधनाच्या शिडातील हवाच नष्ट झाली असती. नंतर दुर्योधनाला पांडवांशी संधी करण्यास पर्याय राहिला नसता. या उलट कृष्णाला नकार देणे म्हणजे साक्षात परमेश्वराविरुद्ध युद्ध, जे जिंकणे अशक्य असते. या प्रसंगी अप्पांनी कर्णाच्या मित्रप्रेमाची मोकळ्या मनाने स्तुती केली आहे (पृ.१४१). श्रीकृष्णाच्या अपयशाचे आणखी एक उदाहरण म्हणजे सर्व कौरव योध्यांनी एकत्रितपणे केलेला अभिमन्यूचा वध. या प्रसंगाचे अप्पांनी केलेले स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे (पृ. १७५). भीष्मांच्या पतनानंतर त्यांनी घालून दिलेले धर्मयुद्धाचे नियम जणू रद्दबातल झाले. तसेच याच कारणामुळे बदललेल्या नियमांच्या चौकटीत अर्जुनाने कर्णाच्या रथाचे चाक जमिनीत रुतले असताना त्याचा वध केला याबद्दल तक्रार करण्यास जागा उरत नाही. (पृ.२०९).

श्रीकृष्णाच्या जीवनात काही प्रसंग असे येतात की तेथे वरवर पाहता अंतर्विरोध दिसतो. पण ते खरे नव्हे. उदाहरणार्थ अभिमन्यू-उत्तरा यांच्या पुत्राच्या जन्माचा प्रसंग विचारात घेता येईल. अश्वत्थाम्यानेच अविचाराने सोडलेल्या ब्रह्मास्त्रामुळे या नवजात अर्भकाचा बळी घेतला; ते मृतावस्थेत जन्माला आले. या प्रसंगी श्रीकृष्णाने केलेली प्रतिज्ञा प्रसिद्ध आहे, तो म्हणतो, ''मी जर कधी थट्टेतही असत्य भाषण केले नसेल, युद्धात पाठ दाखविली नसेल... तर हे बालक जिवंत होवो...' त्या क्षणी ते बालक जिवंत झाले. (पृ.२४५) वरवर पाहाणाऱ्या कोणासही श्रीकृष्णाच्या प्रतिज्ञेचा खरा अर्थ समजणे शक्यच नाही. त्यासाठी प्रस्तुत ग्रंथाचे वाचन, मनन व चिंतन करणे आवश्यक आहे. वरील प्रतिज्ञेमधून भगवान श्रीकृष्णाच्या अवतारकार्याचे यथार्थ वर्णन दिसते.

संपूर्ण ग्रंथामध्ये अप्पांची भूमिका एका श्रद्धाळू अभ्यासकाची आहे. आपण संशोधक असल्याचा आव ते कधीच आणत नाहीत. प्रस्तुत ग्रंथ त्यांनी भारतीय संस्कृती व परंपरा यांचे सत्य स्वरूप समजावून घेण्याची इच्छा असणाऱ्या जिज्ञासू वाचकांसाठी लिहिलेला आहे. त्यामुळे बुद्धिवाद्यांनी घेतलेल्या प्रत्येक आक्षेपाचा प्रतिवाद करणे ते आवश्यक समजत नाहीत. श्रीकृष्णाच्या चरित्रासाठी आधारभूत असणाऱ्या भागवत पुराणाचा ते ओझरता उल्लेख करतात मात्र हरिवंशाचा[१] अजिबात उल्लेख करत नाहीत. श्रीकृष्णाच्या चरित्रावरील तौलनिक टीका वाङ्मयाची दखलही आप्पा घेत नाहीत. अशा प्रकारच्या वादांमध्ये पडण्याची त्यांची इच्छा दिसत नाही. वाचकांनी अप्पांच्या या भूमिकेचा आदर करावा.

अप्पांच्या लेखनामधील महाभारतामधील प्रसंग व व्यक्तिरेखा या बहुतांशी भारतीय श्रद्धाळू भाविकांच्या मनावर कोरल्या गेलेल्या प्रसंग व व्यक्तिरेखांबरोबर जुळतात. बहुतेक पारंपारिक अभ्यासक १७व्या शतकात होऊन गेलेला महाभारताचा संपादक व टीकाकार 'नीळकंठ'[२] याने संपादित केलेली महाभारताची प्रत प्रमाण मानतात. हे संपादनाचे काम नीलकंठाने स्वत: अत्यंत कष्टाने (कोणत्याही शासन वा संस्थेच्या मदतीशिवाय) पूर्ण केले. आधुनिक काळात उपलब्ध असलेल्या तंत्रज्ञान व संशोधनाच्या नव्या पद्धती यांचा लाभही त्याला मिळालेला नाही. तरीही त्या पूर्वीच्या सर्व प्रतींपेक्षा नीलकंठाने संपादित केलेली महाभारताची प्रत तुलनेने अद्ययावत म्हटली पाहिजे.

भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्थेने[३] संपादित केलेली महाभारताची आवृत्ती सध्याच्या काळात सर्वात अद्ययावत् मानली जाते. या आवृत्तीमध्ये मांडलेली काही मते पारंपरिक मतांशी जुळत नाहीत. महाभारताचे पारंपरिक अभ्यासक बहुधा याच कारणामुळे भांडारकर प्रत मान्य करत नसावेत. पारंपरिक विद्वानांच्या मनावरचे अनेक पिढ्यांचे संस्कार विचारात घेता त्यांची विचारसरणी समजण्यासारखी आहे. शिवाय या दोन मतप्रवाहांमधील अंतर हे बऱ्याच अंशी बारीक सारीक तपशीलापुरते मर्यादित आहे. हा मुद्दा पुढील उदाहरणाने स्पष्ट होईल.

भांडारकर प्रतीनुसार द्रौपदी वस्त्रहरणाचा प्रसंग (दु:शासनाने द्रौपदीचे वस्त्र ओढणे व कृष्णाने एका मागोमाग एक वस्त्रे निर्माण करून द्रौपदीला पुरवणे) प्रक्षिप्त मानला आहे. द्रौपदीच्या भाषणांत (पृ.२१३) तिचे केस ओढल्याचा उल्लेख आहे; वस्त्र ओढल्याचा नाही. अशी शक्यता आहे की जनमानसात प्रचलित असलेला द्रौपदी वस्त्रहरणाचा प्रसंगही कवी, कथाकार, गायक, नर्तक इ. कलाकारांच्या सृजनशीलतेला वाव देण्यासाठी रचलेला असावा. अप्पांसारखे पारंपरिक अभ्यासक द्रौपदी वस्त्रहरणाचा प्रसंग मूळ महाभारतात आहे या मतावर ठाम आहेत. अशा प्रकारच्या वादांवर मी एक तोडगा सुचवू इच्छितो. तत्त्वत: ज्या क्षणी द्रौपदीला राजसभेमध्ये फरफटत आणले गेले त्याच क्षणी तिची बेअब्रू झालेली आहे; प्रत्यक्ष वस्त्रहरण झाले का नाही याला फारसे महत्त्वच नाही.

सारांश अप्पांनी मांडलेली मते व भांडारकर प्रतीसारख्या महाभारताच्या अद्ययावत प्रतीमध्ये मांडलेली मते यामध्ये तत्त्वत: फारसा फरक नाही. ज्या हेतूने 'भगवान श्रीकृष्ण- एक दर्शन' हा ग्रंथ अप्पांनी लिहिला आहे, तो लोकशिक्षणाचा हेतू विचारांत घेता उपरिनिर्दिष्ट मतभेद फारसे महत्त्वाचे वाटत नाहीत. हे तत्त्व मान्य झाल्यास कांही किरकोळ उणीवांकडे दुर्लक्ष्य करून प्रस्तुत ग्रंथाचे योग्य रसग्रहण करणे शक्य आहे.

**संदर्भ :** १) हरिवंश, (४ पर्वे, २ खंड), भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्था, पुणे, (१९६६-१९६९)

२) महाभारत - नीलकंठ, चित्रशाळा प्रेस (१९२८)

३) महाभारत, (१८ पर्वे, १९ खंड) भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्था, पुणे (१११९-१९६६)

**श्रीकांत पुरुषोत्तम नवाथे**

७, पाटीलपुत्र, देशपांडे पुरम, एरंडवणे, पुणे ४११०३८

फोन : २५४५५७६६, ७३८७५३४५७५





# मनोबोध विवरण- मराठी माणसाची भगवद्गीता

**सुनील चिंचोलकर**

बी.कॉम., प्रवचनकार, लेखक

१२ वर्षे सज्जनगड येथे व्यवस्थापन. ३२ पेक्षां जास्त पुस्तके प्रकाशित. शिवचरित्र, ज्ञानेश्वरी, दासबोध, स्वामी विवेकानंद यावर प्रवचने. समर्थ व्यासपीठ व समर्थ संस्थानाचा पुरस्कार प्राप्त.

(टीप- प.पू. स्वामी वरदानंद भारती यांचा उल्लेख या लेखात कायम अप्पा म्हणून केलेला आहे. कारण संन्यास घेण्यापूर्वी आणि संन्यास घेतल्यानंतरही मी त्यांना अप्पा म्हणूनच संबोधत असे.)

मनाचे श्लोक हे समर्थांचे छोटेखानी प्रकरण. त्याला मनोबोध असे देखील म्हणतात. आचार्य विनोबा भावेंनी त्याला 'मनोपनिषद्' असे यथार्थ नाव दिले आहे. हे छोटेसे प्रकरण एवढे लोकप्रिय ठरले की, बहुसंख्य भारतीय भाषेत त्याचा अनुवाद झाला आहेच पण उर्दू, इंग्रजी, जर्मन, फ्रेंच या विदेशी भाषांमध्येही त्याचा अनुवाद झाला आहे. मराठीमध्ये तर मनाच्या श्लोकांवर किमान ५० पुस्तके झाली असतील. त्यातील मौलिक ग्रंथ म्हणून पुढील पुस्तकांचा उल्लेख करावा लागेल.

१) मनोबोध विवरण- स्वामी वरदानंद भारती ऊर्फ अप्पा, २) स्वाध्याय मनोबोध - डॉ. रा. द. प्राणी, ३) सार्थ मनाचे श्लोक - के.वि.बेलसरे, ४) सार्थ मनाचे श्लोक - शंकर श्रीकृष्ण देव, ५) सार्थ मनाचे श्लोक- ल.रा. पांगरकर, ६) मनाच्या श्लोकांतून मन:शांती- सुनील चिंचोलकर. एकंदरीत मनाच्या श्लोकांवरील निर्माण झालेल्या या सर्व वाङ्मयात अप्पांच्या 'मनोबोध विवरण' या ग्रंथाला प्रथम क्रमांक द्यावा लागेल. असे म्हणताना अन्य मान्यवरांना मी कमी लेखतो आहे असा अर्थ कृपया कोणी काढू नये. सचिन तेंडुलकरला भारतरत्न मिळाल्यामुळे सुनिल गावसकर आणि कपिल देवचे महत्त्व कमी होत नाही. देव, पांगारकर ही माणसे मोठीच होती. समर्थ संप्रदायातील त्यांचे योगदान अपूर्वच होते. मात्र समर्थांच्या मनाचे श्लोक या ग्रंथाचा नि:पक्षपणे विचार करतान प.पू.अप्पांच्या मनोबोध विवरणाला मनाच्या श्लोकावरील सर्वश्रेष्ठ ग्रंथ म्हणावे लागेल.

हा ग्रंथ सुमारे ५७५ पृष्ठांचा आहे. मनाच्या श्लोकांचे एवढे विस्तृत विवेचन अन्य कोणीही केलेले नाही. अप्पांनी मनाच्या श्लोकांना खरोखर न्याय दिला आहे. आज समर्थ असते तर मनोबोध विवरण हा ग्रंथ पाहून 'आपण मनाचे श्लोक लिहिल्याचे खरे सार्थक झाले' असे ते निश्चित म्हणाले असते. मुळात अप्पा महान सत्पुरुष होते. ते स्वत: मनाचे श्लोक जगले. मी अनेक वर्षे त्यांना जवळून पाहिले असल्यामुळे या ग्रंथातील सगळा उपदेश ते स्वत: कसे जगले आहेत याचा मी साक्षीदार आहे. अनेकदा अशा सत्पुरुषांचा व्यासंग असतोच असे नाही. अप्पांचा व्यासंग अफाट होता. त्यांनी वाचलेले शेकडो ग्रंथ आजही गोरटे संस्थानामध्ये पाहायला मिळतात. त्यामुळे अनुभव आणि व्यासंग यांचा सोनिया सुगंधु ठरणारा अपूर्व संगम या ग्रंथात आढळतो. मनाच्या श्लोकांचे विवेचन करताना ज्ञानेश्वरी, दासबोध, नामदेवांचा गाथा, तुकोबारायांची गाथा, विविध उपनिषदे, भगवद्गीता, शांकरभाष्य, शंकराचार्यांची स्फुट प्रकरणे, मनुस्मृती, मोरोपंत, वामन पंडीत, नारदभक्तिसूत्रे, दासगणू महाराज आणि पानोपानी आढळणाऱ्या विविध संतांच्या जीवनातील घडलेल्या घटना हे सारे येथे पाहायला मिळते. हा एक ग्रंथ वाचला की, ५० ग्रंथ वाचल्याचे श्रेय वाचकाला मिळते. जागोजागी सुभाषितांची पेरणी केली आहे. उदा. १५व्या श्लोकातील मृत्यूची वास्तवता समजावून सांगताना-

**धनानि भूमौ पशवश्च गोष्ठे । भार्या गृहद्वारि जन: स्मशाने ।**
**देहश्चितायां परलोकमार्गे । कर्मानुगो गच्छति जीव एक: ।।**

किंवा शरीराचे माहात्म्य सांगत असताना शिव-पार्वती संवादातील-

**अपि स्वशक्त्या तपसि प्रवर्तसे । शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम् ।।**

किंवा पान १५१ वर something is better than nothing या इंग्रजी म्हणीचा आशय व्यक्त करणारे अकरणात् मंदकरणं श्रेय: हे संस्कृत वचन अशी सुभाषिते पानोपानी आढळतात. अलिकडे काही कीर्तनकार निरूपणासाठी अभंग न घेता मनाचा श्लोक घेतात. अशा कीर्तनकारांचे २५-३० पूर्वरंग या एका ग्रंथावरून तयार होतील. तीर्थक्षेत्री बुवाबाजी करणाऱ्या साधकाला पान ३०८ वरील पुढील संस्कृत सुभाषित खाड्कन जागे करेल-

**अन्यक्षेत्रे कृतं पापं पुण्यक्षेत्रे विनश्यति ।**
**पुण्यक्षेत्रे कृतं पापं वज्रलेपो भविष्यति ।।**

पंडीत लोक दुसऱ्याला उपदेश देण्यात पटाईत असतात पण खरा भक्त धर्माचरण करणारा महात्मा असतो हे सांगताना ४९व्या श्लोकात असेच सुंदर सुभाषित दिले-

**परोपदेशे पांडित्यं सर्वथा सुकरं नृणां ।**
**धर्मे स्वीयमनुष्ठातं कस्यचित् सुमहात्मन:।।**

मुळात मनाचे श्लोक म्हणजे स्वत:ला उपदेश आहे. धर्मोपदेश इतरांसाठी नसून स्वत:साठी आहे.

भगवान रामकृष्ण परमहंस म्हणत, ''ज्याला आत्महत्या करायची आहे त्याला टाचणी पुरे पण ज्याला दुसऱ्याला मारायचे आहे त्याला शस्त्रसज्ज असावे लागते. तद्वत आत्मज्ञानासाठी एखादे छोटेसे पुस्तक पुरे. ज्याला इतरांना ज्ञान द्यावयाचे आहे त्याला खूप व्यासंग करावा लागतो.' मनाचे श्लोक हे असे छोटे पुस्तक आहे की ते साधकाला मुक्त करू शकेल. अप्पांनी हे श्लोक असंख्य वेळा वाचले. समांतर श्लोकांची मनात जुळणी केली त्यामुळे काही श्लोकांचे विवेचन करताना समांतर आशयाचे अनेक श्लोक ते देतात. उदा.- श्रीराम हे समर्थांचे दैवत असल्यामुळे पान १२ वर करी रे मना भक्ति या राघवाची । (२६) करी रे मना ध्यान या राघवाचे (६६) घनश्याम हा राम लावण्यरूपी (६७) करी काम नि:काम या राघवाचे (७७) नभासारिखे रूप या राघवाचे (१९७).

अभ्यासकांची यामुळे मोठी सोय होते. 'मना कल्पना सोडी संसारतापा' या १०५ व्या श्लोकाचे विवेचन करताना समर्थांनी ज्या ज्या श्लोकांमध्ये कल्पना हा शब्द वापरला आहे त्यांचा एक गटच पान ३४१ वर अप्पा देतात- मना कल्पना वाऊगी ते न कीजे (१२८), मना कल्पना ते नको वीषयाची (५), विवेके कुडी कल्पना पालटीजे (४०), मना कल्पना कल्पिता कल्पकोटी । नव्हे रे नव्हे सर्वथा रामभेटी (५९), मना कल्पना धीट सैराट धावे । तया मानवा देव कैसेनि पावे (१०४), मने कल्पिता कल्पना ते सरावी (१६४), स्फुरे वीषई कल्पना ते अविद्या (१७२), मिळे ना कदा कल्पनेचे न मेळी (५४), मना कल्पनालेश तो ही नसावा (५८), यात अप्पांचे बुद्धिचातुर्य दिसून येते. 'साधक संजीवनी' या भगवद्गीतेवरील ग्रंथामध्ये आचार्य रामसुखदास महाराजांनी गीतेतील श्लोकांचे असेच वर्गीकरण केले आहे. एखादा विषय नीट समजण्यासाठी असे वर्गीकरण खूप उपयोगी पडते. म्हणून अप्पांचा हा ग्रंथ म्हणजे मराठी माणसाची भगवद्गीता आहे. आपल्या घरात हा ग्रंथ नसेल तर आपल्या संसारातील ती फार मोठी त्रुटी आहे असे समजा!

सार्थ मनाच्या श्लोकाला मर्यादा असते. अप्पांच्या ग्रंथाचे स्वरूप विवरणात्मक आहे. त्यामुळे काही श्लोकांचे विस्तृत विवरण करताना अप्पा नुसते शब्दांचे अर्थ देत नाहीत तर त्यांच्या व्याख्या, व्यवहारातील उदाहरणे हे सारे देतात. ५व्या श्लोकाचे विवेचन १५ पाने आहे तर ६व्या श्लोकाचे विवरण ८ पाने आहे. त्यामुळे या दोन्ही श्लोकांतील संकल्प, विषय, विकार, काम, क्रोध, लोभ, मत्सर, दंभ या सगळ्या विषयांचे अर्थ स्पष्ट होतात. 'घन:श्याम हा राम लावण्यरूपी' या चरणाचे विवेचन करताना पान २५२ वर लावण्य आणि सौंदर्य या दोन शब्दांचा सुरेख उहापोह केला आहे. पान २८३ वर ज्ञानेश्वरीच्या आधारे व्यवहारातील उदाहरणे देऊन मत्सर शब्दाचा नेमका अर्थ सांगितला आहे. पान ३४७ वर रागाचे मानसशास्त्रीय विश्लेषण सुंदर केले आहे. १८३ व्या श्लोकातील भक्ताची १२ लक्षणे सांगताना भक्त, ज्ञानी, विवेकी, विरागी, कृपाळू, मनस्वी, क्षमावंत, योगी, प्रभू, दक्ष, वित्पन्न, चातुर्य या बाराही शब्दांचे सात पानी विवेचन केले आहे. ४० व्या श्लोकांतील सुखसंकल्पना स्पष्ट करताना आपण सुखाचा शोध चुकीच्या जागी कसा घेतो ते समजावून सांगितले आहे. सर्वात महत्त्वाचे म्हणजे प्रत्येक श्लोक आपण कसा जगावा किंवा आचरणात आणावा याचे मानसशास्त्रीय विश्लेषण करताना आपल्यासारखा सामान्य साधक नेमका कुठे आहे आणि त्याला तिथून कसा वर उचलायचा याची तळमळ दिसून येते. अप्पांच्या जीवनात पारंपारिकता आणि वैज्ञानिक दृष्टी यांचा सुरेख मेळ होता. श्लोकांच्या विवेचनात हा समन्वय वेळोवेळी पाहायला मिळतो. पान ७२ वर ते चंद्रशेखर रमण या वैज्ञानिकाचे उदाहरण देतात तर आहाराचे महत्त्व समजावून सांगताना पान ७८ वर आयुर्वेदानुसार आहार कसा असावा याचे तर्कशुद्ध विवेचन करतात. स्वत: अप्पा आयुर्वेदाचार्य होते. केवळ जिभेचे चोचले पुरविण्यासाठी आपण आपल्या शरीरावरती किती अन्याय करतो आणि कसे अनारोग्य आपल्यावर ओढवून घेतो यासंबंधीच्या अप्पांनी केलेल्या विवेचनाचे कुणीही खंडन करून दाखवावे. जेवताना श्लोक म्हणणे किंवा भगवद्चिंतन करणे ही केवळ भाबडी कल्पना नसून त्यापाठीमागचे विज्ञान अप्पा ८९व्या श्लोकात नीट समजावून सांगतात. एवढेच नव्हे तर स्वत:ला पुरोगामी, सुधारलेले आधुनिक विचारांचे समजणारे तथाकथित मूर्ख लोक जेवताना राजकारण, नट-नट्यांचे जीवन, दूरदर्शनच्या मालिका यांची चर्चा करून स्वत:चे कसे नुकसान करून घेतात हे सांगताना अप्पांच्या लेखणीला तलवारीची धार आलेली आहे.

खंडन मंडन हा आप्पांचा अगदी लाडका विषय. कारण एकतर ते तेजस्वी रामदासी होते आणि पुण्यात तथाकथित बुद्धीवादी आणि समाजवादी यांना सामोरे जाण्याचा वारंवार प्रसंग येत असल्यामुळे आधुनिकतेच्या नावाखाली कुणी जर आपल्या चांगल्या परंपरांवर हल्ला चढविला तर तर्काची ढाल आणि विज्ञानाची तलवार घेऊन अप्पा निर्भयपणे मैदानात उतरत. समर्थांनीसुद्धा 'फेडावे नाना आक्षेप' हे समर्थ संप्रदायाचे महत्त्वाचे लक्षण सांगितले आहे. तुकाराम महाराजांनी देखील पाखंडाचे खंडन करण्यासाठी आपण जन्माला आलेलो आहोत असे म्हटले आहे. विज्ञाननिष्ठ असलेल्या अप्पांचा पौराणिक कथांचाही गाढा व्यासंग होता. मनाच्या श्लोकात महाराज अंबरिष, उपमन्यू, ध्रुव, गजेंद्र, अजामेळ, विष्णूचे विविध अवतार, शिव-पार्वती, पिंगला नामक वेश्या, रामायण, महाभारत यातील अनेक कथा येतात. श्लोकांचे विवरण करताना या सर्व कथा अप्पांनी मूळ संदर्भासह दिल्या आहेत. एखाद्या कथेने जर मानवी जीवनाचे उन्नयन होणार असेल तर केवळ पौराणिक म्हणून तोंड वेंगाडायची गरज नाही. याची आदर्श मापपट्टी माऊलींनी हरिपाठात आपल्यासमोर ठेवली आहे, संत ज्ञानदेव म्हणतात-

**मंथुनी नवनीता तैसे घे अनंता । वाया व्यर्थ कथा सांडी मार्गी ।।**

ज्याप्रमाणे इसापनीतिच्या कथा काल्पनिक असल्या तरी आपण शिडीसारखा त्यांचा उपयोग करतो त्याप्रमाणे या पौराणिक कथांचा उपयोग करून घ्यावा असा अप्पांचा दृष्टिकोन आहे.

मनोबोध विवरण्याचे सर्वात महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे अप्पांनी अध्यात्माबरोबरच कुटुंबसंस्था, शिक्षण, राजकारण, समाजकारण, राष्ट्रचिंतन या विविध विषयांना स्पर्श केला आहे. त्यामुळे या सर्व विषयांच्या संकल्पना स्पष्ट व्हायला मदत होते. उदा.- ९व्या श्लोकाचे विवेचन करताना पान ६८वर टेंबेस्वामी सिद्धींचा वापर केव्हा करीत

आणि केव्हा टाळीत ते अप्पांनी सांगितले. पिशाच्चबाधा आणि आजार यासाठी सिद्धीचा वापर करून टेंबेस्वामी त्या कुटुंबाला दु:खमुक्त करीत. पण नोकरी मिळवून देणे, पैसे मिळवून देणे यासाठी ते सिद्धीचा वापर करीत नसत. अलिकडच्या तरुणांना श्रीमंतीचे आकर्षण असते. त्यासाठी वाटेल त्या मार्गाने पैसे मिळविण्यास ते तयार असतात पण अशा श्रीमंतीचे अंतरंग कसे नाना प्रकारच्या दु:खांनी भरलेले असते ते अप्पा व्यवस्थित समजावून सांगतात. ''नको रे मना द्रव्य ते पूढिलांचे' या श्लोकाचे त्यांनी १२ पाने विवेचन केले आहे. अनेकदा विषयांचा अति उपभोग घेणे किंवा विलासी जीवन जगणे याला तरूण पिढी रसिकता समजते. पण या अति विषयसेवनामुळे आरोग्याचा कसा नाश होतो ते अप्पांनी पान १२० वर दाखवून दिले आहे. इंग्रजांच्या प्रभावामुळे आणि समाजवाद्यांच्या बुद्धिभेदामुळे शंकराचार्य आणि राणाप्रताप यांच्यापेक्षा मार्क्स आणि स्टॅलीन जास्त जवळचे वाटायला लागतात. अप्पांनी जगातील विविध विचारप्रवाहांचे अध्ययन केले असल्यामुळे पान ३५९ वर सिग्मंड फ्रॉईड आणि कार्ल मार्क्स यांचे तत्त्वज्ञान त्यांच्याच देशातील लोकांनी कसे खोटे ठरविले आणि फेकून दिले हे सप्रमाण दाखवून दिले. एखादा मनुष्य वशिल्याने विद्यापीठाचा कुलगुरू झाला म्हणून किंवा जातीयवादाच्या निकषावर कुणी प्रसिद्ध वृत्तपत्राचा संपादक झाला अथवा लटपट खटपट करून साहित्य संमेलनाचा अध्यक्ष झाला याचा अर्थ या मंडळींना फार अकला आहेत असे नव्हे. पात्रता नसताना मिळालेल्या मोठेपणापायी तरुणांचा बुद्धिभेद करणाऱ्या या मंडळींचा अप्पा खरपूस समाचार घेतात आणि तरुणांना खोट्या प्रतिष्ठेच्या भ्रामक कल्पनेपासून वाचविण्याचा मनापासून प्रयत्न करतात. त्यांची राष्ट्रहिताची आणि समाजहिताची तळमळ विवरण वाचताना पदोपदी जाणवते. तरुणांनी बुद्धी गहाण ठेवून विचार स्वातंत्र्याच्या नावाखाली परकीयांच्या खुळचट कल्पनांचे अंधानुकरण करून स्वत:चे नुकसान करून घेणे ही देखील विज्ञानातील अंधश्रद्धा नव्हे काय? विज्ञानाचा स्वीकार करताना धर्माला नावे ठेवण्याची काय गरज आहे? नास्तिकता हेच भूषण समजणाऱ्या तथाकथित बुद्धिवाद्यांचा ढोंगीपणा अप्पा तरुणांच्या निदर्शनास आणून देतात. म्हणून वाढदिवसानिमित्त अथवा विवाहप्रसंगी तरुणांच्या हातात हा ग्रंथ द्या.

परमार्थातील भ्रामक समजुतीवरदेखील अप्पा तुटून पडतात. २९व्या श्लोकाचे विवेचन करताना पारमार्थिक माणसाने शांत, सोशिक आणि क्षमाशील असणे म्हणजे मिळमिळीत आणि शेळपट असणे नव्हे. साधकाला वाइटाची चीड आलीच पाहिजे आणि प्रसंगी त्याने नाठाळाच्या माथी काठी घालण्याची हिंमत दाखविली पाहिजे असे अप्पा स्पष्टपणे बजावतात. 'यथासांग रे कर्म तेही घडेना' किंवा 'बहुतापरी संकटे साधनांची' या श्लोकांचे विवेचन करताना खोट्या मोठेपणासाठी परमार्थाच्या नावाखाली माणसे काय काय उद्योग करतात याची खरडपट्टी अप्पा काढतात. पान १७६ वर मौनाच्या नावाखाली पाटीवर लिहिणे किंवा खाणाखुणा करणे ही मौनाची विटंबना होय असे अप्पा स्पष्टपणे बजावतात. तसेच मौनाची यथार्थ व्याख्या करतात. आवश्यकतेपेक्षा अधिक बोलण्याची इच्छाच न होणे हाच मौनाचा खरा अर्थ आहे. पान २५७ वर राज्यकर्त्यांनी शस्त्राचा वापर न करणे याला अप्पा गबाळेपणा म्हणतात. राष्ट्राचे रक्षण करण्यासाठी शस्त्रांचा विवेकपूर्ण वापर झालाच पाहिजे असा त्यांचा आग्रह आहे. प्रयत्नवाद श्रेष्ठ का प्रारब्ध श्रेष्ठ याचा निर्णय पान २५१ वर देताना एका दृष्टांताद्वारे अप्पा प्रयत्न आणि प्रारब्ध या दोन्हींचे महत्त्व समजावून सांगतात. शेतकरी शेतात पेरणी, मशागत असे सारे कष्ट करतो हा प्रयत्नवाद झाला तर वेळेवर पाऊस पडणे हे प्रारब्ध झाले. दैव अनुकूल नसेल तर प्रयत्न कदाचित वाया जातील पण काही प्रयत्न न करता दैव तुम्हाला फुकटाचे काही देणार नाही. नांगरणी आणि पेरणी न करता केवळ पाऊस पडला म्हणून धान्य उगवणार नाही, 'तुटे वाद संवाद तो हीतकारी' या श्लोकाचे विवेचन करताना पान ३५० वर वादाचे तोटे जसे सांगितले तसेच वाद-विवादाचे फायदे देखील सांगितले. बुद्धीला चालना मिळणे, विचारांना नेमकेपणा येणे, आपले मत मांडण्याचे कौशल्य वाढणे हे वादाचे फायदे करून घ्यावेत. फक्त वादातून हट्टीपणा, दुराग्रह, अभिनिवेश वाढणार नाही याची काळजी घेतली म्हणजे झाले. शुष्क वाद घालणाऱ्यांना त्यांची जागा दाखवून देत असताना अप्पा सांगतात- शंकराचार्यांना नावे ठेवणाऱ्या टिळक भक्ताकडे लोकमान्य टिळकांचा कर्मयोग असत नाही किंवा शंकराचार्यांच्या वेदांताचे समर्थन करणाऱ्या शांकरभक्ताकडे आचार्यांची विरक्ती असत नाही. अशाप्रकारे मानवी जीवनातील वाटचालीत पावलोपावली उपस्थित होणाऱ्या प्रश्नांची उत्तरे मिळून विविध विषयांच्या संकल्पना स्पष्ट झाल्याचा आनंद प्राप्त होतो.

या ग्रंथाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे अप्पांच्या मुखातून उत्स्फूर्तपणे बाहेर पडलेली गद्य सुभाषिते होय. संतांसारखी कीर्ति सत्तेने अथवा संपत्तीने विकत घेता येत नाही. (पान-६२), अधिकारापेक्षा अधिकाची अपेक्षा करणे ही चोरीच होय (पान-६८), आयुष्याचा प्रत्येक क्षण मोलाचा आहे आणि तो सत्कारणी लावणे हे माणसाने आपले कर्तव्य समजले पाहिजे (पान-१८१), मिळाले ते स्वत:च्या कर्तृत्वाने आणि मिळाले नाही ते दुसऱ्याच्या दोषांमुळे ही माणसाची धारणा क्वचितच खरी असते. (पान -२२८), परदेशात शिकून येणारा पदवीधर आता मी जे शिकून आलो आहे ते शिकण्यासाठी परदेशात कुणाला जावे लागणार नाही असे म्हणू शकत नाही ही स्थिती राष्ट्रीय दृष्टिकोनातून मोठी दुर्दैवी आहे. अन्यथा प्रत्येकाला तंत्रज्ञानासाठी परकीयांच्या तोंडाकडे पहावे लागले नसते. (पान-२५३), कीर्तनकार किंवा प्रवचनकार चांगले बोलतो, चांगले सांगतो म्हणून केवळ तेवढ्या गुणाने अध्यात्ममार्गातील सद्‌गुरू होऊ शकणार नाही. (पान-५०८), या सर्व गद्य सुभाषितांच्या मागे अप्पांचे केवढे मोठे आध्यात्मिक आणि राष्ट्रीय चिंतन होते तसेच लोकहिताची किती तळमळ होती हे या सर्व विवरणात जागोजागी ध्यानात येते. 'बुडती हे जन। न देखवे डोळा।' ही तुकोबारायांची करुणा घेऊन जन्माला आलेल्या या महात्म्याच्या ऋणातून आपण कसे मुक्त होणार? या ग्रंथाच्या किमान ५ प्रती खरेदी करून ५ तरूणांच्या हातात त्या द्याव्या ही वाचकांना प्रेमाची विनंती. परमपूज्य अप्पांच्या पुण्यस्मृतीला मन:पूर्वक अभिवादन!

**सुनील चिंचोलकर**
अजिंक्यनगर, हिंगणे खुर्द, पुणे ५१. मो. ९४२३७४२४४४

•••



# वाटा आपल्या हिताच्या- जीवन मूल्य कोश

**अरुण म्हाळसाकांत परळीकर**

विद्युत अभियांत्रिकी पदविका व पदवी (DEE+BE)

जलसंपदा विभागात विद्युत अभियंता म्हणून कार्यरत.

लेखकाच्या कुटुंबात प.पू.श्री.दासगणुमहाराजांच्या अनुग्रहाची परंपरा असून ते स्वत: प.पू. स्वामी वरदानंद भारतींचे अनुग्रहित आहेत.

''अप्पा, आपली भारतीय संस्कृती खरोखरच श्रेष्ठ आहे का हो?'' एका संस्कृती संरक्षणाचा वसा घेतलेल्या संघटनेच्या सक्रीय कार्यकर्त्यांचा हा प्रश्न ऐकून अप्पा सचिंत झाले. ज्यांनी समाजात पुढे होऊन आपल्या संस्कृतीवर होणाऱ्या आक्षेपांना समर्थपणे तोंड द्यावयाचे, त्या संघटनेच्या कार्यकर्त्यांच्याच मनात असा संभ्रम असावा असा प्रश्न उपस्थित होत असेल तर इतर सामान्यांचे काय? जो स्वत:च साशंकित आहे तो समाजाचे, देशाचे भले कसे करणार? या विचारांनी अप्पा गंभीर झाले, अस्वस्थ झाले. भारतीय तरुण वर्ग संभ्रमित अवस्थेत असल्याचे त्यांना प्रकर्षाने जाणवले. या अवस्थेला आपल्यातीलच इंग्रजाळलेली बुद्धी कारणीभूत होती. आपले भारतीय आदर्श, भारतीय मूल्य, भारतीय तत्त्वज्ञान इतकेच नव्हे तर आपल्या संस्कृतीने जे जे काही चांगले, ग्राह्य म्हणून स्वीकारले, त्यावर या परभृत मनोवृत्तीच्या विद्वानांनी आघात केले व हे सर्व कसे विकृत आहे, चुकीचे आहे हे वारंवार समाजापुढे प्रचारकी तंत्राने मांडले. परिणामत: चांगल्या संस्कारक्षम तरुणांची मनेही वेगळा विचार करू लागली, तर मग त्यात दोष कोणाचा? अशा अवस्थेत अशा त्या सर्व तरुणांना वेळीच आपल्या संस्कृतीची वैशिष्ट्ये व महात्म्य यथार्थपणे पटवून देणे इष्ट ठरेल. कारण मनबुद्धीतला हा वैचारिक गोंधळ जीवनाच्या उच्च ध्येयापासून त्याला दूर नेतो. त्याची परिणती सांस्कृतिक उच्च मूल्ये, नैतिकता नाकारण्यात होते. एखाद-दुसऱ्या व्यक्तीचे असे झाले तर त्याचा तितकासा परिणाम घडत नाही. परंतु समाजाचा एक मोठा गट असा विचार करील तर निश्चितच सामाजिक स्वास्थ्य बिघडू शकते आणि पर्यायाने संपूर्ण राष्ट्राला धोका निर्माण होऊ शकतो आणि याचा अनुभव भारतवर्षाला तरी नवा नाही.

अप्पांसारखा प्रज्ञावान पुरुष, देशकाल परिस्थितीचा प्रत्यक्ष अनुभव घेतलेला थोर विचारवंत अशा वेळी व्यवहाराच्या दृष्टीने तटस्थ रहाणे, उदासीन राहणे शक्यच नव्हते. 'बुडत हे जन देखवेना डोळा । म्हणून कळवळा येतो मज।।' अशी त्यांची वृत्ती! या कळवळ्यातूनच त्यांच्या मनातील खंत, घालमेल त्यांनी काही समाजधुरीणांपुढे व्यक्त केली असता त्यापैकी दै. तरुणभारतचे तत्कालीन संपादक कै.चं.प.भिशीकर व उद्योगपती कै.बाळासाहेब चितळे यांनी अवसाशंकित पण सश्रद्ध युवकांना जमवून त्यांना मार्गदर्शन करण्याची अप्पांना विनंती केली. अप्पांनी याला तत्काळ सहमती दर्शविली. परिणामत: तरुणांना त्यांच्या मनातील धर्मासंबंधी, संस्कृतीसंबंधी, परंपरेसंबंधी असलेल्या सर्व योग्यायोग्य शंका उपस्थित करण्याचे आवाहन करण्यात आले. सप्टेंबर १९७३ मध्ये झालेल्या तीन दिवसीय शिबिरात प्रत्यही आठ तास त्या सर्व शंकांचे निरसन अप्पांनी केले. या सर्व प्रश्नोत्तरांचे समग्र संकलन म्हणजेच प्राचार्य अ.दा.आठवले उर्फ अप्पा यांचा 'वाटा आपल्या हिताच्या' हा ग्रंथ! यालाच विद्वानांनी 'आधुनिक प्रश्नोपनिषद' वा 'सांस्कृतिक विचार कोश' म्हणून गौरविले आहे.

भारतीय संस्कृतीसंबंधी विचारल्या जाणाऱ्या बहुविध प्रश्नांची उत्तरे यांत आहेत. १०५ प्रश्नोत्तरांचे हे संकलन असून अनेकाविध विषयांचा परामर्श अप्पांनी घेतला आहे, हे या ग्रंथाच्या विस्तीर्ण अशा उत्कृष्ट विषयसूचीवरून लक्षात येते. अप्पांनी दिलेल्या या प्रश्नांच्या उत्तरांतून अप्पांचे अफाट वाचन, सखोल अभ्यास, चिंतन, मनन, प्रखर राष्ट्रनिष्ठा, जाज्वल्य धर्माभिमान, तर्कशुद्ध पद्धतीने बिनतोड युक्तिवाद करण्याची हातोटी, कुशाग्र बुद्धिमत्ता, भाषाप्रभुत्व आदि प्रतीत होते. उत्तरांत मांडलेल्या विचाराच्या समर्थनार्थ दिलेले नेमके संदर्भ, चपखल उदाहरणे व अचूक माहिती वाचून थक्क व्हायला होते. कोणाचाही उपमर्द न करता पण उपरोधिकपणाने ते इतरांचे दोष दाखवून देतात. आपल्या संस्कृतीची मूल्ये, मान्यता कशा उच्च कोटीतील आहेत व त्या काळाच्या कसोटीला कशा खऱ्या उतरलेल्या आहेत, हेही ते आपल्या ओजस्वी वाणीने वाचकांना पटवून देतात. यांत त्यांची समाजोद्धाराची कळकळ प्रकर्षाने जाणवते. युवकांमध्ये धर्मतेज, राष्ट्रतेज खऱ्या अर्थाने प्रगटावे अशी त्यांना असलेली ओढ ठायी ठायी जाणवते.

अत्यंत समतोल विचाराने राष्ट्रधारणेच्या हिताचा विचार करून आणि युवकांच्या विचारांना सुयोग्य दिशा मिळावी म्हणून या प्रज्ञावंताने आपले विचार यात ग्रथित केले आहेत. अध्यात्म, धर्म, संस्कृती, वेद, आपल्या परंपरा, पुनर्जन्म, कर्मविपाक, ईश्वरनिष्ठा, भारतवर्ष, आर्यांचे आगमन, चातुर्वर्ण्य, जातिभेद, आंतरजातीय विवाह, विज्ञान, राजकारण, समाजकारण, प्रचलित शिक्षण पद्धती, स्त्री-स्वातंत्र्य, दैववाद, अंधश्रद्धा, आहार-विहार, संस्कृती-सभ्यतेतले अंतर, धार्मिकता वा धर्मांधता असे विविध विषय अप्पांनी येथे हाताळले आहेत. कोणाला काय वाटेल किंवा कोण काय म्हणेल याला जरा सुद्धा

थारा न देता, सत्याशी यत्किंचित्‌ही प्रतारणा न करता, जे योग्य आहे तेच, मग ते प्रिय असो वा अप्रिय- मांडले आहे. नि:स्पृहता, विवेक व आत्मविश्वास असल्याने व पांडित्य मिरविण्याचा डौल नसल्याने त्यांच्या विवेचनात एक प्रकारचा नेमकेपणा असल्याचे लक्षात येते.

असत्य वा विकृती अप्पांना खपत नाही. न्याय्य व योग्य तर्क त्यांना मान्य आहे. योग्य तर्काने एखाद्या ऐतिहासिक चरित्राचे उदात्तीकरण करणे न्याय्य ठरते पण विकृत तर्काने चारित्र्यहनन करणे त्यांना पटत नाही. संस्कृती संरक्षणाच्या उदात्त ध्येयाने रामायण, महाभारतासंबंधी विकृत व असत्य विधानांचा, आक्षेपांचा त्यांनी येथे परखडपणे समाचार घेतला आहे. (पहा प्रश्न क्र. ४७,४८,४९,५५,५७, ५८,७१,९३) यातले काही विषय विस्तृतपणे जाणून घेण्यासाठी त्यांचा 'महाभारताचे वास्तव दर्शन'हा ग्रंथ अभ्यासावा असा आहे.

वर्णव्यवस्था, जातिभेद, मनुस्मृती इ.विषय तर आजचे ज्वलंत प्रश्न- जणू ठसठसणाऱ्या जखमाच! हे शब्द जरी आज उच्चारले तरी अनेकांचे कान टवकारतात, हमरी-तुमरीचा विषय होतो. पण नेमकी वस्तुस्थिती काय आहे, हे कोणी पहात नाही. मनुस्मृती जाळण्यापूर्वी ती वाचलेली तरी हवी ना! पण तेव्हढेही कष्ट कुणी घेत नाहीत आणि आरोप मात्र करतात, याचे अप्पांना दु:ख आहे. अप्पांनी तोही विषय अत्यंत समतोल बुद्धीने मांडला आहे व अशा ठसठसणाऱ्या जखमांवर योग्य औषधोपचार काय करायला हवेत, हेही त्यांनी एक 'वैद्य' या नात्याने सांगितले आहेत.

हळवे, प्रेमळ मातृहृदयी अप्पा जेव्हा एका विशिष्ट पातळीवरून संवाद करतात त्यावेळी त्यांच्या विवेचनातून कधी माधुर्यासह चातुर्य, कधी स्पष्टोक्ती तर कधी मधाळ वचने ऐकायला मिळतात. अशा अमृत वचनांची वानगी दाखल उदाहरणे द्यायची झाल्यास-

- प्रामाणिक कर्तव्यदक्षता जितकी धर्माच्या प्रेरणेने निर्माण होईल तेवढी ती शासनाच्या भयाने निर्माण होऊ शकणार नाही.
- अन्नछत्र घालणे हे पुण्य आहे पण अन्नछत्रात जेवणे पाप आहे.
- मोठ्या माणसाच्या ठिकाणी असले म्हणून त्याज्य, दोषार्ह क्वचित् क्षम्य वा उपेक्षणीय असले तरी कधीही अनुकरणीय नसते.
- सज्जन व्यक्तीचे शत्रुत्व आणि दुष्ट व्यक्तीचे शत्रुत्व सारख्याच मापाने मोजून चालत नाही.
- दैववाद योग्य प्रयत्नाच्या आड येत नाही.
- सुगृहिणीच्या व्यक्तिमत्त्वाचे एक अमूर्त बंधन सज्जन पुरुषालाही जाणवत असते आणि मग त्याचे वर्तनही संयमी व सौहार्दपूर्ण रहाते.
- तत्त्व आणि व्यवहार एकरूप नसतात मात्र व्यवहाराला तत्त्वाचे अधिष्ठान असलेच पाहिजे.
- धार्मिक वर्तन हे सुखाच्या विनिमयाचे साधन नव्हे.
- भोग लोलुप समाजामध्ये उपभोगाचेच तत्त्वज्ञान बनते.
- व्यवहाराच्या पातळीवर सद्‌गुणांचा अवलंब करतानाही तारतम्य राखावेच लागते.
- सोने जुने म्हणून कधी टाकाऊ ठरत नाही आणि केर नित्य नवा म्हणून संग्राह्य असत नाही.
- स्वत: मांसाहार करणाऱ्या व्यक्तीने (देवदेवतांच्या समोर दिल्या जाणाऱ्या) पशुबलीविरुद्ध प्रचार करणे हे दांभिकपणाचे आहे.
- विचारशून्य अनुकरण हे मूर्खत्वाचे लक्षण होय.
- भक्तीचे स्वार्थी स्वरूप पाहिले की, नास्तिक परवडले म्हणायचे.
- नेतृत्व नि:स्वार्थ, दिव्योदात्त नसेल तर समाजव्यवस्थेचे सारे आदर्श पुस्तकातच राहतात.
- दंभ ही अनधिकार नि लोकेषणा यांची संतति आहे.

अशी मनमोहक वचने या पुस्तकाच्या पानांपानांवर आढळतात. मंद सुगंध देणारी नाजुक प्राजक्ताची फुलेच ही, किती म्हणून वेचावीत? पण हेच अप्पा जेव्हा पित्याच्या अथवा शिक्षकाच्या भूमिकेत शिरून कठोर होऊन बोलतात, तेव्हा त्या शब्दांतील बोच, त्यांतील तीक्ष्ण धार 'सुज्ञांस सांगणे न लगे' या न्यायाने टोचल्या शिवाय रहात नाही. ही बोच सुज्ञांना अंतर्मुख करते अन् ही अंतर्मुखता त्यांना काही ठोस निर्णय घेण्यास, कार्यप्रवण होण्यास भाग पाडते. हे या ग्रंथाचे मोठे वैशिष्ट्यच म्हणायला हवे.

आपणातील काही प्रामाणिक मंडळी तशी पाहता सात्त्विक वृत्तीचीच असतात. परंतु धार्मिक गोष्टींच्या बाबतीत त्यांची मते विचित्र असतात. आपल्या परंपरेतील 'श्राद्ध' ही एक संकल्पना! आपल्या पितरांच्याविषयी आपला असलेला आदरभाव, कृतज्ञता, श्रद्धा व्यक्त करण्यासाठी एक परंपरागत शास्त्रमान्य रूढी! आजच्या या आधुनिक विद्वानांना घरात श्राद्ध घालायचे म्हटले की नकोसे होते. तथापि हे काही केले नाही तर अनपेक्षित आपत्ती येण्याची भीती वाटत रहाते. म्हणून मनात असलेली श्रद्धा व्यक्त करण्यासाठी ही मंडळी एखाद्या अनाथालयाला, संस्थेला देणगीरूपाने काही तरी दान देऊन स्वत:चे समाधान करून घेतात. हे सत्कार्य त्यांनी जरूर करावे मात्र अशा धार्मिक कार्यांच्या बाबतीत शास्त्र प्रमाण मानायलाच हवे. गीतेत सांगितल्या-प्रमाणे 'तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ।' (१६.२४) शास्त्राधारच घ्यायला हवा. आपल्या मनासारखे करून कसे चालेल? यावर अप्पांनी केलेली 'आयकर न भरता मुख्यमंत्र्याच्या वा पंतप्रधानाच्या निधीला देणगी देणे हे जसे शासनाला चालत नाही, तसेच श्राद्धाच्या संदर्भातही समजावे' ही टिप्पणी स्वयंस्पष्ट आहे.

'ईश्वरनिष्ठा, कर्मविपाक व पुनर्जन्म' या संदर्भातही असेच! 'मला स्वत:ला अनुभव आला तरच मी या गोष्टींवर विश्वास ठेवेन' अशी दर्पोक्ती काही विद्वान करतात. या गोष्टीही तशा तर शास्त्र सिद्ध आहेत तथापि त्यांचा प्रत्यय येण्यासाठी काही ठराविक पद्धतीनेच अभ्यास करावा लागतो, ज्याला अशा मंडळींची तयारी नसते. पण म्हणून अनुभवास येत नसल्या तरी नाकारण्यात कसला आलाय पुरुषार्थ? रोजच्या व्यवहारात अशा कितीतरी घटना आपल्या आजूबाजूला घडत असतात ज्या आपणास माहीत असल्या तरी अनुभवास येत नाहीत. त्यांचे प्रमाण देणेही सहज शक्य होईल असे नसते. त्यासाठी सखोल अभ्यास, कठोर परिश्रम घ्यावे लागतात. शास्त्रज्ञांनी ते घेतलेले असतात. गुरूत्वाकर्षण शक्ती कळते पण प्रत्यक्ष अनुभवाला येते का? आपल्या शरीरावर हवेचा मोठा दाब सतत कार्यरत असतो, जो जाणवतो का?

पाणी घनरूपात रूपांतरित होताना हे हलके कशामुळे होते? सामान्य नियमाच्या असे एकदम विपरित घडण्यामागे काही योजना असेल का नाही? सागराच्या तळाशी असलेली जीवसृष्टी जिवंत रहावी यासाठीच ना! यामागे परमेश्वराचा बुद्ध्या विचार असेल का नाही? पृथ्वीचे स्वत: भोवती, सूर्याभोवती प्रचंड वेगाने फिरणे अनुभवाला येते का? या व अशा कितीतरी गोष्टी सामान्य माणसाला सहजपणे सिद्ध करता येणे अशक्य आहे. पण तरीही या गोष्टींवर आपण केवळ बुद्धिमान शास्त्रज्ञांनी सिद्ध करून सांगितल्या, त्यानुसार शब्द प्रामाण्यानेच विश्वास ठेवतो ना! मग निरिच्छ, सर्वजनहितैषी, नि:स्पृह, प्रज्ञावान्, संतसत्पुरुषांवर अविश्वास दाखवायचे कारणच काय? त्यांनी कर्मविपाक, ईश्वरनिष्ठा या गोष्टी आपले सर्वस्व पणाला लावून अनुभवल्या आहेत व त्या केवळ जगत्कल्याणाच्या सद्हेतूने नि:स्वार्थपणे सांगितल्या आहेत, तर त्या अमान्य करणे हे तर्कशुद्ध बुद्धीला कसे पटते? आणि पटावे तरी का या अप्पांच्या प्रतिप्रश्नांनी निरूत्तर व्हावेच लागते.

वाढलेली सांप्रदायिकता व टोकाचा दुराग्रही धर्माभिनिवेश याने सध्या आपल्या राष्ट्राच्या सामाजिक वातावरणात गढूळता आणली आहे. याविषयी जो तो दुसऱ्यावर तावातावाने ओरडतो आहे. यामुळे मने कलुषित होऊन त्याचा सामाजिक स्वास्थ्यावर विपरीत परिणाम होतो आहे हे कोणी लक्षातच घेत नाही. प्रत्येकाने स्वत:च्याच धर्माबद्दल, श्रद्धांबद्दल अभिमान बाळगायलाच हवा. पण त्यासाठी इतरांना कमी, तुच्छ लेखण्याचे काय कारण? स्वत:ला जे योग्य वाटते ते अवश्य करावे, पण इतरांनी माझ्यासारखे करावे हा आग्रह का? यावर अप्पांचे 'पतिव्रता स्त्री जरी आपल्या पतीला श्रेष्ठ मानून त्याच्या सेवेचे भूषण मानते, पण माझ्या पतीचे पतित्व तो श्रेष्ठ असल्याने इतर स्त्रियांनीही स्वीकारावे, असे म्हणत नाही'', या तर्कशुद्ध उत्तरावर वेगळे भाष्य करण्याची गरजच उरत नाही!

असे कितीतरी विषय, सामाजिक मुद्दे, कौटुंबिक प्रश्न, धर्मचर्चा, राष्ट्रहितासंबंधीचे विचार अप्पांनी या प्रश्नोत्तराच्या माध्यमातून आपणासमोर मांडले आहेत. तसे पाहता प्रत्येक प्रश्न अन् त्याचे उत्तर हा स्वतंत्र अभ्यासाचाच विषय आहे. तथापि 'हेहि नसे थोडके' या न्यायाने त्या त्या विषयांची ओळख, नेमकी विषयांची जाण यावी या उद्देशाने तरूण पिढीने या ग्रंथाची पारायणे केली पाहिजेत. आज आपल्या भारतात तरुणांची संख्या इतर देशांच्या मानाने, लोकसंख्येच्या मानाने जगात सर्वाधिक आहे. या तरुण वर्गापुढे योग्य ते आदर्श उभे न केल्यास सध्याच्या बिकट व कष्टप्रद काळापेक्षा कठीण काळ पुढे येईल, हे सांगायला कोण्या भविष्यकाराची खचितच गरज नाही. या दृष्टीनेही या व यासारख्या मार्गदर्शक ग्रंथांचे परिशीलन तरुणांकडून झाले पाहिजे. तेच 'अंततो गत्वा' सर्व समाजाच्या, राष्ट्राच्या हिताचे आहे, यात शंका नाही.

ज्या प्रश्नोत्तरांच्या मंथनातून या ग्रंथाची निर्मिती झाली तो कार्यक्रम १९७३ साली झाला होता. आज या गोष्टीला ४० वर्षांपेक्षा जास्त कालावधी झाला आहे. अप्पांनी त्यावेळी भविष्य वेध घेणारी जी मते मांडली होती, त्या मतांचा प्रत्यय आजच्या परिस्थितीत येतो आहे! या द्रष्ट्या प्रज्ञावंताने स्वत:च्या प्रगल्भ, कुशाग्र बुद्धिमत्तेच्या आधारे व सखोल अभ्यासाने जी मतं मांडली आहेत, ती पूर्णांशाने खरी उतरली आहेत, हे पाहून विस्मित व्हायला होते. 'विज्ञानाचा सुखसोयींसाठी उपयोग यंत्रांच्या माध्यमाने करण्याचे प्रमाण जो जो वाढत जाईल, तो तो प्रदूषणच वाढत जाईल' हे आजच्या परिस्थितीचे नेमके वर्णनच आहे. साम्यवादी विचारसरणीबाबत ते म्हणतात की, 'अत्यंत क्रूरपणाने क्रांति घडवून साम्यवाद्यांनी सर्व शासन आपल्या पद्धतीप्रमाणे निरंकुशपणे चालविले. भिन्न विचारसरणीच्या लोकांना अनन्वित यातना दिल्या, तरी आर्थिक समता आणता आली नाही ती नाहीच, उलट विषमता वाढू लागली आहे.' साम्यवादी राष्ट्रांची झालेली शकले ही याचाच पुरावा आहेत. 'आज आपण कारखाने, उद्योगधंदे आमच्या शहरात का नाहीत म्हणून भांडतो आहोत, उद्या ती आमच्या शहरात नकोत म्हणून आंदोलने करावी लागतील', 'पडू आजारी, मौज हीच वाटे भारी या न्यायाने समाजातील अनेक गट 'आम्हाला मागासलेल्या वर्गातले समजा' असा आग्रह धरू लागली आहेत', 'विकासाच्या नावाखाली वातावरणातील प्रदूषण वेगाने वाढविणारे अनेक उद्योग निर्माण होत आहेत, त्यामुळे रात्री शांत झोपही मिळणार नाही' या मतांवर तर वेगळे भाष्य करण्याची गरजच नाही. अप्पांसारख्या थोर प्रज्ञावंताचे ऐकावयाचे ते यासाठीच. कारण त्यांचे ज्ञान केवळ शब्दज्ञान नाही. ते पांडित्याचे प्रतीक नाही. ते तप:पूत, स्वत्वनिष्ठ चिंतनातून व व्रतस्थ जीवनातून स्फुरलेले तेजस्वी भाष्य आहे.

या ग्रंथातून अप्पांनी केवळ आपल्या धर्माचे, संस्कृतीचे, परंपरांचे उदात्तीकरण केले, महात्म्य पटवून दिले असे नसून आमच्याकडे असलेली गबाळी ईश्वरभक्ति, धर्मांतरितांना परत धर्मात न घेणे, दूरदृष्टीचा अभाव, विघटितपणा, समाजाच्या व्यापक हिताची जाणीव नसणे, वाढलेली सांप्रदायिकता, समाज रक्षणासाठी दक्ष नसणे, अनुशासनाचा अभाव, आळस, उपेक्षा, 'मला काय त्याचे' ही आत्मघातकी उदासीनता असे दोषही दाखवून दिले आहेत. तसेच या दोषांवर कशाप्रकारे मात करत येईल, करावी, हेही व्यवस्थितपणे सांगितले आहे. या अनुषंगाने आपल्या समाजात असलेल्या सद्गुण-दुर्गुणांची मीमांसा हे या ग्रंथाचे अजून एक वैशिष्ट्य ठरावे. आळसाने झोपेच्या गुंगीत गढून गेलेल्या मुलाला अभ्यासासाठी आईने हलवून वा पाण्याचा शिडकावा टाकून जागे करावे त्याप्रमाणे अप्पा हे जनजागृतीचे कार्य करतात.

प्रगत विज्ञानाच्या सध्याच्या काळात प्रत्येक हिंदू युवकापुढे अशा समस्या आहेत. विज्ञानाच्या कसोटीवर तो हिंदूधर्माचे, अध्यात्माचे परीक्षण करू पहात आहे. आपल्या देशाच्या दुरवस्थेची कारणमीमांसा नि:पक्षपणे यथार्थपणे कुणी केली तर ती त्याला पाहिजे आहे. हिंदुधर्माचे सारे काही विज्ञाननिष्ठ आहे, म्हणूनच तो हजारो वर्षे अनेक आघात सोसून टिकून राहिला आहे, हे त्रिवार सत्य आहे! हे सूत्र त्या हिंदू युवकालाही कळते पण त्या सूत्रामागची बैठक, तत्त्वज्ञान त्याला नेमकेपणाने गवसत नाही. ते तत्त्वज्ञान कुणी त्याला समजेल अशा शब्दात समजावले तर हवे आहे. व्यष्टि-समष्टीच्या हिताचा विचार

आपल्या संस्कृतीने केला, तेवढा जगातल्या अन्य कोणत्याही धर्माने वा तत्त्वज्ञानाने केला नाही, हा विचार पटतो पण त्यातील मर्म त्या युवकाला सापडत नाही. ते नेमके मर्म त्याला कुणी समजावून दिले तर पाहिजे आहे. हे सर्व त्याला गवसेल असा हा मौलिक ग्रंथ आहे. मात्र त्याने चिकित्सक बुद्धीने परिश्रमपूर्वक या ग्रंथाच्या परिशीलनार्थ प्रयत्न केला पाहिजे. तरच त्याचे अज्ञान, अशांतता, संभ्रमितता लवांशानेही शिल्लक उरणार नाही. सध्याच्या अस्थिर, संभ्रमक, नैराश्येच्या अंधकारमय वातावरणात भरकटत जाणाऱ्या वैचारिक नौकांना योग्य असा मार्ग दाखविण्याचे, दीपस्तभांचे काम 'वाटा आपल्या हिताच्या' हे पुस्तक करते.

आपल्या संस्कृतीवर होणाऱ्या बौद्धिक आघातांना योग्यरीतीने उत्तर देता यावे व प्रतिकूल परिस्थितीतही आपल्या मनबुद्धीचा तोल कसा सावरावा हे समजावून देणारे असे हे अनेक प्रश्न अन् त्यावर दिलेली उत्तरेही अनेक! दिलेले प्रत्येक उत्तर मात्र हिताच्याच वाटे नेणारे! यात केवळ तरुणांचेच नव्हे तर प्रत्येक सुजाण नागरिकाचे, समाजाचे, राष्ट्राचे, नव्हे अखिल मानव जातीचेही कल्याण समावलेले आहे. त्यादृष्टीने हे पुस्तक प्रत्येक मनुष्याचे जीवनशास्त्रच आहे असं म्हणायला हवे. व्यक्ति व समाज यांच्या विकसनाचे चित्र त्यात उत्कृष्ट रीतीने आढळते! व्यक्ति, समाज, राष्ट्र व धर्म यांच्याशी निगडीत प्रत्येक विषयाच्या अंगोपांगाला स्पर्शणारे हे विचारधन! या अनुषंगाने हा ग्रंथ म्हणजे 'जीवन मूल्य कोश'च ठरावा! आजच्या जाहिराती भाषेतच सांगायचे झाले तर 'प्रत्येक कुटुंबासाठी– कुटुंबातील प्रत्येकासाठी' हा ग्रंथ आवश्यक आहे.

।। इत्यलम् ।।

**अरुण म्हाळसाकांत परळीकर**
ए-१३, 'अनंत', विश्वकर्मा नगर, सूस रोड, पाषाण,
पुणे ४११०२१. मो. ९८८१६१३६१२

• • •

**मना शत्रुही मित्र मानीत जावें ।**
**तयांशीं सदा गोड वाचे वदावें ।।**
**तयांचा नको डाव चित्तांत ठेवूं ।**
**कुणाचा नको शब्द लावून घेऊं ।।**



# साधक-साधना- विषय व्हावा अनुभवाचा

**सौ. प्राची सविता भिडे**

बी.कॉम., एल.एल.बी., अॅडव्होकेट,

प.पू. अप्पांसारखे सद्‌गुरू मिळाले. थोडासा सहवास लाभला व आपल्या जगण्याची, जीवनाची दिशा काय असावी याची थोडी फार ओळख, जाणीव झाली.

प.पू. परमहंस स्वामी वरदानंद भारती यांचा 'साधक-साधना' हा ग्रंथ. मा.श्री. शामराव आपटे यांनी विनंती केल्यावरून या विषयावर प.पू.अप्पांनी प्रवचने केली. त्यातील विवेचनाचे शब्दांकन म्हणजे हा 'साधक-साधना' ग्रंथ होय. हा ग्रंथ संन्यासदीक्षेनंतरचा आहे.

आद्य श्रीशंकराचार्यांचा 'सर्व वेदांत सार-संग्रह' नावाचा ग्रंथ आहे. त्यात त्यांनी 'साधन-चतुष्टय' हा विषय मांडला आहे. मोक्षाच्या प्राप्तीसाठीची साधना या प्रकरणात मांडली आहे.

भगवंताच्या प्राप्तीसाठी सर्वसाधारणपणे कर्म, भक्ती, ज्ञान व योग असे चार मार्ग सांगितले जातात. यातील ज्ञानमार्गासाठी 'साधन-चतुष्टय सम्पन्नता' ही साधकाची योग्यता सांगितली आहे. ही योग्यता प्राप्त झाल्यावर साधकाला ज्ञान किंवा मोक्षासारखी उन्नत अवस्था प्राप्त होते. 'अथातो ब्रह्मजिज्ञासा' या सूत्राप्रमाणे ब्रह्मजिज्ञासेपूर्वी साधक साधन चतुष्ट्य सम्पन्न हवा.

ही योग्यता येण्यासाठी साधकाला बराच काळ अथक प्रयत्न करावे लागतात. त्यासाठी काही विशेष गुण संपादन करावे लागतात. काही दोष, प्रलोभने, मोह सोडावा लागतो. हे गुण संपादन कसे करायचे ते आपल्या अंगी कायम कसे टिकवायचे याचे विवेचन प.पू. अप्पांनी या ग्रंथात केले आहे.

हे साधन चतुष्टय म्हणजे १) विवेक, २) वैराग्य, ३)शमदमादिषट्क, ४) मुमुक्षुत्व. या चारही साधनांवर प.पू. अप्पांनी विस्ताराने विवेचन केले आहे. मूळ विषय तत्त्वज्ञानाचा, वेदातांचा. परंतु. प.पू. अप्पांनी त्यांतील अवघडपणा दूर करून सर्वसाधारण माणसाला, जिज्ञासूला समजेल असे सोपे करून सांगितले आहे. हे सर्व विवेचन करताना प.पू. अप्पांचे स्वतंत्र चिंतन, विषयाचा सखोल अभ्यास, वेद, उपनिषदे, ज्ञानेश्वरी, दासबोध, गाथा यांचा सूक्ष्म अभ्यास व याच्या जोडीला सगळ्यात महत्त्वाचे म्हणजे अध्यात्मातील सर्वोच्च पदाची त्यांना आलेली प्रत्यक्ष अनुभूती प्रतीत होते. प्रस्थानत्रयीवर अधिकाराने भाष्य करणारे प.पू. अप्पा हे आधुनिक काळातील आचार्यच होत.

केवळ शाब्दिक तत्त्वज्ञानापेक्षाही त्यातील सिद्धांत दैनंदिन जीवनात आचरणात आणून आपली अध्यात्मातील प्रगती कशी साधावी याचे उत्कृष्ट विवेचन प.पू. अप्पांनी या ग्रंथात केले आहे. याचा अर्थ यातील विवरण हे केवळ आध्यात्मिक प्रगतीसाठीच आहे असे नसून सर्व साधारण ऐहिक पातळीवरही याचा निश्चित लाभ होऊ शकतो.

मोक्षाचा अधिकार प्राप्त करून देणारी चार साधने आद्य शंकराचार्यांनी सांगितली आहेत ती अशी,

**आद्यं नित्यानित्यवस्तुविवेक:, साधनं मन: ।**
**इहामुत्रार्थ- फलभोग- विरागो द्वितीयकम् ।।२।।**
**शमादिषटक- संपत्ति: तृतीयं साधनं मतम् ।**
**तुरीयं तु मुमुक्षुत्वं साधनं शास्त्रसंमतम् ।।**

चार प्रकारची साधने- १) विवेक, २) वैराग्य, ३) शमादिषट्क, ४) मुमुक्षुत्व. प.पू. अप्पांनी प्रत्येक साधनाचा विचार अत्यंत विस्ताराने केला आहे. सामान्य माणसाला पटेल, आचारावेसे वाटेल असे एकूण विवेचन आहे. ग्रंथाच्या प्रास्ताविकातच साधना म्हणजे उपासना. प्रयत्नांची विशिष्ट पद्धती अशी साधनेची सोपी, सुटसुटीत व्याख्या दिली आहे.

**पहिले साधन विवेक आहे.**

ब्रह्म हेच काय ते नित्य व त्याच्यापेक्षा निराळे जे काही आहे असे वाटते ते सर्व अनित्य आहे असे निश्चितपणे जाणणे यालाच नित्यानित्यवस्तुविवेक असे म्हणतात. हे आद्य शंकराचार्यांचे तात्त्विक विवेचन प.पू. अप्पांनी व्यवहारात आपण जे जीवन जगतो त्या पातळीवर येऊन सांगितले आहे. 'विवेक' शब्दाचा अर्थ निवड करणे. यासाठी ते स्वयंपाकघरातील गृहिणींचे काम, कांडणे, निवडणे, पाखडणे, चाळणे हे सर्व निवडी सारखेच असते. तसेच सर्वसामान्य मनुष्य यंत्र, वस्त्र, वस्तू खरेदी करतानाही अनेक दृष्टिकोनातून निवडच करीत असतो. फक्त त्याला नित्यानित्यवस्तुविवेक असे तात्त्विक शब्द वापरीत नाही. एवढेच प.पू. अप्पा म्हणतात, माणसाचे ठिकाणी नित्य अनित्याची, चांगले-वाईट करण्याची, विचार करण्याची म्हणजेच विवेकाची शक्ती स्वभावत: आहे. शिक्षणाने, अनुभवाने, संस्काराने ती अधिकाधिक विकसित होते व हिताकडे, शाश्वताकडे जाणे शक्य होते. हे साधण्यासाठी मात्र पारमार्थिक नित्यानित्यविवेकाचा अभ्यास हवा. वेदांताने त्यासाठी ब्रह्म नित्य व सत्य, व इतर सर्व सृष्टी, इंद्रियांचे विषय, संसारातील उपभोगाची साधने अनित्य व त्यामुळे त्यापासून मिळणारे सुखही अनित्य हे स्वरूप सांगितले आहे. प.पू.अप्पांनी वस्तूंचा उपयोग नाकारला नाही तर त्यापासून मिळणाऱ्या अनित्य सुखाची आसक्ती, मोह नाकारल्यामुळे हाच विवेक माणसाने आपले खाणे, पिणे, बोलणे सर्व व्यवहार विवेकाने करावेत. एकूणच

आपले सर्व जीवन मग ते ऐहिक असो वा पारमार्थिक विवेकावर आधारित हवे.

**वैराग्य** – दुसरे साधन वैराग्य या प्रकरणात एकूण २० श्लोक आहेत. इहलोकातील किंवा परलोकातील जी जी सुखाची साधने आहेत त्या सर्वांविषयी अनित्य, तात्पुरती व परिणामी सुखावह नाहीत व सुखकल्पना ही मोहावर आधारलेली आहे असा निश्चय वाटू लागला तर त्या सर्व गोष्टींविषयी तुच्छता वाटू लागते. ही तुच्छ बुद्धी माणसाच्या ठिकाणी निस्पृहता, अनासक्ती निर्माण करते.

ही विवेकानंतरची साधना किंवा पायरी आहे. अनासक्ती, वैराग्य उत्कट हवे. वैराग्याची उत्कटता लक्षात आणून देण्यासाठी आचार्यांनी 'काकविष्ठावत्' म्हटले आहे. काकविष्ठेविषयी जशी माणसाला किळस येते तसा उबग विषयांविषयी वाटावा. प.पू. अप्पांनी काकविष्ठावत् ही उपमा देण्यामागचे वैशिष्ट्य असे सांगितले आहे की, ती विष्ठा अत्यंत तिरस्कारार्ह असते, किळसवाणी असते. गाई-म्हशीचे शेण सारविण्यासाठी किंवा खत म्हणून तरी उपयोगी पडते पण काक-विष्ठेचे तसे नाही.

विषयांविषयी दोषबुद्धी तीव्र हवी. ती होण्यासाठी प.पू.अप्पांनी विषयांचे पर्यालोचन कसे करावे हे अत्यंत तपशीलावार सांगितले आहे. विषय घातक असले तरी दोष एकदम लक्षात येत नाही. विषयांचे स्वरूप जाणले पाहिजे. त्यांची ओढ का वाटते? किती आहे? याची चिकित्सा करीत जावी. सुख कोणाला होते? का होते? त्याचे परिणाम काय? याची मीमांसा करीत असले पाहिजे. त्याचबरोबर इंद्रियांचे सामर्थ्य, परिस्थिती यांचा विचार करावा. असे खरोखरीच घडले तर आसक्त असलेली व्यक्ती ही विरक्त होऊ शकते. यासाठी गोस्वामी श्रीतुलसीदासांचे चरित्रातील गोष्ट सांगून उदाहरण दिले आहे. गोष्ट सांगत असताना प.पू. अप्पांची कीर्तनातील शैली जाणवते.

विषयांचे दोष लक्षात आले की विषयाची आसक्ती सुटते असे आद्य शंकराचार्य म्हणतात. पण आज एकविसाव्या शतकात सिगरेटच्या पाकिटावरच 'सिगरेट ओढणे आरोग्यास घातक आहे' असे लक्षात आणून देऊनही सिगरेट ओढणे थांबवले जात नाही. म्हणजेच विषयाची आसक्ती सुटत नाही. म्हणून प.पू. अप्पा विचारतात, विषयाचे दोष लक्षात येऊनही त्याचा उपयोग कितीसा? यालाच समर्थांनी 'पढतमूर्ख' म्हटले आहे.

अशा विषय पर्यालोचनासाठी संत वचन, शास्त्रांचा आधार घ्यावा. चांगली गोष्ट एकाएकी साधत नाही. आयुर्वेदाने दोष क्रमाक्रमाने घालवावेत व गुण क्रमाक्रमाने वाढवावेत असे म्हटले आहे.

यापुढच्या श्लोकात आचार्यांनी या लोकात व परलोकात परिस्थितीचे तारतम्य म्हणजे उच्च-नीच भाव, विषमता कर्मानुरूप असते ती पाहून कोणाला वैराग्य येणार नाही? असे म्हटले आहे.

प.पू. अप्पांनी विविधता स्विकारली आहे. तशी तर ती निसर्गातही असते पण माणसाने अहंकार, लोभ, मत्सर, अभिनिवेश यामुळे या विविधतेला विषमतेच्या पातळीवर उतरवून तो दुःखी झाला. या विवेचनाच्या ओघात त्यांनी हिंदुधर्मातील चातुर्वर्ण्य कल्पना ही विषमतेचा प्रसार करणारी आहे असा जे आरोप करतात त्यांना अतिशय चोख शब्दात व पटेल असे उत्तर दिले आहे. त्यांच्या मते शक्तिस्थानांचे चातुर्वर्ण्य व्यवस्थेत पूर्णपणे विकेंद्रिकरण झाले आहे. विद्या, सत्ता, संपत्ती व श्रम कौशल्य ही शक्तिस्थाने. ती स्थाने एकवटलेली नसणे हेच हिताचे असते. त्यातील दोन एकत्र आली तरीही समाजाचे शोषण होते. त्यामुळे गुण अधिक व दोष कमी अशी आदर्श समाजव्यवस्था चातुर्वण्य आहे. या पार्श्वभूमीवर आज यातील शक्तिस्थाने उदा. विद्या व संपत्ती व सत्ता एकत्र आली तर शिक्षण, अर्थकारण, राजकारण या सगळ्या क्षेत्रांत केवळ स्वार्थकारण कसे घडते हे आज आपण अनुभवतो.

त्यानंतर आचार्यांनी कुर्लार किड्याचा दृष्टांत या प्रकरणात दिला आहे. हा किडा बिळातील पाणी ओसरले, पाण्याशिवाय जीव जायची वेळ आली तरी बीळ सोडत नाही. तसेच घराच्या सुखाने, आसक्तीने माणसालाही शेवटी पुनर्जन्माच्या फेऱ्यात अडकावे लागते. प.पू. अप्पांनी इथे घराचे सुख भोगणे एवढेच अभिप्रेत नसून घराचे सुखात गुंतून राहणे हे कसे दुःखकर होते ते सांगितले आहे. समर्थांचे 'प्रपंच करावा नेटका' या वचनाचा अत्यंत नेटका अर्थ प.पू. अप्पा सांगतात, 'नेटका' म्हणजे मोजका. कर्तव्याला अनुसरून. इथेच त्यांनी आजच्या भोगवादी जीवनाला अतिशय उपयुक्त विचार मांडला आहे. ते म्हणतात, 'उपलब्ध आहे वा शक्य आहे म्हणून मिळवता येईल तेवढे व भोगता येईल तेवढे भोगणे हे परिणामी इष्ट नसते. भोगाच्या दृष्टीने संयम स्वीकारणे म्हणजे प्रपंच नेटका करणे. त्यानंतर आसक्तीचे दुष्परिणाम विस्ताराने सांगितले आहेत ते मुळातच पहायला हवेत.

याचे पुढे कैद्याचे रूपकात, मनुष्याला आशापाशांनी जखडून ठेवले आहे व तीन एषणांमुळे तो बाहेर पडूच शकत नाही. असा माणूस अगतिक होतो बाहेर पडू ठरवले तरी काम क्रोधादी क्रूर पहारेकरी त्याला दटावतात व तो कैदेतच पराधीनतेने जगतो असे सुंदर रूपक आले.

त्यानंतर काम व यम यांची तुलना मार्मिकतेने केली आहे. प.पू. अप्पांनी यमाला न्यायाधीश म्हटले आहे. काम सर्वांना आवडतो व परिणामी तो दुःखकर असतो. यम कोणाला आवडत नाही पण तो हिताचे करतो. यम न्यायाधीश असल्याने सज्जनांना कधी त्रास देत नाही. यमाची अपरिहार्यता किंवा यमाची भूमिका हिताची असे सांगितले आहे. तरीही धर्माने मान्य केलेला काम त्याज्य नाही. विश्वाची वृद्धी व्हावी, स्थिती टिकून रहावी एवढ्या मर्यादेत काम हवा. पण या मर्यादेतील कामाचे माणसाला भान रहात नाही म्हणून कामावर विजय मिळविण्यासाठी संकल्प त्याग हा उपाय आचार्यांनी सांगितला आहे व हा उपाय सज्जनांसाठी सांगत आहेत.

प.पू. अप्पा सज्जनांसाठी का? तर त्याचे उत्तर असे देतात की, हा विचार विवेकी-विचारवंतांसाठी आहे. ज्यांना काही आपले बरे व्हावे असे उत्कटतेने वाटते, ज्यांना संयमाचे वावडे नाही. इतरांनी स्वतःसाठी त्रासभूत होणे रूचत नाही. दीन-दुःखी यांच्याविषयी कणव आहे. ते सज्जन संकल्पाचा त्याग मनावर संयम असेल तरच घडतो. म्हणून सज्जनांसाठी सांगितला आहे.

असे मनातून विषय सोडण्यासाठी कामनेचे, विषयाचे स्वरूप समजून घ्यावे. सर्व जीवनाची, व्यवहाराची इष्टानिष्टता यथायोग्यता कळायची तर सद्ग्रंथांचे वाचन, संतांचा- सज्जनांचा सहवास यातील काही ना काही तरी रोजच्या जीवनात आचरणात उतरवले पाहिजे.

विषयांची, भोगाची आसक्ती निर्माण झाली की, ते प्राप्त करण्यासाठी अधिक पैसा मिळवावा लागतो. व पुढे पुढे तर पैसा मिळविणे

हेच व एवढेच व्यसन लागते. प.पू. अप्पांनी इथेही आजच्या काळाला आवश्यक असे विवेचन केले आहे. धनाची पहिली पायरी आवश्यकतेची व शेवटची पायरी क्षम्यतेची. यासाठी त्यांनी दरवर्षी पूर येणाऱ्या नद्यांना स्वसंरक्षणासाठी धोक्याची रेषा निश्चित केली जाते तसे अर्थकामाचे संदर्भात हवे. असा अतिशय सुंदर दृष्टांत दिला आहे.

काही प्रमाणात पैशाची आवश्यकता आहेच. पण प.पू.अप्पा म्हणतात, संपत्तीच्या दृष्टीने केव्हातरी पुरे, अधिक नको असे वाटावयास हवे. पण तसे वाटत नाही अशी खंत व्यक्त करतात. आज या विचाराची अत्यंत आवश्यकता आहे. आज धनलोभाने घरातील स्त्री-पुरुष सर्वच जण (आवश्यकता असो व नसो) पैशाच्या लोभाने पैशाच्या मागे धावतात त्यामुळे कुटुंब-व्यवस्था धोक्यात येऊ लागली आहे. असो.

धनाला वास्तविक मूल्य नाही तर अन्न, वस्त्र, निवारा याला वास्तविक मूल्य आहे. पण माणसे आज अन्न, वस्त्र, निवाऱ्याची उपेक्षा करतात. पण धनासाठी मरमर करतात. हा विचारही आजच्या काळाचे योग्य दिग्दर्शन करतो. धनाचे दोषही प.पू. अप्पांनी विस्तारपूर्वक सांगितले आहेत. धन माणसाला भयाशी कसे बांधून ठेवते यासाठी मच्छिंद्रनाथ व गोरक्षनाथांची गोष्ट सांगितली आहे.

गोष्ट वाचत असताना प.पू. अप्पा उत्तम कीर्तनकार आहेत हे जाणवते व त्यामुळे ती गोष्ट अधिक परिणामकारक ठरते.

या पुढे धनलोभाने, उपभोग वस्तूंचा लोभ वाढतो, संग्रह वाढतो व विवेकाचा लोप होतो. आजच्या संघर्ष, भ्रष्टाचार, अस्वास्थ्य या सगळ्या कारणांचे मूळ धनलोभ किंवा संग्रह आहे. यासाठी प.पू. अप्पांनी आयुर्वेदाचे प्रणेते चरकाचार्य यांनी केलेली मीमांसा मार्मिकतेने सांगितली आहे. ते म्हणतात की, सत्ययुगाच्या शेवटी जेव्हा बऱ्याच लोकांनी सहज उपलब्ध आहे म्हणून आवश्यकतेपेक्षा थोडे अधिक खाल्ले, तेव्हा त्यांची शरीरे जड झाली व श्रम नकोसे वाटले, आळस वाढला व त्यातून उपभोगाच्या वस्तूंचा संग्रह करावासा वाटला, त्यामुळे लोभ वाढला व लोभातून काम, क्रोध इत्यादी दुर्गुण जन्मास आले.

एकूणच पैसा मिळाला तरी दु:ख तसेच न मिळाला तरी अकिंचनता- दारिद्र्य हा दोष येतो व कितीही मिळाला तरी कमी वाटत नाही. त्यामुळे लोभ वाढतो हा ही पैशाचा दोषच आहे. एकूण पैशाचे स्वरूप संतोष देणारे नाही. अजूनही एक दोष म्हणजे पैशाचा व्यय झाला तर होणारे दु:ख हे पैसा न मिळाल्यास होणाऱ्या दु:खापेक्षा दुप्पट असते असे सांगितले आहे.

इथे प.पू. अप्पांनी गृहस्थाश्रमी माणसासाठी अत्यंत मोलाचे विवेचन केले आहे. ते असे की, गृहस्थाला पैसे खर्च करण्याचे अनेक प्रसंग येतात. पण त्यासाठी व्याकुळता नको. पण सावधपणे तशी योजना मात्र आखावी.

**जोडोनिया धन उत्तम व्यवहारे. उदास विचारे वेच करी ।**

याचा अर्थ धन मिळवावे पण धनासक्ती नसावी व आवश्यक तिथे खर्च करताना मनाला व्याकुळता नसावी. तसेच धन मिळवावे, धन उत्पन्न करण्याचे सामर्थ्य, कौशल्य, ज्ञान, अनुकूलता सर्वांनाच उपलब्ध असत नाही. ही ज्याच्याजवळ आहे त्याने साक्षेपाने प्रयत्न करून जेवढे धन मिळविता येईल तेवढे न्याय्य मार्गाने अवश्य मिळवावे पण मिळालेले धन माझ्या व केवळ कुटुंबाच्यासाठीच आहे असे चुकूनही मानू नये. स्वत:च्या योग्य त्या आवश्यकता पूर्ण झाल्या की इंद्रियांचे लाड, चोचले यासाठी धनाचा विनियोग न करता समाज, राष्ट्र, धर्म यांच्यासाठी उपयोगात आणावे. असे जो करत नाही त्याला गीतेने चोर म्हटले आहे. हा सर्व आचरणाचा विषय व्हावा असा प.पू. अप्पांचा नेहमी आग्रह असे. हा सर्व साधनेचाच भाग आहे. आजचे काळात तर या विचाराची नितांत आवश्यकता आहे. असे जर आचरण झाले तर समाजातील आर्थिक विषमता कमी व्हायला मदत होईल. अर्थ हा अनर्थ न राहता उलट व्यष्टी-समष्टी पातळीवर समानता, समृद्धता, सम्पन्नता एकूणच सर्व विकासाला, कल्याणाला कारण होईल.

असे विषयांचे पर्यावलोचन करून, आवश्यकता व उपयुक्तता यांचा विचार करून, कोणत्याही प्रकारची आसक्ती न ठेवता, लोभ, मोह यापासून दूर राहून विवेकातून जे वैराग्य येते ते तीव्र वैराग्य. हे कायम टिकणारे वैराग्य. असे विवेकातून प्राप्त झालेले वैराग्य हे प्रयत्नपूर्वक संपादन करावे लागते. शरीर, मन, बुद्धीच्या पातळीवर संयम करून, साधना करून मिळवावे लागते. प.पू. अप्पा म्हणतात, ते बाजारात पैसे देऊन मिळत नाही. हे प्रमुख साधन प्राप्त होणे अतिशय महत्त्वाचे आहे. केवळ आश्रमसंन्यासाने वैराग्य येत नाही तर वृत्ती विरक्त हवी.

यालाच गीतेने 'असंगशस्त्रेण दृढेन छित्वा' म्हणजे असंगरूपी शस्त्र म्हणजेच वैराग्य. ज्ञानदेवांनीही वैराग्याचे महत्त्व लक्षात घेऊन 'तरी विरक्तीवाचोनि ज्ञानासि तगणे नाही' असे म्हटले आहे. त्याची आठवण येते. शेवटी तिळमात्रही वैराग्य ज्याचेजवळ नाही तो स्वत:च्या घरातही यमपुरीत असल्याप्रमाणे तिन्ही क्लेश भोगीत राहतो. प.पू. अप्पांनी इथे त्रिविध तापांचेही थोडक्यात वर्णन केले आहे. म्हणून विवेकी माणसाने जेवढे साधेल तेवढे वैराग्य अंगी बाणण्याचा प्रयत्न करावा. एकूणच आपले जीवन जेवढे साधेल तेवढे साधे, संयमित व अनासक्तीने व्यतीत करण्याचा प्रामाणिक प्रयत्न केला तर तीळभर तरी वैराग्य अंगी बाणवता येईल.

**शमादिषट्क :** वैराग्यानंतर येणारे साधना प्रकरण शमादिषटक. शमादिषट्क म्हणजे शम, दम, तितिक्षा, उपरति श्रद्धा, समाधान हे साधनेचे प्रत्यक्ष माध्यम आहे. इथे शारीरिक, मानसिक पातळीवर काहीतरी करावयाचे असते. तसे तर वैराग्यानंतरचे प्रकरण असे म्हणणे योग्य नाही. आपल्या प्रकृतीला, स्वभावाला जे शक्य वाटते ते साधण्याचा प्रयत्न करावा. ते साध्य होत असतानाच इतर साधनेही साध्य होऊ शकतात. कारण ती सर्वच साधने एकाच मोक्षप्राप्तीसाठी असल्याने एकमेकांना पूरकच आहेत.

प.पू. अप्पा यातील अवघडपणा काढून सर्वसामान्य साधकाच्या पातळीवर धीर देतात. त्यांचे म्हणणे असे की, हे साधण्यासाठीचे आवश्यक ते गुण प्रत्येकाजवळ थोड्या प्रमाणात तरी असतात. श्रवण, वाचन, मनन, विचार, विवेक यांच्या सहाय्याने अभ्यास केला तर साधनेचे अवघडपण रहात नाही.

'शम' प्रकरणात आद्य शंकराचार्यांचे १४ श्लोक आहेत. प.पू. अप्पांनी हे प्रकरणही अत्यंत विस्ताराने लिहिले आहे. या प्रकरणात शम म्हणजे स्वत:ला जे साधावयाचे आहे त्यावर मनाची वृत्ती एका स्थितीत टिकविणे. सर्वसामान्यपणे इतरत्र शम म्हणजे मन आवरणे. मनाचा संयम असे म्हटले जाते. अर्थात वरवर दोन्ही अर्थात फरक दिसला तरी मन

आवरल्याशिवाय एका साध्याचे ठिकाणी स्थिर राहू शकत नाही. त्यामुळे दोन्हीचा अर्थ किंवा साध्य एकच आहे.

एकदा काही प्रमाणात विवेकाने वैराग्य प्राप्त झाले की, किंवा विषयांची उपभोगलालसा कमी केली की, मनाच्या सर्व वृत्ती भगवंताच्या ठिकाणी, आपल्या ध्येयाच्या ठिकाणी केंद्रित करणे व ती स्थिती कायम राहील हे पाहणे म्हणजे शम.

मनातील हवे-नको म्हणजे संकल्प, अनावश्यक विचार, विकार जसजसे ज्या प्रमाणात कमी होतील तसतसे मन स्थिर राहील. मन स्थिर झाले की, साध्य किंवा परमार्थ दूर रहात नाही. किंबहुना सगळी साधना करायची ती मनाच्या स्थिरतेसाठीच. गीतेनेही इकडे तिकडे फिरणाऱ्या मनाला अंतरात्म्याचे ठिकाणी बुद्धी व धृतीच्या साहाय्याने हळूहळू स्थिर करावे असे म्हटले आहे. प.पू.अप्पा यातला बारकावा सांगतात, इतर कशाचाही विचार न करणे हे मनाच्या अंत:स्थितीचे बाह्यलक्षण व विचार म्हणजे बुद्धी व धैर्य यांच्या बळावर ही अवस्था साधणे हा साधना मार्ग.

'आत्म-संयम' या ग्रंथात प.पू. अप्पांनी हे विवेचन अधिक विस्ताराने व अत्यंत परिणामकारक रीतीने केले आहे. त्याची आठवण आल्याशिवाय रहात नाही.

व्यवहारात जसे निकालाचे बाबतीत वेगवेगळे गट असतात तसेच प.पू. अप्पांनी मनाच्या एकाग्रतेचे बाबतीत केले आहे. मन आवरण्याचा अभ्यास करणे, प्रयत्न करणे हा शमाचा उत्तीर्ण गट- पास क्लास. व याच्यावर दुसरा, पहिला त्याचेहीवर सुवर्णपदक. पण माझ्यासारख्या सामान्य माणसाचे बाबतीत प्रयत्न करीत राहणे याचेही मूल्य कमी नाही म्हणून धीर देऊन पुढच्या साधनेला उत्साह व धीर देतात.

जी साधना करतो तिची आवड व उत्कट प्रेम मनात असणे, साध्याविषयीही मनात आवड, उत्कट ओढ असली की मनाची एकाग्रता, तल्लीनता प्राप्त होते. यासाठी श्रवणाचे ठिकाणी तल्लीनता प्राप्त झालेल्या एका रजपूत साधकाची कथा सांगितली आहे. हे सांगत असताना प.पू. अप्पा साधकाने कोणती खबरदारी घ्यायला हवी हेही सांगतात. आपल्याजवळचे हवे-नको काय? त्याचे स्वरूप, प्रमाण काय? इष्टानिष्टता किती? प्रामाणिकता किती? याचा विचार करायला लावून जणू काही कठोर आत्मपरीक्षण करावयास सांगतात. हाच खरा अभ्यास व त्यात सातत्य रहाणे महत्त्वाचे आहे.

आपले मन अनावश्यक गोष्टीत किती गुंतून राहते हे व्यवहारातील, कुटुंबातील सूक्ष्म निरीक्षणाने प.पू. अप्पांनी सांगितले आहे. आपण आपली मनोवृत्ती कधी पारखून घेतो का? जिथे मनाने गुंततो ते आपण ममत्वाने गुंतलो आहोत असे कबूल न करता त्याला प्रेम, जिव्हाळा, कर्तव्य अशा गोंडस नावाखाली योग्यच ठरवतो. अशा अगदी किरकोळ सामान्य गोष्टींपासून अनेक गोष्टींचा एक प्रकारे कचरा मनात ठेवल्याने मन स्थिर होत नाही व जसा शम साधायला हवा त्या प्रमाणात साधत नाही. व कोणत्याही प्रकारचा शम साध्य होत नाही. इथे शरीर पातळीवर इंद्रिये आवरणे, मन सत्त्वात ठेवणे, जी साधना करतो ती सावधपणे करणे, मन, बुद्धीही साधनेत राहील हे पाहणे हे अतिशय महत्त्वाचे असते. इथे प.पू. अप्पांनी ज्ञानेश्वरीतील,

**'नेमूचि हा एकला । जीवे करावा आपुला ।**
**जैसा कृतनिश्चयचिया बोला । काजा नाही ।**

या सहाव्या अध्यायातील (३८०-८१-८२) ओव्या सांगून नित्यनियमाचा ठाम निश्चय किती महत्त्वाचा आहे ते सांगितले आहे.

मनात विषय येणारच पण मन विषयाला स्पर्शून जाणे व विषयाने मन व्यापणे यात अंतर आहे. मन विषयाने व्यापणार नाही ही खबरदारी घ्यावी. मनाचे बलापेक्षा श्रद्धेचे बल मोठे असते असे प.पू. अप्पा म्हणतात. ज्ञानदेवांनीही ज्ञानेश्वरीत मनाचे बलापेक्षा, सामर्थ्यापेक्षा योगाचे सामर्थ्य मोठे असल्याने मनाचे योगापुढे काही चालत नाही व ते स्थिर होते असे म्हटले आहे त्याची आठवण होते.

ध्येयाची उत्कट आवड व ओढ असली की बाकीच्या विषयांची गोडी किंवा ओढ वाटत नाही. यासाठी लो. टिळक व श्री. दादासाहेब खापर्डे यांच्यातील प्रसंग सांगितला आहे. लो. टिळकांच्या कानात भगवंतानी गायिलेली गीता भरल्याने दुसऱ्या कोणाचे गाणे ऐकण्याची त्यांना ओढ, इच्छा उरली नव्हती.

या प्रकरणात शम्, शांती, प्रसाद असे तीन वेगवेगळे शब्द आले आहेत. अर्थ सर्वसाधारण एकच असला तरी प्रत्येकाच्या छटा वेगवेगळ्या आहेत. शम म्हणजे संयम. त्यामुळे शांती लाभते व ही शांतीच अखंड टिकली की प्रसन्नता लाभते. प.पू. अप्पांनी चढत्या क्रमाने शम म्हणजे कमळाची कळी, शांती म्हणजे अर्धविकसित कमळ व प्रसन्नता म्हणजे पूर्ण विकसित कमळ असा सुंदर अर्थ अनुभवाने सांगितला आहे. इथे श्रीज्ञानेदवांच्या ओवीची आठवण होते की,

**कमळकलिका झालेपणे । मकरंदाने राखो नेणे ।**
**दे राया ऐका पारणे । आमोदाचे ।।**

असाच प.पू. अप्पांच्या अनुभवाचा प्रसाद सर्वांनाच प्राप्त होतो.

या शमाचेही उत्तम, मध्यम, कनिष्ठ असे तीन प्रकार आचार्यांनी केले आहेत. प.पू. अप्पा म्हणतात, सांगणारा सर्वसामान्य पातळीवरून उपदेश करतो पण साधना करणारे, ऐकणारे, यांची मनबुद्धीची योग्यता, परिस्थितीची अनुकूलता, संस्कार, प्रयत्नातील सातत्य यात विविधता असते म्हणून शमाचे तीन प्रकार झाले आहेत.

उत्तम शमात मनातील उत्पन्न होणाऱ्या सर्व विकारांचा त्याग करतात व मन फक्त वस्तुस्वरूप होऊन स्थिर राहते. ब्रह्माशी तद्रूपता, एकरूपता प्राप्त होते. म्हणून या उत्तम शमास आचार्यांनी 'शांती' शब्द योजिला आहे.

प.पू. अप्पांनी शम हे कारण व शांती हे कार्य असे स्पष्ट केले आहे. शमाच्या सततच्या अभ्यासाचे गोमटे फळ म्हणजे 'शांती'. आता इथे शमासाठी प्रयत्न करावे लागत नाहीत. विकारांचा त्याग घडण्यासाठीचे विकारही इथे उत्पन्न होत नाहीत. खळबळ नाही. धरसोड नाही. संशय नाही. वस्तु म्हणजे ज्याला खरोखरीच अस्तित्व आहे. ती वस्तूच तो साधक स्वत: होतो. प.पू. अप्पांचे हे वर्णन मनाला भावते कारण प.पू. अप्पा अनुभवाने सांगतात. मूळ प्रकरण आचार्यांचे व विवेचन करणारेही त्यांच्याशी एकरूप झालेले, परमहंस पदाला पोहचलेले प.पू. अप्पा. त्यामुळेच असे अनुभवाचे मार्गदर्शनपर विवेचन पुन्हा पुन्हा वाचावेसे वाटते, ऐकावेसे वाटते असो.

यापेक्षा कमी दर्जाचा मध्यम शम. इथे बुद्धीच्या प्रवाहाला अंतरात्म्याच्या अनुभवासाठी वळण लावावे लागते. मन, बुद्धी सतत सात्त्विक गुणात राहील हे पहावे लागते. वृत्ती सात्त्विक राहण्यासाठी मन

अंतर्मुख करावे लागते. इथे प्रयत्न करावे लागतात. अंतरात्म्याची सतत धारणा करून ध्यानात परिणमन कसे होईल हे सावधपणे पहावे लागते. त्याहीपेक्षा कमी प्रतीचा म्हणजे कनिष्ठ शम. इथे विषयसुखाच्या कल्पनेने व्यापलेले मन बाहेर काढून श्रवणादि साधनेत एकाग्र करणे. सगळीकडे सारखे धावणारे मन जिथे जिथे जाईल तिथून त्याला पुन्हा मागे आणून अंतरात्म्यावर केंद्रित करावे लागते. मन मुळात सत्त्वगुणी पण त्याला रजोगुणात रहायला आवडते. ते जर प्रयत्नपूर्वक विषयांतून- रजोगुणातून बाहेर काढून एकाग्र करण्याचा प्रयत्न केला नाही तर ते तमोगुणी होते.

यापुढे या प्रकरणात ही शांती साधण्यासाठी ब्रह्मचर्य, अहिंसा, दया, कोणाशीही वाकडेपणाने न वागणे, अनासक्ती, शौच, पवित्रता, दंभ नसणे, सत्य, निर्ममन, स्थैर्य, अनहंकार, ईश्वराचे ध्यान करण्यात तत्परता, संत्संग, अध्यात्म-ग्रंथाचा अभ्यास, सुखदु:खातील समत्व, अमानित्व, एकांताची आवड व मुमुक्षा असे अठरा सद्गुण ज्याच्याजवळ आहेत त्याला प्रसन्नता प्राप्त होते असे म्हटले आहे. हे सर्व दैवी संपत्तीचे गुण आहेत. कोणतीही साधना पूजा, पाठ इ. केली तरी वृत्तीचे अधिष्ठान सत्त्वाचे हवे. सात्त्विकता वाढविण्यासाठी व विषयांची आवड कमी होण्यासाठी हे सर्व गुण उपयुक्त आहेत. या प्रत्येक सद्गुणावर प.पू. अप्पांनी अतिशय विस्ताराने विवेचन केले आहे. हे सारेच प्रकरण मुळातच पहावे, वाचावे असे आहे. यातील दया, अहिंसा, शौच यांचा अर्थही प.पू. अप्पांनी अतिशय विवेकाने लावला आहे.

हे गुण आत्मसात् करण्यासाठी साधनेतील प्रगती आपली आपण मोजायचा प.पू. अप्पांनी एक उपाय सांगितला आहे. साधनेचा कंटाळा येईनासा झाला, साधनेचे प्रेम वाटू लागले व हवे-नकोचे क्षेत्र क्रमाने उणावत गेले की प्रगती होते हे निश्चित समजावे. असे झाले की मनाची प्रसन्नता बाहेरच्या घटनांवर अवलंबून रहात नाही. ही सगळी अंतरंग साधना आहे.

थोडक्यात मनाचा शम, शांती साधण्यासाठी मन स्थिर हवे. एकाग्र हवे त्यासाठी सात्त्विक विचारात सात्त्विक संगतीत रहावे लागते. काम, क्रोध इ. विकारांना जिंकावे लागते. विषयांना विषाप्रमाणे मानून जो त्यापासून माघारी वळत नाही त्या भिक्षूला शांतीचा लाभ होत नाही असे आचार्य म्हणतात. इथे 'भिक्षू' म्हटले असले तरी हे सर्वच प्रकरण सर्व साधकांसाठी आहे. विशेषत: प.पू. अप्पांनी तर जी साधना सांगितली आहे ती गृहस्थाश्रमी साधकांसाठीच विशेष करून आहे. साधनेने प्राप्त करून घ्यायचे ध्येय म्हणजे मोक्ष, प्रसन्नता हे सर्वच साधकासाठीचे आहे. प.पू. शंकराचार्य संन्यासी व प.पू. अप्पांनीही संन्यासदीक्षा घेतलेली. तरीही प.पू. अप्पांनी गृहस्थाश्रमी साधकाला करता येईल अशीच साधना सांगितली. भिक्षूसाठी 'मोक्ष' हा अपरिहार्य असे ते म्हणतात.

**'दम' :** त्यानंतरचे शमदमादि षटकातील पुढचे साधन 'दम'. शरीराचे पातळीवर, इंद्रियांच्या पातळीवर नियंत्रण म्हणजे दम. बुद्धीतील दोष घालविण्यासाठी दमाचा उपयोग होतो. मन, बुद्धीत अनेक वासना, विकार असतात. ते सर्व नाहीसे झाले की, मन निर्मल होते.

दम म्हणजे ती ती वृत्ती उत्पन्न झाली की, तिला आवरून इंद्रियांचा संयम करणे. मनात एखादी इच्छा, वृत्ती उत्पन्न झाली की, त्या प्रेरणेनेच इच्छा पूर्ण करण्यासाठी इंद्रियांची हालचाल होते. एखादा विषयोपभोग टाळायचा असेल तर खरे तर मनात इच्छाच उत्पन्न व्हायला नको. पण सामान्य साधकाला, माणसाला हे शक्य नाही; परंतु इच्छा झाली तरी इंद्रियांना प्रेरणा मिळू नये व इंद्रियांची हालचाल होऊ न देणे हे स्वाधीन राहू शकते. पाहावेसे वाटले पण पाहिले नाही. खावेसे वाटले पण खाल्ले नाही. हिताचा विचार करून कृती केली नाही. हा दम मनातच वाईट न येणे असे संत समाजात दुर्मिळ असतात. परंतु मनात आले पण न्याय, नीती, सभ्यता, धर्म, शिष्टाचार परिणाम यांचा विचार करून वाईट कृतीत उतरवत नाही तो दम व असा मनुष्य सभ्य, सज्जन असतो.

इथे प.पू. अप्पांनी Conditioning आणि Suppression यातील भेद सांगितला आहे. मनाचे आरोग्य चांगले राहण्यासाठी स्वैराचार किंवा मनात जे येईल तसे मोकळेपणाने कार्यवाहीत येऊ द्यावे असे जे साहित्यिक म्हणतात त्यांना संयम म्हणजे दाबणे किंवा दडपणे नव्हे. तर संयम हाच अंतिमत: कल्याणकारक होतो असे सांगितले आहे. त्यासाठी मोटार गाडीला ब्रेक असावाच लागतो. गाडी ब्रेकने चालत नाही तरीही RTO तपासून घेतो तो ब्रेकच असे उदाहरण दिले आहे. वैद्य पथ्य सांगतो तो दमच आहे. आपल्या परंपरेत उपास, व्रते, नियम सांगितले आहेत तोही दमाचाच प्रकार आहे. त्यामुळे संयमाची, दमाची सवय लागते.

इंद्रिये विषयांकडे धावतांना आवरली की मनाचा त्या मागे धावण्याचा वेग मंदावतो व मन सत्वगुणाने युक्त होते. त्यामुळे त्याला प्रसन्नता, शांती लाभते. अंतकरणातून बाह्य विषयांची आसक्ती सुटणे यालाच आद्य शंकराचार्यांनी मोक्ष म्हटले आहे.

प.पू. अप्पा म्हणतात, यालाच मोक्ष म्हणणे हे 'दम' या विषयाचे महत्त्व पटवून देण्यासाठी गौरवाने म्हटले आहे. त्यासाठी त्यांनी उदाहरण दिले आहे ते असे की, हिमालयात देवदर्शनी स्थानावर आलो की प्रत्यक्ष क्षेत्र तेथून कोसभर वा अधिकही दूर असते पण देवदर्शनीला पोचताच यात्रेकरूचे प्रवासातील कष्ट पार नाहीसे होतात. आपण मुक्कामाला नक्की पोहचू असा विश्वास उत्पन्न होतो, धीर येतो. तसेच या ठिकाणी 'मोक्ष' म्हटले आहे.

बाह्य इंद्रिये आवरता आली की मनही आवरणे अवघड रहात नाही. दमाची सवय लागली की इंद्रिये आवरण्यामध्येही अगदी सहजपणा येतो व त्याचा परिणाम म्हणून मनातील भोगवृत्ती, विषयांची ओढ क्रमाक्रमाने उणावत जाऊन नाहीशी होते व मनाची प्रसन्नता प्राप्त होते.

**तितिक्षा :** शमादिषट्कातील तिसरे साधन तितिक्षा. प्रारब्धाच्या योगाने त्रिविध प्रकारची दु:खे वाट्यास येतात ती सारी चिंता न करता (अचिंतया) सहन करणे. दुसऱ्या एका ठिकाणी आचार्यांनी ही दु:खे अप्रतिकार पूर्वक सोसावी म्हणून म्हटले आहे.

या विवरणात प.पू. अप्पांनी आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक ताप तसेच वाट्याला येणारी दु:खे ज्या कर्मामुळे आपण भोगतो त्या कर्माचे तीन प्रकार क्रियमाण, संचित व प्रारब्ध सांगून समजण्यासाठी व्यवहारातील धनाचा दृष्टांत दिला आहे.

आपण जे धन रोज मिळवतो ते क्रियमाण.

जे धन बँकेत ठेवतो ते संचित.

जे धन खर्च करण्यासाठी बँकेतून काढतो ते प्रारब्ध.

हे सर्वच प्रकरणातील विवेचन अंतरंगसाधना आहे. प्रारब्ध हे सामान्यत: जन्माबरोबर येते. आज जे आपण करतो, वागतो, बोलतो ते क्रियमाण व आज जे सुखदु:ख भोगतो ते आधीच्या मनुष्यजन्माचे

क्रियमाणाचा परिणाम असतो. त्यामुळे आज जे वाट्याला येणारे सुखदु:ख दोन्हीही कोणतेही राग-द्वेष किंवा दु:ख वाट्याला आले तर हायहाय न करता सहन करणे याचेच नाव तितिक्षा. दु:ख वाट्याला आले तर ते भोगण्यातून कोणाचीच सुटका होत नाही. वैशिष्ट्य आहे ते न वैतागता, शांतपणाने भोगणे, सहन करणे यात. अशा प्रकारची तितिक्षा मोक्षासाठी आवश्यक आहेच पण संसारात राहणाऱ्या साधकालाही अत्यंत आवश्यक आहे. कुटुंबातील किंवा समाजातील मित्रमंडळी, अधिकारी, आप्त यांच्या स्वभावातील दोषांमुळे कितीतरी प्रकारची आधिभौतिक दु:खे, मनस्ताप सहन करावे लागते. जर तितिक्षा नसेल तर त्याचा परिणाम माणसाचे आरोग्यावरही होऊ शकतो. सोसणे जर अटळ आहे तर ते सोसताना धीर धरून हाय हाय न करता सोसणे. दुसऱ्या कोणालाही त्याचा दोष न देणे. हे आपलेच दैव. कोणतेतरी कर्माचे फळ असे म्हणून शांत राहिले की मन शांत राहते. हीच तितिक्षा.

**ठेविले अनंते तैसेचि रहावे ।**
**चित्ती असू द्यावे समाधान ।।**

अनंताने म्हणजे ईश्वराने ठेवले तसेच रहावे लागणे त्यावर माणसाचे कोणतेही बळ चालत नाही. माणसाचे माणूसपण आहे ते 'चित्ती असू द्यावे समाधान'. यात बाह्य परिस्थिती आपण बदलू शकत नाही. पण मन:स्थिती आपण बदलू शकतो अनुकूल करून घेऊ शकतो. डॉ. राधाकृष्णन् यांचे एक वाक्य इथे आठवते.

Events are not under our control but reactions to the events should always be graceful.

द्वंद्वे सहन करण्याची क्षमता तितीक्षेने प्राप्त होते. शारीरिक, मानसिक, बौद्धिक पातळीवरील शीत-उष्ण, निंदा-स्तुती, मान-अपमान यासारखी द्वंद्वे शांतपणे सहन करणे म्हणजे तितिक्षा.

तितिक्षेला आचार्यांनी साधकाचे 'कवच' म्हटले आहे. जो धीर पुरुष असे कवच धारण करतो तो सर्व विघ्नांना गवताच्या काडीप्रमाणे (क्षुल्लक) समजतो.

प.पू. अप्पांनी तितिक्षेचा विवेक सांगितला आहे. व्यष्टीच्या पातळीवर तितिक्षा आवश्यक आहे पण तिथे मात्र आपण जराही कोणी अन्याय केला तर सहन करीत नाही. परंतु समष्टीच्या पातळीवर मात्र म्हणजे देशाच्या पातळीवर होणारे अन्याय निमूटपणे सोसतो याला तितिक्षा म्हणता येणार नाही.

तप, व्रते, नियम, दान, तीर्थयात्रा, स्वाध्याय करणे अशा अनेक साधना शेवटपर्यंत नेणे, पूर्ण करणे हे सर्व तितिक्षेनेच साध्य होते. तितिक्षेनेच सोसण्याचे तसेच ध्येय सिद्धीपर्यंत जाण्याचे धैर्य- सात्त्विक वृत्ति प्राप्त होते. कारण या सगळ्याकरिता सहनशीलता लागते. सहनशीलतेने चित्ताला व्याकुळता येत नाही. असमतोलता येत नाही. साधनेत सातत्य टिकवता येते. यासाठी तितिक्षा हे अंतरंग साधन ऐहिक व पारमार्थिक पातळीवर अत्यंत आवश्यक आहे.

**उपरति :** व्यक्तीच्या उन्नती-प्रगती करता, समाजाच्या स्थैर्याकरिता शास्त्राने जे जे करावे म्हणून सांगितले आहे त्या सर्व कर्मांचा शास्त्रोक्त विधीनेच परित्याग करणे या गोष्टीला संन्यास म्हणतात.

श्रीमद्शंकराचार्यांना इथे आश्रम संन्यास अभिप्रेत आहे व जो भिक्षु किंवा संन्यासी आहे त्याच्यासाठी अशा प्रकारचा आश्रम दीक्षेपूर्वी तो जी कर्मे कुटुंबासाठी किंवा स्वत:च्या व कुटुंबाच्या उपजिविकेसाठी करत होता ती शास्त्राप्रमाणे संन्यास घेतल्यावर न करणे.

परंतु हा कर्माचा त्याग जेव्हा साधकाला ज्ञानप्राप्तीसाठीची आवश्यकता, पात्रता प्राप्त होते तेव्हाच सांगितला आहे.

इथे शास्त्राचा उल्लेख आहे. शास्त्र म्हणजे, प.पू. अप्पा म्हणतात 'शास्त्र म्हणजे दीर्घकालीन समृद्ध अनुभवांचा संकलित आविष्कार. त्यामुळे त्यातील विधिनिषेध हे शास्त्रात सांगितल्याप्रमाणेच असावेत. श्रीशंकराचार्यांनी संन्याशाने विकर्माचा त्याग म्हणजे संन्यास असेही या प्रकरणात म्हटले आहे. म्हणजे संन्याशाला काहीच करावयाचे नसते किंवा त्याने काहीच करू नये असा नियम नाही, तर त्याने विकर्माचा- म्हणजे विकारयुक्त, विकृत, अनावश्यक, भोगलोलुप, स्वार्थी, आसक्त असे कर्म जे आहे त्याचा त्याग करायचा. खरे तर असे कर्म कोणाही साधकाने करू नये परंतु संन्याशाला तर ते अपरिहार्यच आहे. त्याने कधीच करू नये. पण लोकसंग्रहासाठीचे, समाजहिताचे कर्म संन्याशाने करावे. हे कर्म आचार्यांनी नाकारलेले नाही. जगद्गुरू शंकराचार्यही अशा प्रकारचे कर्म करीत होते. आद्य शंकराचार्य संन्याशाला कर्म नाकारतात ती सर्व बहुधा मीमांसक कर्मे, यज्ञयागादी कर्मे. संन्याशाने चित्तशुद्धीसाठीची विहित कर्मे संन्यास दीक्षेपूर्वी करून चित्तशुद्धी झालेली आहे. त्यामुळे आता केवळ त्याची साधना व लोकहिताची कर्मेच त्याचेसाठी आहेत.

कर्माचा त्याग का सांगतात कारण ज्या ब्रह्माचे ज्ञान मिळवायचे ते ब्रह्म वा ज्ञान वस्तुत: कर्मसाध्य नाही. निष्काम विहित कर्माने चित्तशुद्धी होते परंतु येथील साधक प्रगत आहे. तो कर्मे करून चित्तशुद्धीच्या पायरीवर आलेला आहे. त्यामुळे आता तो ज्ञानोत्तर कर्मे करतो ती संकल्पाचा त्याग करून. त्यामुळे ती कर्मे फळ द्यायला उरत नाहीत. जोपर्यंत वासना आहे तोवरच कर्म. पण हा ज्ञानी असल्याने वासना नाहीत. त्यामुळे कर्म करूनही न केल्यासारखे म्हणून बंधनात टाकत नाहीत. व जोपर्यंत कर्माचे मागे वासना आहेत तोपर्यंत ब्रह्मप्राप्ती नाही. अशाप्रकारे ब्रह्माचा व कर्माचा परस्परविरुद्ध संबंध आहे.

हे सांगितल्यावर आचार्य सांगतात की, पुरुषाचे, व्यक्तीचे आणि ब्रह्माचे जे ऐक्य आहे ते जीवात्मा आणि ब्रह्म यांच्या विचाराने होणाऱ्या एकत्वाच्या बोधावाचूनही आस्तित्वात आहेच, ही एकता (निरुपाधिक) स्नानाने, कीर्तनाने, जपाने इ. साधनाने वा वेदाने, मंत्राने लाभत नाही.

अनेक प्रकारच्या साधना आपण उपासना म्हणून करतो त्यातील ब्रह्माच्या दृष्टीने त्या साधना निरूपयोगी आहेत हे धक्का देणारे विधान आचार्य करतात.

प.पू. अप्पा सांगतात ब्रह्म हे अद्वैत आहे. उपासना या द्वैतात करतो. म्हणून ती उपासना ब्रह्मापर्यंत पोहोचवू शकत नाही. तरीही करीत असलेल्या उपासनेत मनबुद्धीच्या सहयोगाने प्रामाणिकपणे सातत्य राखलेली चित्तशुद्धी, उपासना या कर्माने होते व चित्तशुद्ध झाले की अंत:करणात ज्ञानाचा प्रकाश पडतो. हे ज्ञान बाहेरून येत नाही तर ते आत आस्तित्त्वात असतेच. अर्थात हा अनुभूतीचा भाग आहे. तो प.पू.अप्पांनी अनुभवावर लिहावा व माझ्यासारख्या मंदतम माणसाने नुसता अर्थ न कळता वाचावा असेच हे सगळे प्रकरण आहे.

या अद्वैतातील साधनेनेच 'ज्ञानादेव तु कैवल्यम्' हे सिद्ध होते. 'अहं ब्रह्मास्मि' या ज्ञानाने अनुभूतीने कैवल्य प्राप्त होते. ज्ञानानेच केवळ

मुक्ती प्राप्त होते. म्हणून इतर साधने म्हणजे कर्म, उपासना यांचे निराकरण केले आहे.

इथेच प.पू. अप्पांनी ज्ञान, कर्म, भक्ती यांच्यातील भिन्नता गळून पडते व ते सर्व एकरूप होतात. वस्तू ज्ञेय उरत नाही. ब्रह्माचे ज्ञान असे म्हणण्याचे कारणही उरत नाही. कारण ब्रह्म हे ज्ञानमयच आहे असे म्हटले आहे.

**श्रद्धा :** शमादिषट्कातील पुढचे महत्त्वाचे साधन म्हणजे श्रद्धा. अत्यंत महत्त्वाचे किंबहुना साधनेला प्रवृत्त होण्यासाठी मुळात श्रद्धा लागते. गुरू-वेदांत वाक्य यावर ती वाक्ये पूर्णपणे यथार्थ आहेत अशी जी निश्चयात्मक बुद्धी तीच श्रद्धा. श्रद्धेशिवाय ऐहिकातही मनुष्य कोणताच व्यवहार करू शकत नाही. त्याच्या सर्व कृती, भावना, विचार, मते कुठे ना कुठे तरी गृहीत कृत्यांवर आधारित असतात तीच श्रद्धा.

खरे तर श्रद्धाहीन मनुष्य असूच शकत नाही. रोजच्या व्यवहारातील चांगले-वाईट, हवे-नको हे सगळे आपले शब्दप्रमाण या श्रद्धेवरच असते. तरीही बुद्धिवादी, नास्तिक, प्रत्यक्ष प्रमाणवादी श्रद्धा नाकारतात.

ज्यावेळेला इंद्रियांना जाणवते तेच प्रत्यक्ष प्रमाण तर आपल्या पूर्वीच्या अनुभवांवरही विश्वास ठेवायला नको. प.पू. अप्पांनी या नास्तिक प्रत्यक्ष प्रमाणवादी यांची मते रोजच्या व्यवहारातील साध्या सुध्या गोष्टींतून व विनोदाचे अंगाने खोडून काढली आहेत. अशा संसारातील अनेक गोष्टी श्रद्धेच्या आदराने करीत असलो तरी परमार्थातील प्रगतीसाठीची सात्त्विक श्रद्धा वेगळी आहे.

'सत्'चा निश्चय म्हणजे वस्तूच्या आस्तित्वाचा निश्चय, निश्चयात्मक बुद्धीने करायचा म्हणजे श्रद्धा. श्रद्धेने तो निश्चय स्थिरावयाचा.

त्यानंतर सत्, चित् व आनंद यांचा अनुभव घ्यायचा. सत् म्हणजे जो आहेच. चित् म्हणजे जो आहेच त्याला जाणायचे किंवा तो आहेच ही जाणीव होणे.

मी तोच आहे ही जाणीवच आनंदमय आहे. कारण ते तत्त्व त्रिकालाबाधित आहेच. कधीही नाही असे नाही. मीही तसाच अखंड आहेच व हीच त्रिकालाबाधित असल्याची जाणीव आनंदमय आहे.

अर्थात् हा अनुभव आहे. याची सुरवात मात्र 'मी ब्रह्म आहे' या आप्त वाक्यावर श्रद्धा ठेवूनच होते. मनुष्य म्हणून जन्माला आला की श्रद्धा असतेच. फक्त ती योग्य ठिकाणी व स्थिर करावी लागते.

**समाधानम् :** चित्ताला, मनाला सगळीकडून आवरून योग्य तेथे म्हणजे अंतरात्म्याच्या ठिकाणी स्थिरपणे ठेवणे म्हणजे समाधान होय. सर्वसाधारणपणे व्यवहारात आपल्याला हवे तेवढे, हवे तेव्हा, हवे ते लाभले की, आपण सुखावतो व आपल्या मनाला तेव्हा जे वाटते ते समाधान. पण हा अर्थ इथे अभिप्रेत नाही.

वेदांनी जे ज्ञेय म्हणजे परमात्मा प्राप्त करून घ्यावा असे सांगितले आहे त्या प्राप्तीची साधना म्हणजे चिंतन, मनन- अर्थ समजणे. हा चित्ताचा विषय आहे व वेदांनी प्रतिपादलेला विषय म्हणजे मोक्ष किंवा परमात्मा. परमात्म्यावर चित्ताची एकाग्रता झाली की समाधान होते. केवळ शब्दज्ञान नव्हे तर यापूर्वीची सर्व साधना आचरून प्रचितीज्ञान हवे.

चित्ताची, अंत:करणाची आत्म्याचे ठिकाणी स्थिरता, एकाग्रता हे समाधानाचे एकमात्र कारण आहे. या प्रकरणातील शेवटच्या साधनाला 'असाधारण' म्हटले आहे. इथे मिळणारे समाधान हे शाश्वत आहे. कारण ते शाश्वत आत्म्यापासून मिळालेले आहे.

शमादिषटक आचरणाची, साधनेची परिणती समाधानात होते. प.पू. अप्पा म्हणतात, 'नित्यानित्यवस्तुविवेक या साधनापासून श्रद्धेपर्यंतची साधने म्हणजे पौष्टिक अन्न व समाधान म्हणजे अन्नाचे पचन. या पचनासाठीही दोन सहकारी कारणे तीव्र वैराग्य व मोक्षाची उत्कट इच्छा. वैराग्याचा विचार यापूर्वी करून झाला आहे. पुढचे 'साधन चतुष्टया'तील साधन म्हणजे 'मुमुक्षुत्व'.

**मुमुक्षुत्व :** मोक्ष प्राप्तीची इच्छा हे सर्व साधनांचे मूळ आहे. तशी काही इच्छाच नसेल तर वेदांत ज्ञान त्यामुळे प्राप्त होणारी प्रसन्नता, आनंद यांना स्थानच उरत नाही.

अजूनही समाजात धार्मिक, आध्यात्मिक कार्यक्रम बऱ्याच प्रमाणात होतात. तीर्थक्षेत्री दर्शनासाठी भाविकांच्या रांगाच्या रांगा लागलेल्या दिसतात. कारण मनुष्यजात स्वभावत:च भजनशील आहे असे ज्ञानदेव म्हणतात. त्यापैकी काही जणांना परमार्थ, अध्यात्म जाणून घेण्याची जिज्ञासा असते. ती जिज्ञासा योग्य वळणावर, योग्य मार्गावर, उचित साधनांवर, योग्य मार्गदर्शक लाभल्यावर तो मुमुक्षु होतो. त्यातही प्रकार सांगितले आहेत- 'तीव्र, मध्यम, मंद, अतिमंद.'

माणसाच्या ठिकाणी विशिष्ट वस्तू प्राप्त व्हावी, ती उत्पन्न होणारी जी इच्छा तिचेही प्रमाण वेगवेगळे असते. मिळालीच पाहिजे त्यावाचून जगणे अशक्य ही तीव्र इच्छा. मिळाले नाही तर अस्वस्थ वाटते ही मध्यम इच्छा. मिळाले तर ठीक आहे, नाही मिळाले तर त्यावाचून फारसे अडत नाही ही मंद इच्छा. सहज मिळाले तर मिळाले ही अतिमंद इच्छा.

परमार्थाच्या दृष्टीने आद्य शंकराचार्यांनी म्हटले आहे की, त्रिविध ताप अनुभवून ज्याचे अंत:करण क्षुब्ध होते तो होणाऱ्या अनर्थाचा विचार करून सर्व काही टाकून लगेच बाहेर पडतो. ही तीव्रतर इच्छा.

प्रत्येकाच्या वाट्याला कोणत्या ना कोणत्या प्रकारचे दु:ख येतेच. हा जणु संसाराचा नियमच आहे.

'सुख पाहता जवापाडे- दु:ख पर्वताएवढे'

सुख जवापाडे जाणवते कारण कोणतीही भौतिकातील वस्तू प्राप्त होताच थोड्याच काळात त्याची सुखदायिकता ओसरते. वस्तू तीच असते पण आपल्याला होणारे सुख कमी होते. म्हणून सुख पाहता जवापाडे व दु:खाचे बाबतीत मात्र ते दीर्घकाळ जाणवत राहते. स्मरणात राहते. बाह्य भौतिक कारणांपेक्षा अंत:करणाची धारणाच येथे महत्त्वाची आहे. म्हणजेच सुख जवापाडे, दु:ख पर्वताएवढे कारण हे सुखदु:ख वस्तुतंत्र असण्यापेक्षा ज्ञातृतंत्रच आहे असे प.पू. अप्पा म्हणतात. इथेच विषयाच्या ओघात माणसाचे ठिकाणी असलेली अधिक अधिक सुख, आनंद मिळविण्याची इच्छा ही मुळात ब्रह्मप्राप्तीसाठी व माणसाच्या हितासाठीच आहे असे मूलतत्त्व सांगितले आहे. माणूस अहंकाराने ब्रह्मापासून वेगळा झाला आहे. तो पूर्ण आनंदरूप ब्रह्माशी एकरूप होईपर्यंत त्याला परिपूर्ण सुख काही वाटत नाही व म्हणून अधिक सुख त्यापेक्षा अधिक सुख हवे अशी धारणा त्याची होते. जो विवेकी आहे त्याचे हे लक्षात येते व संसारातील तात्पुरत्या सुखाचा त्याला कोणताही मोह राहत नाही व तो त्यासर्वाबाहेर पडतो. हेच तीव्र वैराग्य. उदा. समर्थ रामदास, गोस्वामी श्रीतुलसीदास.

हे वैराग्य, ही ओढ, विवेकातून येते.

**मध्यम मुमुक्षु :** त्रिविध ताप अनुभवत असतो पण अनेक कारणांनी संसारात रहावे लागते. बायको मुलांकडे लक्ष ठेवावे लागते. वैराग्य की संसार या दोन टोकात त्याचे अंत:करण झोके घेते. हा मध्यम मुमुक्षु. संसाराचे चटके, दु:खदायक स्वरूप वाचून, अनुभवून कळते पण त्याचवेळी संसाराचे दायित्व, जबाबदारीचेही भान असते. घर, उद्योग, मुले, यांचेसाठीचे कर्तव्यही आठवते. संसारात दु:ख झाले तरी माणूस संसारात धीर ठेवतो. आज नाही उद्या परिस्थिती बदलेल अशी आशा ठेवतो. नव्हे दृढ विश्वास असतो. म्हणून मुमुक्षा तीव्र नसते. श्रीसंत तुकोबांचे काळात दुष्काळ पडल्याने तुकोबांच्या परिस्थितीसारखीच अनेकांची अवस्था झाली होती. पण त्यातले तुकोबाच एकटे मोक्षाचे मार्गाला लागले. व जगद्गुरू संतश्रेष्ठ श्रीतुकाराम महाराज झाले.

**मंद मुमुक्षु :** मोक्षाला, परमार्थाला अजून पुष्कळ वेळ आहे. आजच घाई करण्याचे कारण नाही. सर्व कर्तव्यकर्म पार पाडू व नंतर सावकाश परमार्थाला लागू. असे म्हणणारे यांना जेवढी ओढ संसाराची तेवढी परमार्थाची नसते. वय तरुण आहे. परिस्थिती अनुकूल आहे.

संसारात नाना प्रकारचे भोग आहेत. इंद्रिये कार्यक्षम आहेत तोवरच देहाचे भोग भोगता येतील ना? हा आस्तिक आहे. पूजा, पाठ करतो पण रमत नाही. ओढ असते ती संसाराची.

त्यापेक्षा **मंद मुमुक्ष**. म्हणजे रस्त्याने जाता जाता मोक्ष मिळाला तर त्यातच खरी धन्यता मानणारा. कोणतेही प्रयत्न नाहीत. देवधर्म टाकणे टाकल्यासारखे करतो. म्हणून याला आचार्यांनी मूढ म्हटले आहे. प.पू. अप्पांनी यापेक्षाही बुद्धिवादी, नास्तिक यांचा गट केला आहे. ते ईश्वर, मोक्षच मुळात मानत नाहीत. अज्ञान, अंधश्रद्धा, विषयासक्ती यांनाच जीवनाचे तत्त्वज्ञान बनवितात. असो.

जो मुमुक्षु आहे त्याने मिळालेला प्रत्येक क्षण साधनेसाठी वापरला जाईल अशी तत्परता राखावी.

साधनेने अनेक जन्मातील अंत:करणातील दोष जातात. रज, तम जाऊन वृत्ती सात्त्विक होते. अंत:करण स्वच्छ होते. वाट्याला आलेली कर्मे तो निष्कामतेने करून भगवंताची उपासना करतो व मनुष्यजन्म सत्कारणी लावतो.

चित्ताची शुद्धी पूर्ण झाल्यावर प.पू. अप्पा सांगतात की गीता, दासबोध, ज्ञानेश्वरी यांसारखे ग्रंथ हे जणू आपण होऊन स्वत:चा अर्थ विशद करतात. हे ज्ञान केवळ घोकंपट्टीने होणारे शब्दज्ञान रहात नाही तर बुद्धीला सूक्ष्मता येते व चांगले-वाईट, हितकर-अहितकर यातले अंतर नेमकेपणाने कळते व क्वचित मनात असलेली उपभोग लालसा ही नाहीशी होते. हे सर्व वर्णन हा कल्पनाविलास नाही तर अनुभवाचे पातळीवर सांगितले आहे. नुसते हे वाचले तरी आपल्याला या सर्व गोष्टींचे आकर्षण वाटते. कारण प.पू. अप्पांच्या सांगण्यात, विवेचनाला, मार्गदर्शनाला विलक्षण सामर्थ्य आहे. ते प्रचीतीचे.

अशी चित्तशुद्धी झाली की सद्गुरूंचा अनुग्रह होतो व तीव्र मुमुक्षु लगेच जीवन्मुक्त होतो. प.पू. अप्पा इथे सूक्ष्मतेने अत्यंत मोलाचे रहस्यच आपल्याला सांगतात. ते म्हणतात, 'गुरूकृपा असतेच ती अनुभवास येण्यासाठी शिष्याच्या ठिकाणी तेवढी श्रद्धा व साधनेच्या बळावर मिळवलेली योग्यता हवी.

असे साधनचतुष्टयाचे संकलित स्वरूप सांगतांना प.पू. अप्पांनी म्हटले आहे की, विवेक हे शिर, वैराग्य हे धड, शमदमादिषट् हे सहा अवयव व मुमुक्षा हा प्राण अशा अव्यंग शरीराने युक्त असलेला जिज्ञासू यथार्थ ज्ञानरूपी शस्त्राच्या साहाय्याने मृत्यूचा नाश करून अमर होतो म्हणजे जन्म-मृत्यूतून सुटतो.

अशाप्रकारे विषय वेदांत तत्त्वज्ञानाचा पण प.पू. अप्पांचे विवेचन आपल्या दैनंदिन जीवनातील अनुभवांचे संबधित दृष्टांताचा वापर करून केलेले असते. परमार्थ ध्येय हे अखंड दृष्टीसमोर ठेवून व्यवहार सांगतात.

प.पू. अप्पांच्या विवेचनात शास्त्र परंपरा, गुरू परंपरा, वेदोक्त परंपरा, सांस्कृतिक परंपरा, संत परंपरा व्यक्त होतात. हे सर्वच सद्गुण ऐहिक, पारमार्थिक तसेच व्यष्टीच्या पातळीवर व राष्ट्राच्या पातळीवर कल्याणाकरिता उपयुक्त आहेत. हे परमार्थातील विचारच आज समाज जीवन सुरळीत चालण्यासाठी उपयोगी आहेत. समाज जेव्हा पारमार्थिक विचारापासून दूर जातो तेव्हा त्याची नीतिमूल्ये घसरतात व स्पर्धा, संघर्ष, कलह, भ्रष्टाचार, शोषण, सत्तेसाठी राजकारण यासारख्या विकृत गोष्टींनी राष्ट्राचे अध:पतन होते.

प.पू. अप्पांना राष्ट्राच्या, समाजाच्या उत्थानाची प्रचंड तळमळ होती. संन्यास दीक्षेनंतरही, प्रचीतीनंतरही 'उरलो उपकारापुरता' या हेतूनेच हा ग्रंथ आपल्यासाठी लिहिला आहे. आपल्या पूर्वपुण्याईने हा ग्रंथ आपल्याला प्राप्त झाला आहे.

या ग्रंथात माणसाने मोक्ष हे ध्येय ठेवून ते प्राप्त करण्यासाठीची विवेक, वैराग्य, शमदमदिगुण संपदा प्राप्त करून तीव्र मुमुक्षुत्वाचा दर्जा प्राप्त करून साधनचतुष्टाचा अधिकारी कसे होता येईल याचे मार्गदर्शन प.पू. अप्पांनी सूक्ष्मतेने केले आहे. त्यांचा हेतू प्रत्येकाने हे गुण आत्मसात् करावेत हा आहे.

विषय तसा खूपच अवघड आहे. पण सोपे करून सांगण्याची प.पू. अप्पांची शैली असल्याने काहीतरी थोडे थोडे समजल्यासारखे वाटते.

या समजण्या-उमजण्यातही पातळी असते. माझ्या अतिमंद पातळीवरून मला जे लिहिता आले ते मी लिहिण्याचा अल्पसा प्रयत्न केला आहे.

शेवटी तो प.पू. अप्पांच्याच चरणी अर्पण करते.

**तवैव वस्तु गोविंद तुभ्यमेव समर्प्यते ।**

**सौ. प्राची सविता भिडे**
'अद्वैत' विठ्ठलनगर, मु.पो.ता. रोहा, जि. रायगड
फोन नं. (०२५१) २३४५३६,
मो. : ९७६६४४७९४०

●●●

**मना षड्रिपू दुष्ट ते जाण बापा ।**
**सदासर्वदा तेच देतात तापा ।।**
**विवेकाग्निनें जाळणें मोहमाया ।**
**पुढें मोकळा मार्ग मोक्षासि जाया ।।**



# साधकाची चिंतनिका

## (निरूपण- प्राचार्य अ. दा. आठवले, पुणे)

**प्राचार्य रामचंद्र केशव सातपुते**
M.A.,D.T.E., सेवानिवृत्त प्राचार्य, सरस्वती मंदिर संस्थेचे रात्र महाविद्यालय, पुणे
इंग्रजीचे प्राध्यापक, ५० वर्षे सेवा, B.A., B.Com, M.A. वर्गांना शिकवितात (१९६७ ते २०१३), सध्या गरवारे कॉलेज, पुणे MA I, II इंग्रजी शिकवितात.
पुणे विद्यापीठ ज्येष्ठ नागरीक संत गाडगेबाबा व्याख्याता, Ph.D. अभ्यास सुरू

एकविसाव्या शतकात पदार्पण करताना आजच्या प्रगत विज्ञानाने साधनांची भरमसाठ वाढ केली आहे. पण त्यामुळे मानवी जीवन सुखमय होणार की दु:खमय याबद्दल शंका राहू नये. वास्तविकपणे विज्ञान जो जो अधिक प्रगत होत आहे तो तो भारतीय अद्वैत सिद्धान्तच सिद्ध होत आहे असे मोठे मोठे विज्ञानवेत्ते म्हणू लागलेले आहेत. सद्यस्थितीत तर मानवी जीवन कमालीचे धकाधकीचे-धावपळीचे झाले आहे.

**''श्वास ही घेऊ ना देती सारखे धावणे लागे ।**
**थकोनी धापही लागे, परी कोण न ये मागे ।।''**

असा एक प्रचंड वेग माणसाला खेचतो आहे आणि म्हणून या धावपळीने श्रांत झालेला मनुष्य मन:शांतीच्या, स्वास्थ्याच्या शोधात फिरतो आहे. अशावेळी त्याला चित्ताच्या प्रसन्नतेचा मार्ग सांगणे आवश्यक असते. तेराशे वर्षांपूर्वी आठव्या शतकात होऊन गेलेल्या जगद्गुरू आद्य शंकराचार्यांपासून किंवा त्यापूर्वी होऊन गेलेल्या संतांपासून आजपर्यंत सर्वच संतमंडळींनी वेळोवेळी हेच केले आहे. त्या थोर संतांच्या मार्गावर समर्थपणे वाटचाल करताना घेतलेल्या अनुभूतींनी मार्गदर्शनक्षम बनलेल्या प.पू. अप्पांनी- श्री स्वामी वरदानंदांनी श्री शंकराचार्यांच्या स्तोत्र माध्यमातून ते समर्थ मार्गदर्शन केलेले आहे. ही साधकाची चिंतनिका आहे.

भगवान शंकराचार्यांची १) प्रात:स्मरण, २) चित्तप्रसाद आणि ३) ते धन्या: अशी तीन लहान प्रकरणे आहेत. या तीनही प्रकरणांवर प.पू. अप्पांनी वेळोवेळी केलेली प्रवचने आहेत. ती भाष्ये या साधकाची चिंतनिका मध्ये समाविष्ट आहेत.

### १) प्रात:स्मरण :

परमार्थ हा अनुभूतीचा विषय असल्यामुळे साधना करणे अतिशय आवश्यक ठरते. या साधनेचा प्रारंभ प्रात:काली उठल्यापासून व्हावा. कारण, माणसाचे मन यावेळी प्रसन्न असते म्हणून साधनेलाही हीच वेळ योग्य असे मानले जाते. या दृष्टीने भगवान शंकराचार्यांनी तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने केलेले सर्वश्रेष्ठ प्रात:स्मरण आपणही करीत जावे म्हणून या केवळ तीन श्लोकांचे सुंदर साक्षेपी विवेचन प.पू. अप्पांनी केले आहे.

भगवान शंकराचार्यांचे **'प्रात:स्मरण'** हे प्रकरण केवळ तीन श्लोकांचे आहे. पण ते संस्कृतमध्ये असल्यामुळे सामान्य माणूस त्या तत्त्वज्ञानापासून- विचारांपासून वंचितच राहिला असता. पण प.पू. अप्पांचे आपल्यावर फार मोठे उपकारच आहेत. त्यांच्यासारख्या नि:स्पृह, समाजहितैषी व अधिकारी व्यक्तीने केलेल्या या विद्वत्तापूर्ण भाष्यामुळे भगवान शंकराचार्यांचे विचारधन आपल्याला सहज प्राप्त झाले आहे.

प्रात:काली स्मरण करण्यासाठी रचलेल्या या तीनही श्लोकातील तत्त्वज्ञान अतिशय उच्च प्रतीचे आहे. पहिल्या श्लोकात हृदयामध्ये स्फुरण पावणाऱ्या आत्मतत्त्वाचे पहाटेच्या वेळी मी **स्मरण** करतो असे आचार्य म्हणतात. दुसऱ्या श्लोकात मनाला आणि वाणीला ज्याच्यापर्यंत पोहोचता येत नाही अशा परब्रह्माचे मी प्रभाती भजन करतो; तर तिसऱ्या श्लोकात सर्व अज्ञानाच्या पलिकडे असलेल्या ज्ञानरूप तेजस्वी ब्रह्मास मी प्रभाती **वंदन** करतो.

प.पू. अप्पांनी या तीनही श्लोकांवर अतिशय सुंदर विवेचन केले आहे. ते म्हणतात, ''प्रात:काली शरीर, मन, बुद्धी ही शांत, प्रसन्न अवस्थेत असतात. अशावेळी जर मनावर शुभ संस्कार घडले, शुभ विचारांचे चिंतन केले तर त्याचा परिणाम चांगला होतो. त्यामुळे जीवन सदाचारी, निरामय आणि प्रसन्न होत जाते.'' पुढे प.पू. अप्पा म्हणतात, ''या प्रात:स्मरणाच्या तीन श्लोकांमध्ये 'मी आत्मस्वरूप आहे' असे सांगून वासनांचे कारण नष्ट केले. इंद्रिय प्रवृत्तींना परमेश्वराचा अनुग्रह प्राप्त करून देऊन त्यांना सदाचारी व विनयी बनवले आणि जगताचे जगत्‌रूपाने भासणारे मिथ्यात्व सांगून अंत:करणवृत्तींच्या अभिलाषा नाहीशा करून चित्ताला भगवंताच्या चरणी शांत, स्थिर राहण्याचा आदेश दिला. या तिन्ही श्लोकांचे नित्य पठण, स्मरण, अनुसंधान घडेल व त्यातील अर्थावर लक्ष देऊन तो आचरणात आणण्याचा प्रयत्न होईल तर सर्व जीवन प्रसन्न झाल्याशिवाय राहणार नाही.

### चित्तप्रसाद

आपण याआधी पाहिले विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात वैज्ञानिक प्रगती झाली पण त्याबरोबरच मानवाच्या जीवनातली धावपळही विलक्षण वाढली आहे. जीवनातील स्थिरता कमी होऊन अस्थिरता जास्त प्रमाणत वाढली आहे. धीरगंभीर, स्थितप्रज्ञ वृत्तींचा लोप होऊन चंचलता वाढली आहे. एकमेकांवरील विश्वास नाहीसा होऊन पदोपदी

अविश्वास प्रगट होत आहे. जीवन जगण्यासाठी- केवळ आवश्यक अशा गोष्टी मिळविण्यासाठी- आज मनुष्यास अपार कष्ट करावे लागत आहेत. ही सगळी धावपळ करूनही जेव्हा त्याच्या आवश्यक गरजा भागत नाहीत त्यावेळी त्याचे मानसिक स्वास्थ्य बिघडते. अशावेळी स्वत:संबंधी न्यूनगंडाची भावना निर्माण होऊन तो स्वत:ला हीन, दीन, दुर्बल समजू लागतो. मग मानसिक स्वास्थ्य मिळविण्यासाठी शाश्वत शांतता मिळविण्यासाठी तो देवपूजेला लागतो. धर्म-संस्काराच्या मार्गाने जीवनात शांतता मिळविण्याचा प्रयत्न करतो.

अशावेळी त्याला योग्य मार्गदर्शनाची आवश्यकता असते. जर चुकीचे मार्गदर्शन मिळाले तर मन:शांती, समाधान न मिळता उलट त्याचा धर्मावरीलच विश्वास उडण्याची शक्यता असते. यासाठी संतमहात्म्यांच्या उपदेशाचे श्रवण, मनन आणि आचरण हाच एक सुखाचा मार्ग आहे.

श्रीमत् जगद्गुरू आद्य श्री शंकराचार्यांनी मानवी जीवास अभिप्रेत असलेली आणि आजच्या धावपळीच्या युगात दुर्मिळ असलेली मानसिक शांती मिळविण्याचे, प्राप्त करून घेण्याचे निरनिराळे मार्ग 'चित्तप्रसाद' या छोट्याशा प्रकरणात मार्मिकपणे व सुलभतेने वर्णन करून सांगितले आहेत. श्रीमत् आद्यशंकराचार्यांचे 'चित्तप्रसाद' हे प्रकरणसुद्धा संस्कृतमध्ये असल्यामुळे त्यांच्या शब्दातील भावार्थ कळणे, मार्मिकपणा लक्षात येणे सामान्य लोकांना दुरापास्त होते. त्यासाठी तोलामोलाच्या व्याख्यात्याने जर हा भावार्थ आपल्या बोली भाषेत सांगितला तर तो कळण्यास सुलभ होतो. आणि हे कार्य प.पू. अप्पांनी अतिशय समर्थपणे केले आहे.

प.पू. अनंत दामोदर आठवले तथा प.पू. अप्पांनी श्रीशंकराचार्यांच्या चित्तप्रसाद या प्रकरणावर पुण्यास आणि हिंगोलीस प्रवचने केली. ती प्रवचने काही भाविकांनी टिपून घेतली होती. अनेक भाविकांच्या आग्रहाखातर या टिपण्यांवरून सदर चित्तप्रसाद हे प्रकरण श्री दासगणू प्रतिष्ठान, गोरटे यांनी प्रकाशित केले.

भगवान आद्य श्री शंकराचार्य रचित 'चित्तप्रसाद' हे बारा श्लोकांचे छोटेखानी प्रकरण आहे. या बारा श्लोकांवर प.पू. अप्पांनी अतिशय रसाळ, ओघवत्या आणि विद्वत्तापूर्ण भाषेमध्ये भाष्य केले आहे. ते म्हणतात, ''चित्तप्रसाद म्हणजे चित्ताची प्रसन्नता. मनाची आनंदित स्थिती, मनासारखे घडले, इच्छा पूर्ण झाली, काहीतरी दुर्लभ वस्तूचा लाभ झाला, एखादी आपत्ति अनपेक्षितरीत्या दूर झाली म्हणजे जी स्थिती होते, जे वाटते त्याला प्रसन्नता व आनंद म्हणण्याची पद्धत आहे. पण, हे योग्य नाही. प्रसन्नता या शब्दाचा खरा अर्थ 'निर्मलता' असा आहे. सर्व प्रकारचे विकार मनातून निघून गेले; मन पूर्ण स्वच्छ, शुद्ध बनले म्हणजे प्रसन्नता लाभली असे खऱ्या अर्थाने म्हणता येईल. मनाच्या या प्रसन्नतेचा म्हणजे विकाररहित अवस्थेचा जो अनुभव येतो, तोच वस्तुत: आनंद होय.

'चित्तप्रसाद' या बारा श्लोकांच्या प्रकरणात अशा प्रकारच्या चित्ताची प्रसन्नता लाभण्याची अनेक साधने वा उपाय सांगितले आहेत. ज्याने त्याने यापैकी एखादा तरी उपाय वा एखादे तरी साधन आपली आवड, आपली शक्ती, आपली परिस्थिती यांचा विचार करून अवलंबावे आणि निष्ठेने, आग्रहाने ही चित्ताची प्रसन्नता लाभण्यासाठी प्रयत्नशील असावे.

यम-नियमांचे पालन, मित आहार-विहार, संत सज्जनांचा सहवास, आश्रम निष्ठा, धर्मनिष्ठा यांचा अवलंब करावा. पुढे ते म्हणतात जगद्गुरू शंकराचार्यांनी उपदेशिलेले हे सर्व प्रकरण प्रत्येक व्यक्तीच्या जीवनाला मार्गदर्शक ठरणारे आहे. मग त्या व्यक्तीची परिस्थिती वा पात्रता कशीही, कोणतीही असो. नीट विचार करून या आदेशाप्रमाणे वागण्याचा प्रामाणिक प्रयत्न केल्यास कोणालाही आपली उन्नति साधणे सहज शक्य आहे. मात्र त्यासाठी 'असाल तेथून पुढति चला यत्न सोडा ना' हे तत्त्व लक्षात ठेवले पाहिजे.

**'ते धन्या: ।'**

साधकाच्या दृष्टीने असेच आणखी एक महत्त्वाचे प्रकरण म्हणजे 'ते धन्य आहेत'. जगद्गुरू श्री शंकराचार्य रचित 'ते धन्या:।' हे सात श्लोकांचे एक लहानसे प्रकरण आहे. या सात श्लोकांवर प.पू. अप्पांनी सामान्य साधकाच्या दृष्टीने अतिशय उत्कृष्ट असे मार्गदर्शन केले आहे.

भगवान् आद्य श्रीशंकराचार्य 'ते धन्य आहेत असे कोणाबद्दल म्हणतात? याचे चिंतन-विवेचन आणि विवेचन प.पू. अप्पांनी या ठिकाणी केले आहे. या पुस्तकाचे प्रकाशक कै. मधुकर दत्तात्रय जोशी म्हणतात, ''सत्ता-संपत्ती-संतती यांनी युक्त असलेल्याला आपण धन्य समजतो. पण आचार्यांच्या लेखी याला गौणत्व आहे. खरा धन्य वेगळाच असतो. तो शांत आहे, निर्मोही आहे. ब्रह्मनिष्ठांच्या सत्संगात राहून आत्मचिंतनात रमलेला आहे. क्रियावान कोणाला म्हणावे? एकान्तवास म्हणजे काय? अध्यात्मज्ञान झाल्याचे, ओळखावे कसे? कामक्रोधादि विकारांना शत्रू का म्हणावे? 'अहं आणि मम' या बळकट बंधांचा त्याग कसा करावा? धनेषणा, दारेषणा, लोकेषणा यापासून कोण सुटतो? इत्यादि महत्त्वपूर्ण प्रश्नांची उकल प.पू. अप्पांनी या श्लोकांच्या आधारे, मोजक्या शब्दात तर्कशुद्ध पद्धतीने केली आहे. प.पू. अप्पांच्या 'धन्य जाहलो' या भावकवितेतून ते धन्य आहेत या आचार्यांच्या प्रकरणातील भावच व्यक्त होत आहेत. ते म्हणतात,

**''धन्य जाहलो मी खरा धन्य जाहलो ।**
**नारायणकृपावर्षि नाहलो ।।''**

अशा प्रकारे भगवान श्रीशंकराचार्यांच्या प्रात:स्मरण चित्तप्रसाद आणि ते धन्य आहेत या 'साधकाची चिंतनिका' या अंतर्गत आलेल्या तीन्ही प्रकरणांचा आणि प.पू. अप्पांच्या त्यावरील भाष्याचा आपण थोडासा विचार केला. या भाष्यामध्ये प.पू. अप्पांची काही वैशिष्ट्ये प्रगट झाली आहेत. ती आपण थोडक्यात पाहू.

१) **संस्कृतमधील तत्त्वज्ञान मराठीत** – प.पू. अप्पांनी संस्कृतमधील महत्त्वाच्या तत्त्वज्ञानपर संस्कृत संधांवर मराठीत भाष्ये केली आहेत. १) ब्रह्मसूत्र, २) उपनिषदे, ३) मनुस्मृति, ४) गीता, ५) श्रीशंकराचार्यांची स्फुट रचना, ६) पुढे आपण विचार करणार आहोत ते निर्वाणषट्क, ७) श्रीमद् शंकराचार्यंच्या आणि पू. विनोबाजींनी 'गुरुबोध' या संपादित केलेल्या काही (हरिमीडे वगैरे) काव्यावर केलेले

भाष्य हे सर्व सुलभ मराठीत आणून प.पू. अप्पांनी संस्कृतमधील तत्त्वज्ञानाचे भांडार सामान्यांसाठी खुले करून सामान्य मराठी भाषिकांवर फार मोठे उपकारच केले आहेत.

२) **सोपी भाषा –** प.पू. अप्पांची या भाष्यांची भाषा ओघवती, प्रासादिक आहे. सोपी व सुलभ आहे. जेणे करून सामान्य साधकाला या तत्त्वज्ञानाचा लाभ घेता येईल. यात कुठेही क्लिष्टता नाही.

३) **व्यवहारातील व वैज्ञानिक दृष्टान्त –** 'प्रात:स्मरण' या प्रकरणावरील भाष्यात प.पू. अप्पा म्हणतात, 'ठेविले अनंते तैसेचि रहावे।' यातील बोध माणसाला पटत नाही. नाविन्याच्या ओढीने सुखाच्या कल्पनेने भल्या बुऱ्या मार्गांनी अनेक वस्तूंचा संग्रह तो करतो. वस्तू मिळाल्या तरी त्या मिळताच क्षणी त्यातील नाविन्य नष्ट होते, आकर्षण संपते. परिणामत: जीवन दु:खमय होते.

''संपूर्ण अहिंसा पाळावयाचे ठरवले तर जगणेच अशक्य होईल– श्वासोश्वासही करता येणार नाही. त्यासाठी अहिंसेचा विचार जीवनधारणेच्या, समाजधारणेच्या दृष्टीने केला पाहिजे.''– चित्तप्रसाद

'कट्वम्ल-लवणात्युष्ण-तीक्ष्ण रुक्ष विदाहिनाम्' या सातव्या श्लोकावरील भाष्यात सात्त्विक आहार कसा असावा यादृष्टीने त्यांनी केलेल्या सूक्ष्म विवेचनातून एक निष्णात वैद्य आपल्याला भेटतो. हे सर्व विवेचन मुळातूनच वाचण्यासारखे आहे. – चित्तप्रसाद.

वस्तू जी भासते, दिसते, अनुभवास येते, तिच्या ज्ञानाचे अंतरंग आणि बहिरंग असे दोन भाग व्यवहारात: पडतात. काच, गारगोटी, खडीसाखर, हिरा यांचे बहिरंगाचे गुण बरेचसे सारखे असतात पण त्यांचे अंतरंगातील गुण मात्र त्या त्या विषयातील तज्ञच ठरवितात.

ज्ञानाला खड्गाची उपमा देऊन तोडण्याच्या क्रियेचे वर्णन क्रौर्यासाठी केलेले नाही; हिताचा विचार करून केलेले आहे. मूल दुखणाईत असताना कुशल शस्त्रवैद्यच त्याचे रक्षण करू शकतो. अडाणी आईचा मायाळूपणा मुलाला वाचवू शकत नाही हे लक्षात घेतले म्हणजे मग संसारबंधनाला ज्ञानखड्गाने तोडावे, असे का म्हणतात त्याचे स्वारस्य लक्षात येईल– ते धन्य आहेत.

संस्कृतीचा अभिमान – आपल्या भारतीय संस्कृतीचा अभिमान प.पू. अप्पांच्या भाष्यांतून अनेकवेळा प्रगट होतो. ते म्हणतात–

''आपल्या संस्कृतीमध्ये पहाटेच्या वेळी ईश्वराचे चिंतन, भजन, ध्यान, नमन इत्यादी काहीतरी करण्याची प्रथा आहे. व्यक्तीच्या कल्याणाची इच्छा असणाऱ्या शास्त्रकारांनी प्रात:स्मरण म्हणून काही करावे असा आदेश दिला आहे.''– प्रात:स्मरण

''चित्ताची प्रसन्नता लाभण्याची अनेक साधने वा उपाय सांगितले आहेत. हे सर्व उपाय सर्वांनाच साधणारे आहेत असे नाही. ध्येयानुकूल असलेली व्यक्तिसापेक्ष विविधता भारतीय संस्कृतीचे भूषण आहे.''– चित्तप्रसाद

''नीतिशास्त्राने जन्मजात संस्कृतीतून परद्रव्याच्या अभिलाषेविषयी समाजाला दूर ठेवण्याचा यशस्वी प्रयत्न केला होता.''– चित्तप्रसाद

प.पू. अप्पांच्याच भाषेत सांगायचे तर 'असाल तेथून पुढती चला यत्न सोडा ना ।' हे या तिन्ही प्रकरणांचे व त्यावरील विवेचनाचे समान सूत्र आहे.

### निर्वाणषटकम्

जगद्गुरू भगवान् शंकराचार्य हे केवलाद्वैतवादी आहेत. त्यामुळे त्यांच्या 'साधकाची चिंतनिका' या अंतर्गत आलेल्या प्रात:स्मरण, चित्तप्रसाद आणि ते धन्य आहेत या तिन्ही प्रकरणांमध्ये अद्वैत तत्त्वज्ञानच प्रतिपादिले आहे. आत्मतत्त्वाची – ब्रह्मतत्त्वाचीच उपासना करण्यास आचार्य सांगत आहेत. निरवयव पूर्ण ब्रह्म आणि हे आत्मतत्त्व एकच आहे. ते ब्रह्म हेच माझे स्वरूप आहे. अशा परब्रह्माचे मी प्रात:काली स्मरण करतो, भजन करतो आणि वंदन करतो.

गुरुभक्तीतून ईश्वरभक्ति व ईश्वरभक्तीतून ब्रह्मानंदाची प्राप्ती **होणारी** असते. ब्रह्मज्ञान झाले हे कसे समजावे हे सांगताना आचार्य 'ते धन्य आहेत' यावरील भाष्यात म्हणतात, ''ब्रह्मज्ञानाचा जो परिणाम इंद्रियसंयम, तो झाल्याचे ज्याच्या ठिकाणी दिसेल त्याचवेळी त्याला ज्ञान झाले आहे असे **मानता** येईल. तो धन्य होय. अशीच आत्मतत्त्वाची शोध घेणारी एक रचना जगद्गुरू श्रीशंकराचार्यांनी केली आहे, ती म्हणजे 'निर्वाणषट्कम्' होय.

जगद्गुरू भगवान श्रीमत् शंकराचार्य यांच्या प्रस्थानत्रयीवरील भाष्याप्रमाणेच त्यांची अनेक देवतांची स्तोत्रे व वेदान्तपर प्रकरण-ग्रंथ लोकमान्य आहेत. त्यातीलच एक निर्वाणषट्क हे आहे. स्तोत्रामध्ये कुठल्यातरी देवतेला उद्देशून तिची स्तुती असते व प्रार्थना केली जाते. पण हे स्तोत्र कोणत्याही देवतेला उद्देशून प्रार्थना करण्यासाठी नाही. उलट येथे तत्त्वज्ञानाच्या परमोच्च पातळीवरील वस्तुसत्तेचा बोध ठसठशीतपणे करून दिला आहे. ज्याला आपण 'मी' 'मी' असे म्हणतो, सगळ्या शंकांचे, त्यांच्या निरासाचे आणि विवेकाचेही जो आश्रयस्थान आहे, जो सगळ्या व्यवहारांचे माध्यम आहे, जो आहे म्हणून बाकी सगळे आहे असे म्हणता येते त्या 'मी' चे यथार्थ स्वरूप पूज्यपाद आचार्य येथे स्पष्ट करीत आहेत. महाराष्ट्रातील सर्वच संत श्रीशंकराचार्यांच्या अद्वैततत्त्व मताचे अनुयायी आहेत. संत ज्ञानेश्वर, संत तुकाराम यांच्याप्रमाणे संतकवि श्रीदासगणुमहाराज आणि त्यांचे उत्तराधिकारी असलेले प्राचार्य अ. दा. आठवले तथा स्वामी वरदानंद भारती– प.पू. अप्पा हे सर्वच संतांप्रमाणे अद्वैततत्त्वज्ञानाचे पुरस्कर्ते आहेत. भगवान् श्रीमत् शंकराचार्यांची व त्यांनी प्रतिपादिलेल्या केवलाद्वैती तत्त्वज्ञानाची थोरवी प.पू. अप्पा स्पष्ट करतात.

**'त्या भाष्याचा आधार । घेतला मी असे फार ।।'**

श्रीब्रह्मसूत्रार्थदर्शिनी

आपणाला जाणवणारा 'मी' हाच सगळ्या ज्ञान-विज्ञानाचा केंद्रबिंदू आहे. या 'मी'च्या जाणिवेचे महत्त्व अलीकडे फारच वाढलेले आहे. आपली अस्मिता जागृत असली पाहिजे. आपली अस्मिता टिकवून ठेवली पाहिजे, अस्मितेला धक्का लागू देता कामा नये असे उल्लेख वाङ्मयात अनेकवेळा येतात, तो 'मी' येथे स्पष्ट केला आहे.

भगवान् श्रीशंकराचार्यरचित प्रस्तुत निर्वाणषट्क हे स्तोत्र-काव्य सहा श्लोकांचे आहे. या रचनेत स्तुती नाही, प्रार्थना नाही असे म्हटले

आहे व ते खरेही आहे, योग्यही आहे; पण या काव्यातील शब्दांच्या मागे उभ्या असलेल्या आशयात थोडे खोल जाऊन लक्ष घातले तर असे लक्षात येते की याच्या इतकी श्रेष्ठ प्रार्थना, उदात्त मागणी दुसरी कोणतीही नाही. एका हिंदी कवीने म्हटल्याप्रमाणे, 'अब आरजू यही है कि कोई आरजू न हो- आता मागणे एकच आहे, की मागायची कोणतीही इच्छा उरू नये.' सगळ्या प्रकारचे मागणेच संपून जावे. कसलीही कामना-वासना, आशा-आकांक्षा राहू नये. कोणत्याही अभिलाषेला स्थान नसावे. खरोखरीच हे मागणे सगळ्या मागण्यात उत्कृष्ट असे आहे. देह, इंद्रिये, मन, बुद्धी यांच्या आधारे मागणी केली जाते. परंतु देह, इंद्रिये, मन, बुद्धी हे 'मी'चे स्वरूप नाही. ही सर्व व्यवहारासाठी उपयोगी पडणारी साधने आहेत. प्रपंचात नानाप्रकारची दु:खे, आपत्ती, संघर्ष सहन करावी लागतात ती सर्व 'मी' विषयीच्या चुकीच्या कल्पनेच्या आधारामुळे म्हणून या निर्वाण षटकात 'मी' विषयीच्या चुकीच्या धारणा कोणत्या आणि 'मी'चे वास्तविक स्वरूप कोणते ते श्रीमत् आचार्यांनी मधुर शब्दात येथे विवरिले आहे आणि प.पू. आप्पांसारख्या अधिकारी व्यक्तीने या श्लोकांवर सुंदर, अतिशय प्रासादिक भाषेत भाष्य केले आहे. या भाष्याच्या प्रास्ताविकात अप्पा पुढे म्हणतात, ''या काव्यात वर्णन केलेली पातळी शुद्ध पारमार्थिक आहे.'' या पातळीवरील साधना करण्याची योग्यता फार थोड्यांची असणार आणि ही योग्यता स्वत: प.पू. अप्पांची असल्यामुळेच उच्च प्रतीच्या या तत्त्वज्ञानावर त्यांनी अधिकारवाणीने प्रस्तुत भाष्य केले आहे आणि तेही सामान्य साधक डोळ्यासमोर ठेऊन, सामान्य साधकांसाठीच.

या निर्वाणषटकालाच आत्मषट्क असेही म्हणतात. कारण आत्मा हे 'मी'चे यथार्थ स्वरूप आहे आणि त्या आत्म्याचेच वर्णन प्रत्येक श्लोकाच्या चौथ्या चरणात आलेले आहे- ''चिदानंदरूप: शिवोऽहं शिवोऽहम्''

ज्ञानेश्वरीत एके ठिकाणी वर्णन आले आहे की, भगवान श्रीकृष्ण म्हणतात, ''अर्जुनपणा न स्वीकारता तुझ्या ठिकाणी जे 'मी' चे स्वरूप आहे ते ईश्वराचे रूप - तोच ईश्वर'' हाच नियम प्रत्येक मनुष्यमात्राच्या संबंधातही जाणून घेतला पाहिजे. श्रीज्ञानेश्वरमहाराज जणू त्या आपल्या एका ओवीतच या निर्वाण षटकाचे तात्पर्य प्रकट करीत आहेत.

आपण 'मी'चे जे स्वरूप समजतो त्या 'मी' ला घडविणारा 'मी'च्या आश्रयाने राहणारा, 'मी' ला व्यक्त करणारा, 'मी'चे व्यवहार साधून देणारा पसारा फार मोठा आहे. या निर्वाण षटकातील आधीच्या पाच श्लोकात प्रत्येक श्लोकाच्या पहिल्या तीन ओळीत आपणाला वाटणाऱ्या 'मी'चा त्याच्या पसाऱ्यासकट विश्लेषणपूर्वक एकेक पदार्थ उल्लेखून निरास करतात आणि त्या श्लोकाच्या चौथ्या ओळीत वस्तुस्थिती काय आहे ते सांगतात. सहाव्या श्लोकात मात्र प्रामुख्याने आत्मरूपतेचे भावात्मक स्वरूपात वर्णन केले आहे.

**अहं निर्विकल्पो निराकाररूपो ।**
**विभुर्व्याप्य सर्वत्र सर्वेंद्रियाणि ।**
**सदा मे समत्वं न मुक्तिर्नबंध:**
**चिदानंदरूप: शिवोऽहं शिवोऽहम् ।।**

या श्लोकावरील प.पू. अप्पांचे विवेचन मुळातच वाचण्यासारखे आहे. कारण या सर्वच विवेचनाला परतत्त्वस्पर्श आहे. ते म्हणतात, ''आनंदाचा अनुभव घेणारा शरीर-मन-बुद्धी-इंद्रिये, शरीराचे रुधिराभिसरणातील व्यापार वा मन-बुद्धीच्या माध्यमातून जाणवणारे मानापमान यांचा काहीही संबंध नसताना, आनंदाची जाणीव नसली तरी आनंदाचे अस्तित्व मान्य करावेच लागते. हा निरुपाधिक आनंद हेच ब्रह्माचे स्वरूप आहे. तो मी अनुभवतो म्हणून मी ब्रह्म । चिदानन्द - शिव हेच माझे स्वरूप आहे.

श्रीसमर्थांनी म्हटल्याप्रमाणे 'देहेबुद्धि ते आत्मबुद्धि करावी' ती कशी साधावी याचा विचार या निर्वाणषट्कात आहे. कारण देहबुद्धीचा निरास व्हायचा, तर, मी-मला-माझे याचे स्वरूप नीट जाणले पाहिजे. तेच या श्लोकांमध्ये आचार्यांनी संस्कृतमधून आणि प.पू. अप्पांनी मराठीतून पण सोप्या तरीही अतिशय उत्कृष्टपणे विवेचन केले आहे. आपण त्यांचे सदैव ऋणी राहू.

।। इति शम् ।।

**प्राचार्य राम केशव सातपुते**
अमरीश-ब-५, सर्व्हे नं. ११५, शिवतीर्थनगर,
कोथरूड, पुणे ३८. फोन : ९८५०८९०८४७



।। श्रीशंकर ।।

# विनंती तवचरणा

ॲड. विनायकराव नांदेडकर

बालपणापासून श्रीदासगणूमहाराजांचा सहवास.
गोरटे येथील 'दासगणु प्रतिष्ठान' ट्रस्टचे विश्वस्त सचिव.

परमप्रिया श्रीसद्‌गुरुराया वरदानंदा दयाघना ।
प्रसाद अमुच्या चित्ती असो दे हीच विनंती तवचरणा ।।धृ।।

राजसुखासम सर्व सुखे ती लोळत असता पायाशी
वात्सल्य हि दादांचे अनुपम अनुभविले तुम्ही सर्वांशी
प्रथमाश्रमी तरी सातत्यासह सोडियले ना प्राविण्या
प्रसाद अमुच्या चित्ति असो दे हीच विनंती तव चरणा ।।१।।

धन्य म्हणती त्या गृहस्थाश्रमा तुमच्यासम जे आचरती
सुटून गेला करित नेटका सत्य खरी ती दासोक्ती
दानधर्म पूजन संतांचे उदात्तता अंत:करणा
प्रसाद अमुच्या चित्ति असो दे हीच विनंती तव चरणा ।।२।।

जनहितरक्षण कल्याणास्तव यत्नहि केले परोपरी
वाणि-लेखनी प्रखरपणे ती कारुण्यासह प्रेम उरी
ज्ञानेशासम सुलभ भाष्य ते मूढ जनांच्या भवतरणा
प्रसाद अमुच्या चित्ति असो दे हीच विनंती तव चरणा ।।३।।

तर्कनिश्चयी आचार्यांसम ऋजुता ही तैशीच खरी
सच्चित् घन सुख आनंद रूप नि आश्रम ही त्यांच्याच परी
कृतार्थता जीवनी मिळविली जैशी वर्णिलि ते धन्या
प्रसाद अमुच्या चित्ति असो दे हीच विनंती तव चरणा ।।४।।

बहुत दिले तुम्हि आजवरी ती कृतज्ञता आहेच उरी
कामक्रोध हे तरिही छळती दूर न होते लाचारी
सद्‌वर्तनी स्थिरता असो द्या घालवुनी त्या षड्‌रिपुना
प्रसाद अमुच्या चित्ति असो दे हीच विनंती तव चरणा ।।५।।

ग्रंथरूपि हे अनंतदर्शन मार्ग हिताचा तो कळतो
विकल्प जाती लयास सहजचि शांतिसुखा पार न उरतो
भावाने अर्चन होता ते विवेक वाढे बोध मना
प्रसाद अमुच्या चित्ति असो दे हीच विनंती तव चरणा ।।६।।

शतपैलू जीवन हे आपुले दर्शन त्याचे घडवाया
मार्ग दाविला निरोप घेता 'वाचा चिंतन करा तया
विचार आचरुन मम ग्रंथातिल तेच खरे पूजन माना'
प्रसाद अमुच्या चित्ति असो दे हीच विनंती तव चरणा ।।७।।

'निर्गुण जरि तो सगूण होतो मिठी घालिता समचरणी'
गुरुवचनाला सिद्ध करितचि देह समर्पित त्याचरणी
वरदा निष्ठा तशीच अमुची तवचरणा वर स्थीर करी
अनंत वरदा वरदानंद विनायकाला करीं धरी ।।८।।

ॲड. विनायक नांदेडकर
महावीर चौक, पुंडलिक वाडी, नांदेड ४३१६०१
फोन : ९३७२७५७५७२



# समाजजीवन सुखमय करण्यासाठी- यक्षप्रश्न

**श्री. माधव चिंतामणी खिरे**

मेकॅनिकल, इलेक्ट्रिकील डिप्लोमा.
टाटा मोटरस् मधून निवृत्त

'यक्षप्रश्न' हे महाभारतातले एक मौलिक उपाख्यान असून गुणवत्तेच्या दृष्टीने ते फार महत्त्वाचे आहे. आज सात हजार वर्षांनंतरही त्यातले विचार उपयुक्त आहेत. मुळातले असे उच्च दर्जाचे विचार असलेले हे प्रकरण अप्पांच्या विवरणाने 'सोने में सुगंध' असे झालेले आहे. महाभारताचे मोठेपण असे की 'जे महाभारती नाही- ते नसे त्रिलोकीही!' आणि हे संतवचन सत्य आहे. अप्पांच्या या छोट्याशा ग्रंथातही त्याचाच प्रत्यय येतो. यक्षाचे प्रश्नही मार्मिक तर युधिष्ठिराची उत्तरे त्याच तोलामोलाची! ज्ञानदान करणारी! आणि त्यावरचे पू.अप्पांचे मर्मग्राही विवेचन- दृष्टान्त कौशल्याने विषय पटविण्याची हातोटी! केवळ 'अपूर्व' असेच म्हणावे लागेल. या विवेचनात- मानववंशाचे भवितव्य, राजकीय धोरणे, अर्थनीती, पर्यावरण, विज्ञान-प्रगती, खगोल-भूगोल, धर्माची अनिवार्यता; कर्तव्य परायणाचे महत्त्व असे विविध विषय तर येतातच त्याशिवाय अप्पांच्या ऐतिहासिक दृष्टिकोनाची जाणीव होते. संस्कृती संरक्षण हा तर त्यांच्या जिव्हाळ्याचा विषय. त्यामुळेच ग्रंथाचे महत्त्व फार आहे.

अप्पांची मांडणीच इतकी आकर्षक की, काय घ्यावे- काय नको- असे होऊन जाते. 'कोषागारी कुबेराच्या भिकारी शिरल्यावर- भांबावतो'- (कृष्णकथामृत) तसेच माझे येथे झाले आहे. तथापि लेखनमर्यादेची जाणीव ठेवून काही महत्त्वाच्या प्रश्नोत्तरांचा परामर्श करणे उपयुक्त ठरेल. तसं तर माझा हा प्रयत्न गगनाला गवसणी घालण्या सारखाच आहे.

प्रश्नोत्तरांचा प्रारंभ होतो ब्रह्मापासून तर शेवट होतो साक्षात्कारी पुरुषाच्या योग्यतेच्या वर्णनात! एका वाक्यात असे म्हणता येते की, या ग्रंथात व्यष्टि-समष्टीच्या जीवनाचा परामर्श थोडक्यात घेतलेला आहे.

यक्ष विचारतो- धर्मा, सूर्याला उगवावयास कोण लावतो- धर्म राजाचे उत्तर आहे ब्रह्म! अप्पांचे यावरील स्पष्टीकरण मोठे आकर्षक आहे. विश्वातल्या सर्वच्या सर्व घटना ब्रह्माच्याच सत्तेने घडतात. 'भीषास्मात् पवते मरुत् तपति वै सूर्यः'' अशी श्रुती आहे. नामदेव म्हणतात, 'वृक्षाचेही पान हाले त्याची सत्ता' वामनपंडितांचा श्लोकही याच संदर्भात आहे-

**'सत्तेने प्रभुच्याच सूर्य उगवे त्याच्याच सत्ता बळे ।**
**वारा वाहतसे नभीं, तरुलता देतात पुष्पे फळे ।।**
**पाण्याचा करितात मेघ समयी वर्षाव भूमी वरी ।**
**देते धान्य समृद्धि भूमी अवघी त्याचीच सत्ता खरी ।''**

विश्वात चालणाऱ्या सर्व गोष्टी यात आल्या.

मात्र विश्वनिर्मितीची कल्पना बुद्धिवादी मंडळी आपोआप झाल्याचे मानतात ते बरोबरही नाही व तर्कसंगतही नाही. शेतकरी सहज दिसतो तसा तो दिसत नाही- अनुभव येत नाही तोपर्यंत त्याला मानणे अयोग्य असे या बुद्धिवाद्यांचे मत! अप्पा म्हणतात- पृथ्वी गोल आहे हे तरी शास्त्रज्ञांनी काही आडाखे बांधूनच निश्चित केलय. पृथ्वीची गतीही ते खगोलीय गणिताच्या साह्याने सांगतात. सांगणाऱ्या या शास्त्रज्ञाला त्या गतीचा अनुभव आहे का? अप्पा म्हणून म्हणतात- शास्त्रज्ञावर जसा विश्वास ठेवून पृथ्वीची गती आपण मान्य करतो तसे संतांच्या शब्दांवर विश्वास ठेवून त्या परमेश्वराचे अस्तित्व का मानू नये! ''देखिला देखिला माय देवाचाही देव' असे ज्ञानेश म्हणतात तर खुद्द अप्पांनी ही 'धावली हो पावली - विठाई' म्हटलंच आहे.

कार्य दिसते म्हणजे कारण असलेच पाहिजे. विश्वनिर्मितीला ब्रह्म कारण आहे. अप्पांचा येथला दृष्टांत मार्मिक आहे- थंडीने पदार्थाचे संकुचित होणे व उष्णतेने विस्तार पावणे याला पाण्याचा अपवाद कसा कुणी केला? पाणी गोठले- बर्फ झाले. जलशयावर तरंगणाऱ्या बर्फाखालील पाण्यात जलचर जिवंत रहातात ही त्या ईश्वराची कृती. त्याची योजना त्याने केलेला हा अपवाद. ईश्वरी सत्ता! नास्तिकतेच्या दिशेने होणाऱ्या बुद्धिवादाच्या प्रचारामुळे सश्रद्धांच्या अंतःकरणातही ईशसत्तेबद्दल शंका निर्माण होते त्याचे निरसन व्हावे म्हणून सांगायचे- बुद्धिवाद्यांचे समाधान होईलच असे नाही.

ईशसत्तेच्या विषयापासून सुरू झालेले हे सारे विवेचन थोर पुरुषाच्या योग्यतेच्या विवेचनाने संपते म्हणून अगदी शेवटचा प्रश्न येथे जोडून त्याचा परामर्श घेऊया...

यक्ष विचारतो, सर्वात श्रीमंत मनुष्य (सर्वधनी) कोण? धर्म उत्तरतो- सुख-दुःख, प्रियाप्रिय, भूतभविष्य हे ज्याला सारखे असते तो! यक्षाने सर्वधनी म्हटलंय त्याचा अर्थ श्रीमंत! सर्व दृष्टीने श्रीमंत! असा मनुष्य आत्मज्ञानी असतो. ज्ञानेशादि सकल संत असे सर्वधनी आहेत. ही माणसे सतत सावध- तटस्थ आणि पूर्ण निरहंकारी असतात. व्यक्तीची ही परमोच्च अवस्था! म्हणून प्रारंभी म्हटलंय व्यष्टि समष्टीच्या जीवनाचा

परामर्श म्हणजे 'यक्षप्रश्न!' आता काही प्रमुख प्रश्नांचा परमर्श घेऊ...

यक्ष- मनुष्य कशामुळे बुद्धिमान होतो? आणि बुद्धिमान असूनही तो जिवंत नाही असे केव्हा मानले जाते? युधिष्ठिर उत्तर देतो- वृद्धांची सेवा करण्याने मनुष्य बुद्धिमान ठरतो तर देवता, अतिथी, माता-पिता-पूर्वज आणि स्वत: (आत्मा) यांचे पोषण न करणारा जिवंत आहे असे मानता येत नाही.

अप्पा म्हणतात- केवळ पदवी संपादन ही बुद्धिमत्ता नाही. बुद्धीमत्तेच्या जोडीला अनुभवही असावा लागतो. विख्यात उदाहरण डॉक्टरी शिक्षणाचे. तज्ज्ञाच्या हाताखाली काम केल्याशिवाय डॉक्टरी करण्याची मान्यता मिळत नाही. म्हणून वृद्धसेवा- संपर्क-अनुभवांची देवाण-घेवाण- हे आवश्यक. अनुभवसिद्ध ज्ञानात चतुस्रता असते. अप्पांचे हे विवेचन गोड वाटते. 'म्हातारी घरात असणे आता कालबाह्य आहे!' आताच्या आया फार फार मायाळू- जुन्या सासवा खाष्ट! ही वाक्ये विनोदाचा शिडकावा करतात. खाऊसाठी हटलेल्या बाळाला दोन हातात दोन लहान मोठे गुळाचे खडे घेऊन- मोठ्ठा पाहिजे तुला, घे, म्हणणारी कुशल आई! हजार पाकक्रियांचे पुस्तकावरून पातेल्याच्या बुडालाच पीठ थापणारी मॉडर्न नववधू- ही चित्रे बोलकी आहेत. अनुभव सिद्ध ज्ञानाचे महत्त्व स्पष्ट करणारी आहेत. मात्र येथे केवळ वयोवृद्धता अपेक्षित नाही तर वयोवृद्धतेसह ज्ञानवृद्धता अपेक्षित आहे. गीतेनेही 'तद्धिहि प्रणिपातेन्! परिप्रश्नेन सेवया' असेच म्हटले आहे.

याच्या उत्तरार्धात धर्मराज म्हणतो- मनुष्य कमवू लागला की, तो अहंकारी बनतो. 'मी मिळवलंय त्यावर माझा हक्क आहे- इतरांचा संबंध काय? इ. पण मनुष्य ज्या समाजात रहातो त्याचे प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष साह्य व्यक्तीला झालेलेच असते. शिवाय मिळविलेली संपदा न्याय्य मार्गाने प्राप्त केलेली असावी. म्हणून समाजाचे प्रत्येकावर एक प्रकारचे ऋण असते व ते फेडावे लागते यासाठी इष्ट* व पूर्त** असे दोन प्रकार शास्त्रकारांनी आवर्जून सांगितलेत. त्यातही पूर्ताला महत्त्व अधिक आहे. हे काही न करता जो जगतो तो पाप खातो असा उपनिषद् सिद्धान्तही अप्पा स्पष्ट करतात. म्हणून धर्मराजाने म्हटले आहे की, असा मनुष्य जिवंत असला तरी शास्त्र दृष्टीने तो मृतवत् आहे. पहिला पूर्वार्ध तात्त्विक दृष्ट्या महत्त्वाचा आहे तर उत्तरार्ध सामाजिक दृष्ट्या.

यक्ष एक मार्मिक पण छोटासा प्रश्न विचारतो, धर्मा अत्यंत सुखदायक गोष्ट कोणती? धर्माचे उत्तर आहे 'शील'!

अप्पा स्पष्टीकरण करताना म्हणतात, 'शीलाला-चारित्र्याला महत्त्व देणारे आज किती सापडतील? बंगला, गाडी-मानमरातब- बस! पण युधिष्ठिर यातले काहीच सांगत नाही. चारित्र्य महत्त्वाचे मानतो. मानसन्मान व्हायला हवा तो चारित्र्यसंपन्नतेचा. पण आज खेळाडू, नट-नट्या, पुढारी यांनाच गौरवितात. वक्तृत्व, कला, कौशल्य, अभिनय यांना महत्त्व आहे पण तेथेही चारित्र्य हवे!

यक्ष विचारतो, कोणाशी केलेला संधी जीर्ण होत नाही- टिकतो, मोडत नाही? धर्म राजाचे उत्तर आहे सज्जनाशी केलेला संधी मोडत नाही. अप्पा म्हणाले, 'राजकारणात याचे विशेष महत्त्व आहे. संधी म्हणजे तडजोड-सख्य-तह! दोन्ही पक्ष प्रामाणिक असतील तर संधी तुटत नाहीत. सज्जनांचा संधी मोडत नाही. पण सज्जन राजकारणात पडत नाहीत. आणि राजकारणात पडलेले बव्हंशी सज्जन नसतात. संधी मोडण्याची संधी साधणे म्हणजे यालाच राजकारण म्हणतात.

हिंदुस्तानच्या फाळणीचा जुना संदर्भ देत अप्पा म्हणतात, त्यावेळी भारताने ५ कोटी रुपये पाकला देण्याचा करार झाला होता. पण तत्पूर्वीच पाकने आक्रमण केले- संधी मोडला- आक्रमण मागे घेतल्यावर रक्कम दिली जाण्याचा प्रशासनाचा आग्रह होता. पण गांधींच्या प्रामाणांति उपोषणाच्या धाकामुळे रक्कम आधीच द्यावी लागली. नेतृत्व अदूरदर्शी असले म्हणजे दुसरे काय होणार?

राजकीय दृष्ट्या आणखी एक महत्त्वाचा प्रश्न! यक्ष विचारतो, धर्मा 'राष्ट्र मृत आहे असे केव्हा मानावे?' धर्माने उत्तर दिले- 'ज्या राष्ट्रात अराजकता माजली आहे ते राष्ट्र मृत आहे असे मानावे!'

तरुणांनी अप्पांचे हे प्रश्न मुळातूनच वाचावे इतके ते उद्बोधक आहेत. ते म्हणाले, 'आजची आपली वर्तमान, राजकीय-सामाजिक स्थिती अराजकाचेच उग्र रूप आहे. आसाम, पंजाब, काश्मीर यांच्यावर फाळणीचे सावट आहे. विस्थापितांची व्यवस्था सरकार करू शकत नाही. बलात्कार, लूट, जाळपोळ आणि भ्रष्टाचार या बाबी नित्याच्याच झाल्या आहेत! एक वेगळाच त्रिकोण प्रभावी आहे- राजकारणी स्वार्थी, अधिकारी भ्रष्ट आणि कर्तव्यशून्य सेवक! यात आणखी भर म्हणून भ्रांत तत्त्वज्ञानाला बळी पडलेले बुद्धिवादी, अश्लीलतेला प्रोत्साहन देणारी माध्यमे- अशा स्थितीत सुखाची अपेक्षा कशी करावी? 'मी तुमचे रक्षण करीन म्हणून शपथ घेणारे शासक जेव्हा रक्षण करू शकत नाहीत तेव्हा त्यांना कुत्र्यासारखे ठार करावे' असे महाभारतात म्हटले आहे. येथे ठार करण्याची प्रक्रिया मतपेटीद्वारे होते हे सांगायला अप्पा विसरत नाहीत! अप्पांचा जोश, राष्ट्राविषयी कळकळ तीव्रतेने जाणवते.

आणखी काही प्रश्न पहा-

- मरणाऱ्याचा मित्र कोण? दानधर्म;
- मनुष्याचा आत्मा कोण? त्याचा पुत्र,
- सर्वश्रेष्ठ धन कोणते? ज्ञान;
- सुखांमध्ये उत्तम सुख कोणते? संतोष, पुरे वाटणे, समाधान असणे,
- (Thus far and no further!) काय टाकले म्हणजे मनुष्य सुखी होईल? उत्तर आहे- कामनांचा त्याग. लोभ सोडल्याने!
- श्रेष्ठ प्रकारची दया कोणती? 'सर्वांना सुख लाभावे ही इच्छा सतत बाळगणे!
- पैशून्य (दुष्टता) कशाला म्हणावे? उत्तर- दुसऱ्याला दोष देणे, दुसऱ्यात दोष बघणे आणि दुसऱ्याचे दोष बोलून दाखवणे.
- प्रश्न आहे पंडित कोण? उत्तर आहे- जो क्रियाशील आहे तो!

हे सारेच प्रश्न जीवनाला यथार्थ मार्गदर्शन करणारे आहेत. मी तर म्हणेन या साऱ्या प्रश्नोत्तरांचा सखोल चिंतनपूर्व अभ्यास केला- मनन

---

*इष्ट - स्नानसंध्या, पूजापाठ, तीर्थयात्रा- विहित कर्मे.

**पूर्त - तळी बांधणे, विहिरी खोदणे, विद्यादान, झाडे लावणे अशी समाजोपयोगी.

केले तर जीवनात कधीच कोणता यक्षप्रश्न निर्माणच होणार नाही! एकूण ७६ प्रश्नांचा हा छोटेखानी ग्रंथ समग्रजीवनाचा मार्गदर्शक ग्रंथ आहे.

धर्मराजाची यक्षाने- यमधर्माने- घेतलेली ही पहिलीच परीक्षा. याशिवाय दोन आणखी आहेत.

शेवटपर्यंत ज्या कुत्र्याने साथ दिली त्यासह स्वर्गात येतो नाहीतर तो स्वर्ग नको असे इंद्राला धर्मराज म्हणाला. ही दुसऱ्यांदा घेतलेली परीक्षा. तर तिसऱ्यांदा घेतलेली म्हणजे नरकदर्शनात आपले बंधू तेथे पडलेत ते पाहून तो स्वर्गाकडे येत नाही- येथे (नरकातच) थांबतो म्हणाला ती तिसरी परीक्षा. इंद्र प्रसन्न होऊन त्याने गंगेत धर्मराजाचा देह विसर्जित करून तो नव्या तेजस्वी देहाने स्वर्गात गेला. अप्पा समारोपात म्हणतात- ''धर्मराजाचा हा आदर्श समोर ठेवून जीवनात वागलो- विशेषत: तरुणवर्ग वागला तर कुटुंब जीवनच काय पण समाज जीवन व पर्यायाने राष्ट्रजीवनही सुखी-संपन्न होईल!'

**श्री. माधव चिंतामणी खिरे**
२२, श्रीशंकर सोसायटी, धनकवडी,
पुणे ४११०४३. मो. ९४२२५००५३०

•••





'प.पू. स्वामी वरदानंद भारती' कल्याणी विशेषांकास
**हार्दिक शुभेच्छा!**



**श्री. त्रिंबकराव पांडे (पुस्पुरकर) यांचे स्मरणार्थ**



**हस्ते - श्री. प्रकाश पांडे**
**भाग्यनगर (हैद्राबाद)**
**आंध्रप्रदेश (तेलंगणा)**



# समाज–प्रबोधनाचा वस्तुपाठ:

## वेड लावणाऱ्या कीर्तनांचे पूर्वरंग :
## ग्रंथ : 'पूर्वरंग तरंग'– 'पूर्व रंग तरंगिणी'

**ह.भ.प. गंगासुत**

श्रीदासगणू महाराज परंपरेतील कीर्तनकार

''ब्रह्मीभूत काया होतसे कीर्तनी।'' या तुकोबांच्या अभंगाप्रमाणे आजच्या विज्ञानयुगातही प्राचार्य आठवल्यांची कीर्तने होत होती. त्यांनी या तुकोक्तीचा मधुर अनुभव स्वत: घेतला आहे! मात्र या त्यांच्या यशाची प्राप्ती ज्या प्रेरणेतून झाली ती कथा अशी–

एकदा अप्पा म्हणाले, ''दादा, (तेव्हा ते तरूण होते कीर्तन करू लागले होते, परिवारात येणाऱ्यांचे वागणे–बोलणे निरखीत होते.) ही माणसे हजारो वेळा कीर्तने ऐकतात, पुन:पुन्हा येतात, पण यांच्या वर्तनात काडीचाही बदल होत नाही. कशाला करायची कीर्तने यांच्यापुढे?''

दादा खळखळून हसले! अनंतराव क्षणभर चकित! गंभीर झालेल्या अप्पांच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाले, ''अनंता कुणी सांगितले तुला हे? लोक सुधारले पाहिजेत ही जबाबदारी कुणी टाकली रे तुझ्यावर? 'आयको नायको कथा कोणी तरी । जाऊनीया घरीं निजो सुखें' (तुका.) तुला त्रास होतोय तो ते दायित्व तू तुझ्याकडे घेतोयस् ना त्यामुळे! वेड्या, कीर्तन करायचे ना ते स्वत:च्या समाधानासाठी, संतोषासाठी! हरिकथागायन आपल्या भक्तीच्या प्रकर्षासाठी! उद्धारासाठी! केलीच करावी हरिकथा हेच खरें! शास्त्रवचनही 'कलौ तत् हरिकीर्तनात्' असेच सांगते!''



**ज्येष्ठ बंधू तुकारामबुवा आजेगांवकर यांचेबरोबर काला–कीर्तनात फुगडी खेळताना (१९६८)**

अप्पांच्या वर्तन–परिवर्तनाला हा धडा पुरेसा झाला. पुन्हा कधी असा प्रश्न त्यांना पडला नाही. उलट घडले ते असे– दीड–दोन खणाच्या खोल्यांमधूनही त्यांनी कीर्तने केली तर नांदेडच्या कलामंदिराच्या भव्य पटांगणावर ५/५, ६/६ हजार श्रोत्यांच्या पुढेही त्यांची कीर्तने झाली. ही कीर्तने सतत वर्धिष्णूच राहिली. झाली ती सारी कीर्तने साऱ्या समाजासाठीच पण अप्पांचा कर्तृत्वाभिमानाचा त्यात लवलेशही नव्हता. हजारोंनी तो आनंद लुटला पण अप्पांच्या नि:स्पृह–निरपेक्ष साधनेचे–सेवेचे व्रत अखंड चालूच होते.

नारदीय व वारकरी असे दोनच प्रमुख प्रकार कीर्तनात आहेत. सामान्यत: संतांची–देवादिकांची चरित्रे सांगणे हाच मुख्य उद्देश दोघांचा. नारदीय कीर्तनात सुस्पष्टपणे पूर्वरंग–उत्तररंग असतात. वारकरी संप्रदायातही ते आहेत पण कथा–चरित्र, प्रसंग, गाणी, पदे असे काही वेगळे नसल्याने पूर्वरंगाच्या अभंगावर भावार्थ सांगितला की, पूर्वरंग झाला; नंतर वीणा कुणाला तरी धरायला देऊन पुढे निरूपण करणे हा उत्तर रंग. नारदीय कीर्तनात गायनालाही महत्त्व असते.

ती. दादा– दासगणुमहाराज स्वकृत पद्ये पूर्वरंगासाठी घेत आणि उत्तररंगातील आख्यानही स्वकृतच सांगत. दादा साईबाबांच्या आज्ञेनुसार फक्त उपरणे अंगावर घेऊन उघड्या अंगाने कीर्तने करीत. ती. अप्पांनीही तीच परंपरा कायम ठेवली. आता सारा परिवार तीच परंपरा चालवतो. काही प्रसंगवशात् लो. टिळक (भाग २) राजा दाहीर व रुक्मिणी स्वयंवर ही आख्याने ती.अप्पांनी रचली आहेत. यासह ती.दादांच्या सर्व आख्यांनावर अप्पांची कीर्तने होत असत.

प्रस्तुतची दोन्ही पुस्तके (कीर्तन) 'पूर्वरंग तरंग' आणि 'पूर्वरंग तरंगिणी' अप्पांनी केलेल्या कीर्तनांच्या पूर्वरंगावर आधारित आहेत. यामधले सारेच पूर्वरंग ती.दादांच्या मौलिक पदांवरील आहेत. या दोन्ही ग्रंथांची निर्मिती करून कीर्तन जगतावर प्रकाशकांनी मोठेच उपकार केले आहेत. या सर्वच पूर्वरंगांची योग्यता श्रेष्ठ आहे. मात्र हे पूर्वरंग सहज कुणी करू धजेल तर ते फारसे युक्त होणार नाही. कारण ती.अप्पांची अथांग विद्वत्ता, त्यांचे जबर पाठांतर, प्रखर निवेदनशैली आणि ओज यांची नक्कल होऊच शकणार नाही. मात्र त्या पूर्वरंगाचा अभ्यास जे कोणी करतील त्यांना आपले कीर्तन भारदस्त होत आहे,

असे जाणवेल! कारण बुद्धीला मिळणारे ते पौष्टिक खाद्य आहे.

आणखीही एक वेगळेच वैशिष्ट्य म्हणून उल्लेखता येईल की, 'शिष्यस्तुती करू नये असे शास्त्र असले तरी दादांनी बऱ्याच वेळा म्हटलय की मलाही न स्फुरलेला किंवा न जाणवलेला अर्थ त्याच पदांतून अनंता वेगळेपणाने मांडू शकतो!' गुरूंची ही प्रशस्ती ऐकून ते देवाला विनवीत की, 'ही स्तुती मला पचेल का याचा विचार देवा तूच कर ना!' ती.दादांच्या छात्र बोधातला उपदेश मात्र कीर्तनांच्याबाबतीत अप्पांनी पूर्णपणे पाळला- तो असा

**'नेमस्त गायन करावे । विनोद सभ्य असावे ।**
**प्रौढगंभीर बोलावे । थिल्लरता न शिवो द्यावी।''**

एका थोर विचक्षणाने असे म्हटले आहे की 'विविध अध्यात्मिक विषयांच्या विवेचनाची ही अंतर्यात्रा असून अप्पांच्या प्रगाढ चिंतन-मननातून ती स्फुरलेली आहे. भारताची अस्मिता असणाऱ्या सर्वांनीच विशेषत: तरुण अभ्यासकांनी या पूर्वरंगांचा अभ्यास केला तर भारताचे गतवैभव ते पुन्हा खेचून आणू शकतील. समाजजीवनाचा ढासळणारा तोल ते सावरू शकतील. थोडक्यात यातील अध्यात्माच्या अध्ययनाने व्यक्तिविकास साधेल तर सामाजिक पातळीवरही त्याचा सुयोग्य परिणाम दिसून येईल.

दीड-दोनशे वर्षांपूर्वीच्या एका थोर कीर्तनकाराने कीर्तनकाराच्या योग्यतेसंबंधी एक रचना केली आहे-

**'विरक्तो वैष्णवो वित्रो, वेदशास्त्र-विशुद्धिकृत् ।**
**दृष्टान्तकुशलो धीरो वक्ता कार्येति नि:स्पृह: ।।**

म्हणजेच कीर्तनकार विरक्त असावा, जाणता असावा, बुद्धिमान, वेदशास्त्रांत पारंगत असावा. त्याला विषय पटवून देण्यासाठी दृष्टांत देता येणे महत्त्वाचे आहे. तो धैर्याने पण सत्य बोलणारा आणि नि:स्पृह (निरपेक्ष- निर्लोभी) असावा. मला वाटते हे सारे गुण पू.अप्पांच्या ठिकाणी पूर्णपणे नांदत होते. क्षणभर असे म्हणता येईल तो कीर्तनकार जणू द्रष्टा होता. त्याने वर्णिलेले गुण असणारा कीर्तनकार अप्पांच्या रूपाने त्यानंतरच्या शतकांत समाजाने पाहिला.

श्रीहरिकीर्तन ही अध्यात्म मार्गातली एक सामर्थ्य देणारी साधना आहे. रागदारीचे गाणे कीर्तनात असले तरी त्याची मर्यादा ठरलेली आहे. कीर्तनाचे प्रयोजनच मुळी परमार्थ प्राप्ती आहे- ब्रह्मप्राप्ती आहे. कीर्तनाने श्रोत्या-वक्त्यांच्या पापांचे क्षालन होते. पंचवीस तीस वर्षांपूर्वीच्या एका कीर्तन संमेलनाच्या अध्यक्षपदावरून वारकरी संप्रदायाचे अध्वर्यू ह.भ.प. श्रीधुंडामहाराजांनी सुस्पष्टपणे सांगितले होते की, ''नवोदितांनी वा जुन्यांनीही हे ध्यानातच ठेवावे की कीर्तन ही कला नाही. कीर्तनाचा संगीत जलसा करू नये. भक्तीच्या उत्कटतेसाठी कीर्तन असले पाहिजे'' यात त्यांनी कलेचा उपहास केलेला नाही; निंदा तर त्याहून नाही, तर कीर्तनाचे महत्त्व आणि कीर्तनकाराच्या योग्यतेकडे व दायित्वाकडे लक्ष वेधले आहे. श्रोत्यांच्या अंत:करणातील विकारांवर नियंत्रण यावे, सदाचाराकडे ते वळावे, अधिकाधिक प्रामाणिकता त्यांच्या मनात ठसावी यासाठी कीर्तन आहे. व्यक्ति-व्यक्तीची उन्नती ही शेवटी समष्टीच्या उन्नयनात परिणत होताना दिसून येते. म्हणून तर कीर्तन हे कलेकडे झुकणार नाही, तसे वळण त्याला लागणार नाही याची दक्षता कीर्तनकाराने घेतली पाहिजे असे अपेक्षित आहे. अप्पांच्या कीर्तनात या दृष्टीने त्यांचे बंधू संगीत जाणकार- श्री. छगनराव बारटक्के पदे गात तेव्हा त्यांची गायनकला मर्यादित पण आकर्षक असे ती त्यामुळेच!

''जेणे करोनि मूर्ती ठसावी अंतरि श्री हरिची'- ऐसी कीर्तन मर्यादा हे संताचे घरची'' हे नाथांचे वचन अप्पांच्या कीर्तनात प्रत्ययास येई. त्यांची कीर्तने त्यांच्या प्रगाढ ईशचिंतनातून आणि कीर्तनासंबंधीच्या ध्येयवादातून उतरलेली आहेत. अप्पांची कीर्तने श्रोत्यांना पूर्ण समाधान देऊन जात. चार-चार तासांचा कालावधी कधी सरला ते समजत नसे. आपल्या वयाचा नि आपल्या योग्यतेचाही विसर श्रोत्यांना पडावा अशी त्यांची अमोघ वाणी मनाला वेड लावणारी ठरे. ते म्हणतात, ''पूर्वरंग म्हणजे एखाद्या सिद्धांताचे निरूपण असते तर आख्यान त्याचे प्रात्याक्षिक. (थिअरी अँड प्रॅक्टिकल)' संतचरित्राचा प्रसंग म्हणजे आपल्याला आपल्या प्रगतीसाठी घालून दिलेले एक आदर्श उदाहरण!'

या सर्व पूर्वरंगातून सद्‌भक्ती, सत्कर्म, विषयत्याग, सदाचार, गुरुमाहात्म्य, षड्‌रिपुदमन, मन:संयमन, अध्यात्माचे सत्स्वरूप, संत माहात्म्य, मतामतांचा गोंधळ, ब्रह्म-माया, तत्त्वज्ञान असे सारे अध्यात्माचे पोषक विषय आलेले असून त्यावरचे विवेचन आजच्या विज्ञान युगातल्या श्रोत्यांच्या गळी उतरविण्यात ते यशस्वी झालेले आहेत. भारतीय प्राचीन ग्रंथ, तत्त्वज्ञान, संस्कृती इ. गोष्टींचा अभ्यास न करता तर्कटीपणाने अस्मितेवर आक्षेप घेणाऱ्यांचा पुरेपूर समाचार घेतलेला या दोन्ही ग्रंथात दिसेल. संस्कृतीला धक्का देणारा कुणीही असो- तुकारामांप्रमाणे- त्यांचे खंडण करताना 'नाही भीडभार, तुका म्हणे साना थोर!' अयोग्य अभिरुचीचे साहित्यिक, बुद्धिवादी, साम्यवादी, थोरांची चरित्रहानी करणारे साहित्यिक, दांभिक, जडवादी, इतिहासही विकृतपणे मांडणारे नाटककार, गायक, नट सारे सारे त्यांच्या परखड टीकेत येऊन जातात. उपहासगर्भ विनोदही त्यात असतो. अध्यात्माच्या विषय-विवेचनात ते पूर्ण रंगलेले दिसतात. ते स्वत: वैद्य असल्याने इतर अनेक दृष्टान्ताप्रमाणेच आयुर्वेदीय दृष्टांतही यात बरेच आहेत.

या दोन्ही ग्रंथातले पूर्वरंग ती.दादांच्या १७-१८ पदांवरचे आहेत. त्यातल्या काही पदांचे प्रारंभ आपण पाहू - १) भक्ती तीच खरी, २) विवेक निशिदिनी वरा, ३) अंतर्मुख वृत्ती करी, ४) सदाचार हा शरीर... अध्यात्माचे, ५) अनेकांची अनेक मते, ६) अध्यात्माचे खरे स्वरूप, ७) सद्धर्माचे आचरण हेची, ८) घाल मनाच्या गळ्यात माळा , ९) जगजीवन जगदाधारारे इ.इ.

सगळ्याच पूर्वरंगांबद्दल लिहिणे अशक्यप्राय आहे म्हणून काही महत्त्वाच्या गोष्टी मी येथे मांडणार आहे. त्यातून पूर्वरंगाचे एकूण महत्त्व ध्यानात येईल. आख्यानांसंबंधी मात्र या निबंधात काहीही मांडलेले नाही.

१) धर्म म्हणजे काय ते सांगतात - 'अभ्युदय व नि:श्रेयस यांची सिद्धी-प्राप्ती करून देणारा तो धर्म.' त्याच्या स्पष्टीकरणासाठी ते म्हणतात, धर्माने अभ्युदय म्हणजे या जगातली आपली व्यावहारिक

उन्नती! समृद्धीचे भारताला वावडे नाही. सोन्याचा धूर निघत होता असा उल्लेख करून एक ऐतिहासिक संदर्भही देतात. इ.सनाच्या ७व्या, ८व्या शतकापर्यंत हे वैभव होते. म्हणून तर भारतावर लुटारूंच्या टोळधाडी आल्या. ते काही भारताचे द्रारिद्र्य वाटून घ्यायला आले नव्हते. धर्माच्या महत्त्वाबरोबरच समाजाची जाणीव ते प्राचीन इतिहासाशीही जोडून दाखवितात. धर्मशास्त्राप्रमाणे चोरी करणे हाच अपराध आहे. आज न्यायालयात चोरी करणे अपराध ठरत नाही तर ती सिद्ध होणे अपराध ठरतो- ही चिंतेची बाब. धर्म त्यासाठी महत्त्वाचा. 'जे करणे असेल ते खरे करा तत्त्वत:!'

२) अहंकार - लीनतेचे सोंग घेऊन अहंकार दांभिकपणे मिरवला जातो. हे सांगताना, ते म्हणतात- पुढारी हात जोडतो ते तिरपे- नमस्कारासाठी- पण तोंड समोर नाही- फोटोग्राफरकडे. भ्रष्टाचारी राहतो एकाद्या मुसलमानी सम्राटाच्या थाटात- शिष्टाचाराचा फक्त उपचार. मुळात ती दांभिकताच. व्यक्तिगत पातळीवर अहंकाराचे आपले आपण परीक्षण करणे महत्त्वाचे असते ते यासाठी!

३) मनावरील नियंत्रण परमार्थात सर्वश्रेष्ठ मानलेले आहे. तसे झाले तर अप्पा म्हणतात, परमार्थातला तो पदवीधर झाला. मनाकडूनच माणसाला कार्याची प्रेरणा मिळते. मनच सर्वांचे अधिष्ठान आहे. बृहदारण्यकातला संदर्भ घेऊन ते सांगतात, उपभोगवासना, संकल्प- विकल्प, श्रद्धा-अश्रद्धा, धैर्य, विषमता, लज्जा, भीती इ. सर्व मनाचीच विविध रूपे आहेत. त्यांची टिप्पणी अशी की अतिप्राचीन अशा उपनिषद्‌काली हिंदूंचे मानसशास्त्र किती प्रगत होते हे त्यातील अंगोपांगांचे ऋषींनी केलेले विवरण पाहून कळते. (आणि आम्ही त्यासाठी परक्यांकडे बघतो.) म्हणून 'मन करा रे प्रसन्न' असा संतवचनाचा उल्लेख करतात. 'मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयो:।' असे शास्त्रवचनच आहे.

४) आपल्या देशाची- समाजाची हानी अध्यात्मामुळे झालेली नाही हेच सूत्र 'अध्यात्माचे खरे स्वरूप ते विसरून गेल्यावरी' या पदामध्ये त्यांनी सविस्तर मांडलेले आहे. अध्यात्मामुळे कोणताही धोका संभवत नाही. हानी झाली तरी खरे स्वरूप न कळल्यामुळे! तेच दादांनी या पदांत स्पष्ट केले आहे. महतीचे आजचे स्वरूप आपल्या संस्कृतीने धिक्कारलेले आहे. अध्यात्म नको म्हणणे म्हणजे गाढ झोप नको म्हणण्यासारखे आहे. ते जीवनाचे अंग झाले पाहिजे. अध्यात्म, आसक्तिरहित जीवन जगायला शिकविते. प्राप्त कर्म- स्वीकृत कार्य निरहंकारतेने करावे, सकल सात्त्विक गुणांची जोपासना अध्यात्मामुळे होते. भोगलोलुपता बाह्य साधने वाढवते, परिणाम दु:खात होतो. अप्पांची टिप्पणी अशी 'अनेक आधुनिक साहित्यिकांनी आमची श्रद्धास्थाने उद्‌ध्वस्त करण्याचा जणू विडाचा उचलला आहे' हे घातक आहे. म्हणून साधकांनी ग्रंथ वाचताना सावधपणा बाळगणे आवश्यक!

५) भक्तीमध्ये अनन्यतेला फार महत्त्व! सत्कर्माने सद्‌भक्ती हातात येते आणि त्यामुळे ईशप्राप्ती होते असा विषय सांगताना भक्ती- प्रेमाची कसोटी- म्हणजे गोपींचे उदाहरण! ते म्हणतात, कबीरांना त्याच्या चाहत्यांनी मोठेपणा देताच कबीर म्हणाले, 'कबीर कबीर क्या कहते हो जाओ जमुना तीर। एक गोपिके प्रेममें बह गये कोट कबीर।' अप्पांनी म्हटलंय- हा प्रवास (अनन्येतेचा) लांबचा खरा पण तो कुठे जायचयं ते निश्चित करतो. ते कळले (ध्येय कळले) की, वाटचाल नीट होते. स्वधर्माचरणात श्रद्धा, प्रेम, उत्कट भाव असला की हे साधते.

तसं खूप काही आहे. मला विस्तारभय आहेच. तथापि प्रेरणादायी काही नमुने सांगतो -

१) निवड करायची तर वाईट टाकून चांगले स्वीकारणे गरजेचे असते नाहीतर विवेक शब्दाला अर्थच उरणार नाही.
२) नियमांमध्येच परिवर्तन हे कितपत तर्कशुद्ध? स्वैराचारी होणे म्हणजे नियम पालटणे का?
३) विवाह बंधनाला पूर्वी एक पावित्र्य होते, त्याला अतोनात शैथिल्य आले- जीवघेण्या घाणेरड्या रोगांचा प्रादुर्भाव झाला. शासन म्हणते स्टिक्‌ टु वन पार्टनर! निसर्गात परिवर्तने कशी कोणती होतात? मग माणसालाच परिवर्तन का हवे असते?
४) प्रपंचात वावरतांना येणाऱ्या अस्वास्थ्याला आपला अहंकार कारणीभूत नाही ना हे पहावे. नामस्मरण, पूजापाठ, सद्‌ग्रंथवाचन मनापासून- कर्तव्य म्हणून करावे. (संगीत आवडते तर) मीराबाईची भजने- तुकोबांचे अभंग गावेत. विष्णूसहस्रनामाचे पाठ हा तर सर्वोत्तम उपाय. वेळ लागेल पण सवयीने अस्वास्थ्य उणावेलही, क्वचित संपेलही
५) 'जयाचे जे विहित । ते ईश्वराचे मनोगत' असे संतवचन सांगून ते म्हणतात, आपले कर्तव्य सर्वशक्तिनिशी प्रामाणिकपणे करणे हेच ईश्वराचे खरे पूजन आहे. (म्हणजे रोजची पूजा टाळावी असे नाही). व्यक्तीचे त्यात कल्याण आहे. पर्यायाने समाजाचे व मानवतेचे ही!
६) वृत्ती संयमी असेल तर घरातही तपश्चर्या होऊ शकते. विलासाची आवड असली तर रानांतही उपभोगाची हजारो साधने गोळा होतात. मुळातली अरण्येच आता उंचीवरची रम्य ठिकाणे म्हणून प्रचलित झाली. चैन म्हणजे सांस्कृतिक कार्यक्रम हे आपल्या परंपरेत नाही.

हरदासाची कथा मूळपदावर या न्यायाने असे म्हणता येईल की त्यांनी कीर्तनाचा घालून दिलेला आदर्श त्यांच्या व ती.दादांच्या प्रारंभी उल्लेखिलेल्या संवादाचे फळ आहे! त्यांची ही दोन्ही पुस्तके म्हणजे समाजप्रबोधनचा आदर्शच!

**- ह. भ. प. गंगासुत**, पुणे

**मना मच्छ हा कच्छ, वराह हाची ।**
**मना मुर्ति ही केसरी वामनाची ।।**
**मना रेणुकासूत नी राम हाच ।**
**मना देवकीपुत्र हा कृष्ण साच ।।**



# प.पू. वरदानंद भारती यांचे 'संघ प्रार्थने' वरील भाष्य

**श्री. रमेश माधव पांडव**

एम्.ई., स्थापत्य अभियांत्रिकी
विभागप्रमुख, स्थापत्य अभियांत्रिकी महाराष्ट्र इनिस्टट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी

**नमस्ते सदा वत्सले मातृभूमे**
**त्वया हिन्दुभूमे सुखं वर्धितोऽहम् ।**
**महामङ्गले पुण्यभूमे त्वदर्थे**
**पतत्वेष कायो नमस्ते नमस्ते ।।१।।**

**प्रभो शक्तिमन् हिंदुराष्ट्राङ्गभूता**
**इमे सादरं त्वां नमामो वयं ।**
**त्वदीयाय कार्याय बद्धा कटीयं**
**शुभामाशिषं देहि तत्पूर्तये ।**
**अजय्यां च विश्वस्य देहीश शक्तिं**
**सुशीलं जगद्येन नम्रं भवेत् ।**
**श्रुतं चैव यत्कंटकाकीर्णमार्गं**
**स्वयं स्वीकृतं नः सुगं कारयेत् ।।२।।**

**समुत्कर्षनिःश्रेयसस्यैकमुग्रं**
**परं साधनं नाम वीरव्रतम् ।**
**तदन्तःस्फुरत्वक्षया ध्येयनिष्ठा**
**हृदन्तः प्रजागर्तु तीव्राऽनिशम् ।**
**विजेत्री च नः संहता कार्यशक्तिः**
**विधायास्य धर्मस्य संरक्षणम्**
**परं वैभवं नेतुमेतत् स्वराष्ट्रं**
**समर्था भवत्वाशिषा ते भृशम् ।।३।।**

**।। भारत माता की जय ।।**

'राष्ट्रीय स्वयंसेवक संघा'मध्ये वरील प्रार्थना नियमितपणे म्हटली जाते. या प्रार्थनेचा शब्दार्थ, भावार्थ उलगडून दाखविणाऱ्या 'संघ प्रार्थना' या प.पू. स्वामी वरदानंद भारती यांच्या पुस्तिकेवरील हे विवेचन...

**विषय प्रवेश :** प.पू. वरदानंद भारती हे साक्षात्कारी संत होते. पूर्वायुष्यात ते संघस्वयंसेवकही होते. ही संघ स्वयंसेवकांना अभिमानास्पद बाब आहे. मी त्यांना म्हणजे पूर्वाश्रमीचे प.पू. अनंतराव आठवले यांना १९७९ साली लोणावळ्यात पाहिले आहे, ऐकले आहे. तेव्हापासूनच त्यांच्याविषयी एक विशेष आकर्षण वाटत आले आहे. त्यानंतर पुढे २०१२ साली त्यांनी स्थापन केलेल्या नांदेड जिल्ह्यातील आश्रमात व्याख्यानानिमित्त जायचा योग आला. अनेकानेक जीवांचा उद्धार करणारा हा माणूस भारतीय संस्कृतीचा उच्चादर्श होता. त्यांच्या तोंडून संघाच्या प्रार्थनेवरची व्याख्याने (एप्रिल १९९५) अनेकांना ऐकायला मिळाली. ते सर्वच फार थोर.

त्याची पुस्तिका पुढे प्रकाशित झाली. विशेषांकाच्या निमित्ताने मला त्यांवर लिहिण्याची संधी मिळत आहे, हे माझे परम भाग्य. संघाच्या बाहेर ही प्रार्थना 'सर्व हिंदूसाठी आहे', असे सांगणारा अणि ती नेण्यासाठी प्रयत्न करणारा हा पहिलाच प्रयोग माझ्या माहितीत आहे. संघाने आपला संप्रदाय होऊ दिला नाही याची ही पावती आहे. संघ समाजरूप करण्याचा संघस्वयंसेवकांचा प्रयत्न कसा असला पाहिजे याचा हा आदर्श आहे. संपूर्ण हिंदू समाजानेच देश परमवैभवाला नेण्यासाठी झटावे असा हेतू त्यातून प्रकट तर होतोच पण त्यातून विचारांचे व्यापकत्वही सिद्ध होते. त्यातून एका साक्षात्कारी श्रेष्ठ पुरुषाला, संताला कळकळीने हे वाटावे हे आनंदाश्चर्य आहे. समाजातील प्रगल्भ, समाजहितैषी व्यक्ती याचा यामुळेच विचार करू लागतील असे वाटते.

संघाचे एक अखिल भारतीय अधिकारी मा.श्री.सुरेश रामचंद्र केतकर या प्रवचनांपैकी एका प्रवचनाला होते आणि या पुस्तिकेत त्यांचेही मनोगत छापले आहे. मा.सुरेशरावांशी माझा परिचय १९७० सालापासून. हाडाचे शिक्षक असणाऱ्या या बलदंड माणसाला हा उपक्रम स्तुत्य वाटला आहे. आम्ही त्यांना संघातले 'हनुमान' म्हणायचो. आताशा ते थकले आहेत पण 'पीळ' अजूनही जाणवतो.

श्री.श्री.भा.वर्णेकर यांनाही ऐकायचा मला योग आला आहे. या प्रार्थना पुस्तकाचे स्वागत 'इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपबृंहयेत' या शब्दात केले आहे. 'संघतत्वांचा वेदविचार' अशी त्यांनी संभावना केली आहे. आपल्याकडील वेदांची प्रतिष्ठा लक्षात घेता हा बहुमोल नजराणा या पुस्तिकेचे आणि प्रार्थनेचे श्रेष्ठत्व सिद्ध करणारा ठरतो.

**इतिहास :** एखादा विचार, काव्य, पुस्तक आवडले की चिकित्सक त्यांच्या इतिहासाकडे वळतात. कसे सुचले, केव्हा सुचले, पार्श्वभूमी आणि त्याकाळातील व्यक्तिमत्त्वे यांचा विचार होतो.

प.पू.वरदानंदभारती स्वामींनी त्याचा तपशील तर सांगितला आहेच पण अतिशय समर्पक पद्धतीने आणि श्रद्धायुक्त अंत:करणाने त्या व्यक्तिमत्त्वांबद्दल उल्लेख केला आहे. संघ संस्थापक प.पू.डॉ. केशव बळीराम हेडगेवार आणि द्वितीय सरसंघचालक प.पू.श्री.माधव सदाशिव गोळवलकर उपाख्य श्री. गुरूजी यांच्याबद्दल आदर प्रकट केला आहे. संघ स्थापनेनंतर त्याच काळातील मराठी-हिंदी प्रार्थना, एक समिति नेमून 'संस्कृत' भाषेत आली. हे काम श्री.ना.ना. भिडे यांनी १९३९ साली पूर्ण केले. संघविचार भारतभर झपाट्याने पसरत होता, त्याची आवश्यकता पूर्ण करणारी ही बाजू ठरली. संघस्वयंसेवकांची अंत:करणे अखिल भारतीय पातळीने विचार करणारी ठरली. नंतरच्या काळात काही बदल नाकारताना पू.गुरुजींनी ''ही प्रार्थना आता प्रतिदिनी लक्षावधी स्वयंसेवकांच्या कंठातून प्रेमादराने उच्चारली जात आहे. त्यालाही काही वर्षे उलटली आहेत. त्यामुळे या प्रार्थनेतील शब्दांना आता वेदमंत्राप्रमाणे मंत्रमयता प्राप्त झाली आहे. या कारणाने प्रार्थनेतील शब्दसंहितेत यापुढे कोणताही पालट होणे नाही. तसे करणे इष्टही नाही, आवश्यकताही नाही.'' असे म्हटल्याचे सांगितले आहे. 'संघप्रार्थना म्हणजे वेदविचार' याला आणखी कोणता पुरावा हवा? त्यामुळेच असेल कदाचित अजूनही कोणत्याही खलपुरुषाला यावर टीका करता आलेली नाही. अनेकांची 'व्यंकटी' इथे सांडलेली दिसते, मग रुसून फुगून दुरावलेल्या कार्यकर्त्याला जोडून ठेवणारा सांधाही हाच ठरावा यांत नवल कोणते? 'संघ कोणाच्याही मालकीचा नाही, आम्हीही संघ स्वयंसेवक आहोत, आम्ही हे काम करणारच' असा ही एक्का दुक्का भेटतो तेव्हाही प्रेमभराने गहिवरून येते. संघतत्वावरील प्रेम असेही प्रकट होते तेव्हा या विशाल, व्यापक, सर्वमोही विचारांचे सूक्ष्म मर्मग्रहण अत्यंत आवश्यक ठरते. म्हणून 'ओंकार ट्रस्ट'ला धन्यवाद द्यावे तेवढे थोडेच आहेत. ऋण कसे मानावे, या ऋणांचे ओझे फार-फार सुखकारी आहे. जगद्गुरू संत श्री.तुकारामांच्या भाषेत 'कमोदिनी काय जाणे तो परिमळ' म्हटले आहे. या पलिकडे काय बोलावे? 'संघ प्रार्थनेत' 'संघ' शब्दही नाही हे आम्ही म्हणजे संघाने सांगून चालले नसते, 'आनंदीकृपा न्यास'ने हे फार मोठे काम केले आहे, हे प्रामाणिकपणे नमूद करावेसे वाटते. त्यामुळेच हे जग संघ विसरले तरी चालेल पण हा 'वेदविचार' विसरू नये, विसरणार नाहीत याची खात्री पटते.

**प्रार्थनेचा अर्थ :** पू स्वामीजींनी शब्दार्थ, भावार्थ, गर्भितार्थ तर उत्तम सांगितलेच आहेत. ते या पुस्तिकेतून मुळातून वाचावेत. या लेखन मर्यादेत त्याची पुनरावृत्ती नको. पण त्यानिमित्ताने स्वामीजींची काही सिद्धवाक्ये पुढे आणली आहेत. उदाहरणार्थ-

१. 'आपली सांस्कृतिक आचारपद्धती साधनाप्रधान आहे.'
२. कर्तव्यासाठी थकेपर्यंत प्रयत्न केल्यावाचून देव सहाय्यासाठी येत नाही.
३. अर्थाजनामध्ये दुसऱ्याचे शोषण वा कुणाची वंचना होता कामा नये आणि विषयसेवनामध्ये संयम आणि नीतिमर्यादेचे पालन असलेच पाहिजे.
४ हात पाठीमागे बांधून केवळ छाती पुढे काढून शत्रूपुढे उभे राहणे ही आत्महत्या आहे. त्यालाच खरे शौर्य, धैर्य मानणे हा विचाराचा भोंगळपणा आहे.
५. धार्मिकतेला शोभणारे काही नियम आपल्याही जीवनाचे स्वाभाविक अंग होणे आवश्यक आहे.
६. स्वत्व प्रकट करण्याकरिता व्यापक संघटनेच्या दृष्टीने बहुजनांच्या भावनेचा विचार करता लहान-सहान गोष्टीलाही महत्त्व असते.
७. आमच्या धर्माचरणाचा आहार आम्हास रोगग्रस्त होऊ देत नाही.
८. समोर काही उद्दिष्ट असल्यावाचून केवळ परिवर्तनाला काही अर्थ नसतो आणि असलाच तर तो विनाशाकडे नेणारा असतो.
९. अध्यात्म हे सत्याचेच दुसरे नाव आहे, व्यवहाराच्या पातळीवर मात्र अध्यात्म हे मोक्षोन्मुख असते तर धर्म अर्थकामांचा नियंत्रक असतो.
१०. भारत हे अत्यंत प्राचीन काळापासून एक एकसंध राष्ट्र आहे. आम्हांला अखंड हिंदुस्थान तो प्राचीन भारत राष्ट्रकल्पनेने अपेक्षित आहे.

या आणि अशा असंख्य सिद्धवाक्यांनी पुस्तिका गच्च भरली आहे. पू. स्वामीजी सिद्ध पुरुष होते. त्यांचे उद्गार हे सिद्धवाक्येच आहेत. म्हणून ती एकांगी विचार करीत नाहीत. सर्वसमावेशकता यामुळेच ठायीठायी आढळते.

'धनधान्याच्या समृद्धीसवेच माणसाच्या हृदयातील माणुसकीला शोभणारे सौजन्य, सहिष्णुता, तेजस्विता, नैतिकता, बहुश्रुतता हे भाव वाढले पाहिजेत, तरच त्या वैभवाला अर्थ आहे.' हे स्वामीजींचे वचन जीवनाचा समतोल दाखविणारे आहे. आपल्या दर्शनशास्त्रात सगळीकडेच 'समत्वाला' फार महत्त्व आहे.

**मातृभूमि आणि परमेश्वराला मागणे :** शील आणि अजिंक्य शक्ती प्रार्थनेत मागितली आहे. हे दीर्घजीवी व्हायचे असेल तर न्यायप्रवणतेची आवश्यकता स्वामीजी प्रतिपादतात. भेदाभेदांनी पोखरलेला समाज, एखाद्या गटावर अन्याय करणारा समाज, काही गटांचेच हित साधणारा समाज न्यायप्रवणतेशिवाय एकसंध होत नाही, आणि विखुरलेला समाज परकीय आक्रमकांचे भक्ष्य होतो हे त्रिकालाबाधित सत्य दुर्लक्षिले तर अनर्थ ओढवतोच.

पुस्तिकेचा शेवट फार हृद्य आहे. भ्रष्टाचार, अपराधी प्रवृत्ती, स्वार्थलोलुपुता, द्वेष-मत्सर यांना वाव नसलेला आणि 'सर्वेऽपि सुखिन: सन्तु सर्वे सन्तु निरामया:।।' हा अनुभव समाजातील सर्व स्तरांना देणारा संघटित समाज हवा असे प्रतिपादन आहे. त्यासाठी आम्ही प्रयत्न करू असे स्वामी सांगतात. पू. स्वामीजींच्या व्याख्यानावर अधिक काही बोलणे, लिहिणे मर्यादाभंग आणि उद्धटपणा ठरेल, वाचकांनी अधिक उण्याची माफी द्यावी.

**श्री. रमेश माधवराव पांडव**
लहुजी स्मृती, ४७ मायानगर, एन-२,
सिडको, संभाजीनगर ४३१००१
भ्रमणध्वनी : ९७३००८१६६१

●●●



# प.पू. अप्पानिर्मित संस्था

संग्रहित माहितीवरून

श्रीदासगणु महाराज प्रतिष्ठान (श्रीक्षेत्र गोरटे प्रतिष्ठान) मु.पो. गोरटे मार्गे उमरी, जि. नांदेड.

संतकवी दासगणु महाराजांची वस्त्रसमाधी श्रीक्षेत्र गोरटे येथे आहे. गोरटे संस्थानचे कार्य सांभाळण्यासाठी ती संस्था पू.अप्पांनी १९७४ साली पंजीकृत केली.

प्रतिष्ठानमध्ये पू.अप्पांनी घालून दिलेल्या नियमानुसार दररोज ठरलेल्या वेळी, ठरलेले कार्यक्रम होतात. त्याचा क्रम असा - सकाळी ध्यान मंदिरामधील प्रार्थना, ध्यान, जपानंतर श्रीदासगणू महाराज यांच्या समाधीसमोर प्रार्थना, त्यानंतर पूजा व आरती, सायंकाळी नित्य भजन व आरती आणि रात्री श्रीविष्णूसहस्रनामाचा पाठ.

**प्रतिष्ठान निर्मितीचे त्यांचे उद्देश पुढीलप्रमाणे होते–**

१) प.पू. दासगणुमहाराज व अन्य संतांच्या जीवनकार्याचा प्रसार करणे. त्यामुळे समाजाचे व्यक्तीचे जीवन सर्वार्थाने उज्ज्वल व्हावे. ईश्वरभक्ती वाढीस लागावी.

२) प.पू. दासगणु परंपरेतील श्रीरामनवमी, परशुराम जयंती, नृसिंह जयंती, दशहरा, श्रीवामनशास्त्री पुण्यतिथी, श्रीकृष्ण जन्म, श्रीसाईनाथ पुण्यतिथी, श्रीज्ञानेश्वर पुण्यतिथी, श्रीदासनवमी, श्रीतुकाराम बीज, श्रीनाथषष्ठी, अधिकमास इत्यादि उत्सव पूजा, अभिषेक, प्रार्थना, कीर्तन, अन्नदान अशा स्वरूपांत साजरे करणे.

३) गोरटे हे जत्रेचे स्थान होऊ नये तर साधना केंद्र म्हणून जोपासले जावे.

पू. अप्पांच्या या उदात्त हेतूंना यशाची प्राप्ती होत आहे. त्यासाठी प्रतिष्ठानचे सदस्य सदैव कार्यरत असतात. प्रामाणिक जिज्ञासू साधकांना साधनेसाठी एक शांत, पवित्र स्थान प्राप्त व्हावे, या ठिकाणी येऊन साधकांनी आपली पारमार्थिक प्रगती साधावी असा प्रयत्न असतो. प्रतिष्ठानतर्फे वर्षातून एकदा वेगवेगळ्या गावी पारमार्थिक शिबिर आयोजित केले जाते.

पू.अप्पांच्या समाधी नंतर म्हणजेच इ.स. २००२ नंतर गोरटे प्रतिष्ठानात 'वरद चिंतनिका' स्थापन करण्यात आली. तेथे पू.अप्पांच्या ग्रंथांचे तसेच इतर संत वाङ्मयाचे वाचन करण्याची सोय उपलब्ध आहे. प्रतिष्ठानच्या आवारात पू. अप्पांचे स्मृतिदालन उभे करण्यात आले आहे. तिथे पू.अप्पांच्या चित्ररूप दर्शनाचा लाभ मिळतो.

पू. अप्पांनी सुरू केलेले हे कार्य जोमाने सुरू आहे.

**श्रीराधादामोदर प्रतिष्ठान**
**संत विद्याप्रबोधिनी**
'प्रतीक', ४०३/१, शनिवार पेठ, मेहुणपुरा, पुणे ४११०३०.
दूरध्वनी : (०२०) २४४९२४९७



दासगणु प्रतिष्ठान, गोरटे– सभामंडप



गोरटे येथील प्रतिष्ठानचे प्रवेशद्वार

पू. अप्पांची कीर्तने, प्रवचने, विचार प्रधान व समाजजागृती करणारी असत. त्यामुळे त्यांना स्थायी स्वरूप लाभण्याच्या दृष्टीने त्यांचे वाङ्मय प्रसिद्ध करण्याची कल्पना पुढे आली. यासाठी दासगणु-परिवारातील ज्येष्ठ सुहृद्-शिष्यपरिवाराचा फार आग्रह झाला आणि त्या कल्पनेला १९८२ मध्ये मूर्तरूप प्राप्त झाले. 'श्रीराधादामोदर प्रतिष्ठान' या संस्थेची स्थापना झाली. या प्रतिष्ठानाला प्राप्तिकर खात्याकडून ८०-जी प्रमाणपत्रही मिळालेले आहे. गेली २७ वर्षे ही संस्था अध्यात्माच्या क्षेत्रात कार्यरत आहे.

**श्रीराधादामोदर प्रतिष्ठानची उद्दिष्टे :**

१. सर्व धर्मातील अध्यात्मविषयक कल्पनांचा परस्परांशी समन्वय साधणे.
२. तदनुषंगिकतेने आवश्यक अशा ग्रंथांचे लेखन-संपादन- प्रकाशन करणे.
३. अध्यात्म विषयांतर्गत विविध प्रकारचे संशोधन करणे व तसे कार्य करणाऱ्या संस्थांशी संपर्क करणे.
४. धर्म, संस्कृती, लोकजागरण इ. विषयांमध्ये परिसंवाद, सभा, चर्चासत्रे, शिबिरे अथवा व्याख्याने आयोजित करणे. विविध धार्मिक ग्रंथांची, संतांच्या ग्रंथांची पारायणे करणे, त्यावर मान्यवर अभ्यासकांची प्रवचने घडवून आणणे. प्राचीन आयुर्वेद शास्त्रासंबंधी संशोधन- अध्ययन- अध्यापन व लोकजागृती करणे, त्यासाठी आवश्यक तर ग्रंथनिर्मिती करणे, स्फुटलेखन स्पर्धांचे आयोजन करणे. इ.
५. ग्रामीण विकास योजना हाती घेणे, चालवणे वा अशा विकास योजनेला सहाय्य करणे.
६. गरीब होतकरू विद्यार्थ्यांना उचित अशी मदत करणे.

ही सर्व उद्दिष्टे सफल व्हावीत अशा प्रयत्नांचा पहिला भाग म्हणजे प्राचार्य आठवल्यांची ग्रंथसंपदा प्रकाशित करणे. यासाठी प्रारंभ केला तो त्यांच्या सद्गुरूंच्या 'गुरुचरित्र सारामृत' या ग्रंथापासून. आजवर प्राचार्यांचे ५०च्या वर ग्रंथ प्रतिष्ठानने प्रकाशित केले आहेत.

याच काळात असेही ध्यानात आले की समाज-मानसात पारमार्थिक दृष्ट्या समानतेची गुढी उभारून सर्व समाज जागृत होईल अशी आचारपद्धती संतांनी अवलंबिली. तरीही काही विद्वान मंडळी संतवाङ्मयावरही आक्षेप घेतात, कुतर्क लढवितात. हे सारे टाळण्यासाठी प्रतिष्ठानने एक पाऊल पुढे टाकले आणि श्रीराधादामोदर प्रतिष्ठानची आणखी एक शाखा निर्माण केली. तिचे नाव 'संतविद्या प्रबोधिनी'. या प्रबोधिनीचे उद्देशही तसेच आहेत.

१) संत वाङ्मयाचा सखोल अभ्यास करणे, २) आक्षेपांचे निराकरण करणे, ३) संस्कार वर्ग चालवणे, ४) संतांच्या ग्रंथांची पारायणे घडविणे, ५) भारत-भागवतादि ग्रंथांच्या आधारे परंपरांचे रक्षण करणे, ६) समाजजागृतीसाठी आणि राष्ट्रविचाराच्या जागृतीसाठी विविध विषयांवर परिसंवाद घेणे इत्यादि. उपरोक्त दोन्ही संस्थांचे कार्य उत्तमप्रकारे चालू आहे. प.पू. अप्पांचे तसेच संतकवी प.पू. दासगणू महाराजांचे समग्र ग्रंथ मिळण्याची ठिकाणे पुढीलप्रमाणे....

१) **श्रीराधादामोदर प्रतिष्ठान**
वैद्य वा. वि. मेहेंदळे (दूरध्वनी - ०२०-२४४९२४९७)
श्री. प्र. वि. मेहेंदळे (दूरध्वनी - ०२०-२४४५५३६५)
'प्रतीक' ४०३/१ शनिवार पेठ, मेहुणपुरा,
अश्विनी मेडिकल्स समोर, पुणे ४११०३०.

२) **श्रीदासगणु महाराज प्रतिष्ठान**
मु.पो. गोरटे- ४३१८०७
व्हाया उमरी, जि. नांदेड,
दूरध्वनी : ०२४६७-२०२५१४

३) **वि. वा. ग. प्र. परांजपे**
१३२७, ई, सदाशिव पेठ, विठ्ठल नगरी, पुणे ४११३०
दूरध्वनी : ०२०-२४४७११०९

४) **यशवंत प्रकाशन**
७५३, सदाशिव पेठ, सदाशिव पेठ हौदाजवळ, पुणे ४११०३०
दूरध्वनी : ०२०-२४४७०५३३

५) **श्री. सु. द. काचरे**
श्रीराम मंदिर, भांगरवाडी, लोणावळा - ४१०४०१
जि. पुणे. फोन : ०२११४-२७५४७९

६) **सौ. मीना रमेश वाटवे**
जयप्रसाद रेसिडेन्सी, ब्लॉक क्र. १७, जुनी पंडित कॉलनी,
नाशिक - ४२२००२. दूरध्वनी : ०२५३-२३१३२६२

•••


संजीवन - गोरटे, प्रवेशद्वार



प्राचार्य अ. दा. आठवले-तथा स्वामी वरदानंदभारती यांची ग्रंथसंपदा
• आयुर्वेदीय रचना
१. निदानपंचक २००
२. व्याधिविनिश्चय ९१०
३. अष्टांग संग्रह १०५६ (इंदूटीकायुक्त)
• भाष्य ग्रंथ
• विवेचक ग्रंथ
• महाकाव्ये व अन्यरचना
• अनुवादरचना
• कीर्तन विषयक
• संपादक व चरित्रलेखन
५१ १) श्रीदासगणूमहाजांचे चरित्र व काव्यविवेचन (५४०)
२) संपादन: दासगणूमहाराजांच्या समग्र
५२ ते वाङ्मयाचे दहा खंडात प्रकाशन
६२ डेमी पृ.(५५७३)
खंडणमंडणात्मक
२४ महाभारताचे वास्तवदर्शन (३८०)
२५ वाटा आपल्याहिताच्या (२७०)
२६ यक्ष प्रश्न (११०)
निवेदनात्मक
२७ भगवान श्रीकृष्ण एकदर्शन (३३५)
२८ हिंदूधर्मसमजून घ्या (५२)
२९ संघप्रार्थना (८०)
शंकराचार्यप्रणीत
३० साधक साधना (२७०)
३१ निर्वाणषटक (२४)
३२ साधकाची चिंतनिका (४६)
३३ आत्मानुसंधान (४८)
प्रस्थानत्रयी
४ ब्रह्मसूत्रार्थ दर्शिनी (३६ + ३९२) (डबल क्राऊन)
उपनिषदर्थ कौमुदी (पांचखंड)
भगवद्गीता (१८ अ.)
२३ मनुस्मृती सार्थसभाष्य (११००) (डबल क्राऊन)
पहिला ५ (४१८) ईशावास्य मांडुक्य
दुसरा ६ केन, कठ, प्रश्न, मुंडक, ऐतरेय, तैतीरीय (६१८)
तिसरा ७ छांदोग्य (६१०)
चौथा ८ बृहदारण्यक (४८०)
पाचवा ९ श्वेताश्वतर + महानारायण (४४७+२४+७८)
१० ते २२ अठराही अध्यायांवरील विवेचनाचे १८ ग्रंथ (३१३०)
३४. अनुवाद ज्ञानेश्वरी (पृ.१०७०) ओवी संख्या १०२९६
३५. नारद भक्तिसूत्र ओवी संख्या ९९
३६. वि.स.नाम (१४४)
३७. गंगालहरी ओवीबद्ध (५४)
३८. महिम्नानुवाद (१६)
४६ पूर्वरंग तरंग (१५२)
४७ पूर्वरंग तरंगिणी (१८१)
४८ रूक्मिणी स्वयंवर आख्यान (४८)
४९ राजदाहीर (६४)
५० लोकमान्य टिळक (६४)
३९. श्रीकृष्णकथामृत (१८ सर्ग) (३२५) पादाकुलकछंद.
४०. शालिवाहन (अपूर्ण १५ सर्ग) ५२२०
४१. भावार्चना-त्यांच्या भाव-कवितांचा संग्रह पृ.१९५
४२. रूक्मिणी स्वयंवर ओवीबद्ध (४८)
४३. सद्गुरूपूजा-ओवीबद्ध (२०)
४४. स्वराज्याचा पोवाडा (१६)
४५. राष्ट्रसंरक्षण पोवाडा (२४)



।। श्रीशंकर ।।

# वरदा हे वरदानहि दे

ॲड. विनायकराव नांदेडकर

बालपणापासून श्रीदासगणू महाराजांचा सहवास.
गोरटे येथील 'दासगणु प्रतिष्ठान' ट्रस्टचे विश्वस्त सचिव.

स्मरणहि तव संजीवन आम्हां तव तेजातिल अंशहि दे ।
कार्य चालवू पुढे निरंतर, सेवेचे वरदानहि दे ।।ध्रु।।

प्रेमबीज रुजविले तव हृदीं गणुदासांनी वाढविले ।
वर्षावाने त्या प्रेमाच्या तृप्त जाहलो आम्हि सगळे ।।
प्रेम नसे स्वार्थात, असे ते त्यागातची, हे उमजू दे ।।१।।

कार्य योजिले पूर्ण कराया कसुर न केली तसुभरी ही ।
निश्चय दृढ तो दक्ष सर्वदा, यशहि मिळविले सर्वपरि ।
तशी कुशलता आम्हास लाभो, अभ्यासाचे भानहि दे ।।२।।

मस्तक झुकणे नसेकि पूजन, असे सदा ते आचरणीं ।
तव ग्रंथांच्या घडण्यासाठी, खचित असो अमुची करणी ।
आळसादि दुर्गुणास थारा नसो, ऐसी सद्‌बुद्धि दे ।।३।।

अपात्र आम्ही सुपात्र ठरलो तुझीच केवळ कृपा खरी ।
अपेक्षेत परि कमीच पडलो खंत सदा बोचते उरी ।
ध्येय पूर्तीच्या कार्यासाठी सोशिकपणा अन् धैर्यहि दे ।।४।।

देव देश अन् धर्मासाठी जागृत केले 'हिंदूंना'।
दिली प्रेरणा संस्कृति रक्षणि बांधुन दिधली संघटना ।
पुनरपि वैभव वाढविण्यास्तव सज्जनशक्ति घडवू दे ।।५।।

ज्ञाना नामा एका यांचा संगम तंव हृदि देखियला ।
धीर विवेकी राष्ट्रसंत तो रामदासहि अनुभविला ।
टिळक विनायक हेही दिसले रूप सदा हृदि राहू दे ।।६।।

मिटो भाबडेपणा मनीचा कार्यनिष्ठता वाढू दे ।
आदेशा सम घडो आचरण मनबुद्धि स्थिर राहू दे ।
विनायकावर कृपा असे तव सावलीत त्या राहू दे ।
कार्य चालवू पुढे निरंतर सेवेचे वरदानहि दे ।
वरदा! हे वरदानहि दे ।।७।।

ॲड. विनायकराव नांदेडकर
महावीर चौक, पुंडलिक वाडी, नांदेड ४३१६०१
फोन : ९३७२७५७५७२



# धावली हो, पावली हो, ही विठाई माऊली

पू. अप्पांना हिमालयाचे आकर्षण वयाच्या चाळीशीपासून होते. त्यांनी चारीधाम यात्रा केल्या होत्या. हिमालयाच्या सान्निध्यात राहाणे त्यांना फार आवडे. श्रावण वद्य ११ शके १८९३ म्हणजेच दि. १६ ऑगस्ट १९७१ रोजी गंगोत्री येथे त्यांना श्रीवरदनारायणाचे दर्शन झाले. त्यांच्या जीवन सार्थकतेचा तो क्षण होता. पंढरपुरातील विठूमाऊली आपल्याला भेटण्यासाठी धावत आली. तिने आलिंगन दिले. आपले म्हटले. आपल्यामध्ये सामावून घेतले. असा त्यांचा उत्कट भाव. अशा अलौकिक तृप्तीचा स्वानुभव त्यांच्याच शब्दात...

धावली हो पावली हो ही विठाई माऊली ।
चंदनाने मोगऱ्याची माळ कंठी घातली ।।धृ.।।

कस्तुरीने कुंकवासी भाळभागी रेखिले ।
सूर्यतेजे चांदण्याने सर्व अंगा माखिले ।।
दूध गायीचे पिपासा अमृताची भागवी ।
उन्मनी जी तुर्यगा ती जागृतीसी जागवी ।।
खंत ती चिंतावली ही तृप्तता लाचावली ।।१।।

भास्कराने काजव्यासी कौतुके आलिंगिले ।
थेंबुट्यासी सागराने स्थान पोटी दीधले ।।
उर्ध्वगा होऊन गंगा सीकराने आळशी ।
न्हाणिते की प्रेमभावे ती सुखे वर्णू कशी ।
वासरासी कामधेनू माय ती पान्हावली ।।२।।

विश्वरूपे अर्जुनाचे भाव जे ओसंडले ।
नाचली जी शैलजेच्या सन्मुखी शिवपाउले ।।
वेद–वाणी–माधुरी वा मूर्तरूपे वर्षते ।
एकदाचि स्पर्श सारे अंग नेती धन्यते ।
ही सुखे सारी अनंते पूर्ण चित्ती भोगिली ।।३।।

श्रावण व. ११, १८९३ गंगोत्री

# पू. अप्पांची निरोपाची कविता

श्रीशंकर

आम्ही जातो अमुच्या गांवा।
अमुचा रामराम घ्यावा॥

संत तुकोबा बोलती।
त्याची येणार प्रचीती॥
साक्षी ठेवुन तुम्हां संतां। देह सोडितो हा आता॥
देह झाला व्याधि क्षीण।
गळून पडे पिकले पान॥
त्याचे दुःख ना करावे।
हा तो निसर्ग जाणावे

'मी' म्हणजे ना शरीर
'मी' मद् ग्रंथाचा संभार

त्याचे वाचन चिंतन।
यथाशक्ती आचरण॥

हीच गुरुपूजा खरी।
नीट धरावे अंतरी॥

दिवस आज भाग्याचा।
जीवनाच्या सार्थकाचा॥

भागीरथी करी कृपा। माझ्या पोचवी निरोपा॥

वरद हस्त उभारून। पालवीतो नारायण॥

प्रसन्न मुद्रा ही गोमटी। रिघून राहे तेथे दिठी॥

उत्कंठेचा दाटे भाव। ओढ घेई तेथे जीव॥

नारायणापायी मिठी। वरदानंद दे शेवटी॥

बोला जय जय नारायण। हरितो तो सारा शीण॥

श्रावण वद्य ११-१९२४
उत्तरकाशी.